


॥ श्री ॥

श्रीरुक्मिणीपांडुरंगौ विजयेतेतराम्

# प्रायश्चित्त व्यवहार प्रकाश.

अथवा.

## हिंदुधर्म शास्त्र दर्पण.

मराठी भाषांतरासहित.

हें पुस्तक.

विठ्ठल दाजी शास्त्री धारूरकर.

यांनीं.

प्राचीन अनेक धर्म शास्त्रीय ग्रंथांच्या आधारानें तयार करून.


मुंबई येथें "जगदीश्वर" छापखान्यांत छापविलें.

आवृत्ती १ ली.





शके १८३० कीलकनाम संवत्सरे.





किंमत रुपये २॥ शिवाय टपाल हांशील आहे.



॥ श्री ॥

श्रीरुक्मिणीपांडुरंगौ विजयेतेतराम्

# प्रायश्चित्त व्यवहार प्रकाश.

अथवा.

## हिंदुधर्म शास्त्र दर्पण.

मराठी भाषांतरासहित.

हें पुस्तक.

विठ्ठल दाजी शास्त्री धारूरकर.

यांनीं.

प्राचीन अनेक धर्म शास्त्रीय ग्रंथांच्या आधारानें

तयार करून.

मुंबई येथें "जगदीश्वर" छापखान्यांत छापविलें.

आवृत्ती १ ली.



शके १८३० कीलकनाम सवंत्सरे.



किंमत रुपये २॥ शिवाय टपाल हांशील आहे.

श्री

## पुस्तकें मिळण्याचा ठिकाणा.

जिल्हा सोलापुर, तालुके पंढरपुर, येथें चाटे आळींत रामचंद्र विठ्ठल शास्त्री धारूरकर यांजकडे मिळतील.




॥ श्रीपांडुरंगः प्रसन्नोस्तु ॥

# प्रस्तावना.

प्राचीनकाळीं त्रिकाळज्ञानसंपन्न, परमकारुणिक, अशा ऋषिमंडळींनीं जगाच्या कल्याणा-करितां सर्वशास्त्रावर अनेकग्रंथ लिहिले. तसेंच सर्वलोकांच्या स्थितीस आणि परम सुखास कारण जो धर्म त्या संबंधानें तर पुष्कळ ग्रंथ लिहिले आहेत. ते फारच मोठे आणि गहन असल्या कारणानें साधारण संस्कृतज्ञमनुष्यास देखील समजण्यास अडचण पडते. धर्मशास्त्राचेः--**आचार, व्यवहार, प्रायश्चित्त** असे तीन भाग आहेत. **आचारप्रकरणांत** व्रतोप-वास दिवस, आन्हिक, संस्कार, उभयलोकाच्या सुखोपत्तीस कारणीभूत अशा धर्माचरणाचा विचार सांगितला आहे. **व्यवहारभागांतः**--प्रपंचिकासंबंधानें अठरा प्रकारचे दायविभागादि-प्रकार यांचा विचार सांगितला आहे. **प्रायश्चित्त भागांतः**--मनुष्याच्या हातून जीं पातकें होतात, त्याचे परिहारोपाय सांगितले आहेत. आचारसंबंधाचे ग्रंथ मराठींत झालेले बरेच दिसतात. परंतु **प्रायश्चित्त आणि व्यवहार तसेंच द्रव्यशुद्धी** ( अशुद्ध झा० या पदार्थांची शुद्धी करून घेणें. ), **कर्मविपाक** ( पूर्वजन्मीं केलेलीं जीं अशुभकर्में त्यां पासून होणारे ज्वरादिक रोग, दारिद्र्य, संतती नसणें, इत्यादि दुःखें यांचा निर्णय व परिहारोपाय सांगितलें आहेत. ) या विषयासंबंधानें सुलभ आणि मराठीभाषांतर झालेलें, असे पुस्तक पाहण्यांत नाहीं. व हे विषय मनुष्यमात्रास सदोदित लागतात. त्यामुळें बरीच अडचण पडते. हें मनांत आल्यावरून या विषयांचें आजमासें पन्नास, पंचावन्न, ग्रंथ एकत्र जमवून त्यांतील वचनांच्या आधारानें या ग्रंथाची रचना केली आहे. आणि संस्कृतानभिज्ञ लोकांसही उपयोग व्हावा, या हेतूनें मराठी भाषांतरही केलें आहे. सांप्रतकाळीं विद्यावृद्धीकडे बहुतेक लोकांचें लक्ष लागत चाललें आहे. ही मोठी आनंदाची गोष्ट आहे. परतु जसे लोक राजविद्येकडे परिश्रम घेतात, त्या प्रमाणें आपल्या धर्मग्रंथांकडे कालमानानें त्यांचें कमीच लक्ष्य हटलें तरी चालेल. तथापि दहाबीस वर्षांच्या पूर्वी च्याकालापेक्षां यावेळीं आपल्या धर्माकडे लोकांचें लक्ष कांहींसें वळत चाललें आहे. ही मोठी आ-नंदाची गोष्ट आहे. वास्तवीक विचार केला असतां आपले धर्मग्रंथ हे केवळ कल्पवृक्षच आहेत यांचें ज्ञान झालें असतां बहुत करून मनुष्य व्यवहारामध्यें दक्ष होऊन राजविद्येपासून जें मिळणारें सुख त्या पेक्षां अधिक सुखी असा होईल यावेळीं अशा धर्मसंबंधाच्या पुस्तकाची आवश्यक तामनांत आणून भाषांतरसहित हें पुस्तक केलें आहे. सर्वलोकांनीं हाग्रंथ एकवार वाचून पाहिला असतां, आमचे झालेले श्रम सफळ होतील, आणि शास्त्रानें ज्या क्रमानें प्रायश्चित्त सांगितलें

आहे, तें कृत्य करूं नयें असें सहजच वाचकांचें लक्षांत येईल. या पुस्तकांत च्यार भाग आहेत, **प्रथम भागांत** ब्रम्हहत्यादिमहापातकें, तत्समपातकें, अतिपातकें, जातिभ्रंशकर, संकलीकरण, मलिनीकरण, अपात्रीकरण, उपपातकें, प्रकीर्णकपातकें, इत्यादिक पातकांचा विचार सांगून त्या त्या पातकास प्रायश्चित्तें सांगितली आहेत. **दुसरे भागांत** द्रव्यशुद्धीचा विचार ह्मणजे कोणताही पदार्थ अशुद्ध झाला आसतां, तो कशारीतीनें शुद्ध करून घ्यावा हें सांगितलें आहे. **तिसरे भागांतः**—कर्मविपाकनिर्णय सांगितला आहे. **चौथे भागांतः**—दायविभाग, दत्तकनिर्णय, ऋणादान, सभूयसमुत्थान इत्यादिक अठराप्रकारचे व्यवहार सांगितले आहेत. वास्तवीक विचार करितां माझाइतका अधिकार नाहीं, परंतु उपास्यदेव जो श्रीपांडुरंग त्यांच्याच कृपेचें हें फळ असावें. यापुस्तकांतील सर्वविषय अनुक्रमणिकेवरून वाचकांस सहज लक्षांत येतील. यांतील गुण दोषांचे विवेचन विद्वानमंडळी हंसक्षीरन्यानें करतील. हाविषय धर्मशास्त्राचा असल्या मुळें जे कांहीं चुकून दोष राहिले असतील ते मलाविद्वज्जनांनींकळवावेत. म्हणजे मी द्वितीय आवृत्ती मध्यें दुरस्त करून लिहीन.

यापुस्तकास बरेच विद्वानांचें अभिप्रायमिळाले आहेत त्यांतील कित्येक लगत जोडले आहेत. या पुढील धर्मशास्त्राचें दुसरें पुस्तक आहे त्यांत दानप्रकरण, शांतिप्रकरण, सर्व शाखेस उपयोगि याज्ञिकप्रकरण, उद्यापनप्रकरण सांगितलें आहे हें पुस्तक बरेंच लिहिले आहे श्रीपांडुरंग आणि ब्रम्हवृंद यांच्या चरणकृपेने छापविण्यास आश्रय मिळून लवकरच प्रसिद्ध होवो अशी श्रीविठ्ठापाशी सविनय प्रार्थना आहे.

मिती शके १८३० वैशाखशुद्ध १०

**विठ्ठल दाजी शास्त्री धारूरकर पंढरपूर.**
ग्रंथकर्ते

नंबर.
१२९६




संस्थानचा मुक्काम
सोलापूर.
तारिख ११-४-०७.

॥ श्रीमत्परमहंसपरिव्राजकाचार्यवर्यपदवाक्यप्रमाणपारावारपारीण यमनियमासन प्राणायामप्रत्याहारध्यानधारणासमाध्यष्टांगयोगानुष्ठाननिष्ठतपश्चक्रवर्त्यनाद्यविच्छिन्न गुरुपरंपराप्राप्तषड्दर्शनसंस्थापनाचार्यव्याख्यानसिंहासनाधीश्वरसकलवेदार्थप्रकाशक सीरुपन्नयीप्रतिपालकसकलनिगमागमसारहृदयवैदिकमार्गप्रवर्तकसर्वतंत्रस्वतंत्रादिराज धानीश्रीमद्विद्यानगरमहाराजधानीकर्नाटकसिंहासनप्रतिष्ठापनाचार्यश्रीमद्राजाधिराजगुरुमंडलाचार्यतुंगभद्रातीरवासऋष्यशृंगपुरवराधीश्वरश्रीशृंगेरिश्रीमद्विद्याशंकरपादप आराधकश्रीशृंगेरिश्रीशिवगंगाश्रीगंगाधरभारतीस्वामिनांकरकमलसंजातश्रीशृंगेरि श्रीशिवगंगाश्रीसुब्रह्मण्याभिनवसच्चिदानंदभारतीस्वामिभिः ॥

अस्मदत्यन्तप्रियमुख्यशिष्य रा. रा. विठ्ठल दाजी शास्त्री
धारूरकर मु० पंढरपूर.

विषयें श्रीनारायणस्मरणपूर्वक विरचिताशिषःसमुल्लसन्तुतरांआसेतुहिमाचलप्रसिद्धात्रभवत् श्रीमच्छंकरभगवत्पादपूज्यपीठविषयिणीभक्तिरनवधिकश्रेयोनिदानमिति सार्वजनीनमेतत्साम्प्रतम्.

आपण लिहिलेला प्रायश्चित्तव्यवहारप्रकाशग्रंथ अवलोकन होऊन व आपली विद्वत्ता पाहून परम संतोष जाहला सदरहु ग्रंथ धर्मशास्त्रीयग्रंथांच्या आधारानें तयार केला असल्यामुळें तो फार लोकोपयोगी झाला आहे व प्रायश्चित्तादिविचारास आधारभूत आहे सबब तो आम्ही मान्य केला आहे. इत्येषा नारायणस्मृतिः यापुढे तेलगभाषेंत श्रींची हस्ताक्षरें आहेत.

॥ श्री. ॥

वे. शा. रा. रा. विठ्ठल शास्त्री धारूरकर यांणीं केलेला "प्रायश्चित्तव्यवहार प्रकाश,, नामक ग्रंथ आम्ही वाचून पाहिला त्यांत प्रायश्चित्त व व्यवहार या बद्दल दिलेली माहिती साधार असून पुष्कळ परिश्रमानें गोळा केलेली आहे व श्लोकार्थांचा मराठी भाषांतर दिलें असल्यामुळें निवळ मराठी वाचकांसही धर्मशास्त्राचीं सामान्य तत्वें सुलभरीतीनें लक्षात येण्या सारखीं आहेत. हायकोर्टाचे निवाड्यांनीं व्यवहारात काहीं फरक पडला आहे तथापि शास्त्राचीं मूळवचनें कोणतीं हे लक्षांत येण्यास हा ग्रंथ उपयोगी पडेल सारांश सर्वांस उपयोगी पडण्या सारखा हा ग्रंथ झाला असून तो लोकाश्रयास पात्र आहे अशा प्रकारची माहिती

एवढ्या परिश्रमानें गोळा करणारे विद्वान् शास्त्री आमच्या प्रांतात. तरी कमी आहेत व तशा दृष्टीनें पाहिलें तरी ही विठ्ठलशास्त्री यांचा उद्योग लोकांस उपयुक्त व त्यांस भूषणावह आहे.

पुणें — बाळ गंगाधर टिळक.

ता. ६ जुलै सन १९०७

श्री

-वे. शा. विठ्ठल दाजी शास्त्री धारूरकर यांनी केलेला ( प्रायश्चित्तव्यवहारप्रकाशनामक ) ग्रंथ संपूर्ण पाहिला हा ग्रंथ फार लोकोपयोगी झाला आहे. . अनेकप्राचीनधर्मशास्त्रग्रंथाची मूलवचनें यांत असून सरळ संस्कृत व मराठी भाषांतर उत्तम आहे असें पुस्तक सरळ संस्कृतांत व मराठी भाषेत उपलब्धनाहीं सबब सर्वांनीं संग्रह करण्यास योग्य आहे. शास्त्रिबुवानीं त्या ग्रंथास फार परिश्रम केले आहेत हे यांचे विद्वत्तेस भूषण आहे.

मि. ज्ये. व. ११ शनिवार शके १८२९.

मुकुन्दशास्त्री आडकर डेकनकालेजचे अध्यापक. पुणें

वे. रा. रा. विठ्ठल दाजी शास्त्री धारूरकर यांनी केलेला प्रायश्चित्तव्यवहारप्रकाशग्रंथाची हस्तलिखित प्रत ठिकठिकाणी वाचून पाहिली सदरहू ग्रंथात प्रायश्चित्तप्रकर्ण, द्रव्यशुद्धि, कर्मविपाक, व व्यवहार अशी प्रकर्णे असून सर्व माहिती वचनाधारानें संस्कृतात व मराठीभाषेत दिली आहे हा ग्रंथ धर्मशास्त्र माहित होण्यासाठीं फार उपयोगी पडेल असें मला वाटतें. प्रत्येक विषयासंबधानें सर्वतऱ्हेने मूळ वचनाचा शोध लावून विचार केला आहे. व्यवहारसंबंधानें जरी हायकोर्टाच्या ठरावाच्या विशिष्ट बाबतीत विशिष्टशास्त्रार्थच कायम झाला आहे. तथापि एकंदर मूळ वचनें काय आहेत हें माहित होण्यास विशेषतः मराठी वाचकास सदर ग्रंथ उपयोगी पडेल अशी मला उमेद आहे.

ता. ३१ आक्टोबर सन १९०६.

चिंतामण विनायक वैद्य.

॥ श्रीगणेश ॥

वे. शास्त्रसंपन्न रा. रा. विठ्ठल शास्त्री धारूरकर मु. पंढरपूर यांसी.

स. न. वि. विशेष. आपले “ प्रायश्चित्तव्यवहारप्रकाश नावाचें पुस्तक बरेंच वाचून पाहिलें हें पुस्तक प्राचीनधर्मशास्त्राच्या आधारानें आपण तयार केलें आहे याची रचना प्राचीन पद्धती न सोडतां हल्लींच्या लोकांस उपयुक्त होईल अशी आहे व याचें मराठीभाषांतर केलें असल्यामुळें संस्कृतानभिज्ञलोकांनाही याचा फार उपयोग होणार आहे प्रायश्चित्तव्यवहारांत

असे पुस्तक अद्यापपर्यंत कोठें झालेलें पाहण्यात आलें नाहीं एकंदरीत हें पुस्तक लोकाश्रयास पात्र आहे असें माझे मत आहे. कळावें. ता. २६–१०–१९०६

बाळ शास्त्री उपासनी. पुणें ट्रेनिंग कॉलेज शास्त्री–

वे. रा. रा. विठ्ठल दाजी शास्त्री धारूरकर यांणीं प्रायश्चित्तव्यवहारप्रकाश ग्रंथ अनेक ग्रंथांचें अवलोकन करून केला आहे यात हल्लींचें कालांत या विषया वरील समग्र ग्रंथ पाहण्यास अवसर नसल्याने या ग्रंथापासून फारच मदत होणार आहे शास्त्रीबावांनी विशेष मक्त मेहनत घेऊन हा ग्रंथ तयार केला. हा छापत असतांना मला बरेच वेळा पाहण्यास मिळाला होता. तेव्हा मूळ ग्रंथांतून जें जें प्रमाण होतें तें तेंच घेतलें आहे असें दिसलें एकंदर ग्रंथापासून महाराष्ट्रीयांस असें प्रकारचे विषयांत विशेष मदत होईल व लोकाश्रयास पात्र आहे.

२६–१२–१९०६ व्यंकटेश दामोदर पुणतांबेकर. डि. डे. कलेक्टर नाशिक.

वे. रा. रा. विठ्ठल दाजी शास्त्री धारूरकर.

यांस आपण केलेला प्रायश्चित्तव्यवहारप्रकाश या नांवाचा ग्रंथ उत्तमरीतीनें अवलोकन केला या ग्रंथांत पुष्कळविषयांचा समावेश केला आहे. धर्मशास्त्र, पुराण, इतिहास वगैरे ग्रंथांतील वचनें घेऊन त्या त्या विषयास अनुकूल वचनांची योजना केली आहे मूळ संस्कृत आणि त्याचे खालीं मराठीभाषांतर असल्याकारणानें संस्कृतज्ञमनुष्यांस आणि संस्कृत न जाणणारे मनुष्यासहि प्रायश्चित्तादिविषय समजण्यास बिलकूल अडचण पडणार नाहीं. असें पुस्तक दुसरें उपलब्ध नाहीं सबब हें पुस्तक संग्रहास ठेविल्यानें धर्मशास्त्राचा निर्णय चांगल्या रीतीनें समजण्यास दुसरे पुस्तकाची बहुत करून जरूरी लागणार नाहीं शास्त्रीबोवांनी हें पुस्तक तयारकरण्यास मोठे श्रम घेतले आहेत यापासून लोकोपकार झाला आहे हें याच्या निर्वृत्तेस भूषणावह आहे सबब सज्जन सद्गृहस्थ या पुस्तकास योग्य मदत करतील अशी आशा करीत आहे कळावें मिति वैशाख वद्य ९ रविवार शके १८३०

शास्त्री. जीवराम लल्लुभाई ( रायकवाल ) ( हाय कोर्ट )

वेदशास्त्रसंपन्नपांडुरंगपुरनिवासिधारूरकरेत्युपनामकविठ्ठलशास्त्रिभिर्विरचितंप्रायश्चित्तव्यवहारप्रकाशाभिधंग्रंथमद्राक्षमयंग्रंथोधर्मशास्त्रीयग्रंथसारभूतोमूलवचनपरिबृंहितो महाराष्ट्रभाषांतरसमन्वितः समीचीनतमश्चवर्ततेऽस्मादज्ञातधर्मशास्त्राणांज्ञातधर्मशास्त्राणां विदुषांचमहानुपकारोभवेत् सर्वेषांसंग्रहार्होवर्ततेअलमतिपल्लवितेन

सम्मतिरत्रार्थे मुकुन्दतनुजुषो ज्येष्ठारामशर्मणः वैशाख कृष्णे १० सोमे शके १८३०

विदितमेतत्सर्वविदुषांसांप्रतकालेधर्मशास्त्राध्ययनं तद्विचारस्तदवलोकनंचग्राहकाभावादस्तप्रायमिवप्रतीयतेतस्मिन्नतिविकटेसमयेपदेभिर्वेदशास्त्रसंपन्नैर्दाजिसूनुभिर्धारूरकरेत्युपाह्वयैर्विठ्ठलशास्त्रिभिः प्रायश्चित्तव्यवहारप्रकाशाख्यस्यपुस्तदेशभाषासंवलितस्यधर्म

शास्त्रस्यसंग्रहः—कृतःतेनैतेनादृष्टधर्मशास्त्राणां द्विजानामुपकारसंभावनाशास्त्रीयधर्मप्रचारश्चसंभाव्यः ग्रंथोपिप्रायःस्मृतिशास्त्रानुकूलएवेतिविभावनीयंसुधीभिरितिशम्.

पंडित चंद्रभान्वात्मजोनातुरामशर्मा अध्यापकः संस्कृतस्य एलिफन्स्टन् कॉलेज मुंबईस्थराजकीयमहत्त्यापाठशालायाम् एकोनविंशतिशताधिकचतुःषष्टितमेवैक्रमेब्दे फाल्गुनशुक्लपूर्णिमायाम्. तारिख १७ मार्च सन १९०८.

॥ श्री ॥

श्री मद्वेदशास्त्रसंपन्न राजमान्य राजश्री विठल दाजी शास्त्री धारूरकर· वास्तव्य पंढरपूर यांस—.

साष्टांग नमस्कार. वि. वि. आपण रचलेला प्रायश्चित्त व्यवहार प्रकाश या नावाचा निबंध आरंभापासून शेवट पर्यंत. वाचून पाहिला. या ग्रंथात प्रायश्चित्त, द्रव्यशुद्धि, कर्मविपाक, व्यवहार या विषयाचा प्रमाणवचनोपन्यासपूर्वक स्पष्ट व सुगमरीतीनें केलेला निर्णय पाहून—मला अतिशय आनंद झाला आजकाली सर्वउपयुक्तविषयाचें एकत्र क्रोडीकरण. करून केलेला सुलभ व अत्युपयुक्त ग्रंथ हा आहे यास्तव विशेषतः अन्यग्रंथावलोकन न करिता सर्व सर्वधर्मतत्वें जाणण्याला हें एक मुख्यसाधन आहे. व खालीं दिलेल्या मराठीभाषांतरानें संस्कृत न जाणणाऱ्या लोकांसहि अत्यंत उपयोगी होईल. आपण परोपकारार्थ केलेला हा स्तुत्य उद्योग आपल्या विद्वत्तेला अत्यंतभूषण आहे कारण हा ग्रंथ. लौकर छापून प्रसिद्ध करावा असी आपणास माझी सविनय प्रार्थना आहे. व या ग्रंथाला सर्वलोकांनीं योग्य मदत करावी. अशी सूचना आहे.

कृष्णा शास्त्री वेट्टगिरी.

शके १८२९ प्लवंग नाम संवत्सरें फाल्गुन शु० १३ चंद्रवार.

शास्त्री रणछोडजी उद्धवजी वैय्याकरण केसरी. } शे. गो. ते संस्कृतपाठशाळा मुख्याध्यापक.

वे. शा. सं शास्त्रीजी विठल दाजी धारूकर क्षेत्र—

पंढरपूरनिवासी यांनीं केलेल्या प्रायश्चित्त व्यवहार प्रकाश यानावाच्या ग्रंथाचें कि येक भाग यांनीं वाचून दाखविले याग्रंथामध्यें प्राचीन धर्मशास्त्राच्या आधारानें आचार तथा व्यवहार विषयाचा निर्णय येत आहे तथा प्राचीनऋषीं मंडळींनीं केलेल्या ग्रंथातील प्रमाण वाक्याचा मोठा संग्रह केला आहे. धर्मशास्त्राची चर्चा करणाऱ्या विद्वान् मनुष्यांस हा ग्रंथ फार उपयोगी आहे हा ग्रंथ तयार करण्यास शास्त्रीबोवास फार श्रम पडले आहे तथा मोठे धैर्यानें आपला वेळ आणि द्रव्य याचा व्यय करून या—उपयोगी ग्रंथाची रचना केली आहे. या मुळें लोकोपकार केला आहे. सबब विद्वान धनीक लोकांनीं यांस उत्तेजन द्यावें धर्मशास्त्राचा विचार करण्याम हा ग्रंथ उपयोगी आहे. म्हणून ग्रंथ अवश्य संग्रह करण्यास योग्य आहे.

मार्च ता. १८—१९०८ विश्वनाथ प्रभुराम वैद्य बी. ए. बॅरिस्टर—मुंबई.

॥ श्रीपांडुरंग प्रसन्न ॥

# प्रायश्चित्तव्यवहारप्रकाश.

## अथवा.

# हिंदुधर्म शास्त्र दर्पण याची अनुक्रमणिका.

### प्रथम भाग प्रायश्चित्त विचार.

## भोजनसंबंधि प्रायश्चित्त विचार.

प्रथमभाग समाप्त.

---

## द्रव्यशुद्धी—भाग २ रा.

व्यवहारभागाची अनु०

## प्रकीर्णप्रकरण.

शुभंभवतु.

॥ श्री ॥

॥ श्रीगणेशाय नमः ॥

॥ श्रीरुक्मिणीपांडुरंगाभ्यां नमः ॥

# ॥ अथ प्रायश्चित्तव्यवहारप्रकाशारंभः ॥

---

॥ श्रीविठ्ठलं सुरगणैः परिसेव्यमाणं भीमासरित्पुरजुषं नतकल्पवृक्षम् ॥ वंदे भवार्तशरणं करुणासमुद्रं योगींद्रगेयपदपंकजमिंदिरेशम् ॥ १ ॥ श्रीपांडुरंगं नतकामपूरमनंतसौख्यप्रदपादपद्मम् ॥ नत्वा च तत्प्रेरितचित्तवृत्तिः करोमि धर्मागमसारसारम् ॥२॥ श्रीविठ्ठलंश्रुतिगणैरपिमृग्यमाणं भक्तप्रदत्तवरतोधृतदिव्यदेहम् ॥ वंदेदयार्द्रमनसंनिजभक्तसंघे तिष्ठंतमज्ञनिवहान् विबुधान्हिकर्तुम् ॥ ३ ॥ योलोकेऽस्मिन् धर्मार्थकामान्हि भुक्त्वामुक्तिंचातिगात्पांडुरंगांघ्रिभक्त्या ॥ वावंद्यंतंश्रीविठ्ठलेशैकभक्तंकाशीनाथाख्यंतातपादंनमामि ॥ ४ ॥ अंबांविठाख्यांहिसतींसुमुख्यांकुलद्वयानंदकरींपवित्राम् ॥ सौम्यांदयालुंमितभाषणींचगुण्यांवरेण्यांप्रणमाम्यजस्रम् ॥ ५ ॥ प्रायश्चित्तव्यवहारप्रकाशाख्योधुनामया ॥ ग्रंथोविरच्यतेमूलवचनैर्विदुषांमुदे ॥ ६ ॥ श्रुत्वाकथामुदधिमंथनजांहिमूढोरत्नेच्छयाजलधिमंथनकर्तुकामः ॥ मंथानहस्तइवसंप्रतिहास्यतांवैयास्यामिमंदधिषणोबुधकार्यकर्ता ॥ ७ ॥ क्षमंतांसाहसंमेचसुधियःसारसेविनः ॥ विहायदोषसंघातंगृह्णंतुगुणलेशकम् ॥ ८ ॥ उच्यतेचास्यग्रंथस्यसंक्षेपात्संग्रहःपुरा ॥ तत्रतुप्रथमेभागेप्रायश्चित्तविनिर्णयः ॥ ९ ॥ द्वितीयेद्रव्यशुद्धिश्चकथितास्तिशुभप्रदा ॥ विपाकःकर्मणांप्रोक्तस्तृतीयेसुखदुःखदः ॥ १० ॥ भागेस्मिन्कथितस्तुर्येव्यवहारविनिर्णयः ॥ एवंचतुर्विभागेश्चग्रंथपूर्तिर्मयाकृता ॥ ११ ॥ अनेनप्रीयतांदेवोभगवान्रुक्मिणीपतिः ॥

॥ श्रीपांडुरंगः प्रसन्नोस्तु ॥

## अथ प्रायश्चित्तव्यवहारप्रकाशग्रंथ प्रारंभः

देव समुदाय सेवा करण्याकरितां ज्याच्या सभोंवती राहिले आहेत, आणि भीमा नदीचे तिरीं असलेलें जें पंढरपूर क्षेत्र याचे ठायीं राहणारा, नम्रभक्तजनांचे मनोरथ पूर्ण करण्यास केवळ कल्पवृक्षच, संसारानें पीडित झालेल्या मनुष्यास रक्षण करणारा दयेचा समुद्र, योगीजन ज्याच्या पदकमलाचें ध्यान करितात, असा जो लक्ष्मीपती श्रीविठ्ठल यास माझा नमस्कार असो.

## ॥ अथ प्रायश्चित्तभागारंभः ॥

श्रीविठ्ठलं दयासिंधुं पुंडरीकवरप्रदम् ॥ वंदेश्रीरुक्मिणीं देवीमस्माकं कुलदैवतम् ॥ १ ॥ कृतानांचैवपापानांज्ञानतोज्ञानतोपिवा ॥ उच्यतेपापिनांशुद्ध्यैप्रायश्चित्त विनिर्णयः ॥ २ ॥

## प्रायश्चित्त भागाचें मंगलाचरण.

दयेचा समुद्र, पुंडरीकास वर देणारा अशा श्रीविठ्ठलास, आणि आमची कुळदेवता जी जगज्जननी रुक्मिणी देवी हीस नमस्कार करितों. ॥१॥ जाणून अथवा न जाणून पापी जनानीं जीं पातकें केली असतील त्यांपासून त्यांची शुद्धता होण्याकरिता प्रथम प्रायश्चित्त निर्णय सांगतों.॥२॥

## ॥ अथ प्रायश्चित्तशब्दार्थः ॥

तत्रहारीतः ॥ प्रयतत्वाद्वोपचितमशुभंनाशयतीतिप्रायश्चित्तंतत्रवाशब्दएवार्थकः ॥ वास्याद्विकल्पोपमयोरेवार्थेचसमुच्चयइतिविश्वदर्शनात् ॥ प्रयतत्वाचथाविधिअनुष्ठानात् ॥ उपचितंसंचितमशुभमेवनाशयतिनतुफलांतरंजनयतियत्कर्मतत्प्रायश्चित्तम् ॥ अशुभंपापं ॥ १ ॥ प्रायश्चित्तविषयेअंगिराः ॥ प्रायोनामतपःप्रोक्तंचित्तंनिश्चयउच्यते ॥ तपोनिश्चयसंयुक्तंप्रायश्चित्तमितिस्मृतम् ॥ तप्यतेशरीरमनेनेतितपः ॥ निश्चयःप्रायश्चित्तस्यपापक्षयसाधनत्वे ॥ २ ॥ महार्णवेतु ॥ प्रायःपापंविजानीयाच्चित्तंतस्यविशोधनं ॥ ३ ॥ प्रायशश्चसमंचित्तंचारयित्वाप्रदीयते ॥ परिषदाकार्यतेयत्तुप्रायश्चित्तमितिस्मृतम् ॥ परिषद्युपविष्टैःसर्वैःचित्तंयथासमंभवतितथाचारयित्वैकत्वेनविचार्यप्रदीयते,विधीयते, कार्यतेऽनुष्ठाप्यतइत्यर्थः ॥ ४ ॥ यद्यथाविध्यनुष्ठानाद्युपचिताशुभनाशकमेवतत्प्रायश्चित्तम् ॥ पापनाशकंकर्मप्रायश्चित्तमुच्यते ॥ ५ ॥ पातकनिवृत्यैतदवश्यंकार्यम् ॥ तथाचयाज्ञवल्क्यः ॥ विहितस्याननुष्ठानान्निंदितस्यचसेवनात् ॥ अनिग्रहाच्चेंद्रियाणांनरःपतनमृच्छति ॥ १ ॥ प्रायश्चित्तमकुर्वाणाःपापेषुनिरतानराः ॥ अपश्चात्तापिनःकष्टान्नरकान्यांतिदारुणान् ॥ २ ॥ तस्मात्तेनेहकर्त्तव्यंप्रायश्चित्तविशुद्धये ॥ एवंतस्यांतरात्माचलोकश्चैवप्रसीदति ॥ ३ ॥ मनुरपि ॥ अकुर्वन्विहितंकर्मनिंदितंचसमाचरन् ॥ प्रसक्तश्चेंद्रियार्थेषुप्रायश्चित्तीयतेनरः ॥ ४ ॥ विहितंकर्मनित्यंसंध्योपासनादि ॥ नैमित्तिकंशवस्पर्शादौस्नानादितदकुर्वन्निषिद्धंहिंसादितदनुतिष्ठन् ॥ इंद्रियार्थेपुस्रक्चंदनादिष्वत्यंतासक्तिं कुर्वन्नरोमनुष्यमात्रं ॥ प्रायश्चित्तीयतेतदपनोद्यपापभाग्भवति ॥ ४ ॥ प्रायश्चित्तोपदेशाधिकारिणः ॥ वेदवेदांगतत्वज्ञाधर्मशास्त्रविशारदाः ॥ स्वधर्मनिरतादांतास्तेभ्यःपापनिवेदयेत् ॥ ५ ॥ पापिनांप्रायश्चित्तोपदेशेफलमाहांगिराः॥ यत्पुण्यमुद्धृतेविप्रेम्रियमाणेजलादिषु ॥ तत्पुण्यंतारितेपापात्प्रायश्चित्तैस्तुमानवे ॥ ६ ॥

धर्मशास्त्रमविज्ञायप्रायश्चित्तंनवक्तव्यम् ॥ अबुद्ध्वाधर्मशास्त्राणिप्रायश्चित्तंवदंतिये ॥ प्रायश्चित्तीभवेत्पूतस्तत्पापंतेषुगच्छतीतिशातातपीयात् ॥७॥ तदर्चादिपूर्वकंकथितव्यम्॥

प्रायश्चित्त शब्दाचा अर्थ हारीतानें असा सांगितला आहे. प्रयतत्वात् ह्मणजे यथाशास्त्र अनुष्ठान केल्यापासून संचित झालेलें जें पाप त्या पापाप्रतच जें नाश करितें, आणि दुसऱ्या फळाप्रत उत्पन्न करीत नाहीं, असें जें कर्म त्यास प्रायश्चित्त ह्मणावें. ॥ १ ॥ आंगीरीऋषाचें मत प्रायस् शब्दाचा अर्थ तप सांगितला आहे. चित्त शब्दाचा अर्थ निश्चय, तप आणि निश्चय यांनीं जें युक्त त्यास प्रायश्चित्त असें ह्मणावें. पाप क्षयाविषयीं हेंच साधन असा निश्चय शब्दाचा अर्थ आहे. ॥ २ ॥ महार्णव ग्रंथांत तर प्रायः शब्दाचा अर्थ पाप, चित्त शब्दाचा अर्थ शोधन पापास नाश करणारें जें कर्म त्यास प्रायश्चित्त असें ह्मणावें. ॥ ३ ॥ प्रायश्चित्त महानिर्णयांत प्रायश्चित्त शब्दाचा अर्थ असा केला आहे कीं, सभेमध्यें बसलेल्या विद्वज्जनांनीं प्रायः ह्मणजे बहुत करून चित्त ह्मणजे समान अंतःकरण करून सत्यपणानें विचार करून जें कथन केलें जातें, नंतर पापी मनुष्यानें अनुष्ठान केलें जातें, त्यास प्रायश्चित्त असें ह्मणावें. ॥ ४ ॥ पाप नाशक जें कर्म त्यास प्रायश्चित्त अशी संज्ञा आहे. ॥ ५ ॥ पाप निवृत्ती होण्याकरितां प्रायश्चित्त अवश्य करावें. यास याज्ञवल्क्याचें वचन, विहित ह्मणजे शास्त्रानें सांगितलेलें जें स्नान संध्यादि कर्म तें न करणें आणि निंदित ह्मणजे निषिद्ध केलेलें जें मद्यपानादि त्याचा स्वीकार करणें; आणि इंद्रियांचा निग्रह न करणें या अशा कारणांनीं मनुष्य पतित ह्मणजे भ्रष्ट होतो. ॥ १ ॥ असे पतित झाले असूनही पापाचरणाविषयीं आसक्त आणि आपल्या वाईट कर्माविषयीं ज्यांस कधीं पश्चात्ताप होत नाहीं असे मनुष्य दुःख देणारे आणि अति भयंकर अशा नरकास जातात. ॥ २ ॥ यास्तव त्यांची शुद्धता होण्याकरितां पतितानें येथें प्रायश्चित्त करावें. कारण प्रायश्चित्त केलें असतां त्याचें अंतःकरण मी पातकापासून शुद्ध झालों असें वाटून प्रसन्न होतें. लोकही त्याज विषयीं प्रसन्न होतात. मनूच्या वचनाचा अर्थ याज्ञवल्क्यांच्या वचना प्रमाणेंच आहे. ॥४॥ प्रायश्चित्त उपदेश करण्यास अधिकारी वेद, व्याकरणादि वेदांगें यांच्या रहस्या जाणणारे, धर्म शास्त्रांमध्यें निष्णात, स्वधर्माचे ठायीं रत, ज्यांनीं आपलीं इंद्रियें स्वाधीन ठेविलीं आहेत, अशा ब्राह्मणा पाशीं आपलें पाप निवेदन करावें. ॥५॥ पापी मनुष्यास प्रायश्चित्त सांगितलें असतां मोठें पुण्य प्राप्त होतें. पाण्यामध्यें बुडून मरणाऱ्या ब्राह्मणास त्या पासून वर काढिलें असतां जें पुण्य तें पुण्य प्रायश्चित्त सांगून पातकापासून तारिलें असतां प्राप्त होतें. ॥ ६ ॥ धर्म शास्त्राचें ज्ञान असल्या शिवाय प्रायश्चित्त सांगूं नये, कारण धर्म शास्त्रास न जाणून प्रायश्चित्त सांगितलें असतां पापी त्या पातकापासून मुक्त होतो. परंतु तें पाप सांगितलेल्या प्रायश्चित्ताचें त्यास [illegible] [illegible] असें [illegible] वचन आहे, प्रायश्चित्त करणारे मनुष्यानें पूजा [illegible].

[illegible] ॥ प्रायश्चित्तं [illegible] ॥ इत्यं [illegible] ॥ ८ ॥

# अथप्रायश्चित्तसंसन्निर्णयः ॥

संसच्चतुर्भिस्त्रिभिर्वाधर्मशास्त्रादितत्वज्ञैर्भवति ॥ एकेनापिब्रह्मविदायतिवर्ज्यम् ॥ वेदशास्त्राध्ययनरहितैस्सहस्रैरपिसंसन्नभवति ॥ तथाचपाराशरः ॥ अव्रतानाममंत्राणां जातिमात्रोपजीविनां ॥ सहस्रशःसमेतानांपरिषत्वंनविद्यते ॥ ९ ॥ चत्वारोवात्रयो वापियंब्रूयुर्वेदपारगाः॥सधर्मइतिविज्ञेयोनेतरैस्तुसहस्रशः ॥ १० ॥ यमः ॥ एकोद्वौवा त्रयोवापियद्ब्रूयुर्धर्मपाठकाः ॥ सधर्मइतिविज्ञेयोनेतरेषांसहस्रशः ॥ ११ ॥ एकोपिवेद विद्धर्मंयंव्यवस्येद्द्विजोत्तमः ॥ सविज्ञेयःपरोधर्मोनाज्ञानामुदितोयुतैः ॥ १२ ॥ याज्ञव ल्क्यः॥ चत्वारोवेदधर्मज्ञाःपर्षत्त्रैविद्यमेववा ॥ सात्रतेयंसधर्मःस्यादेकोवाध्यात्मवित्तमः ॥ १३ ॥ धर्मविवृतौच ॥ पातकेचशतंपर्षत्सहस्रंमहदादिषु ॥ उपपातकेषुपंचाशत्स्व ल्पेल्पातथाभवेत् ॥ १४ ॥ बहुभिर्विद्वद्भिर्मिलित्वाविचार्यप्रायश्चित्तंविधेयम् ॥ इति शतादिशब्दानांतात्पर्यार्थः ॥ १५ ॥

आपणास जरी धर्मशास्त्राचें ज्ञान आहे, तथापि पूजा केल्यावांचून, तसेंच सभेमध्यें बोलावून विचारल्या वांचून प्रायश्चित्त सांगू नये. असें आंगिरा ऋषीचें वचन आहे.

## प्रायश्चित्ताच्या सभेचा निर्णय.

प्रायश्चित्ताच्या सभेमध्यें धर्मशास्त्र जाणणारे चार अथवा तीन जरी ब्राह्मण असले तरी त्यांच्या योगानें सभा होते. ब्रह्मवेत्ता एक जरी असेल तरी त्याच्या योगानें ती सभा होते, परंतु तो ब्रह्मवेत्ता संन्यासी नसावा. वेदशास्त्र अध्ययन रहित असे हजार जरी ब्राह्मण असतील तरी त्यांच्या योगानें सभा होत नाहीं. पराशराचें वचन प्राजापत्यादिव्रत रहित, तसेंच वेदाध्ययनानें शून्य, केवळ ब्राह्मण जातीच्या योगानें उपजीविका करणारे असे हजार जरी ब्राह्मण असतील,तरी त्यांच्या योगानें सभा होत नाहीं. ॥ ९ ॥ वेदाध्ययन संपन्न असे चार अथवा तीन ब्राह्मण असोन त्यांनीं जो धर्म सांगितला असेल तोच धर्म जाणावा. अविद्वान हजार जरी ब्राह्मण असतील तरी हीं त्यांच्या योगानें धर्मज्ञान होणार नाहीं. ॥ १० ॥ यमाचें वचन. धर्मशास्त्र जाणणारे असे एक दोन अथवा तीन यांनीं जें सांगितलें असेल तोच धर्म जाणावा. धर्मशास्त्राध्ययनरहित अशीं हजार जरी मनुष्यें असतील तरी त्यांच्या योगानें धर्म ज्ञान होणार नाहीं. ॥ ११ ॥ पुढील श्लोकाचा ही अर्थ असाच आहे ॥ १२ ॥ याज्ञवल्क्याचेंवचन–वेद आणि धर्मशास्त्र याला जाणणारे असे चार ब्राह्मण असतील तरींही त्यांच्या योगानें सभा होते. तीन वेदास जाणणारे असे ब्राह्मण असतांही सभा होते, अध्यात्मवेत्ता असा एक ब्राह्मण असल्यास ही चालेल. ॥ १३ ॥ धर्म विवृत्ती मध्यें असे सांगितलें आहे कीं, पातकाचे ठायीं शंभर ब्राह्मणांची सभा असावी. महापातकास हजार ब्राह्मण, उपपातकाचे ठायीं पन्नास ब्राम्हण, या पेक्षां अल्पपातक असेल तर सभेस कमी ब्राम्हण बोलवावेत. ॥१४॥ पुष्कळ विद्वान् ब्राम्हणांनीं एकत्र जमून विचार करून प्रायश्चित्त

सांगावें. या प्रमाणें शतादिक शब्दाचें तात्पर्य आहे. कमी जरी ब्राम्हण असतील तरी चालतील. पातकाच्या महत्वा प्रमाणें ब्राम्हणांची संख्या असावी. ॥ १५ ॥

पर्षद्दक्षिणाचलक्षगवादिकिंचिद्द्रव्यपर्यंता॥ यथायोग्यंकृच्छ्रसंख्ययावा॥पर्षत्तुष्टिर्वा॥ पापीचसचैलंस्नातोवाग्यतःआर्द्रवासाउपदेष्टारंसाष्टांगंप्रणम्यस्पष्टमभिधानंवदेदिदंमेपापं निष्पन्नंप्रायश्चित्तंमेउपदिशंत्विति ॥ १६ ॥ कृत्वापापनगूहेतगूह्यमानंविवर्धते ॥ स्वल्पंवाथप्रभूतंवाधर्मविद्भ्योनिवेदयेत् ॥ १७ ॥ पापंकृतवतोपरेर्ज्ञातदोषस्यचसभोपस्थानंविनाभोजनेभाषणेचपापवृद्धिः ॥ १८ ॥ आसंवत्सरंप्रायश्चित्ताकरणेपापद्वैगुण्यम् ॥ संवत्सराभिशस्तस्यदुष्टस्यद्विगुणोदमइतिमनुवचनात् ॥ कालातिरेकेद्विगुणंप्रायश्चित्तंसमाचरेत् ॥ द्विगुणंराजदंडंचदत्वाशुद्धिमवाप्नुयात् ॥ इतिदेवलीयाच्च ॥ १९ ॥ आर्तानांजिज्ञासूनांप्रायश्चित्ताकथनेऽचैतस्यविपश्चितोदोषः ॥ आर्तानांयाचमानानांप्रायश्चित्तानियेद्विजाः ॥ जानंतोनप्रयच्छंतितेपितद्दोषभागिनइत्यंगिरोवचनात् ॥ २० ॥ क्षत्रियादौप्रायश्चित्तकथनेब्राह्मणमंतरितंकृत्वाकथनीयम् ॥ न्यायतोमार्गमाणस्यक्षत्रियादेःप्रणामिनः ॥ अंतराब्राह्मणंकृत्वाव्रतमेतत्समादिशेत् ॥ २१ ॥ गुरुपापेचलघुप्रायश्चित्तंलघुपापेगुरुप्रायश्चित्तंनवक्तव्यं ॥ पापेगुरूणिचगुरुस्वल्पान्यल्पेच तद्विदः ॥ प्रायश्चित्तानिमैत्रेयजगुःस्वायंभुवादयइतिविष्णुवचनात् ॥ २२ ॥ अन्यथाहिमहावाहोलघूनामुपदेशतः ॥ गुरूणामुपदेशोहिनिःप्रयोजनतांव्रजेत्इतिभविष्यपुराणाच्च ॥ २३ ॥ प्रायश्चित्तप्रदानेयथोक्तंप्रायश्चित्तंवाच्यंनतुस्नेहादिनानुग्रहःकार्यः॥ तद्यथा ॥ लोभाद्वाथदिवास्नेहान्मोहादज्ञानतोपिवा ॥ कुर्वंत्यनुग्रहंयेतुतत्पापंतेषुगच्छतीतिपाराशरीयात् ॥ २४ ॥ शास्त्रीयप्रायश्चित्तमुदाहृत्यदुर्बलत्वादिनानुग्रहःकार्यः कृत्वापूर्वमुदाहरंयथोक्तंशास्त्रवेदिभिः ॥ पश्चात्कार्यानुसारेणशक्त्याकुर्वंत्यनुग्रहमित्यंगिरोवचनात् ॥ २५ ॥

सभेस दक्षिणा लक्षगायी पासून यत्किंचितद्रव्य पर्यंत जसें पातक असेल, अथवा पातक्याची शक्ति असेल त्यास अनुसरून असावें. जितकीं पातकास कृच्छ्रें सांगितलीं असतील. त्यांच्या संख्येनें असावी; अथवा सभेचा संतोष होईल असी दक्षिणा असावी. पापी मनुष्यानें सचैल स्नान करून ओलें वस्त्र तसेंच धारण करून नियमित वाणी करून उपदेश करणारास साष्टांग नमस्कार करून आपलें स्पष्ट नांव सांगून बोलावें. माझें हें पाप निष्पन्न झालें आहे. मला प्रायश्चित्त सांगा. ॥ १६ ॥ पातकी मनुष्यानें हातून पाप घडलें असेल तें गुप्त ठेऊ नये. ठेविलें असतां तें वृद्धिंगत होतें. झालेलें पातक अल्प असो अथवा मोठें असो तें धर्मवेत्त्या मनुष्यास सांगावें. ॥ १७ ॥ या संबंधाचा विचार पुढें सांगू- पाप करणारा ज्याचे दोष अन्य मनुष्यास माहीत झाले आहेत. अशा मनुष्यानें सभेस जाऊन पातकाचा विचार झाल्या वांचून भोजन अथवा भाषण केलें असतां पाप दुप्पट होतें. ॥ १८ ॥ वर्षभर पर्यंत प्रायश्चित्त न केलें असतां

पाप दुष्ट होतें. देवळ आणि मनू याच्या वचनाचा अर्थ असाच आहे. ॥ १९ ॥ पतीत आणि पातकास प्रायश्चित्त जाणण्यास इच्छा करणाऱ्या अशा मनुष्यास पूजा केली असता ही प्रायश्चित्त न सांगितलें तर विद्वान मनुष्यास दोष प्राप्त होतो ॥ यास अंगिराचें वचन-पापानें पीडित आणि प्रायश्चित्त मिळण्यास याचना करणारे अशा मनुष्यास जे ब्राह्मण जाणणारे असूनही प्रायश्चित्त सांगत नाहींत त्यांना तो दोष प्राप्त होतो. ॥२०॥ क्षत्रियादिकांस प्रायश्चित्त सांगावयाचें असतां मध्यें ब्राह्मण करून प्रायश्चित्त सांगावें अंगिराच्या वचनाचाही अर्थ असाच आहे. ॥२१॥ महापापाचे ठायीं अल्प, अल्प प्रायश्चित्ताचे ठायीं महाप्रायश्चित्त सांगू नये. विष्णु आणि ब्रह्मपुराण या वचनाचा अर्थ असाच आहे. ॥ २२ ॥ २३ ॥ प्रायश्चित्त सांगते समयीं यथा शास्त्र प्रायश्चित्त सांगावें. स्नेहादिकामुळें अनुग्रह करू नये. त्यास पराशराचें वचन—लोभानें किंवा स्नेहानें किंवा अज्ञानानें किंवा मोहानें जे अनुग्रह करितात. तें पाप त्या सांगणाऱ्या मनुष्यास प्राप्त होतें. ॥ २४ ॥ शास्त्रांत सांगितलेलें प्रायश्चित्त प्रथम सांगून नंतर तितकें प्रायश्चित्त करण्यास असमर्थ असेल तर त्यास अनुग्रह करावा. त्यास अंगिराचें वचन प्रथम शास्त्रोक्त प्रायश्चित्त सांगून नंतर धर्मशास्त्रवेत्त्यानीं त्याच्या शक्त्यनुसार अनुग्रह करावा. ॥ २५ ॥

कार्यानुसारेणदुर्बलत्वादिना ॥ दुर्बलेऽनुग्रहःकार्यस्तथावैशिशुवृद्धयोः ॥ अतोन्यथाभवेद्दोषस्तस्मान्नानुग्रहोभवेदितिपराशरीयाच्च ॥ २६ ॥ अनुग्रहादौसर्वत्रपादन्यूनं प्रायश्चित्तंनकर्तव्यम् ॥ तस्मात्कृच्छ्रमथाप्यर्द्धपापंवापिविधानतः ॥ ज्ञात्वाबलाबलं कालंप्रायश्चित्तंप्रकल्पयेदितिहारीतात् ॥ २७ ॥ अत्रकृच्छ्रपदेनाजहत्स्वार्थलक्षणयापादोनकृच्छ्रमपिज्ञेयम् ॥ यद्वर्णेयत्प्रायश्चित्तंतद्वर्णेबालवृद्धस्त्रीरोगिणांतदर्द्धंप्रायश्चित्तं ॥ अशीतिर्यस्यवर्षाणिबालोवाप्यूनषोडशः ॥ प्रायश्चित्तार्द्धमर्हंतिस्त्रियोरोगिणएवचेति विष्णुपुराणात् ॥ २८ ॥ अतएकस्योभयधर्मवत्त्वेधर्मत्रयवत्त्वेपिवापादप्रायश्चित्तम् ॥ अनुग्रहेपादंवेतिवाशब्दस्यैवकारार्थत्वादितिमिताक्षरातः ॥ अर्द्धमेवभवेत्पुंसांतुरीयंतत्र योषितामिति ॥ अत्रोनषोडशवार्षिकग्रहणात्तदूर्ध्वंसंपूर्णप्रायश्चित्तम् ॥ २९ ॥ ऊनैकादशवर्षायस्यबालस्यपंचवर्षात्परंपादंप्रायश्चित्तं ॥ पादोबालेषुदातव्यःसर्वपापेष्वयं विधिरितिविष्णुवचनात् ॥ ३० ॥ ऊनैकादशवर्षस्यपंचवर्षाधिकस्यच ॥ चरेद्गुरुःसुहृद्वापिप्रायश्चित्तंविशुद्धये ॥ ३१ ॥ एतेनस्वयमशक्तौप्रतिनिधिद्वाराप्रायश्चित्तंकरणीयम् ॥ पंचवर्षमध्येतुप्रायश्चित्तंनकरणीयं ॥ ततोन्यूनतरस्यास्यनापराधोनपातकम् ॥ नचास्यराजदंडोस्तिप्रायश्चित्तंनविद्यतइत्यंगिरोवचनात् ॥ ३२ ॥ यत्तुचतुर्थाद्वत्सरादूर्ध्वमष्टमंयावदेवहि ॥ शिशोर्व्रतंप्रकुर्वंतिगुरुसंबंधिबांधवाइतिब्रह्मपुराणेपंचवर्षेव्रतविधानं तत्पापनाशकातिरिक्तपरमतोनविरोधः ॥ ३३ ॥ ज्ञानाज्ञानकृतेपापेयत्रयद्देवोक्तंतत्रतद्देवकरणीयम् ॥ यत्राज्ञानकृतेयदुद्दिष्टंज्ञानकृतेतत्रतद्द्विगुण ॥ ज्ञानकृतेयदुद्दिष्टमज्ञानकृतेतदर्धंप्रायश्चित्तं ॥ स्यादकामकृतेयत्तद्द्विगुणंबुद्धिपूर्वकेइत्यंगिरोवचनात् ॥ ३४ ॥

कृच्छ्रांस्तुचतुरःकुर्याद्गोवधेबुद्धिपूर्वके ॥ अमत्यातुद्वयंकार्यंतदर्धंबालवृद्धयोरितिविश्वामित्रवचनात् ॥ एकत्रानिर्णितःशास्त्रार्थोबाधकंविनापरत्रापिइतिन्यायाच्च ॥ ३५ ॥ अनुक्तविषये ॥ विष्णुः ॥ अनुक्तनिष्कृतीनांतुपापानामपनुत्तये ॥ शक्तिंचावेक्ष्यपापंचप्रायश्चित्तंप्रकल्पयेत् ॥ ३६ ॥ पराशरःप्रायश्चित्तंसदादद्यादेवतायतनाग्रतः ॥ इदंपुण्यक्षेत्रतीर्थादेरुपलक्षणम् ॥ ३७ ॥

## पाराशराचें वचन.

बाळ,वृद्ध,दुर्बळ यांस अनुग्रह करावा, यावांचून इतरांवर दया केली असतां दोषप्राप्ति होते. ह्मणोन अनुग्रह करूं नये. ॥ २६ ॥.अनुग्रहाचे ठिकाणीं ज्या दोषास जें पाप सांगितलें असेल त्याच्या चवथ्या हिस्सापेक्षां न्यून प्रायश्चित्ताचा उपदेश करूं नये. निदान पाद म्हणजे चतुर्थांश प्रायश्चित्त सांगावें. त्यापेक्षां न्यून सांगूं नये. हारीताचें वचन. सशक्त, अशक्त, देश, काळ, इत्यादिकांचा विचार करून अर्धे अथवा पाद प्रायश्चित्ताची योजना करावी. ॥ २७ ॥ ब्राम्हण, क्षत्रिय, वैश्य, शूद्र या वर्णांमध्यें ज्या वर्णाचे पुरुषास जें प्रायश्चित्त सांगितलें असेल त्याचें अर्धें प्रायश्चित्त बाळक, वृद्ध, स्त्रिया, रोगी यांस सांगावें. ज्यास ऐशीं वर्षें झालीं आहेत त्यास वृद्ध म्हणावें. सोळा वर्षांचे आंत ज्याचें वय आहे, त्यास बाळ अशी संज्ञा आहे. वृद्ध, बाळक, स्त्री आणि रोगी यांस अर्धे प्रायश्चित्त सांगावें. असें विष्णु पुराणांत वचन आहे. ॥ २८ ॥ जेथें एकासच दोन अथवा तीन धर्म प्राप्त होत असतील, तेथें पाद प्रायश्चित्त सांगावें. जसें बाळ असून रोगी व स्त्रियांस पादप्रायश्चित्त, कारण जेथें अनुग्रह करण्यास सांगितलें आहे तेथें पादापेक्षां न्यून प्रायश्चित्त सांगूं नये. असें शास्त्रांत सांगितलें आहे. जेथें पुरुषास अर्धें प्रायश्चित्त सांगितलें असेल तेथें स्त्रियांस चतुर्थांश प्रायश्चित्त द्यावें. ॥ २९ ॥ पांच वर्षां पासून अकरा वर्षांच्या आंत ज्याचें वय आहे अशा मुलास चतुर्थांश प्रायश्चित्त द्यावें. सर्व पातकांचे ठायीं बाळकास पाद प्रायश्चित्त द्यावें. असें विष्णु पुराणांत वचन आहे. ॥ ३० ॥ अकरा वर्षांचे आंत व पांच वर्षां पेक्षां ज्यास्त ज्याचें वय आहे अशा मुला वरचें प्रायश्चित्त गुरु अथवा मित्र यानीं करावें. ॥ ३१ ॥ यावरून स्वतः प्रायश्चित्त करण्याची शक्ति नसतां प्रतिनिधी द्वारानें ही प्रायश्चित्त करावें असें सिद्ध होतें पांच वर्षांचे आंतील मुलास प्रायश्चित्त नाहीं. यास अंगिराचें वचन. पांच वर्षांचे आंतील मुलास पातक, अपराधास राजदंड नाहीं. ॥ ३२ ॥ आतां पनये वर्षा नंतर आणि आठ वर्षें पर्यंत मुला वरचें व्रत गुरु, बंधु इत्यादिक करितात असें ब्रम्ह पुराणांत वचन आहे. तें पांच वर्षांचें ठायीं ब्रनार्थं विधान पातक नाशक जें प्रायश्चित्त त्याहून वेगळें आहे. मग्व पांच वर्षें पर्यंत प्रायश्चित्त नाहीं म्हणून जें प्रथम सांगितलें त्याशीं विरोध येत नाहीं.॥३३॥जेथें ज्ञानानें अथवा अज्ञानानें केलेल्या पातकाच्या ठायीं जें प्रायश्चित्त सांगितलें आहे तेथें तेंच करावें. अज्ञानानें केलेल्या पातकाच्या ठायीं-जें. प्रायश्चित्त सांगितलें असेल त्याच्या

दुप्पट ज्ञानानें केलेल्या दोषास आहे. ज्ञानानें केलेल्या दोषास जें प्रायश्चित्त सांगितलें असेल त्याच्या अर्ध प्रायश्चित्त अज्ञान कृत दोषास जाणावें. सहज रीतीनें झालेल्या पातकास जें प्रायश्चित्त सांगितलें असेल त्याच्या दुप्पट प्रायश्चित्त बुद्धिपूर्वक केलेल्या दोषास आहे असें अंगिराचें वचन आहे. ॥ ३४ ॥ गोवध बुद्धिपूर्वक केला असता चार कृच्छ्र प्रायश्चित्त करावें. बुद्धिपूर्वक नसून सहज रीतीनें गोवध झाला असता दोन कृच्छ्र प्रायश्चित्त आहे. बाल आणि वृद्ध यासही अर्ध प्रायश्चित्त. एका प्रकरणामध्यें जो शास्त्रार्थ सांगितला असेल तो बाधक नसतांना अन्य प्रकरणाचे ठायींही तोच जाणावा. ॥३५॥ विष्णूचें वचन ज्या पातकास प्रायश्चित्त सांगितलें नसेल तें पातक दूर करण्यास पातकी मनुष्याची शक्ती आणि पातक पाहून प्रायश्चित्ताची योजना करावी. ॥ ३६ ॥ पराशराचें वचन प्रायश्चित्त देवालय, पुण्यक्षेत्र, तीर्थ, पुण्यभूमि इत्यादिकांचे समीप घ्यावें. ॥ ३७ ॥

## ॥ अथपातकानिर्णयः ॥

तत्रपातकानिनवविधानि ॥ तथाच ॥ प्रकीर्णकजातिभ्रंशकरसंकरीकरणापात्रीकरणमलिनीकरणोपपातकमहापातकानुपातकातिपातकरूपाणितत्रजातिभ्रंशकरादिगणितातिरिक्तंप्रकीर्णकम् ॥ पातयंतितानिपातकानीतिपातकशब्दार्थः ॥ १ ॥

## पातकांचा विचार.

धर्म शास्त्रांत पातकें नऊ प्रकारचीं सांगितलीं आहेत. तीं अशीं— प्रकीर्णक, जातिभ्रंशकर, संकरीकरण, अपात्रीकरण, मलिनीकरण, उपपातक, महापातक, अनुपातक, अतिपातक, अशीं नऊ सांगितलीं आहेत. जातिभ्रंशादिकाहून जे भिन्न त्यास प्रकीर्णक असें म्हणावें, करणारास पतित करितात म्हणून त्यास पातक अशी संज्ञा आहे. या प्रमाणें पातक शब्दाचा अर्थ आहे. ॥ १ ॥

## ॥ पापिनःपंचधा ॥

साक्षात्कर्त्रनुग्राहकप्रयोजकानुमंतृनिमित्तकर्तृभेदात् ॥ १ ॥ तत्रसाक्षात्कर्त्ताप्रसिद्धः ॥ साक्षात्कर्तुः ॥ २ ॥ पालनादिनोपकारकोनुग्राहकः ॥ ३ ॥ आज्ञापयिताभ्यर्थयितोपदेष्टाचप्रयोजकः ॥ ४ ॥ स्वार्थपरार्थवानुमतिकर्तानुमंता ॥ ५ ॥ अनिमित्तंभर्त्सनताडनधनहरणादिनाकोपंजनयन् ॥ तन्मरणेनिमित्तंभवेत्सनिमित्तकर्त्ता ॥ एषूत्तरोत्तरमल्पदोषत्वंप्रायश्चित्ताल्पत्वंचबोध्यम् ॥ १ ॥ ॥ १ ॥ मुख्यकर्तुःपूर्णप्रायश्चित्तं ॥ २ ॥ कर्तुःपादोनंप्रायश्चित्तम् अनुग्राहकस्य ॥ ३ ॥ प्रयोजकस्यार्धम् ॥ ४ ॥ अनुमंतुःसार्धपादम् ॥ ५ ॥ निमित्तकर्त्तापादंप्रायश्चित्तमाचरेत् ॥ अनुग्राहकप्रयोजका

दीनामपियेतुग्राहकमयोजकादयस्तेपामपिप्रायश्चित्तंकल्प्यम् ॥ तथाप्रोत्साहकादीनाम पिदंडमायश्चित्तेचकल्प्ये ॥ २ ॥ प्रोत्साहकःसहायश्चतथामार्गानुदेशकः ॥ आश्रयः शस्त्रदाताचभक्तदाताविकर्मणाम् ॥ ३ ॥ उपेक्षकःशक्तिमांश्चदोपवक्तानुमोदकः ॥ यएव. म्रियमाणंतुब्राह्मणंसमुपेक्षते ॥ अकार्यकारिणांत्वेपांप्रायश्चित्तंप्रकल्पयेदिति ॥ ४ ॥ तथाच पैठीनसिः ॥ हंतानुमंतोपदेष्टातथासंप्रतिपादकः ॥ प्रोत्साहकःसहायश्चतथा मार्गानुदेशकः ॥ आश्रयःशस्त्रदाताचभक्तादाताविकर्मणाम् ॥ ५ ॥ युद्धोपदेशकश्चै वतद्विनाशप्रवर्तकः ॥ उपेक्षःकार्ययुक्तस्यदोपवक्तानुमोदकः ॥ ६ ॥ अनिपेद्धाक्षमोप स्तुसर्वेतत्कार्यकारिणः ॥ यथाशक्त्यनुरूपंचदंडमेपांप्रकल्पयेत् ॥ ७ ॥

## पातक करणाराचे पांच प्रकार आहेत.

१ मुख्यकर्ता २ अनुग्राहक ३ प्रयोजक ४ अनुमोदन कर्ता ५ निमित्तकर्ता. असे पांच भेद आहेत. स्वतः पाप करणाऱ्या मनुष्यास दुसऱ्या पासून जो रक्षण करितो; अथवा ज्यास मारावयाचें असेल त्यास प्रतिबंध करून मारणाऱ्यास सहाय करितो त्यास अनुग्राहक असें ह्मणावें. यास मुख्य पाप करणाऱ्याहून पाऊणपट प्रायश्चित्त आहे. प्रयोजक तीन प्रकारचा, एक अज्ञापयिता ह्मणजे समर्थ असोन आपल्या सेवकास आपले शत्रूस नाश कर असी जो आज्ञा करितो त्यास आज्ञापयिता असें ह्मणावें. ॥२॥ अभ्यर्थयिता, स्वतः समर्थ नसोन आपल्या शत्रु नाशाविषयीं दुसऱ्यास प्रार्थना करून जो प्रवृत्त करितो त्यास अभ्यर्थयिता असें ह्मणतात. ॥ ३ ॥ उपदेष्टा, जो आपल्या शत्रूस मारण्याविषयीं उपदेश करितो त्यास उपदेष्टा असें ह्मणावें असे प्रयोजकाचे तीन भेद आहेत. त्यास कर्त्यास जें प्रायश्चित्त असेल त्याचें अर्ध प्रायश्चित्त जाणावें. स्वतः वडल अथवा दुसऱ्या वडल पातक करणाऱ्या पुरुषास जो संमती देतो त्यास अनुमंता ह्मणावें. यास सार्धपाद ह्मणजे अनुग्राहकाच्या अर्ध हिस्शानें प्रायश्चित्त जाणावें. निमित्तापासून निर्भत्सना करणें, मारणें, द्रव्य हरण करणें इत्यादि कारणानें जो राग उत्पन्न करून त्याच्या नाशाविषयीं कारण होतो त्यास निमित्तकर्ता असें ह्मणावें. यास मुख्य कर्त्याचे चवथ्या हिस्शानें प्रायश्चित्त सांगितलें आहे, तसेंच अनुग्राहक, प्रयोजक, इत्यादिकांस जे अनुग्रह करणारे त्यांस प्रायश्चित्ताची योजना करावी. प्रोत्साहक, सहाय करणारा, मार्ग दाखविणारा, आश्रय देणारा, शस्त्र देणारा, वाईट कर्म करणाऱ्यास भोजन घालणारा, स्वतः शक्तिमान् असून उपेक्षा करणारा, दोष सांगणारा, अनुमोदन करणारा, मरणाऱ्या ब्राह्मणाची उपेक्षा करणारा, हे सर्व न करण्याच्या कार्यास करणारे पापी आहेत यास्तव यांसही प्रायश्चित्ताची कल्पना करावी.

## ॥ पूर्वेनवविधानिप्रायश्चित्तानिउक्तानितेषुप्रथमंमहापातकविचारः ॥

तत्रपातकलक्षणः ॥ ब्रह्महामद्यपस्तेनस्तथैवगुरुतल्पगः ॥ एतेमहापातकिनोयश्चतैः सहसंवसेत् ॥ १ ॥ हंमिरयंमाणवियोगकरणेव्यापारकृदः यत्व्यापारसमनंतरकालं·

तरेनिरपेक्षः प्राणवियोगोभवतिसब्राह्मणं हतवानितिब्रह्महा ॥ मनुरपि ॥ ब्रह्महत्या सुरापानंस्तेयंगुर्वंगनागमः ॥ महांतिपातकान्याहुःससर्गश्चापितैःसह ॥ २ ॥ शूद्रस्य सुरापानस्थाने ब्राह्मणीगमनंतस्यसुरापानेपातित्याभावात् ॥ स्तेयंब्राह्मणस्वामिकाशी तिरक्तिकामितहेमोतदधिस्यापिवाहरणम् ॥ महापातकं ॥ इतोन्यूनहरणंनमहापातकम् ॥ अपहरणंचसमक्षपरोक्षंवाबलाच्चौर्येणक्रयादिस्वत्वहेतुविनाग्रहणमुच्यते ॥ ३ ॥ संसर्गेविषये ॥ तथाआलापाद्गात्रसंस्पर्शात्स्वाध्यायात्सहभोजनात् ॥ सहशय्यासना त्पानात्पापंसंक्रमतेनृणाम् ॥ ४ ॥ सहभोजनमेकपंक्तिभोजनम् ॥ आलापादेस्तुसंवत्स रेणपातकित्वसंपादकत्व ॥ संवत्सरेणपततिपतितेनसहाचरन्नितिविष्णुवचनात् ॥ ५ ॥ च्यवनस्तुब्रह्महत्यादीनांसर्वसाधारण्येनमहापातकत्वमभिधायअसाधारण्येनाह ॥ अदं ड्यदंडनंब्रह्महत्याचगुरुशय्यारोहणंयुधिपलायनंक्षत्रियस्यं मानतुलानृतत्वंवैश्यानां मांस विक्रयोब्रह्महत्याब्राह्मणीगमनंकपिलापानंशूद्रस्य तत्सपर्यातंपंचममिति॥कपिलापानंक पिलादुग्धपानम् ॥ एतानिपातयंतीतिपातकानिमहच्छब्देनगुरुत्वंद्योत्यते ॥ ६ ॥

## पंचमहापातकांचा विचार.

या प्रमाणें नऊ प्रकारचीं पातकें सांगितलीं त्यांत प्रथमतः महापातकांचा विचार. याज्ञवल्क्याचें वचन–ब्रह्महत्या करणारा, मद्यपानकरणारा, सोनें चोरणारा, गुरूच्याश्रियेसीं गमन करणारा,यास महापातकी अशी संज्ञा आहे.हे जे चार सांगितले याच्याशीं सहवर्तमान जो राहतो तोही महापातकी जाणावा. ॥ १ ॥ ब्रह्महत्या शब्दांतील हन् धातूचा अर्थ प्राणनाश करणें असा आहे. प्राणनाश होण्या करितां केलेला जो प्रयत्न तदनंतर कालांतरीं अगर तात्काळ प्राणनाश झाला असतां त्यास ब्रह्महत्या करणारा असें ह्मणावें. मनूचें वचन–ब्रह्महत्यादिक जीं चार पातकें यास करणारे, याच्याशीं जो संसर्ग करितो तोही महापातकी जाणावा. ॥२॥ शूद्रास मद्यपानाचे ठिकाणीं, ब्राह्मणस्त्रियेसीं गमन हें महापातक सांगितलें आहे. कारण शूद्रांनीं सुरापान केलें असतां त्यास पातित्य येत नाहीं. ब्राह्मणाच्या मालकीचें ऐशीं गुंजेपेक्षा ज्यास्त जें सोनें त्याची चोरी करणें हें महापातक आहे. याहून न्यून हरण केलें असतां महापातक होत नाहीं. हरण करणें समक्ष अथवा परोक्ष अथवा बलात्कारानें मोबदला दिल्या वाचून जें घेणें त्यास चौर्य असें ह्मणावें. ॥ ३ ॥ महापातक्याशीं संसर्ग केल्यानेंही महापातकी होतो असें जें सांगितलें त्यास वचन–महापातक्याशीं भाषण केलें असतां,त्याचा शरीर स्पर्श झाला असतां,तसेंच त्या सहवर्तमान अध्ययन केलें असतां, त्याच्या पंक्तीशीं भोजन केलें असतां,एकेठिकाणीं शयन केल्यानें व बसल्यानें, जलपान केल्यानें पाप लागतें त्याच्याशीं भाषणवर्षभर केलें असतां पातित्य प्राप्त होतें. यास विष्णुस्मृतीचें वचन असें आहे कीं, पतिता शीं वर्षभर पर्यंत सहवास केला असतां सहवासी मनुष्य पतित होतो. ॥ ५ ॥ च्यवन ऋषींचें वचन–ब्रह्म हत्यादि पातकें सर्व साधारण सांगून

क्षत्रियांस विशेष असा आहे कीं, दंड करण्यास अयोग्य अशा मनुष्यास दंड करणें व युद्धांतून पळून जाणें हें महापातक सांगितलें आहे. वैश्यांस, माप, तराजू यांच्या मध्यें खोटेपणा करून विकणें व मांस विकणें हीं महापातकें सांगितलीं आहेत. शूद्रांस ब्राह्मणस्त्रियेशीं गमन करणें, कपिला गाईचें दुध पिणें हें महापातक सांगितलें आहे. जीं केलीं असतां मनुष्यास पतित करितात ह्मणोन त्यास पातक असें ह्मणावें. सर्व पातकां पेक्षां हीं पातकें फार मोठीं असल्या कारणानें त्यांस महापातक असें ह्मणावें. ॥ ६ ॥

॥ अथवक्ष्यमाणकृच्छ्रादिप्रायश्चित्तप्रत्याम्नायाद्युपयोगितयाद्रव्यमानमुच्यते ॥

## ॥ अथ सुवर्णमाननिर्णयः ॥

गुंजाकृष्णलशब्दौपर्यायधाचकौतत्रपंचगुंजापरिमितःस्वर्णमाषः ॥ तेषोडशमाषा अक्षशब्देनसुवर्णशब्देनकर्षशब्देनवस्तशब्देनचोच्यंते ॥ सुवर्णाश्चत्वारःपलंनिष्कश्चोच्यते ॥ १ ॥ याज्ञवल्क्यः ॥ जालसूर्यमरीचिस्थंत्रसरेणुरजस्मृतम् ॥ तेऽष्टौलिक्षास्तुतास्तिस्रोराजसर्षपउच्यते ॥ २ ॥ गौरस्तुतेत्रयःषट्तेयवोमध्यस्तुतेत्रयः ॥ कृष्णलःपंचतेमाषस्तेसुवर्णश्चषोडश ॥ ३ ॥ पलंसुवर्णाश्चत्वारःपंचवापिप्रकीर्तितम् ॥ पलानिधरणंदश ॥ निष्कःसुवर्णाश्चत्वारः ॥ इतिहेमाद्रिः ॥ ४ ॥ निष्कश्चाष्टगुंजात्मकैश्चत्वारिंशत् ४० माषैर्भवति ॥ स्मृत्यंतरेतु ॥ नवमाषमितंस्वर्णंवराहः ॥ द्विवराहस्तुनिष्कःस्यादितिकथितम् ॥ अत्रशक्ताशक्तादिव्यवस्थयायोजनाकार्या ॥ ५ ॥

पुढें सांगावयाचीं जीं कृच्छ्रादिप्रायश्चित्तें त्यांच्या प्रत्याम्नायाच्या उपयोगाकरितां द्रव्य मान सांगतों.

## सुवर्ण मानाचा निर्णय.

गुंजेस " कृष्णल " अशी संज्ञा आहे. पांच कृष्णल ह्मणजे एक सोन्याचा मासा होतो. ते सोळा मासे ह्मणजे ऐशीं ८० गुंजांचा एक कर्ष ह्मणजे तोळा होतो त्यासच अक्ष, सुवर्ण, वस्त, कर्ष, अशा संज्ञा आहेत. चार सुवर्ण ह्मणजे तीनशेंवीस ३२० गुंजांचा एक पळ होतो त्यासच निष्क असें ह्मणतात. ॥ १ ॥ यास याज्ञवल्क्याचें वचन–झरोक्याच्या मार्गानें ज्या-सूर्य किरणांत धुळी दिसतात त्यांस त्रसरेणु अशी संज्ञा आहे, आठ त्रसरेणु झाले ह्मणजे एक लिक्षा होते. तीन लिक्षा झाल्या ह्मणजे एक राजसर्षप होतो. ॥ २ ॥ तीन राजसर्षप झाले ह्मणजे एक गौरसर्षप होतो. सहा गौरसर्षप ह्मणजे एक यव होतो तीन यव झाले ह्मणजे एक कृष्णल ( गुंज ) होते. पांच गुंजा झाल्या ह्मणजे एक मासा होतो. सोळा मासे झाले ह्मणजे एक सुवर्ण होतें. ॥ ३ ॥ चार सुवर्ण झाले ह्मणजे एक पळ होतो. कित्येक ठिकाणीं पांच सु-

र्णाचाही पळ सांगितला आहे. दहा पळ झाले ह्मणजे एक धरण, च्यार सुवर्णास निष्क, हेमाद्रीनें सांगितला आहे. ॥ ४ ॥ ह्मणजे व्यवहारिक आठ गुंजेचा मासा या प्रमाणानें ४० माशांचा निष्क होतो. अन्यस्मृतिमध्यें तर नऊ मासे सुवर्ण झालें असतां एक वराह होतो. दोन वराह झाले असतां एक निष्क होतो ह्मणजे ९० गुंजा सोन्यास निष्क अशी सज्ञा आहे. येथें श्रीमत व गरीब असा विचार करून या वजनाची योजना करावी.

## ॥ अथरजतोन्माननिर्णयः ॥

द्वेकृष्णलेरूप्यमाषोधरणंषोडशैवते ॥ शतमानंतुदशभिर्धरणैःपलमेवतु ॥ १ ॥ निष्कंसुवर्णाश्चत्वारःकार्षिकस्ताम्रिकःपणः ॥ शतमानपलशब्दौपर्यायौ ॥ २ ॥ निष्कंसुवर्णाश्चत्वारइति ॥ अस्यार्थमाहविज्ञानेश्वरः ॥ पूर्वोक्ताश्चत्वारःसुवर्णारौप्यनिष्काइति ॥ तथाच ॥ सुवर्णचतुष्टयसमानंरजतनिष्कमित्यर्थः ॥ ३ ॥ लिलावत्यांप्रकारांतरेणनिष्कमुक्तम् ॥ वराटकानांदशकद्वयंयत्साकाकिणीताश्चपणश्चतस्रः ॥ तेषोडशद्रंमइहावगम्योद्रंमैस्तथाषोडशभिश्चनिष्कइति ॥ ४ ॥

## रुप्याच्यामानाचा विचार.

दोन गुंजा वजनाचा रुप्याचा एक मासा होतो. याप्रमाणें सोळा मासे म्हणजे ३२ गुंजा वजनात्मक रुप्यास धरण अशी सज्ञा आहे. दहा धरण झाले म्हणजे एक पळ होतें. ॥ १ ॥ चार सुवर्ण झाले म्हणजे एक निष्क होतो. तांब्याचा म्हणजे जो एक पण म्हणजे पैसा त्यास कार्षिक अशी सज्ञा आहे. ॥ २ ॥ शतमान आणि पळ हे पर्याय शब्द आहेत. चार सुवर्णाचा निष्क होतो. यांचा अर्थ विज्ञानेश्वरानें असाच सांगितला आहे. पूर्वोक्त जे चार सुवर्ण म्हणजे ४० मासे जें सोनें तितक्या वजनाचें जें रुपें त्यास निष्क अशी सज्ञा आहे. ॥ ३ ॥ ज्योतिष शास्त्रांत लिलावतीमध्यें निष्क दुसऱ्या प्रकारानें सांगितला आहे. वीस कवडयांची एक काकिनी ( दमडी ) होते. चार दमडयांचा एक पण ( पैसा ) होतो. सोळा पैशांचा एक द्रंम ( पावला ) होतो. आणि सोळा द्रमांचा एक निष्क होतो. ॥ ४ ॥

## ॥ अथधान्यमाननिर्णयः ॥

॥ भविष्ये ॥ पलंद्वयंतुप्रसृतंद्विगुणंकुडवंमतं ॥ चतुर्भिःकुडवैःप्रस्थःप्रस्थाश्चत्वारआढकः ॥ १ ॥ आढकैस्तैश्चतुर्भिश्चद्रोणस्तुकथितोबुधैः ॥ द्रोणैःषोडशभिःखारीविंशत्याकुंभउच्यते ॥ २ ॥ कुंभैस्तुदशभिर्वाहोधान्यमानंप्रकीर्तितमिति ॥ विंशत्याकुंभइति विंशत्याद्रोणैरित्यर्थः ॥ ३ ॥ पलंचकुडवःप्रस्थआढकोद्रोणएवच ॥ धान्यमानेषुबोद्ध

व्याःक्रमशोमीचतुर्गुणाः ॥ ४ ॥ द्रोणैःषोडशभिःखारीविंशत्याकुंभउच्यते ॥ कुंभैस्तु दशभिर्वाहोधान्यसंख्याप्रकीर्तिता ॥ विंशत्येत्यत्रापिद्रोणैरितिसंबध्यते ॥ ५ ॥ उदीच्यास्तुतुलयाधान्यमानंकुर्वंति ॥ दाक्षिणात्याःपात्रेणकुर्वंति ॥

## धान्यमानाचा विचार.

भविष्य पुराणांतील वचन—दोन पल ह्मणजे ८ तोळे झाले म्हणजे एक प्रसृत होतें. दोन प्रसृतांचें एक कुडव होते. च्यार कुडवांचा एक प्रस्थ होतो. चार प्रस्थांचा एक आढक (पायली) होते.॥ १॥ चार आढकांचा एक द्रोण होतो.सोळा द्रोणांची खारी होते. वीस खारींचा कुंभ होतो. ॥ २ ॥ दहा कुंभ म्हणजे एक वाह होतो. याप्रमाणे धान्यमान जाणावें. ॥ ३ ॥ पल म्हणजे चार तोळे कुडव म्हणजे सोळा तोळे, प्रस्थ म्हणजे ६४ तोळे, आढक म्हणजे २५६ तोळे, द्रोण म्हणजे १०२४ तोळे, या प्रमाणें धान्य मानाचे ठायीं क्रमेंकरून चौपट चौपट जाणावेत. ॥ ४ ॥ सोळा द्रोणांची खारी होते. वीस खारींचा कुंभ होतो. दहा कुंभांचा वाह होतो. या प्रमाणें धान्य संख्या सांगितली आहे. ॥ ५ ॥ उत्तरेकडील लोक तोलून धान्य माप करितात आणि दक्षिणेकडील मापानें धान्याची गणना करितात.

## ॥ अथ सकलपातकोपयोगी कृच्छ्रादिप्रायश्चित्तविचारः ॥

॥ मनुः ॥ यैरभ्युपायैरेतांसिमानवोऽपकर्षति ॥ तान्वोऽभ्युपायान्वक्ष्यामिदेवर्षिपितृसेवितान् ॥ १ ॥ तत्रकृच्छ्रशब्दःसामान्यविशेषवचनः ॥ शूलपाणिस्तुनिरुपपदःकृच्छ्रःप्राजापत्यापरपर्यायःसोपपदस्तुतत्तद्वाचकइत्याह ॥ तत्रपादकृच्छ्रमाहयाज्ञवल्क्यः ॥ एकभक्तेननक्तेनतथैवायाचितेनच ॥ उपवासेनचैवायंपादकृच्छ्रःप्रकीर्तितः ॥२॥ एकभक्तेनदिवैवोक्तकालेएककालकृतभोजनेननक्तेनदिनंविलंघ्यरात्रौसार्धयामाभ्यंतरेसकृन्मितभोजनेनउपवासेन दिवारात्रमभोजनेनअयाचितेनयाचनांविनालब्धान्नेन ॥ एवंसचतुरहःसाध्यःपादकृच्छ्रःप्रकीर्तितः ॥ ३ ॥ एकभक्तादौग्राससंख्यानियमःपराशरेणोक्तः ॥ सायंतुद्वादशग्रासाःप्रातःपंचदशस्मृताः ॥ चतुर्विंशतिर्वायाच्यापरंनिरशनंस्मृतम् ॥ ४ ॥ सायंनक्तेप्रातरेकभक्ते ॥ आपस्तंबस्तुप्रकारांतरेणाह ॥ सायंद्वाविंशतिर्ग्रासाःप्रातःषट्विंशतिस्तथा ॥ चतुर्विंशतिर्वाऽयाच्यापरंनिरशनंस्मृतम् ॥ ५ ॥ कुक्कुटांडप्रमाणाःस्युर्यथाचास्यंविशेत्सुखम्॥ अनयोश्चपक्षयोःशक्त्यपेक्षयाविकल्पएवमुक्तत्रापिशक्त्यपेक्षयाविकल्पोविज्ञेयः ॥ उपवासस्तुफलादिद्वारावाकार्यः ॥ ६ ॥ अष्टैतान्यव्रतघ्नानिआपोमूलंफलंपयः ॥ हविर्ब्राह्मणकाम्याचगुरोर्वचनमौषधमित्युक्तेः ॥७॥ परंतुपरिमितमेवेतिगौडाः ॥ इदमपिनेत्यपरे ॥ उपवासाशक्तौरूप्यमाषत्रयदानम् ॥ एकविप्रभोजनंवाशक्तेनउपवासस्थानेद्वौविप्रौभोज्यौसहस्रगायत्रीजपोवा ॥ नक्ताशक्तौ

तुगुंजाद्वयपरिमितरूप्यमापकदानम् ॥ तदभावेतन्मूल्यंदेयम् ॥ तत्रप्रायश्चित्तेसंकल्पः॥ अद्येत्यादिअमुकगोत्रोमुकशर्मामुककर्मजन्यपापक्षयकामोनक्तव्रतंकरिष्ये ॥ तदशक्तौ प्रतिनिधिरूपंइमंरौप्यमापकंचंद्रदैवत्यममुकनामगोत्रायविप्रायाहंसंप्रददइति ॥ इदंमूल्यंविष्णुदैवत्यमितिवासंकल्प्यदानंविप्रंचसंपूज्यद्रव्यमालंभ्यसंमोक्ष्यदद्यात् ॥ ८ ॥

## आतां सर्व पातकांस जीं सांगितलेलीं प्रायश्चित्तें त्यांतील अंगभूत जीं कृच्छ्रादि प्रायश्चित्तें त्यांचा विचार.

मनूचें वचन— मनुष्य ज्या उपाये करून पापातें दूर करितो आणि देव, ऋषि, पितर यांनी जे उपाय स्वीकार केले आहेत, ते येथें सांगतों. ॥१॥ त्यामध्यें कृच्छ्र शब्द सामान्य आणि विशेषवाचक आहे. सामान्य ह्मणजे सर्व प्रायश्चित्त मात्रास कृच्छ्र अशी संज्ञा आहे. विशेष म्हणजे प्राजापत्य प्रायश्चित्तास कृच्छ्र अशी संज्ञा आहे. शूलपाणीनें दुसऱ्या पदानें रहित जो कृच्छ्र शब्द तो प्राजापत्य वाचक आहे. आणि दुसरा शब्द ज्याच्या पाठिमागें आहे तो विशेष वाचक. जसें पर्णकृच्छ्र, अतिकृच्छ्र, पादकृच्छ्र. याज्ञवल्क्य सांगतो. प्रथम दिवशीं एक वेळां जेवल्यानें, आणि दुसरे दिवशीं सायंकाळीं भोजन केल्यानें, तिसरे दिवशीं अयाचित वृत्तीनें राहिल्यानें, चौथे दिवशीं उपवास केल्यानें असें चार दिवसांचें जें व्रत त्यास पादकृच्छ्र असें ह्मणतात. ॥ २ ॥ मूळ श्लोकांत एकभक्तादि शब्द आहेत त्यांचा अर्थ—एकभक्त ह्मणजे दिवसा एक वेळींच भोजन करणें, नक्त ह्मणजे दिवस गेल्या नंतर रात्रीं दीड प्रहराचे आंत एक वेळां परिमित अन्न खाणें, उपवास ह्मणजे दिवसा रात्रीं भोजन न करणें. अयाचित ह्मणजे याचने वांचून प्राप्त झालेलें जें अन्न तें खाणें या प्रमाणें चार दिवसांनीं सिद्ध होणारा पादकृच्छ्र सांगितला आहे. ॥ ३ ॥ एक भक्तादिकाचे ठायीं ग्रास संख्येचा नियम पराशरानें सांगितला आहे. कृच्छ्र व्रताचे ठायीं नक्त सांगितलें आहे. त्यास सायंकाळीं बारा घांस भक्षण करणें, प्रातःकाळीं पंधरा घांस खावेत. आणि अयाचिताचे ठायीं चोवीस घांस खावेत. एक दिवस कांहीं एक भक्षण करूं नये. ॥ ४ ॥ आपस्तंबाचें वचन—सायंकाळीं बावीस ग्रास, प्रातःकाळीं सव्वीस आणि अयाचितास चोवीस, आणि एक दिवस उपोषण करावें. ॥ ५ ॥ येथें ग्रास जे घ्यावयाचे ते कोंबड्याच्या अंड्याच्या प्रमाणाचे घ्यावयाचे. येथें पराशर आणि आपस्तंब यांचे जे दोन पक्ष सांगितले ते शक्तितारतम्यानें जाणावे. येथें जे उपोषण करण्यास सांगितलें तें फळादि भक्षण करून करावें. ॥ ६ ॥ कारण पाणी, मूळें ह्मणजे रताळें वगैरे, फळें—आंबे, केळीं वगैरे दुध, हविष्यान्न, ब्राह्मणाची इच्छा, गुरूचें वचन आणि औषध यांतील कोणताही पदार्थ भक्षण केला असतां व्रताचा नाश होत नाहीं असें वचन आहे. ॥ ७ ॥ हें फळादिक जें भक्षण करावयाचें तें परिमितच खावें असें गौडाचें मत आहे. हे ही खाऊं नयेत असें इतर ग्रंथकार ह्मणतात. उपवास करण्याची शक्ति नसल्यास ब्राह्मणास तीनमासे रुपें दान करावें. अथवा एक

ब्राह्मणास भोजन घालावें. श्रीमंत असल्यास दोन ब्राह्मणांस भोजन घालावें. अत्यंत दरिद्री असोन अशक्त असेल तर हजार गायत्री जप करावा. नक्त करण्यास सामर्थ्य नसेल तर एक मासाभर रुपें अथवा त्याची किंमत ब्राह्मणास द्यावी. त्याचा संकल्प-अद्येत्यादि अमुकगोत्रो अमुकशर्माऽमुककर्मजन्यपापक्षयकामोनक्तव्रतंकरिष्ये॥ तदशक्तौमतिनिधिरूपंदमरौप्यमाषकंचंद्रदैवत्यममुकनामगोत्रायविप्रायाहंसंमददइति ॥ असा संकल्प करून ब्राह्मणाची पूजा करून त्यास हात लावून त्या ब्राह्मणास द्यावें. ॥ ८ ॥

## ॥ अथार्धकृच्छ्रप्रायश्चित्तनिर्णयः ॥

सायंप्रातस्तथैवैकंदिनद्वयमयाचितम् ॥ दिनद्वयंचनाश्नीयात्कृच्छ्रार्द्धंतद्विधीयते ॥ ९ ॥ इदंसार्धकार्षापणसममितिगौडाः ॥

## अर्धकृच्छ्रप्रायश्चित्ताचा निर्णय.

एक दिवस सायंकाळीं भोजन व एक दिवस दिवसा भोजन करणें, दोन दिवस उपोषण करणें, या प्रमाणें केल्यानें अर्धकृच्छ्र होतो. ॥ ९ ॥ येथें गौड असें म्हणतात कीं, अत्यंत अशक्त असेल तर त्यानें दीड तोळा रुपें दान करावें.

## ॥ अथपादोनकृच्छ्रनिर्णयः ॥

तथाचप्रायश्चित्तेंदुशेखरे ॥ द्व्यहंप्रातर्द्व्यहंसायंद्व्यहमयाचयाचितम् ॥ द्व्यहमुपवासइतिअष्टदिनैःपादोनकृच्छ्रोभवति ॥ अत्रचतुःपणाधिककार्षापणद्वयमशक्तौदेयम् ॥१०॥

## पादोनकृच्छ्राचा निर्णय.

प्रायश्चित्तेंदु शेखरांत असें सांगितलें आहे कीं, दोन दिवस प्रातःकाळीं अन्न भक्षण करणें व दोन दिवस सायंकाळीं जेवणें, दोन दिवस अयाचितानें जें मिळेल तें खाणें आणि दोन दिवस उपोषण करणें. या प्रमाणें केल्यानें पादोनकृच्छ्र होतो. येथें अशक्त असेल त्यानें, दोन रुपये आणि च्यार पैसे ब्राह्मणास द्यावे. ॥ १० ॥

## ॥ अथप्राजापत्यकृच्छ्रनिर्णयः ॥

तथाचयाज्ञवल्क्य. ॥ यथाकथंचित्त्रिगुणःप्राजापत्योऽयमुच्यते ॥ मनुः ॥ त्र्यहंप्रातस्त्र्यहंसायंत्र्यहमद्यादयाचितम् ॥ त्र्यहंपरंचनाश्नीयात्प्राजापत्यंचरन्द्विजः ॥ ११ ॥ गौतमः ॥ प्राजापत्यंकृच्छ्रमिदंसर्वपापप्रणाशनं॥ त्रिदिनंस्याद्दिवाभुक्तिस्त्रिदिनंरात्रिभोजनम् ॥ १२ ॥ अयाचितंचत्रिदिनंत्रिदिनंवायुभक्षणं ॥ गोदानंपंचगव्यांतेशुद्धिमाप्नोत्यनुत्तमाम् ॥१३॥ पद्मात्क्रमणैकभक्तनक्तायाचितोपवासाःएवंत्रिरावृत्तिः ॥ पराशरः॥

अकामतःकृतंपापंवेदाभ्यासेनशुध्यति ॥ कामतस्तुकृतेपापेप्राजापत्यंसमाचरेत् ॥ १४ ॥ जाबालिः ॥ प्रजापतिरिदंसाक्षात्सृष्टवान्देवसन्निधौ ॥ सर्वलोकोपकारायसर्वपापापनुत्तये ॥ १५ ॥ इदंपङ्कुपवाससमम् ॥ तदशक्तौपयस्विन्याधेनोर्दानम् ॥ तदभावेगोमूल्यम् ॥ तत्रदेवलः ॥ गवामभावेनिष्कंस्यात्तदर्द्धंपादमेववा ॥ दरिद्रःकुरुतेपादंधनिकःपूर्णमाचरेत् ॥ १६ ॥ अन्यथातत्फलंनास्तिप्राजापत्यंनसिध्यति ॥ मार्कंडेय. ॥ प्राजापत्येष्वशक्तस्तुधेनुदद्यात्पयस्विनीम् ॥ धेनोरभावेनिष्कंस्यात्तदर्धंपादमेववा ॥ १७॥ .अशीतिगुंजात्मकःकर्षःचत्वारकर्षानिष्कंनिष्कनिष्कार्धनिष्कपादान्यतमप्रमाणंहेमरूप्यंवाधेनुमूल्यदेयम् ॥ अत्यशक्तेननिष्कपादार्द्धंरजतंवादेयम् ॥ अथवाज्योतिःशास्त्रोक्तषोडशद्रंमैर्निष्कःनिष्कार्धनिष्कपादनिष्कपादार्धपरिमितंसुवर्णंवारजतंदेयम् ॥ षट्त्रिंशन्मते ॥ धेनुःपंचभिराढ्यानांमध्यानांत्रिपुराणिका ॥ कार्षापणैकमूल्यापिदारिद्र्याणांप्रकीर्तिता ॥ १८ ॥ पंचभि पुराणैरितिकेचित् ॥ 'पुराणश्चषोडशमाषपरिछिन्नंरजतम् ॥ षद्वापणषोडशकंपुराण. ॥ पुराणएवकार्षापणशब्देनकार्षिकशब्देनचोच्यते ॥ १९ ॥ पणस्तु ॥ अशीतिरक्तिकापरिमितंताम्रंअशितिवराटिकावा ॥ ताम्रपणएवकर्षउच्यते ॥ रौप्यःपुराणोदक्षिणस्यांपणैःपूर्वस्यामितिव्यवस्था ॥ २० ॥ वत्समूल्यमाहकात्यायनः ॥ द्वात्रिंशत्पणिकागावोवत्सःपौराणिकोमतः ॥ धेनुमूल्यंकार्षापणत्रयम् ॥ सवत्सागौर्धेनुरित्यर्थ. ॥ शूलपाणिस्तु ॥ वृषभमूल्यंपंचकार्षापणाइत्याह प्रायश्चित्तेंदुशेखरेतु ॥ षट्कार्षापणाउक्ताः ॥ अश्वमूल्यंतुपंचदशकार्षापणाउक्ताः ॥ प्रसिद्धवचनानुसारेणव्यवस्थाश्रेयसीतिअस्मन्मतम् ॥ धेन्वादिसममूल्यंभूधनधान्यवस्त्रवर्णरुप्यादिवादद्यात् ॥ २१ ॥ दरिद्रकुरुतेपादंधनिकःपूर्णमाचरेत् ॥ अन्यथातत्फलंनास्तिप्राजापत्यंनासिध्यति ॥ इतिपूर्वोक्तदेवलवचनात् ॥ धनिकेनवित्तशाठ्यादिनाहीनपक्षाश्रयणंनकार्यंपूर्णफलाभावात् ॥ २२ ॥

## प्राजापत्यकृच्छ्राचानिर्णय.

. यास याज्ञवल्क्याचें वचन. प्रथम जो पादकृच्छ्र सांगितला तो कसा तरी तीन वेळां केल्यास प्राजापत्य कृच्छ्र होतो. मनूचें वचन. तीन दिवस दिवसा भोजन करणें, तीन दिवस सायंकाळीं भोजन करणें, तीन दिवस अयाचिताने मिळालेलें अन्न भक्षण करणे, या प्रमाणें केल्यनें प्राजापत्य प्रायश्चित्त बारा दिवसांनीं होतें. ॥ ११ ॥ गौतमाचे वचनाचा अर्थ असाच आहे. परंतु बारा दिवस असें करून तेरावे दिवशीं पचगव्य प्राशन करून ब्राम्हणास एक गोप्रदान केल्याने शुद्धता होते ॥ १२ ॥ १३ ॥ अथवा प्राजापत्य व्रताचें ठायीं क्रमानें एक भुक्त, नक्त, अयाचित आणि उपवास हे चाराची तीन वेळा आवृत्ती करावी. पराशराचें वचन. इच्छा न करिता सहज रीतीनें केलेलें पाप वेदाभ्यासानें नाहींसें होतें. ज्ञान पूर्वक केलेलें पाप प्राजापत्या चरणानें

नाहींसें होतें ॥ १४ ॥ जाबालीचें वचन. साक्षात् प्रजापतीनें सर्व लोकांवर उपकार कराया, आणि सर्व पापाचा नाश व्हावा, म्हणून देवाच्या समोर हें प्राजापत्य उत्पन्न केलें आहे. ॥१५॥ हे सहा उपवास मेरुसारिखे आहे. हें करण्यास सामर्थ्य नसेल तर पुष्कळ दूध देणारी गाय ब्राह्मणास द्यावी. गाय देण्यास सामर्थ्य नसेल तर एक निष्क प्रमाण द्रव्य द्यावें. किंवा निष्काचें अर्ध, किंवा निष्काचा पाद दरिद्री जो आहे त्यानें निष्कपादद्रव्य द्यावें. श्रीमंत जो आहे त्यानें परिपूर्ण निष्क दान करावें. असें न केलें तर प्राजापत्य होत नाहीं, ॥ १६ ॥ मार्कंडेयाचे वचनाचा अर्थ असाच आहे ॥ १७ ॥ ऐंशीं गुंजाचा एक कर्ष म्हणजे तोळा, शास्त्रात सांगितला आहे. अशा चार तोळ्यांचा एक निष्क होतो. श्रीमंतानें निष्क म्हणजे चार तोळे, मध्यम मनुष्यानें निष्कार्ध म्हणजे दोन तोळे, कनिष्ठ मनुष्यानें निष्कपाद म्हणजे तोळाभर वजनाचें सोनें अथवा रुपें गाईच्या किमती बद्दलचें ब्राह्मणास द्यावें. अत्यंत गरीब असेल त्यानें निष्कपादार्ध म्हणजे सहा मासे रुपें द्यावें. ज्योतिष शास्त्राच्या लिलावती ग्रंथांत द्रम म्हणजे एक पावला सोळा द्रमाचा एक निष्क होतो. निष्क म्हणजे चार रुपये निष्कार्ध म्हणजे दोन रुपये. निष्कपाद म्हणजे एक रुपया. निष्कपादार्ध म्हणजे आठ आणे वजनाचें सोनें अथवा रुपें द्यावें. षट्त्रिंशन्मतांत पांच कार्षापण म्हणजे पांच रुपये गाईची किंमत उत्तमास सांगितली आहे. मध्यमास तीन पुराण म्हणजे ९६ गुंजा रुपें किंमत सांगितली आहे. दरिद्री यास एक कार्षापण म्हणजे एक तोळा ॥ १८ ॥ पुराण म्हणजे सोळा मासे रुप्याचा एक पुराण होतो. येथें दोन गुंजा वजनाच्या रुप्याचा मासा सांगितला आहे स्त्रियेयांनीं पांच पुराणाची गाय उत्तमास सांगितली आहे. अथवा सोळा पणाचा पुराण होतो. पुराणासच कार्षापण, कार्षिक हे शब्द आहेत. ॥ १९ ॥ पण म्हणजे ऐंशी गुंजा परिमित तांबें अथवा ऐंशी कवड्यांचा एक पण होतो. त्याचा पुराण दक्षिणदिशेकडे घेण्यास सांगितला आहे. पूर्व दिशेकडे पण म्हणजे तांब्याचे पैसे घ्यावेत. याप्रमाणें व्यवस्था प्रायश्चित्तेंदुशेखरांत सांगितली आहे. ॥ २० ॥ धांसराची किंमत कात्यायनानें सांगितली आहे. ती अशी. कनिष्ठपक्षीं बत्तीस पैसे गाईची किंमत व श्रीमंताची किंमत पुराण म्हणजे सोळा पैसे याप्रमाणें सामान्य गाईची किंमत. अत्यंत दरिद्री यास तीन कार्षापण सांगितले आहे. स्मृत्यंतरीं तर धेनूची किंमत पांच कार्षापण सांगितली आहे. प्रायश्चित्तेंदुशेखरांत धेनूची साठ कार्षापणें सांगितलीं आहेत. आणि [illegible] तर [illegible] कार्षापणें सांगितलीं आहेत [illegible] [illegible] ॥ अगदी [illegible] आहे [illegible] प्रकारांत प्रसिद्ध वचनें आहेत [illegible], असें [illegible]. [illegible] विशेष [illegible] भूमि, धन, [illegible], [illegible], सोनें, रुपें [illegible] ॥ २१ ॥ दरिद्री [illegible] व [illegible] करावा. असें न केल्यानें [illegible]

सिद्ध होत नाहीं असें देवलाचें वचन आहे. यास्तव श्रीमंतानें द्रव्यादिकाच्या लोभानें हीन प- क्षाचा आश्रय करूं नये. केला असतां त्यास पूर्णफळ मिळत नाहीं ॥ २२ ॥

## ॥ अथप्राजापत्यप्रत्याम्नायाः ॥

अपरार्के द्वादशैवसहस्राणिजपेद्देवीमुपोषितः ॥ जलांते विधिवन्मौनीप्राजापत्यो यमुच्यते ॥ १ ॥ जलांतेजलसमीपे ॥ तत्रैव अन्नदानहिरण्येनद्वादशब्राह्मणान् शुचित् ॥ तर्पयेन्मारुताशीचश्रोत्रियान्कृच्छ्रउच्यते ॥ २ ॥ उपोष्यश्रद्धयायुक्तस्ति- लदात्राणिधर्मतः ॥ द्वादशब्रह्मवादिभ्यःप्राजापत्येनतत्समम् ॥ ३ ॥ स्वयमाह- त्ययोमूर्द्धातृणभारानुपोषितः ॥ दद्याद्गोमंडलेकृच्छ्रेद्वादशैवनसंशयः ॥ ४ ॥ प्राणायामशतंकृत्वाद्वात्रिंशोत्तरमार्तिपु ॥ अहोरात्रोषितस्तिष्ठेत्प्राङ्मुखःकृच्छ्रउच्यते ॥ ५ ॥ नमस्कारसहस्राणिद्वादशैवदृढव्रतः ॥ गोविप्रपितृदेवेषुकुर्यात्कृच्छ्रसमंभवेत् ॥ गायत्र्यासहस्रतिलहोमः ॥ क्वचित्सहस्रंप्याख्यातितिलहोमउक्तः ॥ अपरार्के स- मिद्धृतहविर्धान्यतिलान्वामारुताशनः ॥ हुत्वाद्वादशसाहस्रंगायत्र्याकृच्छ्रमाप्नुयात् ॥ द्वादशभिरधिकं सहस्रं द्वादशसहस्रं ॥ तीर्थोद्देशेनयोजनगमनंवाशिरःशोषणपूर्वकं द्वादशसांगस्नानानिवाप्राजापत्यमेव कृच्छ्रंभवति ॥ ८ ॥

## प्राजापत्याच्या प्रत्याम्नायाचा विचार.

अपरार्कातील वचन- स्नानकरून नदीच्यापाण्याजवळ बसून उपोषित, मौन धारण करून बारा हजार गायत्री मंत्र जप करावा. असें केल्यानें प्राजापत्य कृच्छ्र होतें. ॥ १ ॥ अन्नदान अथवा सोनें हें बारा विद्वान् ब्राह्मणास देऊन तृप्त करावे. व आपण ते दिवशीं उपोषण करावें. असें केल्याने प्राजापत्य कृच्छ्र आचरणाचें फळ प्राप्त होतें. ॥ २ ॥ उपोषण करून श्रद्धेनेंयुक्त असें होऊन विद्वान् ब्राह्मणास बारा तिळपात्रें द्यावीत. ह्मणजे प्राजापत्याचरण केल्यासारखें होतें. ॥ ३ ॥ उपोषित असें होऊन गवत काढून त्याचे भारे आपल्या मस्तकावर आणून गाईच्या समुदायास खाण्यास असे बारा भारे घालावे ॥ ४ ॥ अहोरात्र उपोषित होऊन पूर्वेकडे तोंड करून बसून शा- स्त्रात सांगितल्या प्रमाणें कुंभक, रेचक पूरक यानियमानें १३२ प्राणायाम केल्यानेंही कृच्छ्र सिद्ध होतो. ॥ ५ ॥ गायी, ब्राह्मण, पितर, देव यांस नियम युक्त होऊन बारा हजार नम- स्कार केल्यानेंही कृच्छ्राचरण होतें. ॥ ६ ॥ गायत्री मंत्र ह्मणून एक हजार तिळहोम केल्यानें- ही प्रायश्चित्त होतें. अपरार्कातील वचन—स्वतःउपोषित होऊन समिधा, तूप, हविर्द्रव्यें, धान्य, तिळ, यांतील कोणत्या तरी एका पदार्थानें गायत्री मंत्र म्हणून एक हजार आणि हवन केल्यानें कृच्छ्राचरण केल्यासारखें होतें ॥ ७ ॥ तीर्थाच्या उद्देशानें योजन म्हणजे चार कोस गमन के- ल्यानें अथवा एक वेळा शास्त्रांत सांगितल्या प्रमाणें स्नानकरून पाण्याच्या बाहेर बसावें. नंतर

मस्तक घाळलें म्हणजे पुनः स्नान करावें. या प्रमाणें बारा वेळ स्नान केल्यानेंही कृच्छ्राचरण केल्याचें फल प्राप्त होतें ॥ ८ ॥

## ॥ अथकृच्छ्रस्थाने तीर्थ प्रत्याम्नाया उच्यंते.॥

प्रायश्चित्तेंदुशेखरे ॥ भागीरथ्यांस्नानंपष्टियोजनागतस्य पडब्दकृच्छ्रसमम् ॥ चंद्रभागावेत्रवतीशरयूगोमतीदेविकाकौशिकीमंदाकिनीपुनःपुनापूर्णाबाहुदावारुणी गंडक्यादिदेवनदीपुद्वादशयोजनागतस्यपोडशकृच्छ्राणि ॥ एतासांपरस्परसंगमेद्विगुणंत्रिगुणमित्यन्ये ॥ ९ ॥ अन्यासुसमुद्रगासुनदीपुद्वादशयोजनागतस्यपट्कृच्छ्रसमम् उपवाससहितंनदीस्नानंकृच्छ्रसमंयोजनादर्वागपि ॥ १० ॥ परार्थंगतातीर्थेपोडशांशंलभते ॥ प्रसंगेनगंताद्धफलं ॥ पितामहभ्रातृमातामहपितृव्यमातुलश्वशुरपोपकार्थं गुर्वाचार्योपाध्यायाद्धेतेपांपितृष्वसृमातृष्वसृमातृष्वसर्थंचस्नात्वास्वयमष्टमांशंलभते ॥ पित्रोरर्थेकुर्वन्पुत्रश्चतुर्थांशं ॥ दंपतीचसपल्पश्चलभंतेऽद्धमिथःफलम् ॥ ११ ॥ देवलः ॥ अतिगम्यचतीर्थानिपुण्यान्यायतनानिच ॥ नरःपापात्प्रमुच्येतब्राह्मणानांतपस्विनाम् ॥ १२ ॥ अत्रविशेपविस्तारस्तुआकारग्रंथेपुद्रष्टव्यः ॥

## कृच्छ्राबद्दल तीर्थप्रत्याम्नाय सांगतों.

प्रायश्चित्तेंदुशेखरांत असें सांगितलें आहे कीं, पष्टी योजन ह्मणजे साठ योजना पासून मनुष्यानें येऊन भागीरथीचें स्नान केलें असतां पडब्दकृच्छ्र प्रायश्चित्ताचें फल प्राप्त होतें. चंद्रभागा, वेत्रवती, शरयू, गोमती, देविका, कौशिकी, मंदाकिनी, पुनः पुना, पूर्णा, बाहुदा, वारुणी, गंडकी, इत्यादिक ज्या देवनद्यांचे ठायीं बारा योजना पासून येऊन स्नान केलें असतां षोडशकृच्छ्र प्रायश्चित्ताचें फल प्राप्त होतें. या नद्यांचा परस्पर संगम जेथें झाला असेल तेथें स्नान केलें असतां दुप्पट फल प्राप्त होतें. कित्येकांचे मत तिप्पट फल प्राप्ती असें आहे ॥९॥ समुद्रास मिळणाऱ्या ज्या अन्य नद्या यांचे ठायीं द्वादश योजनें ह्मणजे ४८ कोसांवरून येऊन स्नान केलें असतां सहाकृच्छ्र प्रायश्चित्ताचें फल प्राप्त होतें. उपोषण करून नदीचें ठायीं स्नान केलें असतां प्राजापत्य कृच्छ्राचें फल प्राप्त होतें. चार कोसापेक्षां कमी प्रदेशाहून जरी आला असेल तरी ही हेंच फल प्राप्त होतें॥१०॥ दुसऱ्या करितां जाऊन तीर्थास स्नान केलें असतां त्या तीर्थाचे पुण्यापैकीं षोडशांशफल मिळतें. यात्रेच्या उद्देशानें न जातां सहज रीतीनें गेलें असतां अर्धे फल प्राप्त होतें. बापाचा बाप आजा, बंधु, आईचा बाप, चुलता, मामा, सासरा, आपलें पोषण करणारा, गुरु, उपाध्याय, बापाची बहीण, आईची बहीण यांच्या निमित्तानें स्नान केलें असतां स्नान करणारास अष्टमांश फल प्राप्त होतें, मुलानें आईबापा करितां स्नान केलें असतां चतुर्थांशफल प्राप्त होतें. तसेंच नवरा बायको यांनी

परस्परांकरितां तसेंच सापत्न स्त्रियानीं परस्परांकरितां स्नान केलें असतां परस्परांस अर्ध फळ प्राप्त होतें ॥११॥ देवळाचें वचन-पुण्यकारक तीर्थें, देवतेची स्थानें, तसेंच तपस्वी ब्राम्हणांची स्थानें यांचे ठायीं गेलें असतां मनुष्य पातका पासून मुक्त होतो. ॥१२॥यासंबधानें विशेष विचार धर्म-शास्त्राच्या निबंधग्रंथामध्यें पहावा. ॥

सुलभतपापातकनाशनोपायस्तु अस्मिन्युगेपापिजनानामुद्धारार्थंगृहीतावतारस्य लक्ष्मीपतेःश्रीपांडुरंगस्यदर्शनात्सकलपातकनाशोभवति ॥ अत्रविशेषस्तु ॥ पद्मपुराणोक्तवराहसंहितायांद्रष्टव्यः ॥ १३ ॥

## प्रायश्चित्तपूर्वाहकृत्यविचारस्तुअग्रेवक्ष्यते.

सुलभ रीतीनें पातक नाशनाचा उपाय तर या युगामध्यें पापी जनाचा उद्धार करण्या करितां ज्यानें अवतार धारण केला आहे. अशा लक्ष्मीपती जो श्री पांडुरंग यांचें दर्शन घेतलें असतां सर्व पातकांचा नाश होतो. यासंबंधानें विशेष विचार पद्मपुराणांत सांगितलेली जी वाराह संहिता तेथें पाहावा. ॥ १३ ॥ प्रायश्चित्ताच्या पूर्व दिवशीं जें करावयाचें त्याचा विचार पुढें सांगूं.

## ॥ कृच्छ्रंत्रयोदश प्रकारकं तथाचमार्कंडेयः ॥

प्राजापत्यंतप्तकृच्छ्रंपराकंपावकंतथा ॥ ततःसांतपनंकृच्छ्रंमहासांतपनंतथा ॥ १ ॥ औदुंबरंचपर्णंचफलकृच्छ्रमतःपरं ॥ कृच्छ्रंमाहेश्वरंचैवब्रम्हकृच्छ्रंतथैवच ॥ २ ॥ धान्यंस्वर्णमयंकृच्छ्रंदशत्रेधामकीर्तितम् ॥ कृच्छ्राणांसाध्यसाध्यानिपापान्याह देवलः ब्रम्हहत्यासुरापानंस्तेयंगुर्वंगनागमः ॥ तत्संयोगीचपंचैतेमहापातकिनस्त्विमे ॥ एतेषांपंचानांमरणांतंप्रायश्चित्तनकृच्छ्रादिकम् ॥ गोवधोगुर्वधिक्षेपोभृतकाध्यापना-दिकम् ॥ कृच्छ्रचांद्रायणाधैस्तुपरिशुद्धंप्रकीर्तितम् ॥ ४ ॥ तिलानांधान्यराशीनां विक्रयस्त्वन्यवस्तुनः ॥ एतत्संकरीकरणंकृच्छ्रसाध्यंवदंतिहि ॥ ५ ॥ कन्यापहरणंचैव धेनुभूहरणादिकम् ॥ मलिनीकरणंत्वेतत्कृच्छ्रसाध्यंप्रयत्नतः ॥ ६ ॥ दुरन्नभोजनं-चैवदुष्टभक्षणमेवच ॥ दुष्टशंकादिकंचैवजातिभ्रंशकरंमहत् ॥ ७ ॥ एतत्कृच्छ्राचरणे-ननश्यति ॥ व्यासः ॥ श्रीकामःपुष्टिकामश्चस्वर्गकामस्तथैवच ॥ देवताराधनपरस्त-थाकृच्छ्रंसमाचरेत् ॥ ८ ॥ रसायनानिमंत्राश्चतथाचैवौषधानिच ॥ तस्यसर्वाणिसि-ध्यंतियोनरःकृच्छ्रकृद्भवेत् ॥ ९ ॥ वैदिकानिचसर्वाणियानिकाम्यानिकानिचित् ॥ सिद्धांतिसर्वदानानिकृच्छ्रकर्तुर्नसंशयः ॥ १० ॥ याज्ञवल्क्यः कृच्छ्रकृद्धर्मकामस्तुमह तींश्रियमाप्नुयात् ॥ तथागुरुक्रतुफलमाप्नोतिसुसमाहितः ॥ ११ ॥

## कृच्छ्रें तेराप्रकारचीं सांगितलीं आहेत त्यांचा निर्णय.

मार्कंडेयाचें वचन–१प्राजापत्यकृच्छ्र२ततकृच्छ्र३पराक४यावक५सांतपन६महासांतपन७औदुंबर ८पर्णकृच्छ्र९फलकृच्छ्र १०माहेश्वरकृच्छ्र ११ ब्रह्मकृच्छ्र १२धान्यकृच्छ्र१३सुवर्णकृच्छ्र.याप्रमाणें तेरा कृच्छ्रें सांगितलीं आहेत.या कृच्छ्रांनी ज्याचा नाश होतो अथवा नाश होत नाहीं अशीं पातकें केवळ सांगतों. ब्रह्महत्या, मद्य प्राशन करणें, सुवर्ण चोरी करणें, गुरु स्त्रियेशीं गमन करणे हे चार महा पातकी याच्या बरोबर सहवास करणारा तो पंचम ॥ ३ ॥ हे जे पंच महापातकी यास मरणान्त प्रायश्चित्त सांगितलें आहे. कृच्छ्रादिकाच्या आचरणानें याचें पातक जात नाहीं. गाईचा नाश करणें आपल्या गुरूचा तिरस्कार करणें, द्रव्य घेऊन विद्यार्थ्यांस अध्ययन शिकविणें हीं पातकें कृच्छ्र, चान्द्रायण इत्यादिकाच्या आचरणानें नाहींशीं होतात म्हणजे मनुष्य त्या त्या पातकापासून शुद्ध होतो. ॥ ४ ॥ तीळ, तसेंच धान्याच्याराशी व इतर दुसरे पदार्थ म्हणजे गूळ, तूप इत्यादिक रसपदार्थ यांचा जो विक्रय करितो तो संकरीकरण प्रायश्चित्तानें दूषित होतो यामुळें त्यानें कृच्छ्राचरण केल्यानें शुद्ध होतो. कन्येचें हरण करणें, गाय, भूमी, याचे हरण करणें, यास मलिनी करण प्रायश्चित्त अशी संज्ञा आहे. हें कृच्छ्राचरण केल्यानें नाहींसें होतें. ॥ ६ ॥ निंदित अन्नखाणें, दुष्टपुरुषाचें अन्नखाणें, वाईट अन्न आहे अशी शंका उत्पन्न होते तें अन्नखाणें यास जातिभ्रंशकर पातक सांगितलें आहे. हें पापकृच्छ्राचरणानें नाहींसें होतें. ॥ ७ ॥ व्यासाचें वचन ॥ ज्यास आपणास संपत्ती प्राप्त व्हावी अशी इच्छा असेल त्या मनुष्यानें व आपलें शरीरपुष्ट असावें अशा इच्छा कारणानें, तसेंच देवतेच्या पूजे विषयीं तत्पर त्यानें कृच्छ्राचरण करावें ॥ ८ ॥ रसायनें, मंत्र, औषधी ह्या कृच्छ्रकरणाऱ्या मनुष्यास सिद्ध होतात ॥ ९ ॥ वेदांत सांगितलेंली सर्व कामनिक फळें व सर्व दानाची फळें कृच्छ्रकरणारास सिद्ध होतात ॥१०॥ याज्ञवल्क्याचें वचन धर्माची इच्छा करणारा आणि कृच्छ्रे करणारा अशा मनुष्यास मोठी संपत्ती प्राप्त होते तसेंच मोठा यज्ञ केल्यानें जसेंच फळ प्राप्त होतें. ॥ ११ ॥

## ॥ अशक्तेन तप्तकृच्छ्रादीनि प्रायश्चित्तानिप्रत्याम्ना- यद्वारा कार्याणि ॥

तथाचदेवलः ॥ तप्तकृच्छ्रस्यसर्वस्यप्रत्याम्नायोमनोःकृतः अशक्तानांचकृपयापावकेंदु- सुत पुरानघ ॥ तदेवाहंब्रवीम्यद्यशृण्वन्तुद्विजसत्तमः ॥ १ ॥ कलौयुगेविशेषेणहयन्न त्यागान्मृत्युंगच्छति ॥ पराशरः ॥ कृतेचर्माश्रितःप्राणःत्रेतायामस्थिसंश्रयः ॥ द्वापरेमांसमाश्रित्यकलावन्नमाश्रितःस्मृत ॥ २ ॥ कलौयुगेद्वादशरात्रसाध्यकृच्छ्राणां कर्तुंमशक्ताश्चिरोक्ष्यकृपयः प्रत्याम्नायदुक्तवंत.अतएवशक्ताःप्रत्याम्नायद्वाराप्रायश्चित्ता- चरणकुर्वंतु ॥ ३ ॥

अत्यंत अशक्त मनुष्यानें तप्तकृच्छ्रादिक प्रायश्चित्ते प्रत्याम्नायानें करावीत. त्यास देवलाचें वचन—तप्तकृच्छ्राचा प्रत्याम्नाय मनूनें सांगितला आहे तो मी सांगतों श्रवण कर. ॥१॥ कलियुगामध्यें अन्न त्याग केल्यापासून मनुष्यास मृत्यू होतो. यास पराशराचें वचन कृतयुगामध्यें प्राण अगाच्या चर्माचा आश्रय करून रहात असत. त्रेतायुगामध्यें हाडाचा आश्रय करून राहत असत. द्वापारामध्यें रक्ताचा आश्रय करून आणि कलियुगामध्यें अन्नाचा आश्रय करून प्राण राहतात. ॥ २ ॥ सबब कलियुगामध्यें अन्न भक्षण न करिता बारा बारा दिवस राहून कृच्छ्रादि प्रायश्चित्ताचरण करण्यास अशक्त अशा मनुष्यास पाहून ऋषींनीं प्रत्याम्नाय सांगितले आहेत यास्तव अत्यंत अशक्त मनुष्यानीं प्रत्याम्नाय द्वाराने प्रायश्चित्ताचरण करावें. ॥ ३ ॥

## ॥ अथातिकृच्छ्रनिर्णयः ॥

तत्रव्रतांगभूता-धर्मानाहयाज्ञवल्क्यः ब्रम्हचर्यंदयाक्षांतिर्दानंसत्यमकल्पता ॥ आहिंसास्तेयमाधुर्यंदमश्चेतियमाःस्मृताः ॥ १ ॥ स्नानंमौनोपवासेज्यास्वाध्यायोपस्थनिग्रहः ॥ नियमोगुरुशुश्रूषाशौचाक्रोधोप्रमादता ॥ २ ॥ मनुः ॥ एकैकंग्रासमश्नीयात्त्र्यहाणित्रीणिपूर्ववत् ॥ त्र्यहंचोपवसेदन्त्यमतिकृच्छ्रंचरन्द्विजः ॥ त्रीणित्र्यहाःणिनवदिनानिपूर्ववत्एकभुक्तादिकालेतन्नियमयुक्तःसन्नित्यर्थ ॥ याज्ञवल्क्यः ॥ अयमेवातिकृच्छ्रःस्यात्पाणिपूरान्नभोजनः ॥ अयमेवपूर्वोक्तप्राजापत्यधर्मएवअत्रतुविशेषःएकभुक्तनक्तायाचितदिनेषुपाणिपूरणमन्नंप्रसृतिपूरणमात्रमन्नंभुञ्जीतनतुपूर्वोक्तद्वाविंशत्यादिग्रासानितिअत्रचपाणिपूरणमात्रमन्नमेवविधेयंनतुभोजनंअतोयेषुदिनेषुप्राजापत्यभोजनंप्राप्तंतदनुवादनपाणिपूरान्नताविधीयते ॥ नोपवासदिनेषुपाणिपूरान्नभोजनप्राप्तिःगन् ॥ याज्ञवल्क्योक्तपाणिपूराणान्नग्रासयोःशक्त्यपेक्षोविकल्पःपापापेक्षोवाअतिकृच्छ्रपादादिव्यवस्थाप्राजापत्यवदेव ॥ मार्कंडेयः ॥ प्रत्याम्नायमिमंराजन्वक्ष्यामिगृणुपार्थिव ॥ प्रत्यान्वरणमात्रेणअतिकृच्छ्रफलंलभेत् ॥ ४ ॥ दशगावःप्रदातव्यावस्त्राद्यैःसमलंकृताः ॥ साधुवृत्ताःपयस्विन्योविप्रेभ्यश्चपृथक्पृथक् ॥ ५ ॥

## अतिकृच्छ्राचानिर्णय.

त्याविषयी व्रताचे अंगभूत जे धर्म जे आचारण करावयाचे आहेत ते याज्ञवल्क्य सांगतातः—ब्रह्मचर्य, दया, क्षमा, दान करणें, सत्यानें वागणें, सरळपणा, हिंसानकरणें, चोरी न करणें, वचनांत माधुर्य राखणे, इंद्रियाचा निग्रह करणें यास यम अशी सज्ञा आहे. ॥१॥ स्नान, मौन, उपोषण करणें, यज्ञकरणे, वेदाचा अभ्यास करणे, ब्रह्मचर्यानें राहणें, गुरुची सेवा करणें, पवित्रता, क्रोधाचा निग्रह करणें, नेहेमी सावध असणे, यास नियम असें ह्मणतात हे यमनियमोक्त धर्मानें कोणत्याही प्रायश्चित्त आचरण करणारानें वागलें पाहिजे ॥ २ ॥ मनूचें वचन—पूर्वी प्राजापत्य करण्यासबधानें तीन दिवस नियम युक्त होऊन दिवसा एक वेळां पूर्वोक्त ग्रास सख्येनें

भोजन करणें. रात्रीं तीन दिवस सांगितल्या नियमानें भोजन करणें आणि तीन दिवस याचना न करितां मिळालेलें अन्न भक्षण करून राहणें असे जे प्राजापत्याचे नऊ दिवस याचे ठायीं प्रति दिवशीं एक एक ग्रास भक्षण करून नऊ दिवस राहून पुढील तीन दिवस प्राजापत्याप्रमाणे उपोषण तीन दिवस केलें असतां अतिकृच्छ्र होतो. ॥ ३ ॥ याज्ञवल्क्यानें तर नऊ दिवसाचे ठायीं प्रसूती पूरणान्न ह्मणजे पसाभर अन्न खाणे. आणि पुढील तीन दिवस उपोषण केलें असतां अतिकृच्छ्र होतो असें सांगितलें आहे. मनु आणि याज्ञल्क्याचें वचनाची व्यवस्था प्रायश्चित्त सांगते समयीं शक्ति आणि पाप याचा विचार करून कोणतें तरी एक मत सांगावें ॥ ४ ॥ मार्कंडेयाचे वचन अतिकृच्छ्र करण्यास सामर्थ्य नसेल तर ब्राह्मणा कारणें उत्तम पुष्कळ दूध देणाऱ्या वस्त्रादिकेकरून अलंकृत केलेल्या १० गाई वेगळे वेगळे ब्राह्मणास द्याव्या. ह्मणजे अतिकृच्छ्राचें फल प्राप्त होतें. ॥ ५ ॥

## ॥ अथकृच्छ्रातिकृच्छ्रप्रायश्चित्तनिर्णयः ॥

याज्ञवल्क्यःकृच्छ्रातिकृच्छ्रःपयसादिवसोनकविंशतिः ॥ अत्रपयशब्दःमदनपारिजातेदुग्धार्थवाचकोऽक्तः ॥ १ ॥ प्रायश्चित्तेंदुशेखरेतुजलवाचकोग्रहतिः ॥ तत्रजलं सायंप्रातर्मध्यान्हेपुपेयम् ॥ द्विगुणोतिकृच्छ्रएवकृच्छ्रातिकृच्छ्रः ॥ तथाचप्रायश्चित्त मयूखेब्रह्मांडपुराणस्थवचनंचरेत्कृच्छ्रातिकृच्छ्रंतुपिबेत्तोयंतुशीतलं ॥ तज्जलंप्रातर्मध्या न्हसायान्हेपुपेयम् ॥ यम.चतुर्विंशतिरात्रंतुनियतात्माजितेंद्रियः ॥ कृच्छ्रातिकृच्छ्रंकु र्वीतएकस्थानेद्विजोत्तमः ॥ २ ॥ कृच्छ्रातिकृच्छ्रप्रत्याम्नायार्थंब्राह्मणेभ्यःसमलंकृताः पट्धेनवोदातव्या ॥ यममतेतुधनिकेनाधिकधेनवोदेयाः ॥ ३ ॥

## कृच्छ्रातिकृच्छ्राचानिर्णय.

याज्ञवल्क्यानें असें सांगितलें आहे कीं, एकवीस दिवस पर्यंत पयभक्षण करून राहिलें असतां कृच्छ्रातिकृच्छ्र होतो. येथें पय शब्दाचा अर्थ मदन पारिजातकांत दूध असा केला आहे. ॥१ ॥ आणि प्रायश्चित्तेंदुशेखर व प्रायश्चित्तमयूख यामध्यें पाणी असा सांगितला आहे. ब्रह्मांड पुराणांत कृच्छ्रातिकृच्छ्र करणारानें थंड पाणी प्राशन करावें असें सांगितलें आहे. यावरून येथें पाणी घेणें हें युक्त दिसतें. तें पाणी प्रातःकाळीं, मध्यान्ह काळीं, व सायंकाळीं असें तीन वेळां प्यावें. यमानें तर अति कृच्छ्र द्विगुणीत झाल्यानें कृच्छ्रातिकृच्छ्र होतो असें सांगितलें आहे: ब्राह्मणानें जितेंद्रिय असें होऊन मन स्वाधीन ठेवून अतिकृच्छ्र चोवीस दिवस पर्यंत आचरण केल्यानें कृच्छ्रातिकृच्छ्र प्रायश्चित्त होतें ॥२॥ कृच्छ्रातिकृच्छ्र प्रत्याम्नाया करितां अलंकृत केलेल्या पुष्कळ दूध देणाऱ्या गाई ब्राह्मणास द्याव्या. यमाच्या मतें तर ज्यास्त गाई देण्यास सांगितल्या आहेत. ॥३॥

## ॥ अथपराककृच्छ्रः ॥

द्वादशाहोपवासेन पराकः परिकीर्तितः ॥ मरीचिःप्रत्याम्नायंपराकस्यदशपंचहि गाद्विजः ॥ दद्यात्पापविशुद्ध्यर्थंसर्वश्रेयोभिवृद्धये ॥ १ ॥ महापातकयुक्तोपिसर्वपापैः प्रमुच्यते ॥ प्रत्याम्नायेनकृच्छ्रस्यपराकस्यजनाधिप ॥ सर्वकृच्छ्रफलंलब्ध्वाप्रयातिपर-मंपदम् ॥ २ ॥

## परकप्रायश्चित्ताचानिर्णय.

याज्ञवल्क्याचें वचन– बारादिवस पर्यंत उपोषण केल्यानें पराककृच्छ्र होतो. येथें व्रताग भूत• स्नानादिकनियम अवश्य केलेच पाहिजेत. मरीचींचेंवचन– पराकाच्या प्रत्याम्नायाकरितां ब्राम्हाणा-स. १५ गाई द्याव्या म्हणजे सर्व पातका पासून मनुष्य शुद्ध होतो. व कल्याणाची वृद्धी होते ॥ १ ॥ व उत्तमगती प्राप्त होते. यापराक प्रत्याम्नायाचरणानें पराककृच्छ्राचे परिपूर्ण फळ प्राप्त होतें व उत्तमगति प्राप्त होते. ॥ २ ॥

## ॥ सांतपननिणयः ॥

पूर्वेद्युःपंचगव्यमात्राशनंपरेद्युःउपवासइतिद्विरात्रिकंसांतपनं ॥ तथाचयाज्ञवल्क्यः॥ गोमूत्रंगोमयंक्षीरंदधिसर्पिःकुशोदकम् ॥ जग्ध्वापरेद्युरुपवसेत्कृच्छ्रंसांतपनपरम् ॥ १ ॥ यदापूर्वेद्युरुपोष्यअपरेद्युःसमंत्रकंसंपूज्यसमंत्रकमेवपचगव्यंपीयतेतदाब्रह्मकूर्चइत्याख्याय तेइतिमिताक्षरायामुक्तम् ॥ अत्रएकःपुराणोदयःप्रायश्चित्तेंदुशेखरेतु ॥ चतुर्दश्यामुपोष्यप-रेद्युःपौर्णमास्यांपंचगव्यपानेनब्रह्मकूर्चोभवतीत्युक्तम् ॥ २ ॥

## सांतपनाचानिर्णय.

पूर्व दिवशीं पंचगव्य प्राशन करून दुसरे दिवशीं उपोषण करणें. असे दोन दिवसानीं सिद्ध होणोर त्यास द्वैरात्रिक सातपन अशी संज्ञा आहे. यास याज्ञवल्क्याचें वचन गोमूत्र, शेण, दूध, द-धी, तूप हे येथें ( गाईचेच घ्यावयास सांगितलें आहे )दर्भोदक हे सहा पदार्थ पूर्वदिवशीं प्राशन करून दुसरे दिवशीं उपोषण करावें. यास कृच्छ्रसांतपन असें म्हणावें ॥ १ ॥ जेव्हां पूर्व दिवशीं उपोषण करून द्वितीय दिवशीं गोमूत्रादिक पदार्थ पूजा करून समंत्रक प्राशन केले जा-गत तेव्हा त्यास ब्रह्मकूर्च असें म्हणावें असें मिताक्षरांमध्यें सांगितलें आहे. हे ब्रम्ह कूर्चकरण्यास सामर्थ्य नसल्यास ब्राम्हणास एक पुराण ( पूर्वी मान प्रकरणांत सांगितलें आहे ) दक्षिणा द्यावी. प्रायश्चित्तेंदुशेखरांत तर चतुर्दशी दिवशीं उपोषण करून पौर्णिम दिवशीं पंचगव्य प्राशन केल्यानें ब्रह्मकूर्च होतो असें सांगितलें आहे ॥ २ ॥

## ॥ अथयतिसांतपननिर्णय ॥

अथशंखः ॥ एतदेवत्र्यहाभ्यस्तंयतिसांतपनंस्मृतम् ॥ एतदेवमिश्रितंपंचगव्यंदिन-

त्र्यंपिबेदित्यर्थः ॥ अत्रचतुर्थेउपवासः ॥ अत्रापिहोमः ॥ १ ॥ अत्रसमलंकृतधेनुद्वयंदद्यात् ॥ अतिदरिद्रेणएकाधेनुर्देया ॥

## यतिसांतपनाचानिर्णय.

यास शंखस्मृतीचें वचन- पंचगव्य तीन दिवस प्राशन करून राहिलें असता त्यास यति सांतपन असें म्हणतात. या यतिसांतपनाचे ठायीं चतुर्थ दिवशीं उपोषण आणि होम करण्यास सांगितलें आहे ॥ १ ॥ याठिकाणीं समलंकृत दोन गायी द्या यात अत्यंत दरिद्री असेल त्यानें सवत्स एक गाय द्यावी.

## ॥ अथमहासांतपननिर्णय ॥

गोमूत्रंगोमयंक्षीरदधिसर्पिः कुशोदकम् ॥ क्रमेणैकैकमत्यहपीत्वाएकरात्रोपवासेसप्तसाध्योमहासांतपनः ॥१॥ तथाचयाज्ञवल्क्यः ॥ पृथक्सांतपनद्रव्यैः षडहः सोपवासकः ॥ सप्ताहेनतुकृच्छ्रोयंमहासांतपनः स्मृतः ॥ २ ॥ अत्रधेनुद्वयंदेयं ॥ यमस्तु महासांतपनंपंचदशाहसाध्यमाह ॥ तथाचत्र्यहंपिबेत्तुगोमूत्रंत्र्यहंवैगोमयंपिबेत् ॥ त्र्यहंदधित्र्यहंक्षीरंत्र्यहंसर्पिस्ततःशुचिः ॥ महासांतपनंह्येतत्सर्वपापप्रणाशनम् ॥ एतत्पंचदशाहसाध्यम् ॥

## महासांतपनाचानिर्णय.

प्रथम दिवशीं गोमूत्र द्वितीय दिवशीं गोमय, तिसरे दिवशीं दूध याप्रमाणें दहीं, तूप, दर्भोदक हे क्रमानें पिऊन सातवे दिवशीं उपोषण करणें यास महा सांतपन असें ह्मणतात ॥ १ ॥ याज्ञवल्क्य स्मृतीचा अर्थ असाच आहे ॥२॥ महा सांतपन करण्यास सामर्थ्य नसेल तर ब्राह्मणास सवत्स दोन गोप्रदानें द्यावीत. यमानें तर पंधरा दिवस आचरणानें महा सांतपन होतें असें सांगितलें आहे. तें असें-तीन दिवस गोमूत्र प्राशन, तीन दिवस गोमय, तीन दिवस दहीं तीन दिवस दूध, तीन दिवस तूप असें पंधरा दिवस केल्यानें सर्व पातकाचा नाश करणारें असें महा सांतपन होतें.

## ॥ अथातिसांतपननिर्णयः ॥

अत्रयमः ॥ एतान्येवतथापेयान्येकैकंतुत्र्यहंत्र्यहं ॥ अतिसांतपनंनामश्वपाकमपिशोधयेत् ॥ एतानिगोमूत्रादिकुशोदकान्तानिषड्द्रव्याणिपराशरः ॥ महासांतपनास्यास्यमत्याम्नायविदुर्बुधाः ॥ गावः षोडशविप्रेभ्योदेयाः सम्यक्शुभाप्तये ॥ २ ॥ अलंकृताश्चवस्त्राद्यैः पयस्विन्यः पृथक्पृथक् ॥ सवत्सा साधुशीलिन्यः मत्याम्नायउदीरितः ॥ ३ ॥

## अतिसांतपनाचानिर्णय.

गोमूत्र, गोमय, दूध, दहीं, तूप, दर्भोदक हीं सहा द्रव्यें प्रत्येक क्रमानें दोन दोन दिवस

प्राशन करून राहिल्यानें चांडाळासही पवित्र करणारें असें अति सांतपन होतें. पराशराचें वचन - महा सांतपनाच्या प्रत्याम्नाया बद्दल ब्राह्मणास वस्त्रादिकानें भूषित केलेल्या पुष्कळ दूध देणाऱ्या अशा सत्रास सोळा गायी वेगवेगळाल्या ब्राह्मणास द्याव्या ॥ २ ॥ ३ ॥

## ॥ पंचगव्यविचारः ॥

तत्रपाराशरः ॥ गोमूत्रंगोमयंक्षीरंदधिसर्पिःकुशोदकम् ॥ निर्दिष्टंपंचगव्यंतुप्रत्येकं कायशोधनम् ॥१॥ गोमूत्रंताम्रवर्णायाःश्वेतायाश्चापिगोमयं ॥ पयःकांचनवर्णायानीला याश्चतथादधि ॥ घृतंचकृष्णवर्णायाःसर्वंकापिलमेवच ॥ अलाभेसर्ववर्णानांपंचगव्येष्व यंविधिः ॥ २ ॥ मरीचिः ॥ देवताःसंप्रवक्ष्यामिअनुपूर्वेणयस्ययाः ॥ वरुणोदेवतामूत्रेगो मयेहव्यवाहनः ॥ सोमःक्षीरेदधिवायुर्घृतेरविरुदाहृतः ॥ ३ ॥ गोमूत्रंमापकात्वष्टौगो मयस्यतुषोडश ॥ क्षीरस्यद्वादशप्रोक्तादध्नस्तुदशकीर्तिताः ॥ गोमूत्रवत्घृतस्याष्टौतदर्द्धं तुकुशोदकम् ॥ ४ ॥ प्रायश्चित्तेंदुशेखरेतु ॥ मूत्रमेकपलंदद्यादंगुष्ठार्धंतुगोमयं ॥ क्षीरंस प्तपलंदद्यात्दधित्रिपलमुच्यते ॥ घृतमेकपलंदद्यात्पलमेकंकुशोदकम् ॥ ५ ॥ पंचगव्य मृचापूतंहोमयेदग्निसन्निधौ ॥ सप्तपत्राश्चयेदर्भाअच्छिन्नाग्राःशुचित्विषः ॥ ६ ॥एतैरुद्धृत्य होतव्यंपंचगव्यंयथाविधि ॥ इरावतीइदंविष्णुर्मानस्तोकेचशंवती ॥ ७ ॥ एताभिरेवहो तव्यंहुतशेषंपिबेद्द्विजः ॥ प्रणवेनसमालोड्यप्रणवेनाभिमंत्र्यच ॥ ८ ॥ प्रणवेनसमुद्धृ त्यपिबेत्तत्प्रणवेनतु ॥ मध्यमेनपलाशस्यपद्मपत्रेणवापिबेत् ॥ स्वर्णपात्रेणताम्रेणब्रह्मती र्थेनवापुनः ॥ ९ ॥ ॥ मंत्रः ॥ यत्त्वगस्थिगतंपापंदेहेतिष्ठतिमानवे ॥ ब्रह्मकूर्चोपवासस्तु दहत्यग्निरिवेंधनम् ॥ १० ॥

## पंचगव्याचाविचार.

यास पराशर स्मृतीचें वचन- गोमूत्र, गोमय, दूध, दहीं, तूप कुशोदक यास पंचगव्य म्ह- णावें. हीं प्रत्येक द्रव्यें शरीरास पवित्र करणारीं आहेत. ॥ १ ॥ तांबड्या वर्णाच्या गाईचें गोमूत्र घ्यावें, पांढऱ्या वर्णाच्या गाईचें शेण, पिवळ्या वर्णाच्या गाईचें दूध, काळ्या वर्णाच्या गाईचें तूप, तसेंच दहींही काळ्या वर्णाच्या गाईचेंच घ्यावें, लिहिलेल्या वर्णाच्या गाईचें मिळत नसल्यास काळया गाईचें सर्व घ्यावें. ॥ २ ॥ यास मरीचीचें वचन-गोमूत्राची देवतावरुण, गोमयाची अग्नि, दुधाची चंद्र, दह्याची वायु, तुपाची सूर्य देवता सांगितली आहे. ॥ ३ ॥ दु- सरीकडे गोमूत्र आठ मासे, गोमय सोळा मासे, दूध बारा मासे, दहीं दहा मासे, तूप आठ मासे कुशोदक चार मासे, येथें पांच गुंजेचा मासा घेतला आहे ॥ ४ ॥ गोमूत्र चार तोळेच घ्यावें, अर्धाअंगुष्ट प्रमाण गोमय घ्यावें, दूध अठ्ठावीस तोळे, दहीं बारा तोळे, तूप चार तोळे, दर्भोदक एक तोळाभर, येथें व्यवहारीक दहा मासाचा तोळा घ्यावयास सांगितला आहे. ॥

रःस्मृतः ॥ १ ॥ पत्रैर्मतःपत्रकृच्छ्रःपुष्पैस्तत्कृच्छ्रउच्यते ॥ मूलकृच्छ्रःस्मृतोमूलैस्तोय कृच्छ्रोजलेनतु ॥ २ ॥ पत्रैःश्रीवृक्षादिपत्रैस्तत्कृच्छ्रःपुष्पैःपुष्पकृच्छ्रः ॥ मिताक्षरायांतु पुष्पाण्यपिश्रीवृक्षादीनामेवमूलान्यपितेमामेवेत्युक्तम् ॥ ३ ॥

## श्रीकृच्छ्राचानिर्णय.

मार्कंडेयाचें वचन— श्रीफळें भक्षण केलीं असतां श्रीकृच्छ्र सांगितला आहे. कमलाक्ष खाल्यानें श्रीकृच्छ्र होतो दुसऱ्या रीतीनेंही श्रीकृच्छ्र होतो. तो असा—मासभरपर्यंत आवळे भक्षण केल्यानें श्रीकृच्छ्र होतो. ॥ २ ॥ असें सांगितलें आहे. पत्रें भक्षण केल्यानें पत्रकृच्छ्र पुष्पानें पुष्पकृच्छ्र, मूळानें मूळ कृच्छ्र, पाण्यानें जळ कृच्छ्र होतो. ॥ ३ ॥

## ॥ अथयावककृच्छ्रः ॥

तत्रशंखः ॥ गोपुरीपाद्यवानश्नन्मासमेकंसमाहितः ॥ व्रतंतुयावकंकुर्यात्सर्वपापापनुत्तये ॥ १ ॥ प्रायश्चित्तेंदुशेखरेतु ॥ यवानामप्सुसाधितानांसप्तरात्रंपक्षंमासंवाप्राशनेया वककृच्छ्रइत्युक्तं ॥

## यावककृच्छ्राचानिर्णय.

शंखस्मृतींतील वचन— पूर्वोक्त रितीनें गायीस सातू आणि गहूं चारून शेणांत पडलेले ते महिनाभर पर्यंत इतर पदार्थ भक्षण न करितां तेच भक्षण करून राहिल्यानें सर्व पापाचा नाश होतो. ॥ १ ॥ प्रायश्चित्तेंदुशेखरांत तर पाण्यांत सातू शिजवून ते सात दिवस पंधरा दिवस महिनाभर पर्यंत प्राशन करून राहिल्यानें यावक कृच्छ्र होतो.

## ॥ अथवज्रकृच्छ्रः ॥

गोमूत्रयावकपानेएकोवज्राख्यकृच्छ्रः॥१॥ योगीश्वर ॥ प्रत्याम्नायंप्रवक्ष्यामियावकस्यमहात्मनः ॥ सर्वपापप्रशमनंसर्वकृच्छ्रफलंनृणाम् ॥ २ ॥ गावोदशप्रदातव्याःप्रत्याम्नायेप्रकल्पिताःसवत्सादुग्धसंयुक्ताःसुशीलाःसमलंकृताः ॥ ३ ॥

## वज्रकृच्छ्राचानिर्णय.

सातू गोमूत्रांत शिजवून एक दिवस भक्षण करून राहिल्यानें वज्र कृच्छ्र होतो. ॥१॥ याज्ञवल्क्याचें वचन—सर्व पातकाचा नाश करणारें व सर्व कृच्छ्राच्या फलाला देणारें असें हे यावक कृच्छ्र याच्या प्रत्याम्नाया करितां ब्राम्हणा कारणें उत्तम अलंकृत केलेल्या व पुष्कळ दूध देणाऱ्या अशा दहा गायी वेगळ्या वेगळ्या ब्राम्हणास द्याव्या.

## ॥ अथतप्तकृच्छ्रः ॥

याज्ञवल्क्यः ॥ तप्तक्षीरघृताम्बूनामेकैकंप्रत्यहंपिबेत् ॥ एकरात्रोपवासश्चतप्तकृच्छ्रउ

दाहृतः ॥ १ ॥ दिनचतुष्टयसाध्यः कृच्छ्रः मिताक्षरायांतुअयंतुमहातप्तकृच्छ्रःएभिरेवसमस्तैःसोपवासैर्द्विरात्रैसंपाद्यःसांतपनवत्तप्तकृच्छ्रइत्युक्तम् ॥ मनुः॥तप्तकृच्छ्रंचरन्विप्रोजलक्षीरघृतानिलान् ॥ प्रतित्र्यहंपिबेदुष्णान्सकृत्स्नायीसमाहितः ॥ प्रतित्र्यहंजलादीन्प्रत्येकंत्र्यहंत्र्यहंपिबेदित्यर्थः ॥ अयंचद्वादशरात्रसाध्यः ॥ त्र्यहमुष्णाःपिबेदपस्त्र्यहमुष्णंपयःपिबेत् ॥ त्र्यहमुष्णंघृतंपीत्वानाश्नीयादेकवासरम् ॥ एषतप्तकृच्छ्रःजलादिपरिमाणमाह ॥ पाराशरः॥अपःपिबेतुत्रिपलंद्विपलंतुपिबेत्पयः॥ पलमेकंपिबेत्सर्पिःत्रिरात्रश्चोष्णमारुतम् ॥ इति ॥ प्रकारान्तरेणाहतप्तकृच्छ्रं ॥ पाराशरः ॥ ( अपःपिबेतुत्रिपलंद्विपलंतुपिबेतयः ॥ पलमेकंपिबेत्सर्पि ) षट्पलंतुपिबेदंभःत्रिपलंतुपयःपिबेत् ॥ पलमेकंपिबेत्सर्पिस्तप्तकृच्छ्रंविधीयते ॥ अत्रजलादिकमुष्णमेवग्राह्यं॥५॥ मरीचिः ॥ पापनाशककृच्छ्रस्यतप्तस्यब्रह्मरूपिणः॥दद्याद्द्विजायतेसम्यक्गवांविंशतिमादरात् ॥ ६॥

## तप्त कृच्छ्राचा निर्णय.

तापविलेलें दूध प्रथम दिवशीं प्राशन करून राहावें,द्वितीय दिवशीं तूप, तृतीय दिवशीं तापविलेलें पाणी प्राशन करून राहून चतुर्थ दिवशीं उपोषण केल्यानें तप्त कृच्छ्र होतो. ॥१॥ तप्त कृच्छ्राविषयीं मनूचें मत असें आहे कीं, दूध, तूप, पाणी हे तापविलेले एकेक तीन तीन दिवस प्राशन करून तीन दिवस उपोषण करणें असें बारा दिवसानें तप्त कृच्छ्र होतो ॥२॥जलादि॰ प्राशनाचे प्रमाण पराशरानें सांगितलें आहे पाणी बारा तोळे प्राशन करावें. दूध आठ तोळे, तूप तोळे चार पिण्यास सांगितलें आहे. ॥३॥ दुसरीकडे पाणी चोवीस तोळे बारा तोळे दूध एक तोळा तूप पिण्यास सांगितलें आहे ॥४॥ मरीचीचें वचन सर्व पापाचा नाश करणारे असे हें ब्रह्मरूप हें जें तप्त कृच्छ्र याच्या प्रत्याम्नाया करितां ब्राह्मणास वीस गाई द्याव्या ॥ ५ ॥

## ॥ शीतकृच्छ्रः ॥

*पाराशरः ॥ त्र्यहंशीतंपिबेत्तोयंत्र्यहंशीतंपयःपिबेत् ॥ त्र्यहंशीतंघृतम्पीत्वावायुभक्षस्त्र्यहंपरम् ॥ १ ॥*

## शीतकृच्छ्राचानिर्णय.

पाराशराचें वचन-तीन दिवस थंडपाणी तीन दिवस थंड दूध, तीन दिवस तूप आणि तीन दिवस उपोषण करणें असे बारा दिवस केल्यानें शीत कृच्छ्र होतो. ॥ १ ॥

## ॥ अथजलकृच्छ्रः ॥

जाबालिःअनश्नन्जलमध्यस्थस्त्वहोरात्रंजपनबुधः ॥ संवत्सरकृतंपापंजलकृच्छ्रोनापोहति ॥ १ ॥

## जलकृच्छ्राचानिर्णय.

उपोषण करून पाण्यामध्यें दिवसारात्रीं उभा राहून वरुणसूक्ताचा जप केल्यानें एका वर्षांत झालेलें पाप नाहींसें होतें. त्यास जल कृच्छ्र असें ह्मणतात ॥ १ ॥

## ॥ अथगोमूत्रकृच्छ्रः ॥

आतृप्तेश्चारपित्वागांगोधूमान्यवमिश्रतान्॥गोमयोत्थांस्तुसंगृह्यपचेद्गोमूत्रयावकम्॥१

## गोमूत्रकृच्छ्राचानिर्णय.

गहू आणि सातू हे गाईस तृप्त होई पर्यंत खाण्यास घालून त्यांच्या शेणांत पडलेले गहू, सातू घेऊन गोमूत्रांत शिजवून भक्षण केल्यानें गोमूत्र कृच्छ्र होतो. ॥ १ ॥

## ॥ अथचांद्रायणविचार ॥

## ॥ तत्रपिपीलिकाचांद्रायणनिर्णयः ॥

याज्ञवल्क्यः ॥ तिथिवृद्ध्याचरेत्पिंडाञ्शुक्लेशिख्यंडसंमितान् ॥ एकैकंन्हासयेत्कृष्णेपिंडंचांद्रायणंचरन् ॥ इंदुक्षयेनभुंजीतएषचांद्रायणोविधिः ॥ मनुः ॥ एकैकंन्हासयेत्पिंडंकृष्णेशुक्लेचवर्धयेत् ॥ उपस्पृशंस्त्रिषवणमेतच्चांद्रायणंस्मृतम् ॥ २ ॥ एतत्पिपीलिकामध्यंचांद्रायणमुदाहृतम् ॥ चंद्रस्यायनमिवायनंचरणंयस्मिन्कर्मणिन्हासवृद्धिभ्यांतच्चांद्रायणम् ॥ कृष्णप्रतिपद्यस्यारंभः ॥ कृष्णप्रतिपदिचतुर्दशग्रासान्ग्रसित्वाततएकैकंन्हसित्वाचतुर्दश्यामेकंग्रसित्वामायामुपोष्यपुनः शुक्लप्रतिपदमारभ्यपूर्णिमांतंयावर्द्धयेत्ग्रासश्चमयूरांडप्रमाणःआर्द्रामलकप्रमाणोवा ॥ ३ ॥

## चांद्रायणाचाविचार.

## पिपीलिकाचांद्रायणाचानिर्णय.

याज्ञवल्क्याचेंवचन—शुक्लप्रतिपदे दिवशीं मोराच्या अंड्या एवढा एक ग्रास भक्षण करून रा- हावें. पुढें द्वितीये पासून तिथीचे संख्ये प्रमाणें ग्रासांची संख्या पौर्णिमेपर्यंत वाढवावी. व कृष्ण पक्षांत एकेक ग्रास अन्न कमी करीत जाऊन अमावास्ये दिवशीं उपोषण करावें. यास चांद्रायण असी संज्ञा आहे ॥१॥ त्रिकाळीं स्नान करून कृष्णपक्षाचे ठायीं प्रति दिवशी एकेक ग्रास कमी करून खावे, शुक्लपक्षाचे ठायीं एकेक ग्रास वाढवून भक्षण करणें यास पिपीलिका मध्य चांद्रायण असें म्हणतात. ॥ २ ॥ चंद्र जसा कृष्णपक्षाचे ठायीं एकेक कलेनें कमी होतो आणि शुक्ल- पक्षाचे ठायीं वाढतो तसा क्रमानें या कर्माचे ठायीं ह्रास वृद्धि असल्यामुळें यास चांद्रायण असी संज्ञा दिलेली आहे. पिपीलिका मध्य चांद्रायणाला आरंभ कृष्णप्रतिपदे दिवशीं होतो. चौदाग्रा-

कृष्णप्रतिपदे दिवशीं चवदा घास खावेत. द्वितीयेच्या दिवशीं तेरा या क्रमानें कृष्णचतुर्दशी दिवशीं एक घास भक्षण करून अमावास्ये दिवशीं उपोषण करून पुन शुक्लप्रतिपदे दिवशीं एक ग्रास द्वितीयेचे दिवशीं दोन ग्रास, या क्रमानें पौर्णिमेपर्यंत वाढवून पौर्णिमे दिवशीं पधरा ग्रास भक्षण करावे. येथें ग्रास मयूर अंड प्रमाणाचा अथवा ओल्या आवळ्या येवढा घ्यावा. ॥ ३ ॥

## ॥ अथयवमध्यचांद्रायणनिर्णयः ॥

तत्रयमः ॥ वर्धयेत्पिंडमेकैकंशुक्लेकृष्णेचन्हासयेत् ॥ एतच्चांद्रायणंनामयवमध्यंप्रकीर्तितं ॥ १ ॥ इदंचयववत्प्रांतयोरणीयःमध्येस्थवीयइतियवमध्यमितिकथ्यते ॥ अत्रशुक्लप्रतिपदादिग्रासवृद्धिःपूर्णिमांत ॥ ततोन्हासोमांतः ॥ २ ॥ तिथिन्हासेवृद्धौवाग्रासानामपिन्हासवृद्धी ॥ तथाचविष्णुः ॥ ग्रासानास्याविकारमंश्नीयात्तांश्चंद्रकलाभिर्वृद्धौक्रमेणवर्द्धयेद्धानौचन्हासयेदमावास्यायांचनाश्नीयादिति ॥ ३ ॥ अनयोरष्टधेनव. ॥ वृषभसहिताचात्रगौर्दक्षिणा ॥ सार्द्धसप्तधेनवइतिशूलपाणिः ॥ निर्धनस्यतुप्राजापत्यत्रय ॥ अत्रैकादश्यादिव्रतलोपोनदोषावहः ॥ ४ ॥

## यवमध्यचांद्रायणाचानिर्णय.

त्यास यमस्मृतीचें वचन—शुक्लप्रतिपदे दिवशीं आरंभ करून पौर्णिमेपर्यंत एकेक ग्रास वाढवून कृष्णपक्षाचे ठायीं एकेक ग्रास कमी करणें यास यवमध्यचांद्रायण असें म्हणतात. ॥ १ ॥ कारण जसा यव म्हणजे सातू दोन्ही भागाचे ठायीं बारीक असून मध्यें जसा स्थूल आहे त्या प्रमाणें या चांद्रायणाचे ठायीं शुक्लपक्ष आणि कृष्णपक्षाचे आरंभीं ग्रास संख्या कमी असून मध्यें जास्त असल्यामुळें यास यवमध्य चांद्रायण अशी संज्ञा आहे तिथीचा न्हास अथवा वृद्धी असता ग्रासाचीही न्हास वृद्धी करावी ॥ २ ॥ विष्णु स्मृतीच्या वचनाचा अर्थही असाच आहे. ॥३॥ या उभय चांद्रायणाचे बदल आठ आठ गाई द्याव्यात आणि वृषभानें सहित अशी एक गाय दक्षिणा द्यावी. शूलपाणीचें मत साडेसात गाई द्याव्या असें आहे. हें श्रीमता संबंधाचें आहे. निर्धन मनुष्य जो आहे त्यास चांद्रायणाचा प्रत्याम्नाय तीन प्राजापत्यें करण्यास सांगितलीं आहेत. चांद्रायण व्रतामध्यें ग्रास भक्षणामुळें एकादश्यादिव्रताचा लोप झाला असता दोष नाहीं. ॥ ४ ॥

## ॥ अथयतिचांद्रायणनिर्णयः ॥

अष्टावष्टौसमश्नीयात्पिंडान्मध्यंदिनेस्थितः ॥ नियतात्माहविष्याशीयतिचांद्रायणं स्मृतम् ॥ १ ॥ मासमितिशेषःएतत्प्राजापत्यचतुष्टयसममितिबृहद्विष्णुः ॥ २ ॥

## यतिचांद्रायणाचानिर्णय.

दोन प्रहरचे वेळीं हविष्य पदार्थाचे आठ.आठ ग्रास खाऊन जितेंद्रिय होऊन महिनाभर राहिल्या-

नें हें चांद्रायण होतें. ॥ १ ॥ हे चांद्रायण चार प्राजापत्य सम आहे असें बृहद्विष्णूचें मत आहे. ॥ २ ॥

## ॥ अथशिशुचांद्रायणनिर्णयः ॥

चतुरःप्रातरश्नीयात्पिंडान्विप्रःसमाहितः ॥ चतुरोस्तमितेसूर्येशिशुचांद्रायणंस्मृतम् ॥ १ ॥

## शिशुचांद्रायणाचानिर्णय.

प्रातःकाळीं चार ग्रास भक्षण करून राहणें आणि सायंकाळीं चार ग्रास भक्षण करणें यास शिशुचांद्रायण असें म्हणतात. ॥ १ ॥

## ॥ अथऋषिचांद्रायणनिर्णयः ॥

त्रींस्त्रीन्पिंडान्समश्नीयान्नियतात्मादृढव्रतः ॥ हविष्यान्नस्यवैमासमृषिचांद्रायणंस्मृतम् ॥ १ ॥ यतिचांद्रायणमितिसंज्ञामात्रं ॥ तेननयतिमात्रस्यैवात्राधिकारःकिंतुसर्वेषांएवंशिशुचांद्रायणेऋषिचांद्रायणादावपि ॥ २ ॥

## ऋषिचांद्रायणाचानिर्णय.

जितेंद्रिय व्रत करण्या विषयीं दृढनिश्चयकरून हविष्यान्नाचे प्रतिदिवशीं तीनतीन ग्रास खाऊन महिनापर्यंत राहिलें असता यास ऋषिचांद्रायण असें म्हणतात ॥ १ ॥ ऋषिचांद्रायण ही यास केवळ संज्ञाच आहे. ऋषींनीच हें व्रत करावें असें नाहीं. कोणीही करावें. या प्रमाणेंच शिशुचांद्रायण यतिचांद्रायणही हीं नांवेंच आहेत ॥ २ ॥

## ॥ अथसोमायनव्रतनिर्णयः ॥

गोक्षीरंसप्तरात्रंतुपिबेत्स्तनचतुष्टयात् ॥ स्तनत्रयात्सप्तरात्रंसप्तरात्रंस्तनद्वयात् ॥१॥ स्तनात्तथैवषड्रात्रंत्रिरात्रंवायुभुग्भवेत् ॥ एतत्सोमायनंनामव्रतंकल्मषनाशनम् ॥ २ ॥ प्रतिदिनसंख्यानियमानादरेणमासं ॥ चत्वारिंशदधिकशतद्वयग्रासानांपंचविंशत्यधिकशतद्वयग्रासानांवाशतेपिचांद्रायणं ॥ ३ ॥ तथाचयाज्ञवल्क्यः॥यथाकथंचित्पिंडानांचत्वारिंशच्छतद्वयम् ॥ मासेनैवोपभुंजीतचांद्रायणमथापरम् ॥ ४ ॥ आद्यद्वयातिरिक्तचांद्रायणानांदिनांतरेप्यारंभोनमासिपर्यवेतिनियमः ॥ ५ ॥ अथकृच्छ्रचांद्रायणसाधारणीमितिकर्तव्यतामाह ॥ कुर्यात्त्रिषवणस्नायीकृच्छ्रंचांद्रायणंतथा ॥ पवित्राणिजपेत्पिंडान्गायत्र्यावाभिमंत्रयेत् ॥ ६ ॥ अनादिष्टेषुपापेषुशुद्धिश्चांद्रायणेनतु ॥ धर्मार्थंयश्चरेदेतच्चंद्रस्यैतिसलोकताम् ॥ ७ ॥ ॥ इतिचांद्रायणव्रतनिर्णयः ॥

## सोमायन व्रताचानिर्णय.

सात दिवस चारी स्तनांतून उत्पन्न होणारें गाईचें दूध प्राशन करून राहणें, पुढें सात दिवस गाईचे तीन स्तनांतील दूध प्राशन करून राहणें व दोन स्तनापासून उत्पन्न होणारें दूध सात दिवस ॥१॥ एक स्तनांतील दूध प्राशन करून साहा दिवस व पुढें तीन दिवस कांहीं न खातां उपोषण करणें. या प्रमाणें तीस दिवस केल्यानें त्यास सोमायन चांद्रायणव्रत असें ह्मणतात. ॥२॥ प्रतिदिवशीं ग्रास संख्येचा नियम न धरतां दोनशें पंचवीस अथवा दोनशें चाळीस ग्रास एक महिन्यांत खाऊन राहिल्यानेंही चांद्रायण व्रत होतें ॥ ३ ॥ याज्ञवल्क्यस्मृतीचाही अर्थ असाच आहे ॥ ४ ॥ प्रथम जीं दोन चांद्रायणें सांगितलीं त्याहून इतर जीं चांद्रायणें याचा आरंभ अन्य दिवसांचे ठायींही केल्यानें चालतो ॥ ५ ॥ प्रतिपदे दिवशींच केला पाहिजे असें नाहीं. चांद्रायण व्रते संबंधाची कर्तव्यता याज्ञवल्क्याने सांगितली आहे. कृच्छ्र चांद्रायण व्रताचे ठायीं त्रिकाळ स्नान करावें. आणि पवित्र अघमर्षणादिसूक्तें याचा जप करावा. गायत्री मंत्रानें खावयाचे ग्रास अभिमंत्रण करून भक्षण करावे. ॥ ६ ॥ ज्यापापास शुद्धता होण्याविषयीं प्रायश्चित्त सांगितलें नाहीं, अशा पापा पासून चांद्रायण व्रत आचरणानें मनुष्य शुद्ध होतो. धर्मार्थ हें व्रत आचरण केलें असतां चंद्रलोक प्राप्ती होते. ॥७॥

॥ कृच्छ्राचें आचरण संबंधानें कृच्छ्र प्रकरण पहावें. ॥

## ॥ अथब्रह्महत्याप्रायश्चित्त. ॥

तत्रांगिराः ॥ यःकामतोमहापापंनरःकुर्यात्कथंचन ॥ नतस्यनिष्कृतिर्भूयोभृग्वग्न्यनशनादृते ॥ महापातकीनांतुप्रायश्चित्तस्यमरणांतिकत्वात् ॥ १ ॥ तथाचशंखः ॥ रुग्मस्तेयीसुरापश्चब्रह्महागुरुतल्पगः ॥ मृतेनैवविशुध्यंतिमहापातकिनस्त्विह ॥ २ ॥ अज्ञानेतुप्रायश्चित्तमाह ॥ याज्ञवल्क्यः ॥ शिरःकपालीध्वजवान्भिक्षाशीकर्मवेदयन् ॥ ब्रह्महाद्वादशाब्दानीमितभुक्शुद्धिमाप्नुयात् ॥ ३ ॥ स्वव्यापादितब्राह्मणशिरःकपालंदंडाग्रमारोप्यतंधारयन्लोहितकेनमृण्मयखंडशरावेणवाब्रह्महास्मीतिस्वकर्माख्यापयन्द्वारस्थितःसप्तागाराण्येवभिक्षांयाचयेत्विरमपानाद्वारदेशेतिष्ठेत् ॥ भिक्षार्थीब्रह्मघातकइतिपराशरस्यवचनात् ॥ एवंद्वादशवर्षाणिव्रताचरणमावर्त्यब्रह्महाशुद्धिमाप्नुयात् ॥ तत्रव्रतचरणमितिव्रतचर्यांगभूतंशौचसत्यस्नानवत्संध्योपासनमपिकार्यम् ॥ मनुरपि ॥ ब्रह्महाद्वादशसमाःकुटींकृत्वावनेवसेत् ॥ भैक्षाश्यात्मविशुध्यर्थंकृत्वाशवशिरोध्वजं॥४॥ कृतवापनोवानिवसेत्ग्रामांतेगोव्रजेपिवा ॥ आश्रमेवृक्षमूलेवागोब्राह्मणहितेरतः ॥ ५ ॥

## ब्रह्महत्यापातकासप्रायश्चित्त.

त्या विषयीं अंगिराऋषीचेंवचन. जो मनुष्य बुद्धिपूर्वक जाणून महा पाप करील, त्यास

एखाद्या पर्वताच्या कड्यावरून पडणें अथवा अग्नींत प्रवेश करणें अगर मरेपर्यंत कांहीं न खाणें या वाचून अन्य प्रायश्चित्त नाहीं कारण महा पातकास मरणांत प्रायश्चित्त सांगितलें आहे. ॥ १ ॥ यास शंखाचें वचन. सुवर्ण चोरणारा, मद्य प्राशन करणारा, ब्रह्महत्याकरणारा, गुरु स्त्रीसीं गमन करणारा, हे जे महापातकी ते मरणानीं शुद्ध होतात. ॥ २ ॥ न जाणून महा पातक केलें असतां प्रायश्चित्त. याज्ञवल्क्याचें वचन. ब्रम्हहत्या करणाऱ्या मनुष्यानें मारलेल्या ब्राम्हणाचें डोकें काठीस बांधून त्याचा ध्वज घ्यावा आणि हातामध्यें मातीचा तांबडा अर्धी परळ घेऊन त्यात भिक्षा मागून त्या अन्नावर निर्वाह करावा आणि मी ब्रम्हहत्या केली असें, प्रत्येकास सांगत जावें. आणि अन्न भक्षण परि मित करीत जावें. या प्रमाणें बारावर्षे आचरण केल्यानें पातकापासून शुद्ध होतो ॥ ३ ॥ मनूनें असें सांगितलें आहे कीं, ब्रम्हहत्याकरणारानें अरण्यामध्यें पर्ण कुटीका करून त्यांत बारावर्षे वास करावा, व मारलेल्या ब्राम्हणाच्या शिरकरोटीचा ध्वज धारण करावा ॥ ४ ॥ आपलें वपन करून गांवाच्या शिवे पाशीं अथवा गायींच्या गोठ्यांत, आश्रमांत, झाडाखालीं रहावें. गायी ब्राम्हण यांच्या कल्याणा विषयीं तत्पर असें होऊन रहावें. ॥ ५ ॥

## ॥ अथब्रह्महत्याप्रायश्चित्तप्रत्याम्नायनिर्णयः ॥

ब्राह्मणस्यपरित्राणाद्गवांद्वादशकस्यच ॥ तथाश्वमेधावभृथस्नानाद्वाशुद्धिमाप्नुयात् ॥ ६ ॥ दीर्घतीव्रामयग्रस्तंब्राह्मणंगामथापिवा ॥ दृष्ट्वापथिनिरातंकंकृत्वावाब्रह्महाशुचिः ॥ ७ ॥ आनीयविप्रसर्वस्वंहृतंघातितएववा ॥ तन्निमित्तंक्षतःशस्त्रैर्जीवन्नपिविशुध्यति ॥ ८ ॥ लोमभ्यःस्वाहेत्येवंहिलोमप्रभृतिवैतनुम् ॥ मज्जांतांजुहुयाद्वापिमंत्रैरेभिर्यथाक्रमम् ॥ ९ ॥ संग्रामेवाहतोलक्ष्यभूतःशुद्धिमवाप्नुयात् ॥ मृतकल्पःप्रहारार्तोजीवन्नपि विशुध्यति ॥ १० ॥ अरण्येनियतोजप्त्वात्रिर्वैवेदस्यसंहिताम् ॥ शुध्येतवामिताशीत्वा प्रतिस्रोतःसरस्वतीम् ॥ ११ ॥ पात्रेधनंवापर्याप्तंदत्वाशुद्धिमवाप्नुयात् ॥ अदातुश्चविशुध्यर्थमिष्टिर्वैश्वानरीतथा ॥ १२ ॥ यागस्थक्षत्रविड्घातीचरेद्ब्रह्महणिव्रतं ॥ गर्भहाच यथावर्णंतथात्रेयीनिषूदकः ॥ १३ ॥ चरेद्व्रतमहत्वापिघातार्थंचेत्समागतः ॥ द्विगुणं सवनस्थेतुब्राह्मणेव्रतमादिशेत् ॥ १४ ॥

## ब्रह्महत्याप्रायश्चित्ताच्याप्रत्याम्नायाचाविचार.

ब्राम्हणास व्याघ्रादिक मारीत असतां, आपणमध्यें जाऊन त्याचें प्राण रक्षण केलें असतां तसेंच बारा गायींचें याच प्रकारानें संरक्षण केलें असतां, दुसऱ्यानें अश्वमेध यज्ञ करून त्या यज्ञाच्या अंतीं जें अवभृत स्नान तें त्याज बरोबर आचरण केलें असतां ब्रम्हहत्येपासून शुद्ध होतो. ॥ ६ ॥ दुस्तर कष्ट राहणारा आणि अतिदुःख देणारा असा कुष्ठादिक रोग यानें पीडित झालेल्या ब्राम्हणास अथवा गायीस मार्गांत पाहून औषधोपचारानें त्याच्या त्या रोगाचा नाश करून

त्यास निरोगी केल्यानेंहि ब्रम्हहत्या पातका पासून मुक्त होतो ॥ ७ ॥ चोरांनीं हरण केलेलें असें ब्राम्हणाचें द्रव्य सर्व आणून जो ब्राम्हणास देतो अथवा ते आणण्याकारितां प्रयत्न कारित असतां चोरादिकांनीं मारिलें असतां, अथवा ब्राम्हणाचें द्रव्य आणण्याकरितां घायाळ होऊन वांचला असतांही ब्रम्हहत्येपासून मुक्त होतो ॥ ८ ॥ लोमभ्यः स्वाहा इत्यादि मंत्रानें लोमापासून मज्जे पर्यंत शरीराच्या सर्व अंगाचा होम ब्रम्हहत्या करणारानें करावा ॥ ९ ॥ लढाईमध्यें उभय सैन्यांत शिरून आपण बाणास लक्ष्य होऊन जर मृत होईल तर शुद्ध होईल अथवा पुष्कळ प्रहारांनीं युक्त होऊन मृततुल्य होत्साता जर वांचेल तरीहि शुद्ध होतो. ॥ १० ॥ निर्जन अरण्यामध्यें परिमित अहार करून वेदाच्या संहितेचा जप तीन वेळां केल्यानेंही शुद्ध होतो. तसेंच हविष्यान्न भक्षण करून सरस्वती नदीच्या उगमापासून सर्व सरस्वती नदीस प्रदक्षिणा केल्यानेंहि शुद्धता होते. उगमापासून आरंभ करून प्रत्येक शाखे शाखेस पश्चिमोदधिपर्यंत गमन करावें ॥ ११ ॥ अथवा सत्पात्र ब्राम्हणास त्याचे जन्मभर निर्वाहास पुरेल इतकें द्रव्य द्यावें. म्हणजे शुद्धता होते. ब्राम्हणानेंही तें द्रव्य घेऊन वैश्वानरेष्टि करावी. ॥ १२ ॥ याग करणारा जसा क्षत्रीय अगर वैश्य यास मारिलें असतां ब्रम्ह हत्येचें प्रायश्चित्त सांगितलें आहे. गर्भाचा नाश केला असतां, तसेंच रजस्वला स्त्रीयेचा नाश केला असतांही ब्रम्हहत्या प्रायश्चित्त करावें. ॥ १३ ॥ ब्राम्हणास मारण्यास प्रवृत्त झाला असोन कांहीं प्रतिबंध झाल्यामुळें तो ब्राम्हण मरण न पावला असतांही ब्रम्हहत्येचें प्रायश्चित्त करावें यज्ञ करणाऱ्या ब्राम्हणास मारिलें असता दुप्पट प्रायश्चित्त करावें ॥ १४ ॥

पूर्वोक्तद्वादशाब्दादिव्रताचरणाशक्तौषष्ट्युत्तरभिशतधेनवस्तन्मूल्यंवाहेमरौप्यान्यतरस्यषष्ट्युत्तरत्रिशतनिष्कानि ॥ अत्राशक्तौतावत्संख्यान्यर्धनिष्कानिपादनिष्कानिवा ॥ अभावेशतंदशवागावोदक्षिणाविप्रभोजनादिइतिकेचित् ॥ १ ॥ मकांतव्रतमध्येमरणेऽपितावतैवपापक्षयः ॥ विध्योत्तरवासिनातुनिर्गुणेनसगुणेनवाजातिमात्रनिर्गुणविप्रवधेविकर्मवर्जितचातुर्वर्ण्येत्पर्थिभिक्षांकुर्वताछत्रोपानद्वर्जितेनगोकुलगोष्ठग्रामतपोवनतीर्थादिपुस्वकर्मस्वापयन्समुद्रसेतुदर्शनस्नानेकृत्वाविप्रेभ्योभोजनवस्त्रपवित्रादिदेयम् ॥ अत्रगोशतंदक्षिणादेयातेनब्रम्हहत्यादिपातकनाशोभवति ॥ २ ॥ अनुपनीतविप्रवधेनिर्गुणविप्रवधोक्तंषडब्दं ॥ अनुपनीतत्वेनतस्यनिर्गुणत्वात् ॥ ३ ॥ तिरस्कृतनिर्गुणविप्रस्यक्रोधाद्धिपशस्त्रादिनामरणेनिर्गुणस्यत्रैवार्षिकंव्रतम् ॥ ४ ॥ निमित्तिनोगुणतत्वेत्वद्वंगृहक्षेत्रादिसंबंधेनिर्गुणमरणेसगुणस्यापित्रैवार्षिकमेव ॥५॥ यदात्वाक्रोशताडनादिसंबंधमंतरेणभ्रांत्यादिवशात्परमुद्दिश्यविप्रस्यात्महननेतुहंतुरेवदोषोनोद्दिश्यस्य ॥६॥ तथापत्राक्रुष्टोपिमरणादर्वाकधनदानादिनातोपितउच्चैःश्रावपतिनाक्रोशस्यापराधइतिसौम्यदोषः ॥७॥ अत्रापस्तंबः ॥ आक्रुष्टस्ताडितोवापिधनैर्वाविप्रयोजितः ॥ यमु-

**द्विशत्यजेत्प्राणान्तमाहुर्ब्रम्हघातकं ॥ इत्यादिवचनोपात्तनिमित्तवान्निमित्ती ॥ तस्य-
पादंप्रायश्चित्तंतथाचब्रम्हहत्याप्रायश्चित्तपादंनिमित्तिनोदर्शयति ॥ ८ ॥**

ब्रम्हहत्यापातकास पूर्वी द्वादशाब्दादिव्रता चरण सांगितलें आहे, तें करण्यास अशक्त असेल तर तीनशें साठ गायीं ब्राम्हणास दान कराव्या, तें हि सामर्थ्य नसल्यास गायींच्या किंमतीबद्दल तीनशें साठ रुप्याचे अथवा सोन्याचे निष्क द्यावेत. चार रुपायाचा एक निष्क ज्योतीष शास्त्रानें– सांगितला आहे. अन्यमतानें चाळीस मासे रुप्याचा निष्क सांगितला आहे. तितके हि सामर्थ्य नसेल तर अर्ध निष्क किंवा निष्कपाद म्हणजे एक रुपाया या मानानें तीनशें साठ गोप्रदानें क-रावींत असें सर्व प्रायश्चित्त केल्या नंतर शंभर अथवा दहा गायी दक्षिणार्थ द्याव्या. आणि ब्राम्हण भोजन करावें असें कित्येक ग्रथकार सांगतात. ॥ १ ॥ ब्रम्हहत्यादि पातक नाश करितां चतु-र्दशाब्द द्वादशाब्दि व्रतारंभ केलें असोन मध्येंच जर मरण पावेल, तर जेवढें प्रायश्चित्ता चरण झालें असेल तेवढ्यानेंच सर्व पातकाचा नाश होतो विंध्याचलाच्या उत्तरभागीं राहणाऱ्या सगुण अथ-वा निर्गुण मनुष्यानें जाती मात्र निर्गुण अशा ब्राम्हणाचा वध केला असतां शुद्धचरण अशा च-तुर्वर्णाच्या मनुष्या पासून मार्गामध्यें भिक्षा घेऊन छत्री जोडा त्याग करून पायानें वाट चालून मार्गांत लागणारी गायींचीं स्थानें, गांव, तपोवन, तीर्थादीक याचें ठायीं आपण केलेलें ब्रम्हहत्यादि कर्म सर्वांस प्रसिद्ध करावें या रीतीनें मार्ग चालून समुद्रसेतूचें दर्शन घ्यावें. स्नान करावें. नंतर ब्राम्हणास भोजन, वस्त्र, पवित्रें द्यावीत. ॥ २ ॥ व शंभर गोप्रदानें दक्षिणा द्यावी, असें के-ल्यानें ब्रम्हहत्यादि पातकाचा नाश होतो. ॥ ३ ॥ मौंजीबंधन न झालेला असा ब्राम्हणाचा पुत्र मारिला असतां, निर्गुण ब्राम्हण मारला असतां जें पडब्द प्रायश्चित्त सांगितलें आहे तें आचरण क-रावें. म्हणजे शुद्धता होते. ॥ ४ ॥ निर्गुण ब्रम्हणाचा तिरस्कार केल्यामुळें त्यानें क्रोधावेशानें विष, शस्त्रइत्यादिकाच्या योगानें आत्महत्या केली असतां ज्या निर्गुण ब्राम्हणाच्या योगानें मरण आलें असेल, त्यानें त्रिवार्षिक ब्रम्हव्रत करावें. ॥ ५ ॥ ज्याच्या निमित्तानें ब्राम्हणास मरण आलें असेल, तो गुणवान् असतां त्यास अर्द्धप्रायश्चित्त, घर, शेत इत्यादि संबंधामुळें निर्गुण मनु-ष्यानें आत्महत्या केली असतां सगुण मनुष्यासही त्रय वार्षिकच प्रायश्चित्त सांगितलें आहे. ॥५॥ जेव्हां तर आक्रोश, मारणें, इत्यादि करणारांचून केवळ भ्रांतीनें दुसऱ्यास उद्देशून आत्महत्या केली असतां, आत्महत्या करणारासच दोष आहे. ज्याच्या उद्देशानें आत्महत्या केली असेल त्यास दोष नाहीं. ॥ ६ ॥ तसेंच प्रथम तिरस्कार केला असोन मरणाचे पूर्वी द्रव्यइत्यादिक देऊन संतोष युक्त केलें असतां जर पुन्हा तो मरण पावेल तर ज्याच्या उद्देशानें मरण पावला असेल त्यास दोष नाहीं. ॥ ७ ॥ या विषयीं आपस्तंबाचें वचन एखाद्या ब्राम्हणाचा तिरस्कार केला असतां, किंवा त्यास ताडण केलें असतां, अथवा त्याचें द्रव्य हरण केलें असतां त्या कारणानें जर तो ब्राम्हण प्राणत्याग करील तर ज्याच्या उद्देशानें प्राण त्याग केला असेल तो ब्रम्हहत्या करणारा असा होतो. म्हणोन त्यानें ब्रम्हहत्या पातकाबद्दलच्या प्रायश्चित्ताचें पादप्रायश्चित्त करावें. ॥ ८ ॥

सुमंतुः ॥ तिरस्कृतोयदाविप्रोहत्वात्मानंमृतोयदि ॥ निर्गुणःसहसाक्रोधाद्गृहक्षेत्रादिकारणात् ॥ त्रिवार्षिकंव्रतंकुर्यात्प्रतिलोमांसरस्वतीम् ॥ गच्छेद्वापिविशुध्यर्थंतत्पापस्येतिनिश्चितम् ॥ ९ ॥ १० ॥ अत्यर्थंनिर्गुणोविप्रोह्यत्यर्थंनिर्गुणोपरि ॥ क्रोधाद्वैम्रियतेपस्तुर्निमित्तंतुभासतः ॥ वत्सरत्रितपंकुर्याञरःकृच्छ्रंविशुद्धये ॥ ११ ॥ यत्तुतेनैवोक्तम् ॥ केशस्मश्रुनखादीनांकृत्वातुवपनंवने ॥ ब्रम्हचर्यंचरन्विप्रोवर्षेणैकेनशुध्यति ॥ १२ ॥ सुमंतुः ॥ असंबंधेनयःकश्चित्द्विजःप्राणान्परित्यजेत् ॥ तस्यैवद्धवेत्पापंनतुयंपरिकीर्तयेत् ॥ १३ ॥ आत्मघातेतुतत्पुत्रादयोमृतजातीयवधप्रायश्चित्तंसमुचित्तंतप्तकृच्छ्रंचचान्द्रंकुर्युः ॥ १४ ॥ आत्मघातादिपापिनांशवस्पर्शालंकरणवहनदहनाश्रुपातास्थिसंचयनदशाहक्रियादिकमज्ञानतःकृत्वामनूक्तंतप्तकृच्छ्रंद्वादशाहंज्ञानतोद्विगुणंतप्तकृच्छ्रसहितंचांद्रंवा ॥ १५ ॥ एषुस्पर्शाश्रुपातभिन्नेत्वेकैककरणेतुज्ञानतः सप्ताहसाध्यंसांतपनंतप्तकृच्छ्रंवा ॥ १६ ॥ अथानुग्राहकादीनां ॥ तत्रसाक्षादनुग्राहकः ॥ कर्तुर्द्वादशाब्दंचतुर्विंशत्यब्दषडब्दादियत्प्राप्नुयात्तत्पादोनंचरेत्॥प्रयोजकोऽर्धम् ॥ अनुमंतासार्धपादं ॥ निमित्तकर्तापादंचरेत् ॥ १७ ॥

सुमंतुचें वचन. तिरस्कार केलेला असा ब्राम्हण गृह क्षेत्रादि कारणामुळें आत्महत्या करील तर ज्या मनुष्याच्या उद्देशानें आत्महत्या केली असेल त्यानें त्रिवार्षिक व्रताचरण करावें. तसेंच प्रतिलोम सरस्वती नदीकडे गमन करावें. ॥ ९ ॥ १० ॥ अत्यंतनिर्गुण ब्राह्मणानें कारणावांचून अत्यंत निर्गुण ब्राह्मणाची निर्भर्त्सना केली असता, तो रागानें जर मरण पावेल तर त्याच्या उद्देशानें ब्राह्मणमृत झाला असेल त्यानें त्याबद्दल त्रिअब्द कृच्छ्र प्रायश्चित्ता चरण केल्यानें शुद्धता होते. ॥ ११ ॥ केश, स्मश्रु, नखें इत्यादीकांचें वपन करून अरण्यामध्यें एकवर्षपर्यंत ब्रह्मचर्याचरण करून राहिल्यानें ही शुद्धता होते. ॥ १२ ॥ एखादा ब्राह्मण कारणावाचून दुसऱ्यास उद्देशून जर प्राण त्याग करील, ते आत्महत्येचें पाप त्यास लागतें, ज्याच्या उद्देशानें प्राणत्याग केला असेल त्यास पाप नाहीं. ॥ १३ ॥ आत्महत्या केली असता ज्यानें आत्महत्या केली असेल त्याच्या पुत्रादिकांनीं पितादिकाच्या उद्देशानें मृत जातीय हत्यांचें प्रायश्चित्त व दोन तप्त कृच्छ्रें व चांद्रायण प्रायश्चित्त करावें ॥ १४ ॥ आत्महत्या करणारे जे पापी त्यांच्या प्रेतास स्पर्श, अलंकृत करणें, वाहनें जाळणें, त्याच्या उद्देशानें रडणें, त्याचें अस्थि सचय करणें, दशाहादि क्रिया करणें हीं कर्में न जाणून केलीं असतां, मनूनें सांगितलेलें दहा दिवसपर्यंत तप्तकृच्छ्र प्रायश्चित करावें. जाणोन केलें असता द्विगुणित तप्तकृच्छ्र व चांद्रायण प्रायश्चित्त करावें ॥ १५ ॥ यामध्यें स्पर्श, अश्रुपाता वांचून भिन्न, अस्थिसचय, दाहादि, एकेक कर्म ज्ञान पूर्वक केलें असता सातदिवसांनीं साध्य होणारें असें सांतपन अथवा तप्तकृच्छ्र प्रायश्चित्त करावें. ॥ १६ ॥ आतां अनुग्रहादिकाच्या प्रायश्चित्ताचा विचारः—प्रत्यक्ष पापकर्मासि जो अनुग्रह करणारा त्यानें कर्त्यास जें द्वादशाब्द, चतुर्विंशत्यब्द, षडब्द इत्यादिक जें प्रायश्चित्त सांगीतलें असेल, त्यानें पाऊणपट प्रायश्चित्त करावें.

प्रयोजकानें अर्ध प्रायश्चित्त करावें. अनुमोदनकरणाऱ्यानें सार्धपाद म्हणजे पावहिंसा व पावाचा अर्धाहिंसा मिळोन सार्धपाद निमित्तकर्त्यानें पाद प्रायश्चित्त आचारण करावें. ॥ १७ ॥ यासंबंधाचा विशेष विचार पूर्वी पांच प्रकारचें पातक करणारे यांचा विचार सांगितला आहे तेथे पाहावा.

## ॥ अथब्रह्महत्यासमप्रायश्चित्तनिर्णयः ॥

तत्रयाज्ञवल्क्यः ॥ गुरूणामध्यविक्षेपोवेदनिंदासुहृद्वधः ॥ ब्रह्महत्यासमंज्ञेयमधीतस्य विनाशनम् ॥ १ ॥ गुरूणांमुख्यानामाक्षेपेनृतपापभिशंसनंच ॥ वेदानाममप्रामाण्याभिधानम् ॥ विप्रातिरिक्तमित्रवधः ॥ अधीतवेदस्यबौद्धादिशास्त्रावष्टंभेननाशनम् ॥ प्राणिमात्रवधफलकानृतसाक्ष्यं ॥ गुणवत्परस्परस्पर्धायांगुणवत्त्वपरीक्षायांवानृतवचनम् ॥ राजकुलेब्राह्मणपीडाजनकंपैशून्यंचेत्यादि ॥ एतानिप्रत्येकंब्रह्महत्यासमानि ॥ २ ॥ यत्तुस्वाध्यायत्यागसोपपातकमध्येपरिगणनं ॥ स्वाध्यायाभिहुतत्यागइतितच्छाग्राम्यासनिष्टत्वेनकुटुंबभोजनव्यग्रतयावापरित्यागेद्रष्टव्यम् ॥ ३ ॥ यत्तुमनुनासुरापानसमत्वमुक्तम् ॥ ब्रम्होज्झितावेदनिंदाकौटसाक्ष्यंसुहृद्वधः ॥ गर्हितान्नाद्ययोर्जग्धिःसुरापानसमानिषट् ॥ इतितत्प्रायश्चित्तविकल्पार्थमेवमन्यत्रापिद्रष्टव्यम् ॥ ४ ॥ तथाचमनुः ॥ अनृतंचसमुत्कर्षेराजगामिचपैशुनम् ॥ गरोश्चलीकनिर्बंधःसमानिब्रह्महत्यया ॥ ५ ॥ राजकुलादिषुचतुर्वेदीएवंचतुर्वेदाभिज्ञइत्यभिभाषणादिसमुत्कर्षोऽनृतंयत्रतुगुणवत्तायाःस्पर्धायांसत्यापरीक्षकोजानन्नपिसमुत्कर्षेविपर्ययेऽनृतवादीसोपिब्रम्हहत्यासमंपापंप्राप्नोति ॥ ६ ॥ विष्णुः ॥ शरणागतहननंब्रम्हहत्यासममिति ॥ प्रचेताः ॥ गोगर्भिणीस्त्रीगर्भिणीबालवधोब्रम्हहत्यासमानमिति ॥ ७ ॥ अत्रसमत्वाभिधानात्शिष्टाचारबलेनपादोनंकल्प्यंअपिसमोब्राम्हणः राजसमोमंत्रीत्यादिपुसमशब्दस्यकिंचिन्न्युनेप्रयोगदर्शनात् ॥ अत्रापिजातिशक्तिवयोऽवस्थाद्यपेक्षयाद्वादशवार्षिकादीनियथायोग्यंयोज्यानि ॥ एषुकपालध्वजधारणादिकंनास्ति ॥ ८ ॥ एवंब्रम्हहत्यासमप्रायश्चित्तनिर्णयोऽन्नयः

## ब्रह्महत्यासारख्याप्रायश्चित्तांचानिर्णय.

यास याज्ञवल्क्याचें वचन. गुरूचा तिरस्कार करणें, वेदाची निंदाकरणें, मित्राचा वधकरणें, जें वेदाध्ययन केलें असेल त्याचा नाश करणें, हें प्रत्येक ब्रह्महत्या समान पातक जाणावें॥ १॥ २॥ येथें तर वेदाध्ययनाचा त्याग करणें हे ब्रह्महत्या समान पातक सांगितलें आहे, आणि उपपातक प्रकरणामध्यें वेदाध्ययन, अग्नि, पुत्र यांचा त्याग केला असतां उपपातक होतें असें सांगितलें आहे. यामध्यें परस्पर विरोध येत आहे तर [illegible] जें पाहिजे. यांच्या सामान्य विचारानें वेदाध्ययनाचा त्याग केला असतां ब्रह्महत्या समान होतें. आणि वेदोक्त [illegible] अथवा

कुटुंब पोषणव्यग्रतेनें जर वेदाध्ययनाचा त्याग केला असतां उपपातक जाणावें. ॥ ३ ॥ मनूनें वेदाध्ययन त्याग करणें हें मद्यपान समान पातक असे सांगितलें आहे. त्यास मनूचें वचन. वेदाचा त्याग करणें, वेदाची निंदा करणे, खोटी साक्ष देणे, मित्राचा वध करणें, निंदित जें अन्नादिक तें भक्षण करणें, निंदित जे लसुनादि पदार्थ यांचें भक्षण करणें हीं सहा मद्यप्राशना समान पातकें जाणावीं. येथे वेदत्याग करण्यास सुरापान समत्व सांगितलें त्याचे कारण प्रायश्चित्त विकल्पा करितां, ह्मणजे वेदत्यागास ब्रह्महत्या किंवा सुरापान या दोहोंपेकीं एक प्रायश्चित्त करावें. याप्रमाणें अन्यस्थळींही अशीच व्यवस्था जाणावी ॥ ४ ॥ मनूचें वचन, नीचजाती असोन मी उत्कृष्ट जातीचा आहें असें खोटें बोलणें, जेणेंकरून मरण शिक्षा होईल असा कोणाचा दोष राजा जवळ सांगणें, आणि गुरूजवळ मिथ्या भाषण करणें, हीं पातकें ब्रह्महत्या समान जाणावीत. ॥ ५ ॥ राजकुळा मध्ये मी चतुर्वेदी किंवा चतुर्वेदास जाणणारा असें खोटें भाषण करणें, गुणवान् मनुष्याची स्पर्धा चालली असता परिक्षक मनुष्यानें स्वतः जाणूनही उत्कर्षा विषयीं खोटें बोलणें, हें ही ब्रह्महत्यासम पातक होते. ॥ ६ ॥ विष्णूचें वचन. शरणागताचा नाश करणें, हें ही ब्रह्महत्यासम पातक सांगितलें आहे. प्रचेताचे वचन. गोगर्भिणी, गर्भिणी स्त्री, बालक यांचा वध करणें, हे प्रत्येक ब्रह्महत्यासम जाणावे. ॥ ७ ॥ येथें ब्रह्महत्यासमान जीं पातकें सांगितलीं, त्यास पादोन प्रायश्चित्ताची योजना करावी. कारण ऋत्वीसारखा ब्राम्हण, राजासारखा प्रधान, इत्यादिक वाक्यांमध्यें समशब्दाला मूळ मनुष्यापेक्षा किंचित् न्यूनता आहे, त्याप्रमाणें येथेंही जाणावें. येथेंही जाति, शक्ति, वय, अवस्था इत्यादिकांच्या विचारानें द्वादश वार्षिकादि प्रायश्चित्ताची यथायोग्य योजना करावी. येथें कपालध्वज ह्मणजे नरकरोटीचा ध्वज धारण करून फिरण्यास जें सांगितलें आहे, तें येथें नाहीं. ॥ ८ ॥ याप्रमाणें ब्रम्हहत्यासम प्रायश्चित्तांचा निर्णय जाणावा.

## ॥ अथ सुरापानप्रायश्चित्तविचारः ॥

तत्रमनुः ॥ सुरावैमलमन्नानांपाप्माचमलमुच्यते ॥ तस्माद्ब्राह्मणराजन्यौवैश्यश्चनसुरांपिबेत् ॥ १ ॥ इतियत्तुतेनोक्तम् ॥ गौडीपैष्टीचमाध्वीचविज्ञेयात्रिविधासुरा ॥ यथाचैकातथासर्वानपातव्याद्विजोत्तमैः ॥२॥ यक्षरक्षःपिशाचान्नंमद्यंमांसंसुरासवम् ॥ तद्ब्राह्मणेननात्तव्यंदेवानामश्नताहविः ॥ ३ ॥ बृहद्विष्णुः ॥ माधुकमैक्षवंसैरंतालंखर्जूरपानसम् ॥ मधूत्थंचैवमाध्वीकमैरेयंनारिकेलजम् ॥अमेध्यानिदशैतानिमद्यानिब्राह्मणस्यतुइति॥४॥ सुरापानेप्रायश्चित्तमाहमनुः ॥ सुरांपीत्वाद्विजोमोहादग्निवर्णांसुरांपिबेत् ॥ तयास्वकायेनिर्दग्धेमुच्यतेकिल्बिषात्ततः ॥ मोहात्शास्त्रार्थापरिज्ञानात्नतुस्वरूपापरिज्ञानात् ॥ अग्निवर्णांक्वथितादिनापादिताग्निवर्णाम् ॥५॥ याज्ञवल्क्यः ॥ सुरांवुघृतगोमूत्रपयसामग्निसन्निभम् ॥ सुरापोऽन्यतमंपीत्वामरणाच्छुद्धिमृच्छति ॥ ६ ॥ गोमूत्रसाहचर्याद्गव्ये

एवघृतपयसीग्राह्येघृतपयःसाहचर्याच्चतैयमेवगोमूत्रंएतचार्द्रवाससाकार्यंसुरापआर्द्रवासाश्चअग्निवर्णांसुरांपिबेदितिपैठीनसिस्मरणात्॥तथालोहेनपात्रेणसुरापोऽग्निवर्णांसुरामायसेनपात्रेणवापिबेदितिप्रचेतःस्मरणात् ॥ एतच्चसकृत्पानमात्रेसरापानंसकृत्कृत्वाग्निवर्णांसुरांपिबेदित्यंगिरःस्मरणात् ॥ ७॥ प्रायश्चित्तांतरमाहयाज्ञवल्क्यः ॥ वालवासाजटीवापिब्रह्महत्याव्रतंचरेत् ॥ पिण्याकंवाकणान्वापिभक्षयेत्रिसमानिशि ॥ ८ ॥ एतत्शक्तविषयं ॥अशक्तौतुप्राजापत्यमत्याम्नायत्वेनद्वादशवर्षव्रतसंख्यापरिमितषष्ट्यधिकशतत्रयगादद्यात् ॥ तदभावेतन्मूल्यप्रमाणंद्रव्यं॥ तदर्धंवादद्याचतःपूतोभवति॥९॥स्त्रीविषयेपतिलोकंनसायातिब्राह्मणीयासुरांपिबेत्॥इहैवसाशुनीगृध्रीसूकरीचोपजायते॥१०॥

## सुरापानप्रायश्चित्ताचा विचार.

त्या विषयीं मनूचें वचन. सुरा म्हणजे मद्य हा अन्नाचा मल आहे, मल म्हणजे पाप होय यामुळें ब्राम्हण, क्षत्रिय आणि वैश्य यांनीं मद्य पिऊ नये. ॥ १ ॥ गूळ, पीठ, मध यापासून सुरा तयार होते. तर या तीनही प्रकारचें मद्य ब्राम्हणानीं पीऊं नये. ॥ २ ॥ मद्य आणि मांस हें यक्ष, राक्षस, पिशाच्च यांचें अन्न सांगितलें आहे. यास्तव हें देवाच्या हविर्भागाला भक्षण करणाऱ्या ब्राम्हणानें खाऊ नये. ॥ ३ ॥ बृहद्विष्णूनें दहा प्रकारचें जें मद्य ब्राम्हणांनीं पिऊ नये असें सांगितलें आहे. ते मद्याचे दहा प्रकार–मधापासून उत्पन्न होणारें त्यास माधुक असें म्हणावें. उसाच्या रसापासून होणारें त्यास ऐक्षव अथवा सेंधू असें म्हणतात. सैर सौद म्हणजे अर्क रुई यापासून होणारें त्यास सैर असें म्हणतात. ताडवृक्षाच्या फळापासून उत्पन्न होणारें, खजूरापासून उत्पन्न होणारें, फणसापासून उत्पन्न होणारें, मोहाच्या फुलापासून उत्पन्न होणारें, द्राक्षापासून उत्पन्न होणारें, नारिकेळापासून उत्पन्न होणारें, मिरा द्रव्या पासून उत्पन्न होणारें, अशीं दहा प्रकारचीं मद्यें ब्राह्मणानीं पिऊं नयेत. ॥ ४ ॥ सुरापान केलें असता प्रायश्चित्त. मद्य अग्नि प्रमाणें लाल असें तप्त करून पिणाराच्या मुखात ओतावें. त्याच्या योगानें शरीर दग्ध झालें असता ब्राह्मण पातका पासून मुक्त होतो. ॥ ५ ॥ याज्ञवल्क्यानें असें सांगितलें आहे कीं, मद्य, पाणी, तूप, गोमूत्र, दूध यांतील कोणताही एक पदार्थ तापवून अग्नि प्रमाणें लाल झाल्या नंतर मद्य प्राशन करणाऱ्यानें प्यावा, त्या योगानें मरण प्राप्त झाल्या नंतर तो शुद्ध होतो. ॥ ६ ॥ गोमूत्र, तूप, दूध, हें गायीचेंच घ्यावयाचें आहे. पैठीनसी आणि प्रचेता यानें गोमूत्रादिक जें पिण्यास सांगितलें तें ओलें वस्त्र नेसून लोखंडाच्या पात्रानें पिण्यास सांगितलें आहे. ॥ ७ ॥ याज्ञवल्क्यानें दुसरें प्रायश्चित्त सांगितलें आहे, गायी अथवा बोकड याच्या केसांचें वस्त्र धारण करून, जटा वाढवून, ब्रह्महत्येस जें व्रत सांगितलें तें करावें. अथवा तीन वर्षे पर्यंत रात्रीं एक वेळां पेंड खाऊन रहावें. अथवा तांदुळाचे कण भक्षण करून रहावें. ॥ ८ ॥ अत्यंत अशक्त असेल तर प्राजापत्याच्या प्रत्याम्नायानें ब्राह्मणास ३६० गोप्रदानें करावीत. इतक्या गायी देण्यास शक्ति नसल्यास त्यांच्या

किमतीचें अथवा अर्ध किमतीचें द्रव्य ब्राह्मणास द्यावें. तेणेंकरून पवित्र होईल ॥ ९ ॥ जी स्त्री मद्य प्राशन करिते ती मरणा नंतर पतिलोकास जात नाहीं. तर तिला या लोकीं कुत्री किंवा गिधाडी अथवा डुकरीण असा जन्म प्राप्त होतो. ॥१०॥

## ॥ शुष्कसुराभांडोदकपाने प्रायश्चित्तनिर्णयः ॥

शातातपः ॥ सुराभांडोदकपानेच्छर्दनंघृतप्राशनमहोरात्रोपवासश्चेति ॥ ११ ॥ बौधायनः ॥ सुरापानस्ययोभांडेअप पर्युषिता पिबेत् ॥ शंखपुष्पीविपक्वंतुक्षीरंसतुपिबेत् त्र्यहं ॥ १२॥ सुरापस्यमुखगंधघ्राणेमनुनोक्तं ॥ ब्राह्मणस्तुसुरापस्यगंधमाघ्रायसोमपः ॥ प्राणानप्सुत्रिराचम्यघृतंप्राश्यविशुध्यति ॥ १३ ॥ अन्यौषधासाध्यव्याध्युपशमनार्थंसुरापानेत्वज्ञानकृतेत्रैमासिकमब्दस्यादचांद्रायणंवाकृत्वापुनरुपनयनम् ॥ १४ ॥ मद्यपाने तुतथाकृतेतप्तकृच्छ्रसहितःपुनःसंस्कारः ॥ १५ ॥

## वाळलेल्या दारूच्या भांड्यांतील पाणी प्यालें असतां प्रायश्चित्त.

मद्याच्या भांड्यातील पाणी पोटांत गेलें असतां ओकून टाकावें. आणि तूप प्राशन करून अहोरात्र उपोषण करावें. असें शातातपाचें वचन आहे ॥ ११ ॥ मद्य प्राशन करण्याच्या भांड्यामध्यें एक रात्रपर्यंत राहिलेलें पाणी प्यालें असतां शंखपुष्पी घालून तप्त केलेलें असें दूध अथवा पाणी तीन दिवस पिऊन राहावें. ॥ १२ ॥ मद्यप्राशन करणाऱ्याच्या मुखाचा वास घेतला असतां सोमरस पिऊन पाण्यामध्यें तीन प्राणायाम करून तीन वेळां आचमन करून तूप प्राशन केलें असतां शुद्धता होते ॥१३॥सुरा ( पिठापासून झालेली. ) प्राशना वाचून दुसऱ्या कोणत्याही औषधानें दूर न होणारा असा रोग शांत होण्याकरितां, अथवा न जाणोन मद्य प्राशन केलें असतां तीन महिनेपर्यंत अब्द प्रायश्चित्ताचें चतुर्थांश प्रायश्चित्त करावें. अथवा चांद्रायण करून पुनरुपनयन करावें. ॥ १४ ॥ याच कारणा करितां मद्य प्राशन केलें असतां तप्तकृच्छ्रप्रायश्चित्त करून पुनरुपनयन करावें ॥ १५ ॥

## ॥ अथ सुरापानसमप्रायश्चित्तनिर्णयः ॥

तत्रमनुः ॥ ब्रह्मोज्झितावेदनिंदाकौटसाक्ष्यंसुहृद्वधः ॥ गर्हितान्नाद्ययोर्जग्धिः सुरापानसमानिषट् ॥ १ ॥ छत्राकंविड्वराहंचलशुनंग्रामकुक्कुटं ॥ पलांडुंगृंजनंचैवमत्याजग्ध्वापतेद्विजः ॥ २ ॥ याज्ञवल्क्यः॥ निषिद्धभक्षणंजैह्म्यमुत्कर्षेचवचोनृतं ॥ रजस्वलामुखास्वादःसुरापानसमानिषट् ॥ ३ ॥ अत्रब्रह्मवधसमानानामपिकेषांचिद्ग्रहणं प्रायश्चित्तविकल्पार्थं एतेषुअर्धंप्रायश्चित्तम् ॥ ४ ॥ इतिसुरापानसमानिप्रायश्चित्तानि॥

## सुरापानसमप्रायश्चित्ताचा विचार.

त्याविषयीं मनूचें वचन. शिकलेला जो वेद तो आळस्यादि कारणानें टाकणें, वेदाची निंदा

करणें, खोटी साक्ष देणें, मित्राचा वध करणें, निंदित जें अन्न तें खाणें, निंदित जें पान तें करणें, हे सहा दारु पिण्यासारखे दोष आहेत. ॥१॥ तसेंच पावसाळ्या मध्यें जे छत्रीसारखे उत्पन्न होतात, त्यास आळंबी म्हणतात तें, विष्ठा भक्षण करणारा वराह, लसूण, गांवांतील कोंबडा, कांदा, गाजर, हे बुद्धिपूर्वक खाल्ले असतां मनुष्य भ्रष्ट होतो. ॥ २ ॥ या संबंधानें याज्ञवल्क्याचें वचन, निषिद्ध जें लशुनादिक तें खाणें, कुटिलपणा, आपल्या उत्कर्षा करितां खोटें बोलणें, अथवा दोघांच्या परीक्षे मध्यें खोटें बोलणें, रजस्वला स्त्रीच्ये मुखाचा स्वाद घेणें, हीं सुरापान समपातकें जाणावींत. ॥ ३ ॥ मनुवचनांत ब्रह्मवधसम जीं पातकें त्यांस येथें सुरापानसमत्व जें सांगितलें आहे तें प्रायश्चित्त विकल्पा करितां. मद्यपानास जें प्रायश्चित्त सांगितलें त्याचें अर्ध प्रायश्चित्त सुरापान सम प्रायश्चित्तास सांगितलें आहे. ॥ ४ ॥ याप्रमाणें सुरापानसमप्रायश्चित्ताचा निर्णय जाणावा.

## ॥ अथ सुवर्णस्तेयप्रायश्चित्तम् ॥

विप्रस्वामिकाशीतिगुंजापरिमितसुवर्णापहरणंमहापातकं॥इतोन्यूनहरणंनमहापातकं॥ अपहरणंचसमक्षंपरोक्षंवाबलाच्चौर्येणक्रयादिस्वत्वहेतुंविनाग्रहणमुच्यते ॥ ज्ञानतस्तुतस्करोलोहमयंमुसलमादायप्रकीर्णकेशःस्वदोषंस्वर्णापहाराख्यंख्यापयन् ॥अनेनमुसलेनमांमहरेदितिवदन् राज्ञेमुसलमर्पयेत् ॥ तेनसकृदेवाभिहतोमृतःशुद्धः ॥ यदिदृढप्रहारातोंपि जीवेत्तदापिशुद्ध्यति॥नब्राह्मणंहन्यादित्यादिनिषेधस्तुरागप्राप्तविप्रवधविषयः॥अहनने राज्ञःपापश्रवणात् ॥ १ ॥ तथाचयाज्ञवल्क्यः ॥ ब्राह्मणस्वर्णहारीतुराज्ञेमुसलमर्पयेत्॥ स्वकर्मख्यापयस्तेनहतोमुक्तोपिवाशुचिः ॥ २ ॥ राजाभिषेकादिगुणयुक्तःक्षत्रियः ॥ तेनमुसलेनहतोमरणान्मुक्तोवाशुद्धएवअहननेराज्ञोदोषोऽस्त्येव ॥ ब्राह्मणस्वर्णहारीइतितुअत्रसमान्येनाभिधानम् ॥ इदंमरणांतिकप्रायश्चित्तंसार्ववर्णिकं ॥ ३ ॥ अत्रसुवर्णशब्दःपरिमाणविशेषविशिष्टहिरण्यद्रव्यवचनः ॥परिमाणमाहयाज्ञवल्क्यः॥ जालसूर्यमरीचिस्थंत्रसरेणुरजःस्मृतम् ॥ तेऽष्टौलिक्षास्तुतास्तिस्रोराजसर्षपउच्यते ॥ ४॥ गौरस्तुतेत्रयःषड्भिर्यवोमध्यस्तुतेत्रयः ॥ कृष्णलःपंचतेमाषस्तेसुवर्णस्तुषोडश ॥ ५ ॥ एवंचषोडशमाषपरिमितेहेम्निसुवर्णसंज्ञापारिभाषिकी परिमाणविशेषेणप्रायश्चित्तविशेषः ॥ एतच्चसुवर्णस्तेयप्रायश्चित्तं ॥ हृतद्रव्यंस्वामिनेदत्त्वैवकार्यम् ॥ ६॥ तथाचप्रायश्चित्तमयूखेभविष्यवचनम् ॥ यद्यस्यापहृतंद्रव्यंतत्तस्यैवत्रिनिर्दिशेत् ॥ प्रायश्चित्तंततःकुर्यादेवंशुद्धिमवाप्नुयात् ॥ ७ ॥ विष्णुः ॥ दत्त्वैवापहृतंद्रव्यंधनिकस्याप्युपायत ॥ प्रायश्चित्तंततःकुर्यात्कल्मषस्यापनुत्तये ॥ ८ ॥ सुवर्णस्तेयेतुएकादशांशाधिकंचोरितंधनंस्वामिनेदेयं ॥ तथाचमिताक्षरायांलघुवसिष्ठः ॥ स्तेयेनग्रामभृतेतुसुवर्णहरणेकृते ॥ पश्चात्त-

त्तेनदातव्यंतस्मैद्येकादशाधिकम् ॥ ९ ॥ स्मृत्यर्थसारेतु सुवर्णस्तेयीविप्रोव्रतमेवाचरेत्नरः ॥ नदंडेनात्मानंघातयेन्नचराजाविप्रंहन्यादित्युक्तम् ॥ १० ॥

## सोनें चोरलें असतां प्रायश्चित्ताचा विचार.

ब्राह्मणाच्या मालकीचें ऐंशीं गुंजा अथवा त्यापेक्षा ज्यास्त जें सोनें चोरणें हें महापातक सांगितलें आहे. दहा माशाच्या आतील जें सुवर्ण त्याची चोरी करणें हें महापातक होत नाहीं उपपातक होतें. चोरीकरणें ह्मणजे समक्ष अथवा पश्चात् अथवा बलात्कारानें विकत घेतल्यावांचून घेणें. हें होय. ज्ञानपूर्वक सुवर्णाची चोरी केली असता खोबडाचें मुसळ घेऊन केस सोडून राजाचे समोर जाऊन मी सुवर्ण चोरिलें आहे, मला या मुसळानें मारा. असें बोलून राजास मुसळ द्यावें. नंतर राजानें एकवेळ त्या मुसळानें सुवर्ण चोरी करणारास प्रहार करावा. मग प्रहार केल्यावर तो मृत असता किंवा जिवंत असतां मुक्त होतो. ब्राह्मणास मारूं नये असा ब्रह्मवधाबद्दलचा निषेध शास्त्रांत सांगितला आहे. तो या वाचून इच्छेनें ब्रह्मवधाविषयींचा आहे. कारण राजानें मुसळाचा प्रहार न केला असता राजास दोष सांगितला आहे. ॥ १ ॥ याज्ञवल्क्यस्मृतीचाही अर्थ असाच आहे. ॥२॥ या स्मृतीवचनांत ब्राह्मणशब्द साधारण रीत्या सांगितला आहे. कारण सुवर्ण हरणाचें प्रायश्चित्त सर्व वर्णांस सांगितलें आहे ॥ ३ ॥ परिमाणाचा निर्णय याज्ञवल्क्याचें वचन—गवाक्षामध्यें पडलेल्या सूर्यकिरणामध्यें जे रज कण दिसतात त्यास त्रसरेणु ह्मणावे. ते आठ त्रसरेणु झाले असतां एक लिक्षा होते. त्या तीन लिक्षा झाल्या असतां एक राजसर्षप होतो. ॥ ४ ॥ ते तीन झाले असतां एक गौर होतो. सहा गौर झाले असतां एक यव होतो तीन यव झाले असतां एक कृष्णल (गुंज.) होते. ते पांच झाले असतां एकमाष ( मासा ) होतो ते सोळा झाले असतां एक सुवर्ण होतो. ॥ ५ ॥ तात्पर्य सोळा माषपरिमित जें सोनें त्यास सुवर्ण अशी संज्ञा सांगितली आहे ( व्यवहारिकदहामासे सोनें. ) हें जें सोनें चोरिलें असतां जें प्रायश्चित्त सांगितलें आहे, तें चोरलेलें सोनें मालकास देऊन नंतर प्रायश्चित्त घ्यावें. ॥ ६ ॥ प्रायश्चित्तमयूखांतील भविष्य वचन. चोरलेलें द्रव्य मालकास देऊन नंतर प्रायश्चित्त करून शुद्ध व्हावें. ॥ ७ ॥ विष्णुस्मृतीचाही अर्थ असाच आहे. ॥ ८ ॥ मिताक्षरांत लघुवसिष्ठाचें असें वचन आहे कीं, चोरलेलें सोनें ब्राह्मणाचें असेल तर चोरल्यापेक्षा अकरापट द्रव्य ज्यास्त ब्राह्मणास देऊन नंतर प्रायश्चित्त घेऊन शुद्ध व्हावें. ॥ ९ ॥ स्मृत्यर्थसारांत असेंच सांगितलें आहे कीं, सुवर्ण चोरी करणाऱ्या ब्राह्मणानें प्रायश्चित्त घ्यावें. दंडानें आपला नाश करून घेऊ नये. राजानेंही त्यास मारूं नये. असें सांगितलें आहे. ॥ १० ॥

बालाग्रमात्रसुवर्णापहारेएकःप्राणायामःलिक्षापहारेतत्त्रयं ॥ राजसर्षपतुल्येतचतुष्टयंअष्टोत्तरशतगायत्रीजपश्च ॥ ११ ॥ षट्त्रिंशन्मते ॥ बालाग्रमात्रेऽपहृतेप्राणायामं समाचरेत् ॥ लिक्षामात्रेऽपिचतथाप्राणायामत्रयंबुधः ॥ १२ ॥ राजसर्षपमात्रेणप्राणायामचतुष्टयम् ॥ गायत्र्यष्टसहस्रंचजपेत्पापविशुद्धये ॥ १३ ॥ गौरसर्षपमात्रेतुसावित्री

वैदिनंजपेत् ॥ यवमात्रेसुवर्णस्यप्रायश्चित्तंदिनद्वयम् ॥ १४ ॥ सुवर्णकृष्णलंह्येकमपहृत्यद्विजोत्तमः ॥ कुर्यात्सांतपनंकृच्छ्रंतत्पापस्यापनुत्तये ॥ १५ ॥ अपहृत्यसुवर्णस्यमापमात्रंद्विजोत्तमः ॥ गोमूत्रयावकाहारस्त्रिभिर्मासैर्विशुद्ध्यति ॥ १६ ॥ सुवर्णस्यापहरणे वत्सरंयावकीभवेत् ॥ ऊर्ध्वंप्राणांतिकंज्ञेयमथवाब्रह्महत्याव्रतमिति ॥ १७ ॥

केशाच्या अग्रा इतकें सुवर्ण चोरिलें असतां त्याचे अकरा पट ज्यास्त सुवर्ण त्याच्या मालकास देऊन प्राणायाम करावा. चोरलेलें द्रव्य त्यापेक्षां ज्यास्त देणें सर्वत्र आहे. लिक्षामात्राचे ठायीं तीन प्राणायाम, राजसर्षप सुवर्ण चोरी केली असतां चार प्राणायाम, आणि आठ हजार गायत्री जप शुद्ध होण्यास सांगितला आहे. ॥ ११ ॥ षट्त्रिंशन्मताचा अर्थ असाच आहे. ॥ १२ ॥ १३ ॥ गौरसर्षप प्रमाण चोरीचे ठायीं एक दिवस गायत्री जप करण्यास सांगितला आहे. यवमात्र सुवर्ण चोरीचे ठायीं दोन दिवस जप करावा. ॥ १४ ॥ गुंजभर सोनें चोरिलें असतां सांतपन कृच्छ्र प्रायश्चित्त सांगितलें आहे. ॥ १५ ॥ पाच गुंजा सोनें चोरिलें असतां सातु गोमूत्रांत शिजवून तीन महिने पर्यंत खाऊन राहावें. ॥ १६ ॥ नऊ मासे पर्यंत सोनें चोरिलें असतां वर्षभरपर्यंत गोमूत्रांत भिजलेले सातु खाऊन रहावें. यापेक्षां ज्यास्त चौर्याचे ठायीं प्राणांतिक प्रायश्चित्त अथवा ब्रह्महत्येंत सांगितलेलें प्रायश्चित्त करावें. ॥ १७ ॥

सुवर्णमानन्यूनरजतस्तेयेसांतपनंततऊर्ध्वंदशनिष्कपर्यंतंचांद्रम् ॥ ततआशतनिष्कं चांद्रद्वयं ॥ ततआसहस्रात्तुद्विगुणम् ॥ सहस्रनिष्काधिकरजतस्तेयेस्वर्णस्तेयेसमत्वाब्दंब्रह्महत्याव्रतम् ॥ १ ॥ ताम्रकांस्यपित्तलादीनांसहस्रनिष्कमितस्तेयेपराकम् ॥ तथाचचतुर्विंशतिमते ॥ रूप्यहृत्वाद्विजोलोभाच्चरेच्चांद्रायणंव्रतं ॥ वधानकदशादूर्ध्वमाशतात्द्विगुणंचरेत् ॥ २ ॥ इति ॥ आसहस्रात्तुत्रिगुणमूर्ध्वंहेमविधिस्मृतः ॥ सर्वेषांधातुलोहानांपराकंतुसमाचरेत् ॥ ३ ॥ धान्यानांहरणेकृच्छ्रंतिलानांसैदंवंस्मृतम् ॥ रत्नानांहरणेविप्रश्चरेच्चांद्रायणंव्रतम् ॥ ४ ॥ इतिनिष्कपर्यायोवधानः ॥ क्वचित्स्तेयापवादमाहशंखः ॥ अस्तेयमग्न्येकाष्ठमस्तेयंचतृणंगवे ॥ कन्याहरणमस्तेयं योहरत्यनलंकृतामिति ॥ ५ ॥ कन्याहरणंराक्षसविवाहपरं ॥ मनुरपि ॥ द्विजोऽध्वगः क्षीणवृत्तिर्द्वाविक्षूद्वेचमूलके ॥ आददानःपरक्षेत्रान्नदंडंदातुमर्हति ॥ ६ ॥ तथा ॥ चणकव्रीहिगोधूमयवानांमुद्गमापयोः ॥ अनिषिद्धोगृहीतव्योमुष्टिरेकःपथिस्थितैः ॥ ७ ॥ तथैवसप्तमेभक्तेभक्तानिषडनश्नता ॥ अश्वस्तनविधानेनहर्तव्यंहीनकर्मणाइति ॥ ८ ॥

## अन्य चौर्याच्या प्रायश्चिताचा निर्णय.

दहा मासापेक्षां न्यून रुपें चोरिलें असतां सांतपन प्रायश्चित्त करावें. दहामासांस चांद्रायण प्रायश्चित्त. शंभर तोळ्यांपर्यंत दोन चांद्रायण. हजारापर्यंत चार चांद्रायणें. हजारापेक्षां ज्यास्त रौप्य चोरिलें असतां सुवर्ण चोरी सारखा दोष होतो. म्हणून एक वर्षपर्यंत ब्रह्महत्या प्रायश्चित्त करावें.

॥ १ ॥ तांबें, काशें, पितळ इत्यादिक धातु पदार्थ हजार तोळे वजनाचें चोरिलें असतां पराक प्रायश्चित्त सांगितलें आहे. चतुर्विंशतिमतांतील वचन. ब्राम्हणानें लोभानें रुपें चोरिलें असत चांद्रायण प्रायश्चित्त. दहाधानका (च्याळीस तोळे.) पेक्षा ज्यास्त शभर तोळयापर्यंत चोरिलें असता दोन चांद्रायण प्रायश्चित्त सांगितलें आहे. ॥ २ ॥ हजारपर्यंत चौर्य केलें असतां तीन चांद्रायण प्रायश्चित्त, यापेक्षा ज्यास्त चौर्यास दहा माशापेक्षां ज्यास्त सुवर्ण चोरिलें असताचें प्रायश्चित्त जाणावें. सर्व धातु, लोह हें चोरिलें असता पराक प्रायश्चित्त आचरण करावें. ॥ ३ ॥ धान्य चोरिलें असता कृच्छ्र प्रायश्चित्त, तीळ चोरिले असता कृच्छ्र आणि चांद्रायण प्रायश्चित्त. रत्नें हरण केलीं असतां चांद्रायण प्रायश्चित्त सांगितलें आहे. ॥ ४ ॥

## चौर्यदोषाचा अपवाद.

यास शास्त्राचें वचन. अग्नि पेटविण्यास लाकूड, गायी करितां गवत, जिचे अगावर अलंकार नाहींत अशी कन्या लग्न करण्याकरितां नेणें हें चौर्य होत नाहीं. ॥ ५॥ कन्या हरण करून लग्न करणें हें राक्षस विवाहांत सांगितलें आहे सत्य हे लिहिणें राक्षस विवाह संबधानें आहे. आपल्या विवाहास लागू नाहीं. मनुचें वचन. वाट चालणारा असा उपोषित ब्राह्मण यानें शेतांतून दोन ऊस अथवा कंद, मूळें हीं घेतलीं असता चोर्य होत नाहीं. ॥ ६ ॥ तसेंच वाट चालणारानें शेतातील मूठभर भोला हरभरा, साळी, गहू, सातू, उडीद हें घेतलें असता दोष लागत नाहीं. ॥ ७ ॥ उपोषित असणाऱ्या ब्राह्मणानें दिवसाच्या सातव्या भागाचे ठायीं जेवणारास पुरे होईल इतकें अन्न हरण केलें असता दोष नाही. ॥ ८ ॥

## ॥ अथ सुवर्णस्तेयसमानानि ॥

याज्ञवल्क्यः ॥ अश्वरत्नमनुष्यस्त्रीभूधेनुहरणंतथा ॥ निक्षेपस्यचसर्वंहिसुवर्णस्तेयसंमितम् ॥ ९ ॥ अश्वादीनिब्राह्मणसंबंधीनि ॥ निक्षेपःसुवर्णव्यतिरिक्तस्य ॥ एतेषुषडब्दंप्रायश्चित्तंकार्यम् ॥ १० ॥

## सुवर्णस्तेयासमान प्रायश्चित्ताचा विचार.

याज्ञवल्क्यानें असें सांगितलें आहे कीं घोडा, रत्नें, मनुष्य, स्त्री, भूमी, गाय तसेंच ठेव ठेविलेली हीं जीं हरण करणें हीं कर्मे सोनें चोरल्याप्रमाणें आहेत. यास षडब्द प्रायश्चित्त सांगितलें आहे. ॥ ९ ॥ १० ॥

## ॥ अथ गुरुतल्पप्रायश्चित्तम् ॥

अत्रेदारेचशय्यायांतल्पशब्दोऽभिधीयतइतिवचनात् ॥ तल्पशब्दोऽत्रदारवचनः ॥ गुरोस्तल्पस्त्रीतत्रगच्छतीतिगुरुतल्पगः ॥ तत्रपमः ॥ गुरुदाराभिगमनंकृत्वामोहेनवै

द्विजः ॥ ज्वलंतीमायसींशय्यांसंविशेद्गुरुतल्पगः ॥ १ ॥ सूर्मीज्वलंतिमाश्लिष्यमृत्युना सविशुद्ध्यति ॥ अथवाशिश्नवृषणावुत्कृत्यप्रतिगृह्यच ॥ गुरोरभिमुखस्तिष्ठेत्पूतोभवति किल्बिषात् ॥ २ ॥ नैर्ऋतींवादिशंगच्छेदानिपातादजिह्मगः ॥ प्राणत्यागाद्विशुद्धेद्वैमनुःस्वायंभुवोब्रवीत् ॥ ३ ॥ गुरुरत्रपितातथाचमनुः ॥ निषेकादीनिकर्माणियःकरोतियथाविधिः ॥ संभावयतिचान्नेनसविप्रोगुरुरुच्यते ॥४॥ निषेकादीनिगर्भाधानादीनि ॥ तथाचषट्त्रिंशन्मते ॥ पितुर्भार्यांचविज्ञायसवर्णांयोऽधिगच्छति ॥ जननींवाप्यविज्ञायनामृतःशुद्धिमाप्नुयात् ॥ ५ ॥ स्वयंवाशिश्नवृषणावुत्कृत्याधायचांजलौ ॥ नैर्ऋतिदिशमातिष्ठेदानिपातादजिह्मगः ॥ ६ ॥ इतिपृष्ठतोऽनीक्षमाणेनैवगमनंकर्तव्यम् ॥ गुरोर्भार्यांतुयोवैश्यांगत्वागच्छेत्पुनःपुनः ॥ लिंगाग्रंछेदयित्वातुततःशुद्ध्येतकिल्बिषात् ॥ ७ ॥ जाबालिः ॥ अतिकृच्छ्रंतप्तकृच्छ्रंपराकंचतथैवच ॥ गुरोःशूद्रांसकृद्गत्वाबुद्ध्या विप्रःसमाचरेत् ॥ ८ ॥ एवंविधपापेप्रवृत्तानांस्त्रीणामपिमहापातकिनीत्वाविशेषात्कामकृतेमरणांतिकम् ॥ ९ ॥ तथाचकात्यायनः ॥ एषदोषश्चशुद्धिश्चपतितानामुदाहृता ॥ स्त्रीणामपिप्रसक्तानामेषएवविधिःस्मृतः ॥ १० ॥ अकामकृतेतुद्वादशवार्षिकाद्धंस्त्रीणामर्धस्यविहितत्वात् ॥ अयंतुविशेषः ॥ अरण्यादिस्थितिर्नास्तिगृहएववासइति ॥ तथाचयोगियाज्ञवल्क्यः ॥ पतितानामेषएवविधिःस्त्रीणांप्रकीर्तितः ॥ वासोगृहांतिके देयोह्यनुवासश्चरक्षणं ॥ इतिरक्षणार्थमनुवास कर्तव्यएवसमीपवासइत्यर्थः ॥ ११ ॥

## गुरुतल्पगमनाचें प्रायश्चित्त.

तल्पशब्द अर्थ म्हणजे माडी, स्त्री, शय्या याचे ठिकाणीं सांगितला आहे. सबब येथें तल्पशब्दाचा अर्थ स्त्री. गुरूची जी तल्प म्हणजे स्त्री तिचेशीं जो गमन करितो, त्यास गुरुतल्पग म्हणावें. त्यास यम स्मृतींतील वचन. अज्ञानानें गुरुपत्नीसीं गमन केलें असतां लोखंडाची शय्या करून, तसाच लोखंडाचा स्त्रीचा पुतळा करून, शय्या व लोखंडाची स्त्री ही लाल तापवून गुरुस्त्रीसीं गमन करणाऱ्या मनुष्यानें त्या स्त्रीसीं आलिंगन करून तापविलेल्या स्त्रीसह त्या शय्येवर निजावें. अथवा लिंग, वृषण हे आपल्या हातानें कापून आपल्या हातांत घेऊन गुरु समोर उभें राहावें. म्हणजे त्या पातकापासून शुद्ध होतो. ॥ १ ॥ २ ॥ मनूनें तर कापलेलें लिंग आणि वृषण हातात घेऊन मार्गे न पाहातां सरळ पुढें प्रनिश्च होईपर्यंत नैर्ऋत्य दिशेस जावें. असें केल्यापासून प्राण गेला असतां शुद्धता होते. ॥ ३ ॥ येथें गुरुशब्दाचा अर्थ जनक पिता आहे. मनूचें वचन. जो यथा शास्त्र गर्भाधानादि संस्कार करितो, आणि अन्न घालून आपलें संरक्षण करितो त्यास गुरु असें म्हणावें. ॥ ४ ॥ षट्त्रिंशन्मतांतील वचनाचा अर्थ असाच आहे. ॥ ५ ॥ गुरूची स्त्री, वैश्यजातीची असल्यास (पूर्वकाळीं ब्राम्हणास चारीवर्णांच्या स्त्रिया करण्यास सांगितलें आहे, या संबंधाचें वचन आहे.) तिच्यासी गमन केलें असतां लिंगाचा अग्रभाग तोडल्यानें

शुद्धता होते. ॥ ६ ॥ ७ ॥ जाबालीचें वचन. गुरुस्त्री शूद्रजातीची असतां आणि तिच्याशीं एक वेळ गमन केलें तर अतिकृच्छ्र, तप्तकृच्छ्र, पराक हीं प्रायश्चित्तें करावींत. ॥ ८ ॥ अशा पाप कर्मींच्या ठिकाणीं प्रवृत्त झालेल्या ज्या स्त्रिया त्यांनाही महापातक सांगितलें आहे. त्यामुळें त्या आपल्या इच्छेने प्रवृत्त झाल्या असता त्यासही मरणांतिक प्रायश्चित्त सांगितलें आहे. ॥९॥ त्यास कात्यायनाचें वचन. पतित झालेले जे पुरुष यास दोष व त्यास शुद्धि हीच सांगितली. अशा कर्माचे ठायीं प्रवृत्त झालेल्या ज्या स्त्रिया त्यासही असाच प्रकार जाणावा. ॥ १० ॥ इच्छेवांचून स्त्रिया प्रवृत्त झाल्यास त्यास द्वादश वार्षिकाचें अर्ध प्रायश्चित्त सांगितलें आहे कारण स्त्रियास शास्त्रामध्यें अर्ध प्रायश्चित्त सांगितलें आहे. स्त्रियास हा एक विशेष सांगितला आहे. प्रायश्चित्त करिते समयीं स्त्रियांनीं अरण्यांत न राहता घरातच राहावें. त्यास याज्ञवल्क्याचें वचन. भ्रष्ट झालेल्या ज्या स्त्रिया त्यांस घराजवळ ठेवून त्यांचें रक्षण करावें ॥ ११ ॥

## ॥ अथ गुरुतल्पसमानि ॥

तत्रयाज्ञवल्क्यः ॥ सखिभार्याकुमारीषुस्वयोनीष्वंत्यजासुच ॥ स्वगोत्रासुसुतस्त्रीषुगुरुतल्पसमंस्मृतम् ॥१॥ पितुःस्वसारंमातुश्चमातुलानींस्नुषामपि ॥ मातुःसपत्नींभगिनीमाचार्यतनयांतथा ॥ २ ॥ आचार्यपत्नींस्वसुतांगच्छंस्तुगुरुतल्पगः ॥ लिंगंछित्वावधस्तत्रसकामायाःस्त्रियाअपि ॥ ३ ॥ अत्रस्नुषाभगिन्योःपूर्वश्लोकेनगुरुतल्पसमीकृतयोः पुनर्ग्रहणंप्रायश्चित्तविकल्पार्थम् ॥ एवंराज्ञीप्रव्रजिताधात्रीशरणागताश्चगत्वागुरुतल्पगउच्यते ॥ ४ ॥ तथैकरात्रादूर्ध्वंकामतोभ्यस्तेषुयथाक्रमेणपञ्चवार्षिकम् ॥ नववार्षिकंचप्रायश्चित्तंविज्ञेयम् ॥ अस्मिन्नेवविषयेकामतोत्यंताभ्यासेमरणांतिकम् ॥ ५ ॥ तथाचबृहद्यमः ॥ रेतःसिक्त्वाकुमारीषुस्वयोनिष्वंत्यजासुच ॥ सपिंडापत्यदारेषुप्राणत्यागोविधीयते ॥ इति ॥ ६ ॥

## गुरुपत्नी समान स्त्रीयेसीं गमन केलें असतां प्रायश्चित्ताचा विचार.

यास याज्ञवल्क्य स्मृतीचें वचन. आपले मित्राची स्त्री, उत्तम जातीची कन्या, आपली बहीण, आपल्या एक गोत्राची स्त्री, अंत्यज स्त्री, सून यातील कोणत्याही स्त्रियेशीं गमन केलें असता गुरुपत्नीशीं गमन केल्या समान होय. ॥ १ ॥ एक गोत्र शब्दानेंच स्नुषेचें ग्रहण झालें असतां पुनः सुतस्त्री ( मुलाची बायको ) चें ग्रहण याज्ञवल्क्यानें आपल्या स्मृतींत केलें आहे. यावरून या संबंधानें जास्त प्रायश्चित्त आहे असें जाणावें. बापाची बहीण, आईची बहीण, मामी, सून, सावत्र आई, बहीण, गुरूची मुलगी, गुरूची बायको, आपली मुलगी यांच्याशीं गमन केलें असता मातोश्रीच्या गमनाचें पाप आहे. सबब त्याचें लिंग तोडून त्याचा वध करावा. या प्रमाणें स्त्रियाही कामासक्त होऊन पाप कर्मास प्रवृत्त झाल्या असतां त्यांस वधरूपच प्रायश्चित्त सांगितलें आहे. ॥ २ ॥ ३ ॥ पूर्व वचनांत सून आणि बहीण यांचें

ग्रहण करून येथें पुनः ग्रहण केलें आहे. तें प्रायश्चित्ताचा विकल्प जाणविण्या करितां आहे. या प्रमाणें राजस्त्री, विरक्त झालेली स्त्री, शरणागत आलेली स्त्री, धात्री ( दाई ) यांच्याशीं गमन केलें असताही हेंच प्रायश्चित्त सांगितलें आहे. ॥ ४ ॥ एक रात्री पेक्षा ज्यास्त इच्छेनें गमन केलें असतां षड्वार्षिक प्रायश्चित्त. त्यापेक्षां अधिक वेळ गमन केलें असतां नऊ वार्षिक प्रायश्चित्त. इच्छापूर्वक अत्यंत गमनाचा अभ्यास असेल तर मरणांत प्रायश्चित्त सांगितलें आहे. ॥ ५ ॥ यास बृहद्यमाचें वचन—मुली, बहिणी, अत्यन्त स्त्रिया, सपिंडाच्या स्त्रिया, स्नुषा, यांच्याशीं गमन केलें असतां प्राण त्याग करावा. ॥ ६ ॥

## ॥ अथातिपातकनिर्णयः ॥

एतदुक्तेषुकेषांचिदतिपातकसंज्ञा ॥ मातृगमनं ॥ सापत्नमातृगमनंस्वसृस्नुषयोर्गमनंदुहितृगमनमतिपातकानि तदुक्तंबृहद्विष्णुना॥जनन्यांचभगिन्यांचस्वसुतायांतथैवच ॥ स्नुषायांगमनंचैवविज्ञेयमतिपातकम् ॥ १ ॥ अतिपातकिनस्त्वेतेमविशेयुर्हुताशनम् ॥ नान्यथानिष्कृतिस्तेषांविद्यतेहिकथंचन ॥ २ ॥ संवर्तः ॥ मातरंयदिगच्छेत्तुस्नुषांवापुरुषाधमः ॥ नतस्यनिष्कृतिर्विद्यात्कामाद्दुहितरंतथा ॥ ३ ॥ अत्रतुलिंगवृषणछेदनादिमरणांतमेवप्रायश्चित्तमुक्तम् ॥

## अतिपातकाचा निर्णय.

हीं जीं पातकें सांगितलीं त्यामध्यें मतोश्री, सापत्नमातोश्री, बहीण, सून, मुलगी याच्याशीं जें गमन करणें, तें अतिपातक सांगितलें आहे. बृहद्विष्णूचे वचनाचाही अर्थ असाच आहे. या पातकाचे ठायीं लिंग आणि वृषण यांचा छेद करणें, इत्यादिक मरणांतिक प्रायश्चित्त सांगितलें आहे. ॥ १ ॥ २ ॥ ३ ॥

॥ इतिगुरुतल्पगमनप्रायश्चित्तनिर्णयः ॥

## ॥ अथ संसर्गप्रायश्चित्तनिर्णयः ॥

तत्रसंसर्गकर्मभेदेनानेकधाभिद्यतेतथाचबृहस्पतिः ॥ एकशय्यासनेपंक्तिर्भाण्डपक्वान्नमिश्रणं ॥ याजनाध्यापनेयौनंतथाचसहभोजनं ॥ नवधासंकरःप्रोक्तोनकर्तव्योधमैः सह ॥ १ ॥ देवलोपि ॥ संलापस्पर्शनश्वाससहयानाशनासनात् ॥ याजनाध्यापना दानात्पापंसंक्रमतेनृणाम् ॥ २ ॥ एकसद्मादिशयनमेकसद्मासनंतथा ॥ एकपंक्तिभोजनमेकभांडपचनमन्नमिश्रणंसंसर्गस्तदीयान्नभोजनमितियावत् ॥ याजनपतितस्यस्वस्य वातेन ॥ अध्यापनंवा ॥ तस्यस्वस्यवातेन ॥ यौनंतस्मैकन्यादानं ॥ तत्सकाशात्कन्यापाःमनिग्रहः ॥ सहभोजनमेकपात्रभोजनं ॥ संलापःसंभाषणं ॥ स्पर्शोगात्रसंस्पर्शः ॥

निःश्वासःपतितमुखवायुसंपर्कः ॥ सहयानमेकतुरगाद्यारोहणं ॥ एषांमध्येकेनकर्मणा कियताकालेनपातित्यमित्यपेक्षायांवृद्धविष्णुनोक्तम् ॥ याजनाध्यापनाद्यौनात्तुसंवत्स रेणपततितार्हिसद्यएवपतति ॥ तत्संबंधीभोजनादिनादेवलः ॥ याजनंयोनिसंबंधंस्वाध्या यंसहभोजनं ॥ कृत्वासद्यःपतत्येवपतितेननसंशयः ॥ अत्रसंल्लापादीनांपृथक्पातित्यहे तुत्वंनास्तियानादिचतुष्टयेनतुसंवत्सरंनिरंतराभ्यस्तेनेतियुक्तम् ॥ ३ ॥ तत्रमनुः ॥ यो येनपतितेनैषांसंसर्गंयातिमानवः ॥ सतस्यैवव्रतंकुर्यात्तत्संसर्गविशुद्धये ॥४॥जाबालिः॥ संसर्गीयेनसंसर्गंकुर्यात्तत्व्रतमाचरेत् ॥ तेननवविधपापान्वितानांमध्येयोयेनपापीयसासं सर्गंकुर्यात्ससतस्यव्रतंकुर्यादित्यर्थः व्रतंतुपादोनं ॥ ५ ॥ व्यासः ॥ योयेनसंवसेद्वर्षंसोपितत्स मतामियात् ॥ पादन्यूनंचरेत्सोपितस्यतस्यव्रतंद्विज ॥ यद्यपिमरणेपादोनत्वंनसंभवति तथापिमरणवैकल्पिकचतुर्विंशतिवार्षिकंव्रतंपादोनंकर्तव्यमितिसंवत्सरसंसर्गेयत्प्रायश्चित्त मुक्तंसंवत्सराप्राप्तौभागहारःकर्तव्यः ॥ ६ ॥ तथाबृहस्पतिः ॥ षण्मासिकेतुसंयोगेयाज नाध्यापनादिना ॥ एकत्रासनशय्याभिःप्रायश्चित्तार्द्धमाचरेत् ॥ ७ ॥ एवंनिरंतरमासत्र यसंसर्गेप्रायश्चित्तपादइत्यूहनीयंएवंमूलपापकर्तुर्यत्प्रायश्चित्तंतत्पादहानिक्रमेण तृतीयसंस र्गिपर्यंतंप्रायश्चित्तंकरणीयं ॥ चतुर्थस्यवचनाभावान्नकिंचिदिति ॥ ८ ॥ यथाचांडालाद्य न्नाशनेव्यासः ॥ एतदन्नाशिनोविप्राःकृच्छ्रात्तेषांविधीयते ॥ तद्भोजनाद्वैकृच्छ्रेणतदन्ना दाश्चपादवः ॥ ९ ॥ यथापस्तंबः ॥ भुक्तंयैस्तत्रपकान्नंकृच्छ्रंतेषांविधीयते ॥ तेषामपिच यैर्भुक्तमर्धंतेषांविधीयते ॥ तथाच ॥ योयेनेतिमनुवचनं ॥ संसर्गीत्रितयपरमितिज्ञेयम् ॥ १० ॥ माधवस्तुसंसर्गदोषःकलौपातित्यापादकोनकिंतुपापमात्रापादकः ॥ संसर्ग दोषःपापेष्वितिकलिवर्ज्येषुगणनादित्याह ॥ ११ ॥

## संसर्गप्रायश्चित्ताचा निर्णय.

संसर्ग ह्मणजे पतितांशीं संबंध ठेवणे, तो कर्म भेदानें अनेक प्रकारानें होतो. त्यास बृहस्पतीचें वचन. एका पलंगादिकांवर शयन करणें, एका आसनावर बसणें, पतितानें आणि आपण एका पंक्तीस बसून भोजन करणें, एका भांड्यांत उभयतांनीं अन्न शिजविणें, उभयतांनीं अन्नाचें मिश्रण करणें, पतिताचे घरीं आपण होम करणें, अथवा आपले घरीं त्याजकडून होम करविणें, आपण त्यास अध्ययन सांगणें, अथवा त्याजपाशीं अध्ययन करणें, आपली कन्या त्यास देणें, अथवा त्याची कन्या आपले घरीं करणें, उभयतांनीं एकापात्रांत भोजन करणें, असा नऊ प्रकारानें संकर सांगितला आहे. तो नीचाशीं सहवर्तमान करूं नये. ॥ १ ॥ देवलाचें वचन. पतितांशीं भाषण करणें. त्याच्याशीं स्पर्श करणें, त्याच्या श्वासाशीं आपला श्वास मिसळणें, त्याच्या बरोबर चालणें, निजणें, बसणें, शयनकरणें, यज्ञकरणें, अध्ययन सांगणें, दान देणें अथवा घेणें, याकारणानें मनुष्यास पापप्राप्ती होते. ॥ २ ॥ हीं जीं कारणें सांगितलीं त्यांमध्यें

कोणत्या कर्मानें किती दिवसांनीं पातित्य प्राप्त होतें, यानिषयीं बृहद्विष्णूनें सांगितलें आहे. यज्ञ, अध्ययन, कन्यादान, हे वर्षभर केलें असतां पातित्य प्राप्त होतें. कन्यादान वर्षभर ह्मणजे तत्संबंधानें भोजनादिक केल्यानें पातित्य प्राप्त होतें. देवळाचें मत कन्यादानादिक केलें असतां तात्काळ पातित्य प्राप्त होतें. येथें पतिताशीं संभाषण, स्पर्श इत्यादि एकेक केल्यानें पातित्य येत नाहीं. तर तीन चार कारणें अथवा त्याच्याशीं निरंतर वर्षपर्यंत घडल्यानें पातित्य येणें हें युक्त आहे. ॥ ३ ॥ पतितास शुद्ध होण्यास प्रायश्चित्त मनूनें सांगितलें आहे. जो ज्या भ्रष्ट झालेल्या मनुष्याशीं संसर्ग करितो त्या मनुष्यानें त्या पतित झालेल्या मनुष्याचा दोष जाण्या करितां जें प्रायश्चित्त असेल, तेंच प्रायश्चित्त संसर्गी यानें करावें. ॥ ४ ॥ परंतु संसर्गी यानें पतिता पेक्षां पाऊण पटीनें मात्र करावें. व्यास, जाबाली यांच्या वचनांचा अर्थ असाच आहे. ॥ ५ ॥ जेथें मरणांत प्रायश्चित्त सांगितलें आहे, तेथें चतुर्वार्षिकादिक जें त्या बदलचें व्रत करण्यास सांगितलें आहे. तें व्रत पादहीन असें आचरण करावें. वर्षभरपर्यंत संसर्ग न होतां जितका दिवस संसर्ग झाला असेल तितक्याच दिवस संख्येच्या हिस्सेरसीनें प्रायश्चित्त करावें. ॥ ६ ॥ यास बृहस्पतीचें वचन. सहा महिने पर्यंत पतिताशीं यज्ञ, अध्ययन, एक शय्यासन इत्यादि कारणानें संबंध घडला असतां अर्ध प्रायश्चित्त करावें. तीन मासपर्यंत संसर्ग घडला असतां चवथ्या हिस्शानें प्रायश्चित्त करावें. ॥ ७ ॥ मूळ पापकर्त्या यास जें प्रायश्चित्त त्याच्या पेक्षां एक हिस्शानें कमी द्वितीयास प्रायश्चित्त, तृतीयास एक पाद प्रायश्चित्त, चवथ्या मनुष्यास संसर्गी प्रायश्चित्त नाहीं. कारण त्या संबंधानें कोठें वचन आढळत नाहीं. ॥ ८ ॥ यास व्यासानें चांडालादिकांचें अन्न खाल्लें असतां प्रायश्चित्त सांगितलें आहे. चांडाळाचें जें अन्न तें खाणारे जे ब्राह्मण त्यास कृच्छ्र प्रायश्चित्त. त्या ब्राह्मणाचें जे अन्न खाणारे त्यांस अर्धकृच्छ्र प्रायश्चित्त, त्या ब्राह्मणाचें अन्न खाणाऱ्याचें जे अन्न खाणारे त्यांस पादकृच्छ्र प्रायश्चित्त. ॥ ९ ॥ आपस्तंबाचे वचनाचाहि अर्थ असाच आहे. ॥ १० ॥ यावरून संसर्ग प्रायश्चित्त तीन मनुष्यांपर्यंतच, पुढें नाहीं. कारण पुढें पातक सूचक वचन दिसत नाहीं. माधवानें तर संसर्ग दोषानें कलियुगाचे ठायीं मनुष्य पतित होत नाहीं. परंतु त्यापासून पाप मात्र लागतें. कलीचे ठायीं संसर्ग दोष नाहीं यावदल कलिवर्ज्य प्रकरणात सांगितलें आहे. ॥ ११ ॥

## ॥ पतितकन्योद्वाहनिर्णयः ॥

याज्ञवल्क्यः ॥ एभिस्तुसंवसेत्योवैवत्सरंसोऽपितत्समः ॥ कन्यांसमुद्वहेदेषांसोपवासामकिंचनाम् ॥ १ ॥ कन्यांपतितावस्थायामुत्पन्नाम् ॥ वृद्धहारीतः ॥ पतितस्यतुकुमारींविवस्त्रामहोरात्रोपोषितां ॥ प्रातःशुक्लेनाहतेनवाससाच्छादितांनाहमेतेषांनममैत इति ॥ त्रिस्त्रिरुक्तेरभिदधानांतीर्थेस्वगृहेचोद्वहेदिति ॥ २ ॥ वसिष्ठः ॥ पतितेनोत्पन्नः पतितोभवतिअन्यत्रस्त्रियाःसाहिपरगामिनीतामरिक्थामुपेयादिति ॥ ३ ॥ अरिक्थां भूषणादिरहितां पतितैःसहसंसर्गीसंवत्सरेणपतितोभवतीतियत्तिदेशतःप्रायश्चित्तंप्राप्तं

धापिपूर्णमेवद्वादशवार्षिकंप्रायश्चित्तंकर्तव्यंमहापातकित्वात् ॥ अनेनैवाभिप्रायेण ॥ ४ ॥ मनुः ॥ योयेनपतितेनैषांसंसर्गंयातिमानवः ॥ सतस्यैवव्रतंकुर्यात्तत्संसर्गविशुद्धये ॥ ५ ॥

## पतितअवस्थेचे ठायीं उत्पन्न झालेल्या कन्येच्या लग्नाचा विचार.

याज्ञवल्क्यानें असें सांगितलें आहे कीं, हे जे महापातकी यांच्याशीं वर्षभरपर्यंत जो संबंध ठेवील, तोही त्याच्यासारखा पातकी होईल. असें जरि आहे तरी पतित अवस्थेमध्यें उत्पन्न झालेली जी मुलगी तिला उपोषण घालून तिजपाशीं कांहीं नाहीं अशी जी ती मुलगी तिच्याशीं विवाह करावा. ॥ १ ॥ यास वृद्धहारिताचें वचन. पतिताच्या मुलीस वस्त्र रहित करून, अहोरात्र तिला उपोषित ठेवून, शुद्ध नवीन वस्त्र नेसावयास देऊन, मी पतिताची नाहीं व ते माझे नाहींत. या प्रमाणें तिजकडून बोलवून तीर्थाचे ठायीं अथवा आपल्या घरामध्यें तिच्याशीं लग्न करावें. ॥ २ ॥ वसिष्ठानें असें सांगितलें आहे कीं, पतितापासून उत्पन्न झालेला मुलगा पतित होतो. परंतु उत्पन्न झालेली मुलगी पतित होत नाहीं. कारण ती परगोत्रांत जाणारी आहे. सवस्त्र अलंकार रहित ती जी मुलगी तिच्याशीं लग्न करावें. ॥ ३ ॥ पतिताशीं संसर्ग करणारीं जीं मनुष्यें त्यांस महापातक्यास जें द्वादशवार्षिक प्रायश्चित्त सांगितलें आहे. तेंच संसर्गी यास प्रायश्चित्त जाणावें. ॥ ४ ॥ यास मनूचें वचन. जो मनुष्य ज्या पतित मनुष्याशीं संसर्ग करितो त्या मनुष्यास पतिताचें पातक प्राप्त होतें. म्हणून त्यानें आपली शुद्धता होणे करितां पतितास जें प्रायश्चित्त सांगितलें असेल, तेंच प्रायश्चित्त करावें. ॥ ५ ॥

## ॥ अथ पातित्यहेतवः ॥

ब्रह्महत्यासुरापस्तेयीगुरुतल्पगमातृपितृयोनिसंबंधगस्तेननास्तिकनिंदितकर्माभ्यासिपतितात्याग्यपतितत्यागिनःपतिताःपातकसंयोजकाश्च ॥ १ ॥ मातापितृयोनिसंबंधागोमातृष्वसृपितृष्वस्रात्मभगिनीगामीस्तेयीसुवर्णतत्समयोः ॥ नास्तिकोवेदाप्रामाण्यवादीअपतितत्यागीगुरुमभिशप्यतत्त्यक्त्वापातकसंयोजकी ॥ स्वसंसर्गेणदोषहेतव इतिमाचः ॥ अपरार्केतु ॥ पातकसंयोजकाःप्रयोजकादयस्तेपिपतिताइति ॥ एवंकल्पतरावपि ॥ २ ॥ यमः ॥ मातृष्वसामातृसखीदुहिताचपितृष्वसामातुलानीस्वसाश्वश्रूर्गत्वासद्यःपतेन्नरःइति ॥ ३ ॥ मनुः ॥ द्विजःसद्यःपततिमांसेनलाक्षयालवणेनच ॥ सएवयमः ॥ जलाग्न्युद्बंधभ्रष्टाःप्रव्रजानांपातित्यमाह ॥ ४ ॥ याज्ञवल्क्यः ॥ अतऊर्ध्वं पतंत्येतेसर्वधर्मबहिष्कृताः ॥ सावित्रीपतिताव्रात्याव्रात्यस्तोमादृतेक्रतोः ॥ ५ ॥ मनुः ॥ चांडालांत्यस्त्रियोगत्वाभुक्त्वाचप्रतिगृह्यच ॥ पतत्यज्ञानतोविप्रोज्ञानात्साम्यंतुगच्छति ॥ ६ ॥ याज्ञवल्क्यः ॥ नीचाभिगमनंगर्भपातनंभर्तृहिंसनं ॥ विशेषपतनीयानिस्त्रीणामेतान्यपिध्रुवं ॥ अपिशब्दाद्ब्रह्महत्यादीन्युपपातकान्यप्यभ्यस्तानि ॥ ७ ॥ नीचोहीनवर्णःशूद्रःतद्गमनंचगर्भोत्पन्नता ॥ अतएवव्यभिचाराद्दतौशुद्धिर्गर्भेत्यागोविधीयते ॥

गर्भभर्तृवधादौचतथामहतिपातके इतियाज्ञवल्क्यवाक्येशूद्रकृतेगर्भेइतिप्राचांव्याख्यानं॥ ब्राह्मणक्षत्रियविशांभार्याःशूद्रेणसंगताः ॥ अप्रजाताविशुद्ध्यंतिप्रायश्चित्तेननेतरा इति अत्रविशेषस्तुतत्तत्प्रकरणेज्ञेयः ॥ ८ ॥

## ज्या पातकानें मनुष्य पतित होतो त्याचा निर्णय.

ब्रह्महत्या, मद्यप्राशन, सुवर्ण चोरीकरणारा, गुरुपत्नीबरोबर गमन, मातोश्री आणि पिता यांच्या संबंधी ज्या स्त्रिया त्यांच्याशीं गमन करणें, नास्तिकपणानें निरंतर वागणें, निंदित जें कर्म त्यांचा निरंतर अभ्यास करणें, पतित झाला असोन त्याचा त्याग न करणें; व पतित नसणाऱ्याचा त्याग करणें, पतिताशीं निरंतर संबंध ठेवणें, हीं मनुष्यें पतित जाणावींत. ॥ १ ॥ पूर्वी मातोश्री आणि पिता यांच्या संबंधी स्त्रियांशीं गमन करणें, ह्मणजे मातोश्रीची बहिण मावशी, पित्याची बहिण आत, आपली बहीण याच्याशीं गमन करणें, चोरी करणारा ह्मणजे दहा माशांपेक्षां अधिक सोनें किंवा तितक्या किंमतीचें दुसरें द्रव्य चोरी करणें, नास्तीक ह्मणजे वेद प्रमाणभूत नाहींत असें ह्मणणारा, अपतितत्यागी ह्मणजे गुरु, पिता इत्यादिकांचा तिरस्कार करून त्यांचा त्याग करणारा, स्वतः पातक करणारा, आपल्या संसर्गानें दुसऱ्यास दोष उत्पन्न करणारा, असे प्राचीनांनीं सांगितले आहेत. अपरार्कामध्यें व तसेंच कल्पतरूमध्यें पातकाचे सयोजक ह्मणजे प्रयोजकादिक तेही पतित होतात असें सांगितलें आहे. ॥२॥ यमाचें वचन. आईची बहीण, आईची सखी, मुलगी, बापाची बहीण, मामाची स्त्री ( मामी ), आपली बहीण, सासु यांच्याशीं गमन केलें असतां मनुष्य तात्काळ पतित होतो. ॥ ३ ॥ मनूचें वचन. ब्राह्मणानें मांस भक्षण केलें असतां, तसेंच लाख अथवा मीठ विकलें असतां तात्काळ पतित होतात. यमाचें वचन. एखाद्या मनुष्यानें आपला प्राण द्यावा अशा हेतूनें पाण्यांत उडी घालून प्राण नाश न होतां निघाला असतां, तसेंच अग्निमध्यें, तसेंच गळफांस घेतला असतांही ज्याचा प्राण गेला नाहीं, तो तात्काळ पतित होतो. संन्यासाश्रम घेऊन जो पुनः ग्रहस्थाश्रमपणा स्वीकार करितो, तो ही पतित होतो. ॥ ४ ॥ याज्ञवल्क्याचें वचन. ब्राह्मणादिकांचे जे मौंजी बंधनास काळ सांगितले आहेत, त्यांचें उल्लंघन झालें असतां पतितसावित्रिक् असे सर्वधर्मापासून बहिष्कृत असे पतित होतात. ॥ ५ ॥ मनूचें वचन. चांडाळ, अंत्यज इत्यादिकांच्या स्त्रियेशीं गमन करणारा, त्यांच्याशीं जेवणारा व त्यांची संगत करणारा, असा मनुष्य पतित होतो. परंतु या गोष्टी न जाणून झाल्या असतांच्या आहेत. ज्ञानपूर्वक जर कोणी करील तर त्या जातीशीं या कर्मातील कर्म घडलें असेल, त्या जातीचाच तो होतो. ॥ ६ ॥ याज्ञवल्क्याचें वचन. स्त्रियांस विशेषें करून पतित करण्यास हीं कारणें आहेत. नीच ह्मणजे ब्राह्मण स्त्रियेनें शूद्राशीं गमन केलें असतां, तसेंच गर्भपात केला असतां, किंवा आपल्या पतीचा नाश केला असतां स्त्रिया पतित होतात.- अपिशब्दानें ब्रह्महत्यादिक महापातकें केलीं असत अथवा उपपातकें निरंतर करण्याचा अभ्यास असेल तर स्त्रिया पतित होतात. ॥ ७ ॥ यास्तवच

याज्ञवल्क्यांनीं असें सांगितलें आहे कीं, स्त्रियांस व्यभिचार घडला असतां, ती रजस्वला झाल्या नंतर तिला प्रायश्चित्त दिल्यानें शुद्ध होते. परंतु व्यभिचारापासून गर्भधारणा झाली असतां ती पातित होते. सबब तिचा त्याग करावा. गर्भाचा अथवा पतीचा नाश किंवा महापातक घडलें असतां स्त्रिया पतित होतात. ब्राह्मण, क्षत्रिय, वैश्य यांच्या स्त्रिया शूद्र पुरुषाशीं समागम जर करतील आणि त्या गर्भानें गर्भिणी झाल्या नसतील तर प्रायश्चित्ताच्या योगानें शुद्ध होतात. आणि गर्भिणी झाल्या असतां शुद्ध होत नाहींत. या संबंधानें विशेष विचार त्या त्या प्रकरणामध्यें पहावा. ॥ ८ ॥

प्रायश्चित्तमंजर्यां ॥ एषुप्रत्याम्नायेषुपातकतारतम्येनदेशकालवयोवस्थाद्रव्योपपत्तिशक्त्यधिकारानुसारेणव्यवस्थाबोध्या ॥ उक्तंचबौधायनेन ॥ देशंकालंतथात्मानंद्रव्यंद्रव्यप्रयोजनं ॥ उपपत्तिमवस्थांचज्ञात्वाशौचंप्रकल्पयेदिति ॥ शौचशब्देनशुद्धिजनकंप्रायश्चित्तानुष्ठानंग्रह्यते ॥१॥ स्त्रीशूद्रादीनांजपादिरूपेप्रायश्चित्तेद्रव्यदानादियोज्यम् ॥ यत्रपुंसःसचैलंस्नानंविहितंतत्रसुवासिन्याअशिरस्कं ॥ यत्ररजोनिवृत्त्यादौवाचनिकंतत्रसशिरस्कंसचैलंविधवायाःसर्वत्रसचैलं ॥ शिरोरोगिणश्चाशिरस्कं ॥ आतुराणामुष्णोदकेन ॥ अत्यातुराणांस्नाननिमित्तेपाद्याचमनंमार्जनंवस्त्रांतरधारणादियथासंभवं ॥२॥ बालेत्वाहवृद्धशातातपः ॥ शिशोरभ्युक्षणंप्रोक्तंबालस्याचमनंस्मृतं ॥ रजस्वलादिसंस्पर्शेस्नानाच्छुद्धिःकुमारिके ॥ ३ ॥ तल्लक्षणंचाहसएव ॥ शिशुस्त्वन्नप्राशनात्प्रागाचौलंबालकःस्मृतः ॥ कुमारकस्तुविज्ञेयोयावन्मौंजीनिबंधनमिति ॥ ४ ॥

प्रायश्चित्त मंजरीमध्यें तर असें लिहिलें आहे कीं, पातकास जे प्रत्याम्नाय सांगितले त्यांविषयीं पातकाच्या न्यूनाधिकाचा विचार करून, तसेंच देश ( हिमालयादि थंड प्रदेश. ) काल ह्मणजे शीतकालादि, वयाची अवस्था ह्मणजे वार्धक्य, बाल्यादि वय, द्रव्य म्हणजे श्रीमंत गरिबाच्या विचारानें द्रव्याची योजना योजणें, शक्ति, तरुण असोन रोगादिकानें अशक्त झाला असेल तर, अधिकार म्हणजे राजादिकाच्या अधिकाराचा विचार करून प्रत्याम्नायाची योजना करावी. त्यास बौधायनाचें वचन. देश, काल, आत्मा, द्रव्य, द्रव्याचें प्रयोजन, उपपत्ती, अवस्था यांचा विचार करून शौच म्हणजे प्रायश्चित्ताची योजना करावी. ॥ १ ॥ स्त्रिया, शूद्र इत्यादिकांस जपादिकरूप एतद्रूप जें प्रायश्चित्त तें द्रव्यदानादिकानें करावें. जेथें पुरुषास सचैल स्नान सांगितलें आहे, तेथें सुवासिनी स्त्रियेनें केशपाश न भिजवितां खांद्या खालून स्नान करावें. रोग्यास स्नान करण्याची शक्ती नसल्यास उष्णोदकानें स्नान करावें. अत्यंत मुमूर्षु मनुष्यास स्नानाचें निमित्त उत्पन्न झालें असतां हातपाय धुवून, दुसरें वस्त्र धारण करून, आचमन मार्जनादि यथासंभव करावेत. ॥ २ ॥ बालाविषयीं वृद्धशातातपाचें वचन. शिशूस रजस्वलादिकांचा स्पर्श झाला असतां अभ्युक्षण ( प्रोक्षण. ) सांगितलें आहे. बाळास आचमन सांगितलें आहे.

कुमारास स्नानानें शुद्धता होते. ॥ ३ ॥ अन्नप्राशन करण्याच्या पूर्ववयाचा जो मुलगा त्यास शिशु अशी संज्ञा आहे. ज्याचा चौल संस्कार झाला नाहीं त्यास बालक अशी संज्ञा आहे. मौंजीबंधन होई पर्यंत कुमार अशी संज्ञा आहे. ॥ ४ ॥

इतिश्रीधारूरकरेत्युपनामकश्रीपांडुरंगचरणकिंकरपौंडरीकक्षेत्रनिवासिदाजीसूनु विठ्ठलशास्त्रिणासंग्रहीतेप्रायश्चित्तव्यवहारप्रकाशाख्यग्रंथेसकलपातकोपयोगिप्रथमप्रकरणंतथामहापातकप्रकरणंचपरिपूर्तिमगात् ॥ श्रीरुक्मिणीरमणचरणारविंदसमर्पितमस्तु ॥ १ ॥ शुभंभवतु ॥

याप्रमाणें पंढरपूर क्षेत्रांत राहणारा श्रीपांडुरंग चरणाचा चाकर धारूरकर ज्याचें उपनांव आहे असा दाजीबाचा पुत्र जो विठ्ठलशास्त्री यानें अनेक ग्रंथांच्या आधारानें संस्कृतमध्यें ज्याची रचना केली आहे व प्राकृतमध्यें त्याचें भाषांतर केलें आहे. असा प्रायश्चित्त व्यवहार प्रकाश ग्रंथाचें सकल पातकोपयोगी लागणारें असें प्रथम प्रकरण, तसेच महापातक प्रकरण श्रीपांडुरंग कृपेनें परिपूर्ण झालें. सबब हें श्रीरुक्मिणी पांडुरंग चरणार विंदीं अर्पण केलें आहे. तें कल्याण कारक होवो. ॥ १ ॥

---

## ॥ अथोपपातकप्रायश्चित्तनिर्णयः ॥

तत्रयाज्ञवल्क्यः ॥ गोवधोव्रात्यतास्तेयमृणानांचानपक्रिया ॥ अनाहिताग्नितापण्यविक्रयःपरिवेदनम् ॥ १ ॥ भृतादध्ययनादानंभृतकाध्यापनंतथा ॥ पारदार्यंपारिवित्त्यं वार्धुष्यंलवणक्रिया ॥ २ ॥ स्त्रीशूद्रविट्क्षत्रवधोनिंदितार्थोपजीवनम् ॥ नास्तिक्यंव्रतलोपश्चसुतानांचैवविक्रयः ॥ ३ ॥ धान्यकुप्यपशुस्तेयमयाज्यानांचयाजनं ॥ पितृमातृसुतत्यागस्तडागारामविक्रयः ॥ ४ ॥ कन्यासंदूषणंचैवपरिविंदकयाजनं ॥ कन्याप्रदानंतस्यैवकौटिल्यंव्रतलोपनम् ॥ ५ ॥ आत्मनोर्थेक्रियारंभोमद्यपस्त्रीनिषेवणं ॥ स्वाध्यायाग्निसुतत्यागोबांधवत्यागएवच ॥६॥ इंधनार्थंद्रुमच्छेदःस्त्रीहिंसौषधजीवनं ॥ हिंस्रयंत्रविधानंचव्यसनान्यात्मविक्रयः ॥७॥ शूद्रप्रेष्यंहीनसख्यंहीनयोनिनिषेवणं ॥ तथैवानाश्रमेवासःपरान्नपरिपुष्टता ॥ ८ ॥ असच्छास्त्राधिगमनमाकरेष्वधिकारिता ॥ भार्यायाविक्रयश्चैषामेकैकमुपपातकम् ॥ ९ ॥ व्रात्यतासावित्रीपतितत्वं ॥ स्तेयंब्राह्मणसुवर्णव्यतिरिक्तस्पर्चौर्यंसुवर्णस्तेयसमव्यतिरिक्तस्यच ॥ ऋणानांचानपक्रिया ॥ यज्ञप्रजोत्पादनस्वाध्यायाध्यापनानामकरणंसत्यपिकारेपि ॥ प्रायश्चित्तेंदुशेखरेतु ॥ असत्प्रतिग्रहः ॥ निंदिताभ्यादनं ॥ नटादिकर्मकरणं ॥ भार्यात्यागः ॥ एतान्युपपातकान्युक्तानि ॥१०॥

# उपपातक प्रायश्चित्ताचा निर्णय.

१ गोवध–गायीचा वध करणें, २ व्रात्यता–शास्त्रानें सांगितलेल्या वेळीं मौंजी बंधनादि संस्कार न करणें, ३ स्तेय–चोरी करणें, येथें ब्राह्मणाचे सुवर्णा वाचून अन्य द्रव्याची चोरी करणें असा अर्थ आहे. कारण सुवर्ण चौर्य हें महापातक सांगितलें आहे. ४ ऋणानपक्रिया–देव, ऋषि, पितर यांचीं जीं ऋणें तीं दूर न करणें, अथवा घेतलेलें ऋण न देणें, ५ अनाहिताग्निता–अग्निहोत्र घेण्यास अधिकार असून अग्निहोत्र न घेणें, ६ आपण्यविक्रय– विकण्यास अयोग्य जे मीठ, तेल इत्यादि पदार्थ यांची विक्री करणें, ७ परिवेदन–वडील भावाचें लग्न न होतां धाकट्या भावाचें लग्न करणें, ८ भृतकाध्ययनाध्यापन–द्रव्य देऊन वेदादिकाचें अध्ययन करणें, अथवा द्रव्य घेऊन लोकांस अध्ययन सांगणें, ९ पारदारि–परस्त्रीशीं गमन करणें, येथें परस्त्रीशब्दानें पूर्वोक्त महापातक प्रकरणांत ज्या गुरुपत्न्यादि सांगितल्या त्याशिवाय इतर स्त्रिया घ्यावयाच्या आहेत, १० पारिवित्त्य–धाकट्याचें लग्न झालें असतां वडील भावानें लग्न न होतां राहणें, ११ वार्धुष्य–व्याज बट्टा अथवा वाढी दिढी याच्या योगानें उपजीविका करणें, १२ लवणक्रिया–मीठ तयार करणें, १३ स्त्रीशूद्रविट्क्षत्रवधः–स्त्रियेचा वध करणें, वैश्य, क्षत्रिय, शूद्र यांचा नाश करणें, १४ निंदितार्थोपजीवन–निंदित जें द्रव्य त्याच्यानें उपजीविका करणें, १५ नास्तिक्य–परलोक नाहीं, ईश्वर नाहीं, असा आग्रह धरणें, १६ व्रतलोप–ब्रह्मचारी असतां स्त्रीसमागम करणें, १७ सुतविक्रय–आपलीं मुलें किंवा मुली यांचा विक्रय करणें, १८ धान्यकुप्यपशुस्तेय–१ व्रीह्यादि जीं धान्यें त्यांची चोरी करणें, २ सोनें रुपें याशिवाय सर्व धातूंची चोरी करणें, ३ पशूंचें हरण करणें, प्रथम चौर्याचा निर्णय सांगितला असोन पुनः धान्यादिकाच्या चोरीसंबंधानें सांगण्याचें कारण विशेष प्रायश्चित्त याच्या बद्दलचें आहे असें सांगण्याकरितां, याप्रमाणेंच जेथें पुनरुक्ति होईल तेथें ज्यास्त प्रायश्चित्त सुचविण्याकरितां आहे असें समजावें, १९ अयाज्ययाजन–यज्ञ करण्यास अयोग्य त्याच्याबद्दल यज्ञ करणें, २० पितृमातृसुतत्याग–पोषण करण्यास योग्य असे माता पितर आणि मुलें यांचें पोषण न करणें, अथवा त्यांस घराचे बाहेर काढून देणें, २१ तडागारामविक्रय–तळें, बाग इत्यादिक विकणें, २२ कन्यासंदूषण–अंगुल्यादिकांनीं मुलीच्या योनीचें विदारण करणें, २३ परिविदकयाजन–वडील भावाचें लग्न न होतां धाकट्या भावाचें लग्न झालें आहे, त्याजकडून यज्ञ करणें, २४ तस्यकन्याप्रदान–त्याच्या धाकट्या भावास आपली मुलगी देणें, २५ गुरोरन्यत्रकौटिल्य–गुरु वाचून अन्याचा विश्वास घात करणें, २६ व्रत लोप–प्रथम व्रताचें ग्रहण करून पुनः तें व्रत सोडून देणें, २७ आत्मार्थेक्रियारंभ–आपण आपल्या करितांच पाकक्रिया करणें, २८ मद्यपस्त्रीनिषेवण–मद्य प्राशन करणारी अशी जी आपली स्त्री तीचेशीं संभोग करणें, २९ स्वाध्यायाग्निसुतत्याग–वेदाध्ययन न करणें, श्रौत-स्मार्तादि जे अग्नि त्यांचा त्याग करणें, सुतत्याग म्हणजे मुलांचे संस्कार न करणें, ३० बांध-

त्याग–आपणास ऐश्वर्य असतां दारिद्री चुलते, मातुल इत्यादिकांचें रक्षण न करणें, ३१ इंधनार्थद्रुमच्छेद–पाक निष्पत्ति करण्या करितां ओलीं झाडें तोडणें, ३२ स्त्रीहिंसौषधजीवन– स्त्रियेच्या योगानें, अथवा प्राण्यांची हिंसा करून त्या योगानें, औषधाच्या योगानें आपली उपजीविका करणें, ३३ हिंस्रयंत्रविधान–तीळ, ऊंस इत्यादिकांस पीडा करणारे जे घाणे ते लावणें, ३४ द्यूतादिव्यसन–द्यूत, मृगया इत्यादिकांचें व्यसन. ३५ आत्मविक्रय–द्रव्य घेऊन परस्त्रीसीं गमन करणें, ३६ शूद्रप्रेष्य–शूद्राची चाकरी करणें, ३७ हीनयोनीनिषेवण– नीच जातीच्या मंडळीशीं मैत्री करणें, सवर्ण स्त्रीशीं विवाह न करितां हीन वर्ण स्त्रीशीं लग्न करणें, अथवा वेश्या गमन करणें, ३८ अनाश्रमित्व– ब्रह्मचर्य, गृहस्थाश्रम, वानप्रस्थ, संन्यास यांपैकीं कोणताही आश्रमाचा स्वीकार न करणें, ३९ परान्नपुष्टता–आपल्यास अधिकार असतां व ऐश्वर्य असतां दुसऱ्याचे अन्नाचें निरंतर सेवन करणें, ४० असच्छास्त्राधिगमन–नास्तिकादिकांचे जे ग्रंथ त्याचें ज्ञान करून घेणें, ४१ आकरेषु अधिकारता–सुवर्णादिकांच्या ज्या खाणी त्याचे ठायीं राजाज्ञेनें अधिकार स्वीकार करणें, ४२ भार्यादिविक्रय–भार्यादिकाचा विक्रय करणें, प्रायश्चित्तेंदुशेखरांतील जास्त सांगितलेलीं उपपातकें. ४३ असत्प्रतिग्रह–वाईट दान घेणें, ४४ निंदितान्नादन–निंदित अन्न खाणें, ४५ नटादिकर्मकरण–नटादिकांचें कर्म करणें, ४६ भार्यात्याग– सदाचारसपन्न जी आपली स्त्री तिचा त्याग करणें, याप्रत्येकास उपपातक संज्ञा आहे. ॥ १० ॥

## ॥ अथ गोवधप्रायश्चित्तनिर्णयः ॥

तथाचयाज्ञवल्क्यः ॥ पंचगव्यंपिबन्गोघ्नोमासमासीतसंयतः ॥ गोष्ठेशयोगोनुगामीगोप्रदानेनशुध्यति ॥ १ ॥ कृच्छ्रंचैवातिकृच्छ्रंचचरेद्वापिसमाहितः॥दद्यात्त्रिरात्रंचोपोष्यवृषभैकादशास्तुगाः ॥२॥ अत्रव्रतचतुष्टयंविहितम् ॥ आहारान्तरनिरपेक्षेणपंचगव्यंपिबन्रात्रौगोशालायांशयानःप्रातस्ताःएवंवनंगच्छंतीरनुगच्छन्नुतिष्ठन्तीरनुतिष्ठन्अन्यैरपिनियमैर्युक्तोमासमासीत॥ ततोमासांतेब्राह्मणायगांदत्वाशुद्ध्यतीत्येकंव्रतं॥ पंचगव्याहारव्यतिरेकेणपूर्वोक्तधर्मयुक्तोमासंप्राजापत्यंकृच्छ्रंचरेदितिद्वितीयंप्रायश्चित्तम् ॥ तथैवप्राजापत्यस्थानेतिकृच्छ्रंमासंचरेदितितृतीयं ॥ त्रिरात्रोपवासंकृत्वाएकंवृषभंदशगाश्चदद्यादितिचतुर्थंप्रायश्चित्तम् ॥ अत्रेयंव्यवस्था ॥ अज्ञानतोजातिमात्रब्राह्मणसंबन्धिमात्रगोवधेदद्यात्त्रिरात्रंचोपोष्यवृषभैकादशास्तुगाइत्येतत् ॥ ३ ॥ अज्ञानतःक्षत्रियसंबन्धिगोमात्रव्यापादने-पंचगव्यंपिबन्गोघ्नोमासमासीतसंयतः ॥ गोष्ठेशयोगोनुगामीगोप्रदानेनशुद्ध्यति ॥ ४ ॥ इत्येतत्षड्उपवासात्मकप्राजापत्यस्थानेप्राजापत्यप्रत्याम्नायाएकागोमासंपंचगव्याशनेपंचधेनवएवंषड्धेन्वोभवंति ततश्चवृषभैकादशगोदानसहितत्रिरात्रोपवासापेक्षयामासं पंचगव्याशनंन्यूनमितिक्षत्रियगोहननविषयत्वंयुक्तमेवमुत्तरत्रापिज्ञेयं ॥ ५ ॥ अपरार्केतुदेशकालवयःसामर्थ्याद्यपेक्षयायाज्ञवल्क्योक्तचतुष्टयस्यव्यवस्थाकल्प

नीयेत्युक्तम् ॥ इदमेवपुक्तंदशपतेकामवधेतुमनुः॥उपपातकसंयुक्तोगोघ्नोमासंयवान्पिबेत्॥ कृतवापोवसेद्गोष्ठेचर्मणार्द्रेणसवृतः ॥ ६ ॥ चतुर्थकालमश्नीयादक्षारलवणंमितम् ॥ गोमूत्रेणचरेत्स्नानंद्वौमासौनियतेंद्रियः ॥७॥ दिवानुगच्छेत्गावस्तुतिष्ठन्नूर्ध्वंरजःपिबेत् ॥ शुश्रुषित्वानमस्कृत्यरात्रौवीरासनंनयेत् ॥ ८ ॥ तिष्ठंत्स्वनुतिष्ठेत्तुव्रजंतीष्वप्यनुव्रजेत् ॥ आसीनास्तुतथासीतनियतोवीतमत्सरः ॥ ९ ॥ आतुरामभिशस्तांवाचौरव्याघ्रादिभिर्भयैः ॥ पतितांपंकलग्नांवासर्वप्राणैर्विमोक्षयेत् ॥१०॥ उष्णेवर्षतिवाशीतेमारुतेवातिवाभृशम्॥नकुर्वीतात्मनःत्राणंगोरकृत्वातुशक्तितः ॥ ११ ॥ आत्मनोयदिवान्येषांगृहेक्षेत्रेऽथवाखले ॥ भक्षयंतींनकथयत्पिबंतंचैववत्सकम् ॥ १२ ॥ अनेनविधिनायस्तुगोघ्नोगामनुगच्छति ॥ सगोहत्याकृतंपापंत्रिभिर्मासैर्व्यपोहति ॥ १३ ॥

## गोवधप्रायश्चित्ताचा निर्णय.

यास याज्ञवल्क्याचें वचन. गोहत्या करणारानें महिनाभर पर्यंत इतर आहार न करिता पंचगव्य प्राशन करून रहावें. आणि दिवसा गाई चरण्यास चालल्या असता त्याच्या बरोबर जावें. आणि रात्रीं गोठ्यांत शयन करावें या प्रमाणें महिनाभर वर्तन करून मासांतीं एक गोप्रदान करावें या प्रमाणें केल्यानें गोहत्यापातका पासून मनुष्य शुद्ध होतो. ॥ १ ॥ अथवा एक महिनाभर पर्यंत गाईस दिवसा रानांत चरावयास नेऊन रात्रीं गोठ्यांत शयन करून पंचगव्य भक्षण न करितां कृच्छ्रप्रायश्चित्त आचरण करून रहावें ह्मणजे शुद्ध होतो. पूर्वोक्त रीतीनें गाईचे पाठीमागें दिवसा जाऊन रात्रीं गोठ्यांत मास पर्यंत शयन करून अतिकृच्छ्राचरणानेंही शुद्ध होतो. अथवा त्रिरात्र उपोषण करून ब्राह्मणास अकरा गायी व एक वृषभदान करावें ह्मणजे गोहत्यादोषा पासून मुक्त होतो. ॥ २ ॥ केवळ जातीनेंच ब्राह्मण ( वेदाध्ययनानें रहित ) अशा ब्राह्मणाच्या गाईचा वध केला असता तीन रात्र उपोषण करून अकरा गाई व एक वृषभ ब्राह्मणास दिल्यानें गोहत्ये पासून मुक्त होईल ॥ ३ ॥ या प्रमाणें जे हे गोहत्या प्रायश्चित्ता संबधानें चार प्रकार सांगितले त्यां मध्यें प्रथम न जाणून क्षत्रियाची जी गाय तिचें हनन घडलें असतां पंचगव्याचें प्राशन, आणि महिनाभर पर्यंत गोठ्यांत शयन, गाईचे अनुलक्षून जाणें व गोप्रदान करणें यानें शुद्ध होतो. ॥ ४ ॥ असें जें सांगितलें हें सहा उपवासात्मक जें प्राजापत्य त्या बद्दल प्राजापत्य प्रत्याम्नाय एक गाय आणि महिनाभर पर्यंत पंचगव्य प्राशनानिमित्त पाच धेनू होतात. व शेवटीं दानयास सांगितलेली एक गाय अशा सहा धेनू होतात त्याहून अकरा गायी आणि एक वृषभ आणि त्रिरात्र उपवास या पेक्षा मासभर पर्यंत पंचगव्य प्राशन करून रहाणें हे न्यून आहे. सबब क्षत्रिय गोहनन विषयक असें ह्मणणेंच युक्त आहे. या प्रमाणेच पुढें ही समजावें. ॥ ५ ॥ अपरार्का मध्यें तर हे जे याज्ञवल्क्यानें चार प्रकार सांगितले त्यांची व्यवस्था देश, काल, वय, सामर्थ्य यांचा विचार करून करावी असें सांगितलें आहे. हेंच युक्त दिसतें,

आपल्या इच्छेनें गायीचा वध केला असतां मनूनें प्रायश्चित्त सांगितलें आहे तें असें, गोहत्या करणारानें आपलें वपन करून गाईचें ओलें कातडें पांघरून गोमूत्रांत सातू शिजवून महिनाभर पर्यंत पिऊन राहावें. ॥ ६ ॥ नंतर चतुर्थ काळाचे ठायीं क्षार आणि लवण यानें रहित असें परिमित अन्न भक्षण करून गोमूत्रानें स्नान करून जितेंद्रिय असें दोन महिने पर्यंत रहावें. ॥ ७ ॥ दिवसा गाईचे पाठी मागून जावें आणि रात्रीं गोठ्यांत रहावें,गाईची सेवा करावी, गाईस नमस्कार करून रात्रीं वीरासन स्वीकारावें. ॥ ८ ॥ गायी उभ्या राहिल्या असतां आपण उभें राहावें. गायी चालत असतां आपण चालवें. मत्सर रहित असें होऊन रोग युक्त गायी झाल्या असतां त्यांना रोगापासून मुक्त करावें. ॥ ९ ॥ चोर, वाघ इत्यादिकांच्या भयानें युक्त गाय झाली असतां अथवा चिखलांत बुडाली असतां तिला आपल्या प्राणानें ही रक्षण करावें ॥ १० ॥ फार ऊन अथवा पाऊस पडत असतां अगर अत्यंत गारठा अगर वारा सुटला असतां आपलें रक्षण न करितां आपल्या शक्तिनें गाईचें रक्षण करावें. ॥ ११ ॥ आपल्या अथवा दुसऱ्याच्या घरांत अथवा शेतांत अथवा खळ्यांत गाय धान्य भक्षण करीत असतां सांगूं नये. वासरूं पीत असतां ही कोणास सांगुं नये व निवारण करूं नये. ॥ १२ ॥ या प्रमाणें तीन महिने पर्यंत व्रताचरण केलें असतां मनुष्य गोहत्ये पासून मुक्त होतो. ॥ १३ ॥

वृषभैकादशागाश्चदद्यात्सुचरितव्रतः ॥ अविद्यमानेसर्वस्वंवेदविद्भ्योनिवेदयेत्॥१४॥ वीरासनलक्षणं ॥ भित्याद्यनाश्रित्योपवेशनंवीरासनंशूलपाणौभविष्ये ॥ उत्थितस्तु दिवातिष्ठेदुपविष्टस्तथानिशि ॥ एतद्वीरासनंनाममहापातकनाशनम् ॥ १५ ॥ एतच्च गोस्वामिनोद्रव्यादिनापरितुष्टिंकृत्वाकार्यं ॥ यदाहमनुः ॥ हिंस्याद्योयस्यद्रव्याणि ज्ञानतोज्ञानतोपिवा ॥ तस्योत्पादयेत्तुष्टिंराज्ञेदद्यात्तुतत्समम् ॥ १६ ॥ ब्राह्मे ॥ आदौगोपत्वपेदत्वागोमूल्यंसाधुकल्पितमिति ॥ ततःप्रायश्चित्तंसमाचरेत् ॥ एतानिचस र्वाणिप्रायश्चित्तानिवृषवधेपिभवन्ति ॥ १७ ॥ निमित्तवाक्येगवामनुवादेनतद्गतस्त्रीलिंग स्याविवक्षितत्वात् ॥ दानंतुस्त्रीगवीनामेवतद्वाक्येगवांविधेयत्वेनतद्गतस्त्रीत्वस्यविवक्षि तत्वात् ॥ गोदानादौलिंगविशेषनिर्देशाभावेपिस्त्रीगवीनामेव ॥ तासांदुग्धादिद्वाराब हूपकारकत्वात्॥प्रायश्चित्तानंतरंपार्वणविधिनाश्राद्धंकार्यंतच्चजीवत्पित्रकेणापि॥१८॥ गर्भिणीगोवधेबृहस्पतिः ॥ गर्भिणींकपिलांदोग्ध्रींहोमधेनुंचसुव्रतां ॥ खड्गादिनाघातयि त्वाद्विगुणंव्रतमाचरेदिति ॥ १९॥ यदिलगुडादिघातेनगौर्जीवतिगर्भमात्रघातोभवेत्तत्र षट्त्रिंशन्मतेविशेषउक्तः ॥ पादउत्पन्नमात्रेतुद्वौपादौदृष्टतांगते ॥ पादोनंव्रतमुद्दिष्टंह त्वागर्भमचेतनम् ॥ २० ॥ अंगप्रत्यंगसंपूर्णेगर्भेचेतःसमन्विते ॥ द्विगुणंगोव्रतंकुर्यादे षागोघ्नस्यनिष्कृतिः ॥ २१ ॥ वृद्धप्रचेताः ॥ एकवर्षेहतेवत्सेकृच्छ्रपादोविधीयते ॥ अबुद्धिपूर्वेपुंसःस्याद्द्विपादस्तुद्विहायने ॥ त्रिहायनेत्रिपादःस्यात्प्राजापत्यमतःपरमिदि

॥२२॥ एतच्चप्रायश्चित्तमल्पत्वादबुद्धिपूर्वकाधमसंबंधिगोवधविषयंज्ञेयम् ॥ पराशरः ॥ अतिबालामतिकृशामतिवृद्धांचरोगिणीम्॥ हत्वापूर्वविधानेनचरेदर्द्धव्रतंद्विजइति॥२३॥ ब्राह्मणान्भोजयेत्शक्त्यादद्याद्धेमतिलांस्तथा ॥ यस्मिन्निरोगादिविषयेपरप्रायश्चित्तं विहिततदर्द्धमित्यर्थः ॥ अतिबालत्ववर्षन्यूनवयस्कत्वम् ॥ अतिवृद्धत्वंतृणछेदनासमर्थत्व ॥ अतिकृशादोहनावाहनायोग्या ॥ २४ ॥

* अकरा गाई आणि एक वृषभ ब्राम्हणास द्यावा इतकें देण्यास सामर्थ्य नसल्यास वेदवेत्त्या ब्राम्हणास आपलें सर्वस्व दान करावें. ॥१४॥ उपपातकी मनुष्यांनी हेंच प्रायश्चित्त करावें. वीरासनाचें लक्षण–भित्त्यादिकाचा आश्रय न करिता ज बसणें त्याचें नाव वीरासन. शूलपाणी मध्यें भविष्य पुराणांतील असें वचन लिहिलें आहे की, दिवसा गाई चालत असता आपण चालणें, तसेंच त्या बसल्या असता आपण बसणें, त्याचें नांव वीरासन. हें महापातकांचा नाश करणारें आहे.॥१५॥ पूर्वी जें गोहत्येचें प्रायश्चित्त सांगितलें तें ज्याची गाय मृत झाली असेल त्या मालकास गाईची किमत देऊन त्याचा संतोष करून नंतर प्रायश्चित्त करावें. त्यास मनुचें वचन. जो ज्या मनुष्याच्या द्रव्याचा नाश जाणून अथवा न जाणून करितो त्याचा संतोष करून राजासही समान द्रव्य द्यावें. ॥ १६ ॥ ब्रह्मपुराणात असें सांगितलें आहे की, प्रथम गाईच्या मालकास गाईची योग्य किमत देऊन नंतर त्याजपासून तें गाईचें कातडें, शिंगें, खुर, शेपूट, हीं घेऊन नंतर प्रायश्चित्त आचरण करावें. हीं जीं सर्व गोवधाचीं प्रायश्चित्तें सांगितलीं तीं वृषभ वधाचे ठायीं ही ध्यावींत. ॥ १७ ॥ कारण निमित्त वाक्यामध्यें गाईच्या अनुवादानें गोगत जें स्त्रीलिंग त्याची येथें विवक्षेची जरूरी नाही. जेथें गोप्रदान सांगितलें आहे तेथें गाईचें द्यावयाचें कारण त्या वाक्यामध्यें गाईच्या विधेयत्वें करून गोगत जें स्त्रीलिंग त्याचीच विवक्षा आहे. प्रायश्चित्ता नंतर पार्वण विधिनें श्राद्ध करावें. तें जिवंत पितृकानें ही करावें. ॥ १८ ॥ गर्भिणी गाय मारली असतांचें प्रायश्चित्तास बृहस्पतीचें वचन–गर्भिणी, कपिला, पुष्कळ दूध देणारी, चांगली अशी गाय खड्गादिकानें मारिली असता दुप्पट प्रायश्चित्त करावें. ॥ १९ ॥ षट् त्रिंशन्मतें लाकूड इत्यादिक मारल्यानें गाय जीवंत राहून तिच्या गर्भाचा नाश झाला असतां विशेष सांगितलें आहे तें, गाय गर्भामध्यें उत्पन्न झाली असतां एकपाद प्रायश्चित्त करावें. गर्भ दृढ झाला असतां दोन पाद प्रायश्चित्त करावें. अचेतन गर्भ नाश केला असतां पादोन प्रायश्चित्त सांगितलें आहे.॥२०॥ अंग प्रत्यंग यानें गर्भ परिपूर्ण जाहलेला असा असतां गाईचा नाश केला असतां द्विगुण प्रायश्चित्त करावें. ॥ २१ ॥ एक वर्षाचें वत्स न जाणून नाश केलें असतां पादकृच्छ्र प्रायश्चित्त करावें. दोन वर्षांचें मारलें असता द्विपाद. तीन वर्षांचें मारलें असतां त्रिपाद प्रायश्चित्त करावें. या पुढें प्राजापत्य प्रायश्चित्त सांगितलें आहे.॥२२॥ हें जें येथें अल्प प्रायश्चित्त सांगितलें आहे तें न जाणून भ्रांतीनें हनन झाल्याचें आहे. अति बाल किंवा अति वृद्ध, अत्यंत कृश, रोगानें

आपल्या इच्छेनें गायीचा वध केला असतां मनूनें प्रायश्चित्त सांगितलें आहे तें असें, गोहत्या क-णारानें आपलें वपन करून गाईचें ओलें कातडें पांघरून गोमूत्रात सातू शिजवून महिनाभर प-र्यंत पिऊन राहावें. ॥ ६ ॥ नंतर चतुर्थ काळाचे ठायीं क्षार आणि लवण यानें रहित असें परि-मित अन्न भक्षण करून गोमूत्रानें स्नान करून जितेंद्रिय असें दोन महिने पर्यंत रहावें. ॥ ७ ॥ दिवसा गाईचे पाठी मागून जावें आणि रात्रीं गोठ्यांत रहावें,गाईची सेवा करावी, गाईस नमस्कार करून रात्रीं वीरासन स्वीकारावें. ॥ ८ ॥ गायी उभ्या राहिल्या असतां आपण उभें राहावें. गायी चालत असतां आपण चालवें. मत्सर रहित असें होऊन रोग युक्त गायी झाल्या असतां त्यांना रोगापासून मुक्त करावें. ॥ ९ ॥ चोर, वाघ इत्यादिकांच्या भयानें युक्त गाय झाली असतां अथवा चिखलात बुडाली असतां तिला आपल्या प्राणानें ही रक्षण करावें ॥ १० ॥ फार ऊन अथवा पाऊस पडत असतां अगर अत्यंत गारवा अगर वारा सुटला असतां आपलें रक्षण न करितां आ-पल्या शक्तिनें गाईचें रक्षण करावें. ॥ ११ ॥ आपल्या अथवा दुसऱ्याच्या घरांत अथवा शेतात अथवा खळ्यांत गाय धान्य भक्षण करीत असतां सांगूं नये. वासरूं पीत असतां ही कोणास सांगुं नये व निवारण करूं नये. ॥ १२ ॥ या प्रमाणें तीन महिने पर्यंत व्रताचरण केलें असतां मनुष्य गोहत्ये पासून मुक्त होतो. ॥ १३ ॥

वृषभैकादशागाश्चदद्यात्सुचरितव्रतः ॥ अविद्यमानेसर्वस्वंवेदविद्भ्योनिवेदयेत् ॥ १४ ॥ वीरासनलक्षणं ॥ भित्याद्यनाश्रित्योपवेशनंवीरासनंशूलपाणौभविष्ये ॥ उत्थितस्तु दिवातिष्ठेदुपविष्टस्तथानिशि ॥ एतद्वीरासनंनाममहापातकनाशनम् ॥ १५ ॥ एतच्च गोस्वामिनोद्रव्यादिनापरितुष्टिंकृत्वाकार्यं ॥ यदाहमनुः ॥ हिंस्याद्योपस्यद्रव्याणि ज्ञानतोज्ञानतोपिवा ॥ सतस्योत्पादयेत्तुष्टिंराज्ञेदद्यात्तुतत्समम् ॥ १६ ॥ ब्राह्मे ॥ आ दौगोपतयेदत्वागोमूल्यंसाधुकल्पितमिति ॥ ततःप्रायश्चित्तंसमाचरेत् ॥ एतानिचस र्वाणिप्रायश्चित्तानिवृषवधेपिभवन्ति ॥ १७ ॥ निमित्तवाक्येगवामनुवादेनतद्गतस्त्रीलिंग स्याविवक्षितत्वात् ॥ दानंतुस्त्रीगवीनामेवतद्वाक्येगवांविधेयत्वेनतद्गतस्त्रीत्वस्यविवक्षि तत्वात् ॥ गोदानादौलिंगविशेषनिर्देशाभावेपिस्त्रीगवीनामेव ॥ तासांदुग्धादिद्वाराव त्युपकारकत्वात् ॥ प्रायश्चित्तानंतरंपार्वणविधिनाश्राद्धंकार्यंतच्चजीवत्पित्रकेणापि ॥ १८ ॥ गर्भिणीगोवधेबृहस्पतिः ॥ गर्भिणींकपिलांदोग्ध्रींहोमधेनुंचसुव्रतां ॥ खड्गादिनाघातपि त्वाद्विगुणंव्रतमाचरेदिति ॥ १९ ॥ यदिलगुडादिघातेनगोर्जीवतिगर्भमात्रघातोभवेत्तत्र पद्त्रिंशन्मतेविशेषउक्तः ॥ पादउत्पन्नमात्रेतुद्वौपादौदृष्टतांगते ॥ पादोनंव्रतमुद्दिष्टंह त्वागर्भमचेतनम् ॥ २० ॥ अंगप्रत्यंगसंपूर्णेगर्भेचेतःसमन्विते ॥ द्विगुणंगोव्रतंकुर्यादे षागोघ्नस्यनिष्कृतिः ॥ २१ ॥ बृहत्प्रचेताः ॥ एकवर्षेहतेवत्सेकृच्छ्रपादोविधीयते ॥ अबुद्धिपूर्वेपुंसःस्याद्द्विपादस्तुद्विहायने ॥ त्रिहायणेत्रिपादःस्यात्प्राजापत्यमतःपरमिदि

॥२२॥ एतच्चप्रायश्चित्तमल्पत्वादबुद्धिपूर्वकाधमसंबंधिगोवधविषयंज्ञेयम् ॥ पराशरः ॥ अतिबालामतिकृशामातवृद्धांचरोगिणीम्॥ हत्वापूर्वविधानेनचरेदर्द्धंव्रतंद्विजइति॥२३॥ ब्राह्मणान्भोजयेत्शक्त्यादद्याद्धेमतिलांस्तथा ॥ यस्मिन्निरोगादिविषयेयत्प्रायश्चित्तं विहितंतदर्द्धमित्यर्थः ॥ अतिबालत्ववर्षन्यूनवयस्कत्वम् ॥ अतिवृद्धत्वंतृणछेदनासमर्थ त्वं ॥ अतिकृशादोहनावाहनायोग्या ॥ २४ ॥

अकरा गाई आणि एक वृषभ ब्राह्मणास द्याव्या इतकें देण्यास सामर्थ्य नसल्यास वेदवेत्त्या ब्राम्ह-णास आपलें सर्वस्व दान करावें. ॥१४॥ उपपातकी मनुष्यानीं हेंच प्रायश्चित्त करावें. वीरासनाचें लक्षण–भित्त्यादिकाचा आश्रय न करिता ज बसणें त्याचें नाव वीरासन. शूलपाणी मध्यें भविष्य पुराणातील असें वचन लिहिलें आहे कीं, दिवसा गाई चालत असता आपण चालणें, तसेंच त्या बसल्या असतां आपण बसणें, त्याचें नाव वीरासन. हें महापातकांचा नाश करणारें आहे.॥१५॥ पूर्वीं जें गोहत्येचें प्रायश्चित्त सांगितलें तें ज्याची गाय मृत झाली असेल त्या मालकास गाईची किंमत देऊन त्याचा संतोष करून नंतर प्रायश्चित्त करावें. त्यास मनुचें वचन. जो ज्या मनु-ष्याच्या द्रव्याचा नाश जाणून अथवा न जाणून करितो त्याचा संतोष करून राजासही समान द्रव्य द्यावें. ॥ १६ ॥ ब्रह्मपुराणात असें सांगितलें आहे कीं, प्रथम गाईच्या मालकास गाईची योग्य किंमत देऊन नंतर त्याजपासून तें गाईचें कातडें, शिंगें, खुर, शेपूट, हीं घेऊन नंतर प्रायश्चित्त आचरण करावें. हीं जीं सर्व गोवधाचीं प्रायश्चित्तें सांगितलीं तीं वृषभ वधाचे ठायीं हीं घ्यावीत. ॥ १७ ॥ कारण निमित्त वाक्यामध्यें गाईच्या अनुवादानें गोगत जें स्त्रीलिंग त्याची येथें विवक्षेची जरूरी नाहीं. जेथें गोप्रदान सांगितलें आहे तेथें गाईचें घ्यावयाचें कारण त्या वाक्यामध्यें गाईच्या विधेयत्वें करून गोगत जें स्त्रीलिंग त्याचीच विवक्षा आहे. प्रायश्चित्ता नंतर पार्वण विधिनें श्राद्ध करावें. तें जिवत पितृकानें ही करावें. ॥ १८ ॥ गर्भिणी गाय मारली असतांचें प्रायश्चित्तास बृहस्पतीचें वचन–गर्भिणी, कपिला, पुष्कळ दूध देणारी, चांगली अशी गाय खड्गादिकानें मारिली असतां दुप्पट प्रायश्चित्त करावें. ॥ १९ ॥ षट् त्रिशन्मते लाकूड इत्यादिक मारल्यानें गाय जीवत राहून तिच्या गर्भाचा नाश झाला असतां विशेष सांगितलें आहे तें, गाय गर्भामध्यें उत्पन्न झाली असतां एकपाद प्रायश्चित्त करावें. गर्भ दृढ झाला असतां दोन पाद प्रायश्चित्त करावें. अचेतन गर्भ नाश केला असतां पादोन प्रायश्चित्त सांगितलें आहे.॥२०॥ अंग प्रत्यंग यानें गर्भ परीपूर्ण जाहलेला असा असतां गाईचा नाश केला असतां द्विगुण प्राय-श्चित करावें. ॥ २१ ॥ एक वर्षाचें वत्स न जाणून नाश केलें असतां पादकृच्छ्र प्रायश्चित्त करावें. दोन वर्षाचें मारलें असतां द्विपाद. तीन वर्षांचें मारलें असतां त्रिपाद प्रायश्चित्त करावें. या पुढें प्राजापत्य प्रायश्चित्त सांगितलें आहे.॥२२॥ हें जें येथें अल्प प्रायश्चित्त सांगितलें आहे तें न जाणून भ्रांतीनें हनन झाल्याचें आहे. अति बाल किंवा अति वृद्ध, अत्यंत कृश, रोगानें

प्राजापत्य, पाषाणानें तर्से कृच्छ्र, शस्त्रानें नाश झाला असतां अतिकृच्छ्र प्रायश्चित्त सांगितलें आहे. ॥ २५ ॥ २६ ॥ पुष्कळ मनुष्यांनीं एका गाईचा वध केला असतां प्रायश्चित्ताचा विचार–गोवधा निमित्त प्रत्येकाने वेगळें वेगळें पाद पाद प्रायश्चित्त करावें. ॥ २७ ॥ एकानें पुष्कळ गाई मारल्याचा विचार–आडवून,बांधून अथवा भलतेंच औषध चारून पुष्कळ गाईंचा नाश केला असतां द्विगुणीत प्रायश्चित्त करावें म्हणजे शुद्ध होतो. ॥ २८ ॥ औषधाचें ज्ञान नसतांना भलतेंच औषध दिल्यानें गाय मेल्यास प्रायश्चित्त आहे, व्यासाचें वचन. औषध, मीठ, जेवण, हें पुण्य प्राप्ति होण्याकरितांही जास्त देऊं नये, जास्त दिल्यानें जर कदाचित् नाश होईल तर त्यास कृच्छ्र प्रायश्चित्त सांगितलें आहे.॥ २९॥ सत्रत्र औषधादि अल्प प्रमाणानेंच धावें. घांटया अगर इतर भूषणें गाईस घातल्या आणि त्यामुळें तिचा नाश होईल तर गाईच्या मालकास अर्धकृच्छ्र प्रायश्चित्त सांगितलें आहे. ॥ ३० ॥ घंटादिक केवळ भूषणार्थ करितो सांगितलें आहे. अत्यंत धार काढल्यानें किंवा दमन केल्यानें किंवा गुराच्या समुदायात गाईस मिसळल्यानें अथवा सांखळदंड अथवा पाश यानें बांधल्यानें जर गाईस मृत्यु येईल तर गाईच्या मालकास पादोनकृच्छ्र प्रायश्चित्त सांगितलें आहे. ॥ ३१ ॥ पाण्याच्या ओघांत अथवा एखाद्या डबक्यात गाय बुडून मरण पावली असतां तसेंच अत्यंत पर्जन्य वृष्टीनें किंवा वीज पडल्यानें अथवा खळग्यांत पडल्यानें, श्वापदानें भक्षण केल्यानें मरण पावली असतां गोस्वामीस प्राजापत्यकृच्छ्र प्रायश्चित्त सांगितलें आहे. ॥ ३२ ॥ परंतु जर गोस्वामीच्या अपराधानें गाईस मृत्यु आला असतां गोस्वामीस हें प्रायश्चित्त. गाईस रक्षण करणाराच्या अपराधानें जर मृत्यु आला असतां गोरक्षकास प्रायश्चित्त. अत्यंत थंडीनें किंवा वाऱ्यानें किंवा अत्यंत बंधनानें गाय मरण पावली असतां तसेंच ज्या घरांत कोणी नाहीं अशा घरांत बांधून उपेक्षा केली असतां प्राजापत्य प्रायश्चित्त सांगितलें आहे.॥ ३३ ॥ विष्णुस्मृतींतील वचन. खळग्यांत अथवा पर्वताच्या कड्या वरून अगर सर्पादिकांच्या दंशानें गाईस मृत्यु आला असतां अर्धकृच्छ्र प्रायश्चित्त. गाईची रोग-निवृत्ती होण्याकरितां, यंत्रादिकांची योजना केली असतां, मूढगर्भ काढण्याकरितां प्रयत्न केला असतां गाय मरण पावलें तर उपाय करणारास प्रायश्चित्त नाहीं. ॥ ३४ ॥ ३५ ॥ तसेंच डाग देणें, एखादा भाग तोडणें,इत्यादिक प्रयोगानें उपकार करणारास पाप नाहीं. ॥ ३६ ॥ गाईच्या हिता करितां औषध, तेल पाजणें, खाण्यास घालणें इत्यादिक उपाय करून मृत्यु आला असतां उपाय करणारास पाप नाहीं. ॥ ३७ ॥ पराशराचें वचन. बाण समुदायानें, सर्व ग्रामांचा नाश होत असतां अथवा घर पडल्यानें अथवा अत्यंत पर्जन्यवृष्टी झाल्यानें मृत्यु आला असतां मालकास प्रायश्चित्त नाहीं, परंतु हें सर्व बंधन रहित पशूस मृत्यु आला असतांचें आहे. ॥ ३८ ॥ ॥ ३९ ॥ बांधलेल्या पशूचें मरण झालें असतां आपस्तंबानें सांगितलेलें प्रायश्चित्त आहेच, भयंकर जंगलांत अथवा गृहदाहाचे ठायीं, खळग्यांत पडल्यानें , जर मरण पावेल तर एकपाद प्रायश्चित्त. ॥ ४० ॥

॥ यमः ॥ निशिबंधनिरुद्धेषुव्याघ्रसर्पहतेषुच ॥ अग्निविद्युद्विपन्नेषुप्रायश्चित्तंनविद्यते ॥ ४१ ॥ अस्थिभंगादिप्रयुक्तत्वस्यैवाहआपस्तंबः ॥ अस्थिभंगंगवांकृत्वालांगूलच्छेदनंतथा ॥ पाटनेदंतशृंगाणांमासार्द्धंतुयवान्पिबेत् ॥ ४२ ॥ अत्राशक्तंप्रत्यंगिराः ॥ शृंगभंगेस्थिभंगेचचर्मनिर्मोचनेतथा ॥ दशरात्रंपिबेद्वत्संस्तुस्थापियदिगौर्भवेत् ॥ इति ॥ वत्संक्षीरदधिघृतानि ॥ ४३ ॥ पराशरः ॥ गोवृषाणांविपत्तौचयावंतःप्रेक्षकाजनाः ॥ अनिवारयतांतेषांसर्वेषांपातकंभवेत् ॥ ४४ ॥ अंगिरः ॥ अंगुष्ठमात्रस्थौल्येनबाहुमात्रप्रमाणतः ॥ सार्द्रश्चसपलाशश्चदंडइत्यभिधीयते ॥ ४५ ॥ तस्मादूर्ध्वंप्रहारेणयदिगांविनिपातयेत् ॥ द्विगुणंतुचरेत्तत्रप्रायश्चित्तमितिस्थितिः ॥ ४६ ॥ पूर्वोक्तानिउपपातकप्रायश्चित्तानिवक्ष्यमाणानिचोपपातकप्रायश्चित्तानिचक्षत्रियादीनांब्राह्मणापेक्षयापादोनादीनिभवन्ति ॥ अनुग्राहकादीनांपादोनादीनिस्त्रीबालवृद्धादीनामर्द्धं ॥ अनुपनीतबालस्यपादः ॥ अनयैवदिशास्मृत्यंतरोक्तगुरुलघुप्रायश्चित्तानिशक्त्याद्यपेक्षयाअनुग्राहकप्रयोजकाद्यपेक्षयाव्यवस्थापनीयानि ॥ ४७ ॥

" तत्रचेतनांतरव्यापारव्यवधानमंतरेणप्राणवियोगफलकव्यापाररूपवधनिष्पादकःकर्ता ॥ १ ॥ यस्त्वप्रवृत्तंपुरुषंवेतनादिनाप्रवर्त्तयतिप्रवृत्तंवाप्रोत्साहयतिसप्रयोजकः ॥२॥ वध्यस्यपलायनादिनारोधकोऽनुग्राहकः ॥ ३ ॥ एतांहन्मीतिवक्तुरनुमतिदातानिषेधक्षमोपिमौनालंबीचानुमंता ॥४॥ उपदेशपरस्परहतुर्हंतुक्रोधमत्पाद्युत्पादकोनिमित्तं ॥५॥ "
प्रयोजकादीनांक्रमेणपादपादहानिरितिशूलपाणिः ॥ ४८ ॥ गोवधेवपनमुक्तं तत्रकेशरक्षणेच्छायांद्विगुणंव्रतमाचरेत् ॥ द्विगुणेव्रतआदिष्टेदक्षिणाद्विगुणाभवेत् ॥ ४९ ॥ यस्यनद्विगुणंदानंकेशाश्चपरिरक्षिताः ॥ तत्पापंतस्यातिष्ठत्तःवक्त्वाचनरकंव्रजेत् ॥५०॥ स्त्रीणामपिगोवधादौकर्तव्यतामाह ॥ यत्किंचित्क्रियतेपापंसर्वंकेशेषुतिष्ठति ॥ ५१ ॥ सर्वान्केशान्समुद्धृत्यछेदयेदंगुलिद्वयम् ॥ एवंनारीकुमारीणांशिरसोमुंडनंस्मृतम् ॥ ५२ ॥ नस्त्रियाःकेशवपनंनदूरेशयनासनम् ॥ नचगोष्ठेवसेद्रात्रौनदिवागाअनुव्रजेत् ॥ ५३ ॥ नदीषुसंगमेचैवअरण्येषुविशेषतः ॥ नस्त्रीणामजिनंवासोव्रतमेवंसमाचरेत् ॥ ५४ ॥ त्रिसंध्यंस्नानमित्युक्तंसुराणामर्चनंतथा ॥ बंधुमध्येव्रतंतासांकृच्छ्रंचांद्रायणादिकम् ॥५५॥ गृहेषुसततंतिष्ठेच्छुचिर्नियममाचरेत् ॥ ॥ विधवायास्तुमुंडनंअस्त्येव ॥ ॥ इहयोगोवधंकृत्वाप्रच्छादयितुमिच्छति ॥ सयातिनरकंघोरंकालसूत्रमसंशयम् ॥ ५६ ॥ विमुक्तोनरकात्तस्मान्मर्त्यलोकेप्रजायते ॥ क्लीबोदुःखीचकुष्ठीचसप्तजन्मानिवैनरः ॥ ५७ ॥ तस्मात्प्रकाशयेत्पापंस्वधर्मंसततंचरेत् ॥ स्त्रीबालभृत्यविप्रेषुअतिकोपंविवर्जयेत् ॥५८॥

गाय बैल ह्यांनी [illegible] याव, [illegible] अग्नि, [illegible] इत्यादि [illegible] गर्दन
[illegible] प्रायश्चित्त नाहीं. ॥ ४१ ॥ आपस्तंबाचें वचन—[illegible]

वगैरेच्या प्रहारानें गाईचें हाड मोडलें असतां किंवा शेपूट तोडलें असतां दांत पाडले असतां शिंग मोडलें असतां अर्ध मास पर्यंत गोमूत्रांत शिजविलेले यव प्राशन करून रहावें ॥ ४२ ॥ अशक्तास अंगिराचें वचन शिंग मोडलें असतां तसेंच हाड मोडलें असतां कातडें निघालें असतां दहा दिवस पर्यंत यज्ञ प्राशन करून रहावें यज्ञ शब्दाचा अर्थ दूध, दही, तूप, असा आहे ॥ ४३ ॥

पराशराचें वचन. गायी, बैल, हे विपत्तींत पडलें असोन त्यास सोडविण्या विषयींचा प्रयत्न न करितां तसेंच उपेक्षा करीत जे लोक बसतील, त्या विपत्तीस निवारण न करणाऱ्या अशा मनुष्यास पातक लागेल. ॥ ४४ ॥ अंगिराचे वचन, अंगठ्या एवढा मोठा बाहुमात्र छावीचा ओला पानानें युक्त असा गायीस राखण्यास दंड घ्यावा. ॥ ४५ ॥ यापेक्षां मोठ्या दंडानें गाईस प्रहार केल्यानें जर विपत्ती होईल तर द्विगुणीत प्रायश्चित्त करावें ॥ ४६ ॥ पूर्वी सांगितलेलीं जीं उपपातक प्रायश्चित्तें आणि पुढें सांगावयाचीं प्रायश्चित्तें तीं क्षत्रीयादिकांस ब्राह्मणापेक्षा पादोन अशीं होतात. अनुग्राहादिकांस हीं पादोनादि प्रायश्चित्तें सांगितलीं आहेत. स्त्रीया बाल वृद्ध इत्यादिकांस अर्ध प्रायश्चित्त मुंजन झालेल्या मुलास पाद प्रायश्चित्त. याच दिशेनें अन्य स्मृतीनें सांगितलेलीं अल्प महत्प्रायश्चित्तें शक्त्यादिकाच्या मानानें व अनुग्राहक प्रयोजक इत्यादिकाच्या भेदानें योजना करावी ॥

## पांच प्रकारचे जे पातककर्ते त्यांचा निर्णय.

सचेतन दुसऱ्या प्राण्याच्या व्यापारा वाचून दुसऱ्याचा प्राण नाशक जो व्यापार तेणें करून दुसऱ्याचा नाश करणारा जो मनुष्य त्यास कर्त्ता अशी सज्ञा आहे. ॥ १ ॥ जो प्रवृत्तन झालेल्या मनुष्यास वेतन वगैरे देऊन प्रवृत्त करितो व कर्म करण्यास प्रवृत्त झालेल्या मनुष्यास उत्साह युक्त करितो त्यास प्रयोजक अशी सज्ञा आहे ॥ २ ॥ ज्याला वध करावयाचा आहे तो पळू लागला अगर इकडे तिकडे जाऊं लागला तर त्यास जो प्रतिबंध करितो त्यास अनुग्राहक अशी सज्ञा आहे ॥ ३ ॥ एखाद्या मनुष्यानें एखाद्यास मारतो असें विचारलें असतां त्याव जो अनुमत देतो अथवा निवारण करण्याविषयीं स्वत समर्थ असतांही मौनाश्रय करून जो उगीच बसतो त्यास अनुमता अशी सज्ञा आहे ॥ ४ ॥ उपदेश करण्यास योग्य दुसऱ्याच्या नाशा विषयीं प्रवृत्त झालेल्या अशा मनुष्यास मारण्या विषयीं क्रोधादिक जो उत्पन्न करितो त्यास निमित्त अशी सज्ञा आहे ॥ ५ ॥ प्रयोजकादिकांस क्रमानें पाद. पाद. न्यून प्रायश्चित्त शूळ पाणीनें सांगितलें आहे. ॥ ४८ ॥ गोवधाचें ठायीं वपन करण्यास सांगितलें आहे. वपन न करिता प्रायश्चित्त करण्याची इच्छा असल्यास दुप्पट प्रायश्चित्त आचरण करावें त्यास वचन केशाच्या रक्षणाची इच्छा असल्यास द्विगुण व्रताचरण करावें, जेथें द्विगुण व्रत करण्यास सांगितलें आहे तेथें दक्षिणा ही द्विगुणीत द्यावी ॥ ४९ ॥ ज्या प्रायश्चित्ताचें ठायीं द्विगुणीत

दान केलें नाहीं आणि वपन न करितां केश तसेंच ठेविलें तर त्या मनुष्याचें पाप तसेंच राहातें सबब तो मनुष्य नरकास जाईल ॥ ५० ॥

## स्त्रियांनीं गोवधादिक पातक केलें असतां विचार.

जें कांहीं पातक करावें तें सर्व पातक केशाचें ठायीं राहातें यामुळें प्रायश्चित्तारंभीं केशांचें मुंडण करण्यास सांगितलें आहे. परंतु सुवासिनी स्त्रियाचें सर्व केश मुंडण न करितां सर्व केश एके ठिकाणी करून पुढील दोन बोटें केशाचें छेदन करावें. ॥ ५१ ॥ या प्रमाणें स्त्रियाचें आणि मुलीचे केशाचें मुंडण करावें असें सांगितलें आहे सबब स्त्रियाचे सर्व केशाचें वपन करू नये ॥ ५२ ॥ स्त्रियानीं दुसरीकडे घर सोडून शयन करू नये. व वसू नये आणि गोठ्यांत निजू नये व दिवसा गाईच्या पाठी मागून नदी कडे, संगम मार्गी व अरण्या मध्यें जाऊं नये ॥ ५३ ॥ स्त्रियानीं गाईचें कातडें धारण करूनये या खेरीज गोवधा बद्दल जें प्रायश्चित्त सांगितलें असेल तें करावें ॥ ५४ ॥ त्रिकाळीं स्नान, देवता पूजन करावें. स्त्रियांनीं बंधू वर्गा मध्यें राहून कृच्छ्र चांद्रायणादि व्रताचरण करावें. ॥ ५५ ॥ घरा मध्यें निरंतर राहून शुचिर्भूत असें होऊन नियमा चरण करावें. विधवा स्त्रियानीं मुंडण करावें या लोकीं जो गाईचा वध करून तें पाप तसेंच झाकून ठेवितो तो मनुष्य भयंकर काळसूत्र या नावाच्या नरकास निःसंशय जाईल ॥ ५६ ॥ त्या पातकाचा उपभोग झाल्या नंतर त्या नरक पासून या मनुष्य लोकाचें ठायीं त्यास सात जन्म पर्यंत नपुंसकाचा, तसेंच दुःखयुक्त, कुष्ठ रोगानें युक्त असा जन्म प्राप्त होतो ॥५७॥ यास्तव मनुष्यानें आपलें जें पातक असेल तें प्रसिद्ध करावें आणि त्या बद्दलचें प्रायश्चित्त घेऊन निरंतर स्वधर्मा चरण करावें. स्त्रिया, बालक, चाकर, ब्राह्मण यांचें ठायीं अत्यंत कोप करू नये ॥ ५८ ॥ या प्रमाणें गोवध प्रायश्चित्ताचा निर्णय जाणावा.

## अथ अन्येषामुपपातकानां प्रायश्चित्तनिर्णयः

तत्र याज्ञवल्क्यः ॥ उपपातकशुद्धिःस्यादेवंचांद्रायणेनवा ॥ पयसावापिमासेनपराकेणाथवापुनः ॥ १ ॥ एवमुक्तेनगोवधव्रतेनमासपंचगव्यपानेनमासमाजापत्याभ्यासेनवामासमतिकृच्छ्रेणवात्रिरात्रोपवासपूर्वकदशगोसहितवृषभदानेन ॥ २ ॥ अन्येषांव्रात्यादीनामुपपातकानांशुद्धिर्भवेत् ॥ चांद्रायणेनवावक्ष्यमाणलक्षणेनमासपयोव्रतेनवापराकेणशुद्धिर्भवेत् ॥ अत्रातिदेशसामर्थ्याद्गोचर्मवसनगोपरिचर्यादिभिर्गोवधासाधारणैःकतिपयैर्न्यूनत्वमवगम्यते ॥ ३ ॥ एतच्चव्रतचतुष्टयमकामकारेशक्त्यपेक्षयाविकल्पितद्रष्टव्यम् ॥ कामकारेतुएतदेवव्रतंकुर्युरुपपातकिनोद्विजाः ॥ अवकीर्णावर्जंशुद्ध्यर्थंचांद्रायणमथापिवेतिति [illegible] न्कत्रैमासिकद्रष्टव्यम् ॥ ४ ॥ अतएववचनादुपप्रायश्चि

त्तातिदेशःसर्वेषामुपपातकगणपठितानामुक्तप्रायश्चित्तानांचावकीर्णिवर्जितानामविशेषेण वेदितव्यः ॥ ५ ॥

आतां गोवधाहून अन्य जीं उप पातकें त्यांच्या प्रायश्चित्तांचा निर्णय सांगतो. याज्ञवल्क्याचें वचन एव या प्रमाणें जे लागितलेलें गोवध प्रायश्चित्त याच्या योगानें ह्मणजे महिना भर पर्यंत प्राजापत्या चरणानें, किंवा मासपर्यंत अति कृच्छ्र प्रायश्चित्ता चरणानें, अथवा तीन दिवस उपोषण करून एक वृषभ आणि दाहा गायी याचे ब्राह्मणास दान केल्यानें अन्य उपपातका पासून शुद्धता होते ॥ २ ॥ या प्रमाणें चाद्रायण व्रता चरणानें अथवा महिना भर पर्यंत दूध पीऊन राहिल्यानें किंवा पराक ह्मणजे बारा दिवस उपोषण केल्यानें उपपातका पासून शुद्धता होते ॥ येथें उपपातक प्रायश्चित्तास गोवधप्रायश्चित्ताचा अतिदेश सांगितला आहे. ह्मणजे गोवध प्रायश्चित्ता चरणानें उपपातकांचा नाश होतो असें सांगितलें आहे. परंतु गोवध प्रायश्चित्ताचें ठायीं गाईचें चर्म धारण करणें व अरण्यात गाई बरोबर जाणें गाईच्या गोठ्यांत निजणें इत्यादिक जे प्रकार आहेत ते येथें करणें नको ॥ ३ ॥ हीं जीं उप पातकास चार व्रताचरणें सांगितलीं तीं अज्ञानानें पातक घडलें असता, अथवा व्रताचरणाविषयीं अशक्त इत्यादिकांचा विचार करून व्रताचा विकल्प जाणावा. इच्छेनें पातक केलें असता उपपातकी द्विज, ( ब्राह्मण क्षत्रिय, वैश्य, ) यानीं हेंच व्रत आचरण करावें. अथवा चांद्रायण प्रायश्चित्त करावें. किंवा मनूनें सांगितलेलें त्रैमासिक व्रताचरण करावें. परंतु अवकीर्णी ह्मणजे ज्यानें व्रत सोडलें आहे. त्याच्या पातकाची गणना उपपातकांत जरी आहे तरी त्यानें हें प्रायश्चित्त न करितां अवकीर्णी प्रकरणात जें प्रायश्चित्त सांगितलें आहे तें करावें ॥ ४ ॥ याच वचनामुळें ह्याजो प्रायश्चित्ताचा अति देश केला तो सर्व उपपातक गणामध्यें सांगितलेलीं जीं प्रायश्चित्तें त्यास चाद्रायणादि जीं प्रायश्चित्तें त्याच्या अविशेषानें आचरण केल्यानें शुद्धता जाणावी ॥ ५ ॥

## अथ व्रात्यप्रायश्चित्तनिर्णयः ॥ २ ॥

तत्र व्रात्यानाहमनुः ॥ द्विजातयःसवर्णासुजनयंत्यव्रतांस्तुयान् ॥ तान्सावित्रीपरिभ्रष्टान्व्रात्यानितिविनिर्दिशेत् ॥ १ ॥ यथाविध्युपनयनाभावोव्रात्यत्वं ॥ गौणकालेपिउपनयनाकरणेव्रात्यप्रायश्चित्तकृत्वोपनयनंकार्यं ॥ तत्रमुख्यकालोमनुनादर्शितः ॥ गर्भाष्टमेऽब्देकुर्वीतब्राह्मणस्योपनायन ॥ गर्भादेकादशेराज्ञोगर्भात्तुद्वादशेविश ॥ १ ॥ गौणकालमाहयाज्ञवल्क्यः ॥ आषोडशाद्द्वाविंशाच्चतुर्विंशाच्चवत्सरात् ॥ ब्रह्मक्षत्रावशांकालोह्युपनायनिकःस्मृतः ॥ २ ॥ अतऊर्ध्वंत्रयोप्येतेयथाकालमसंस्कृताः ॥ सावित्रीपतिताव्रात्याभवत्यार्यविगर्हिताः ॥ ३ ॥ ज्योतिर्निबंधे ॥ अग्रजाबाहुजावैश्याःस्वावधेरूर्ध्वमव्रतः ॥ अकृतोपनया-सर्वेवृषलाएवतेस्मृताः ॥ ४ ॥ अत्रयमेनोक्तं ॥

सावित्रीपतितायस्यदशवर्षाणिपंचच ॥ सशिखंवपनंकृत्वाव्रतंकुर्यात्समाहितः ॥ ५ ॥ एकविंशतिरात्रंचपिबेत्प्रसृतियावकम् ॥ हविष्यंभोजयित्वैवंब्राह्मणान्सप्तपंचच ॥ ततोयावकशुद्धस्यतस्योपनयनंस्मृतं ॥ ६ ॥ यस्यषोडशादिवर्षादूर्ध्वमप्यनापदिब्रुष्यातदतिक्रमस्तेनमासद्वयंयावकपानंमासंपयोमासार्द्धमामीक्षाष्टरात्रंघृतंषड्रात्रमयाचितंत्रिरात्रमम्भक्षताअहोरात्रमुपवासइत्युद्दालकव्रतंकार्यम् ॥ ततोमौंजिबंधनंकार्यं ॥७॥ यस्यपितृपितामहावनुपनितौतस्यसंवत्सरभैक्ष्याशनगुरुशुश्रुषादिब्रम्हचर्यंव्रतम्॥ ततउपनयनं ॥ ८ ॥ ततोयावत्तांपुरुषाणांउपनयनंतावत्संख्याकवर्षपर्यंतंप्रायश्चित्तार्थंपदतियच्चदूरकइत्यादिसप्तपावमानीभिःयेनदेवाःपवित्रेणेतियज्ञपवित्राख्येनकयानश्चित्रआभुवइतिसामपवित्राख्येनहंसःशुचिषदित्यनेनेत्यंतेमंत्रैःस्नानंततोध्याप्यता ॥ ९ ॥ यस्यतुप्रपितामहादीनामुपनयनंनानुस्मर्यंते ॥ तस्यद्वादशवार्षिकं पूर्वोक्तंब्रह्मचर्यम् ॥ ततउपनयनम् ॥ १० ॥ ततःपुरुषसंख्यांकाब्दमुक्तमंत्रैःस्नानम् ॥ तदनंतरमप्यस्यगार्हस्थ्यमात्रोपदेशोनाध्यापनंनापिव्यवहारः॥तज्जन्यस्यतुस्वकालातिक्रमप्रायश्चित्तमात्रंकृत्वायथाकालमष्टमादिवर्षेसंस्कारः॥अस्याध्ययनादिकं भवति ॥ ११ ॥ इतिव्रात्यप्रायश्चित्तनिर्णयः॥

## आतां व्रात्य प्रायश्चित्ताचा निर्णय.

सातूचें पीठ भक्षण करून रहावें. मास भर दूध पीऊन रहावें १५ दिवस पर्यंत ( आमीक्षा ) ऊन दुधात दहि घातल्याने जे नासल्या प्रमाणें होतें ) तें भक्षण करून रहावें. आठ दिवस पर्यंत घृत प्राशन; सहा दिवस पर्यंत अयाचित तीन दिवस पर्यंत पाणी पीऊन राहणें आणि एक दिवस उपवास करणें यास उद्दालक व्रत असे म्हणतात. हें व्रत करून नतर मौंजी बंधन करावें ॥ ७ ॥ ज्याचे पिता आणि पितामह म्हणजे बाप आणि आजा या उभयताचें मौंजी बंधन झालें नाहीं त्या मुलाचें मौंजी बंधन करावयाचें असतां त्यानें वर्षभर पर्यंत भिक्षा मागणें, गुरु शुश्रुषा इत्यादिक ब्रम्हचर्य व्रत करावें. नतर त्याचें मौंजी बंधन करावें ॥ ८ ॥ नतर जितक्या पुरुषांचें उपनयन झालें नसेल तितके वर्षे पर्यंत प्रायश्चित्ता करिता ( यदंतियच्च दूरक इत्यादि सत्त पावमानीभिःयेन देवा पवित्रेणेतियेन पवित्राह्लेन कयानश्चित्र आभुव इति साव पानिशाद्येन हसः शुचिषदित्यनेनेत्येत्रेमंत्रैः ) हें जें लिहिलेले मंत्र या मंत्रानीं प्रति दिवशीं तितके वर्षे त्यास स्नान घालून नतर त्यास अध्ययन सागावें. ज्याचे पणज्यादिकाचें उपनयन केलेलें आठवत नसेल त्याज कडून बारा वर्षे पर्यंत पूर्वोक्त ब्रम्हचर्य करवून नंतर उपनयन करावें. जितके पुरुषाचें उपनयन झालें नसेल तितकी वर्षे पर्यंत वर सांगितलेल्या मंत्रानें स्नान करावें. नतर त्यास गृहस्थाश्रम करण्यास उपदेश करावा. याच्याशीं वेदाध्ययनादि व्यवहार करवूं नये. या पासून झालेल्या मुलास कालातिक्रम प्रायश्चित्त करवून यथा कालीं अष्टमादि वर्षी उपनयन करावें. नतर त्यास अध्ययनादिक सांगावें ॥ ११ ॥ या प्रमाणे व्रात्य प्रायश्चित्ताचा निर्णय आहे. ॥

## अथ स्तेयप्रायश्चित्तनिर्णयः ॥ ३ ॥

तत्रधान्यादिचौर्येमनुः ॥ धान्यान्नधनचौर्याणिकृत्वाकामाद्द्विजोत्तमः ॥ स्वजाती यगृहादेवकृच्छ्राब्देनविशुध्यति ॥ १ ॥ धनंसुवर्णादिअन्यत्सारद्रव्यंद्विजोत्तमोविप्र स्तस्यस्वजातिर्विप्रएवएतच्चब्राह्मणपरिगृहीतधान्याद्यपहर्तुर्ब्राह्मणस्यैवक्षत्रियादीनांस्व स्वजातीयसम्बन्धिधान्याद्यपहरणेयथोक्तक्रमेणपादोनमर्द्धपादश्चेतिकल्प्यं ॥ ब्राह्मणे नक्षत्रियादिपरिगृहितधान्याद्यपहारेपाण्मासिकंमनुक्तंत्रैमासिकगोवधव्रतंचांद्रायणंचक ल्पनीयंतत्रगोवधव्रतंतुगोचर्मगोसेवादितद्विशेषरहितंकार्यं ॥ ३ ॥ क्षत्रियेणवैश्यादिधा न्यापहारेपाण्मासिकंत्रैमासिकंचवैश्येनशूद्रपरिगृहीतापहारेत्रैमासिकमितिकल्प्यं ॥ ४ ॥ इदंचकामकृतेअकामकृतेतुशक्त्याद्यपेक्षयार्द्धंत्रैमासिकंगोवधव्रतंवापरिकल्पनीयं ॥ ५ ॥ धान्यंदशभ्यःकुंभेभ्योहरतोप्यधिकंवधइतिदशकुंभाधिकहरणेयाज्ञवल्क्येवधदर्शनाद्दशकु भपरिमितधान्यहरणेयत्तत्प्रायश्चित्तंवेदितव्यंधान्यसाहचर्यादन्नस्यतंडुलादेरप्येवमेव दशकुंभपरिमितधान्यमूल्यलभ्येरजतादिधनेप्येवमेव ॥ ६ ॥ कुंभश्चपंचसहस्रपलपरिमाणः इतिस्मृत्यर्थसारेउक्तम् ॥ अन्यत्रकुंभपरिमाणंतु ॥ अष्टमुष्टीभवेत्किंचित्किंचिदष्टौचपुष्क

लम् ॥ पुष्कलानिचचत्वारिआढकःपरिकीर्तितः ॥ आढकानिचचत्वारिद्रोणइत्यभिधीयते ॥ दशद्रोणाभवेत्खारीकुंभोपिद्रोणविंशतिरिति ॥ ७ ॥ इतिप्रायश्चित्तेंदुशेखरकारेणोक्तं॥प्रायश्चित्तमयूखेकात्यायनवचनंदशद्रोणाभवेत्खारीकुंभोपिद्रोणविंशतिरिति द्रोणस्तुपलंचकुडवःप्रस्थआढकोद्रोणएवच ॥ धान्यमानेषुविज्ञेयाःक्रमशोमीचतुर्गुणाइत्येवंक्रमाद्ज्ञेयाः ॥ ८ ॥ अल्पसाराणांत्रपुसीसकादीनांहरणेमनुः ॥ द्रव्याणामल्पसाराणांस्तेयंकृत्वान्यवेश्मनः ॥ चरेत्सांतपनंकृच्छ्रंतंनिरयस्यात्मशुद्धये ॥ इतिएतच्चपंचविंशतिपणमूल्यलभ्यत्रपुसीसाद्यपहारे ॥ ९ ॥ तथाभक्ष्यभोज्यापहारणेयानशय्यासनस्यच ॥ पुष्पमूलफलानांचपंचगव्यंविशोधनम् ॥ १० ॥ एककालभोजनपर्याप्तभक्ष्यभोज्यापहारेएतद्द्विवारभोजनपर्याप्तहरणेतुपैठीनस्युक्तत्रिरात्रंभक्ष्यभोज्यान्नस्योदरपूरणमात्रस्यहरणेत्रिरात्रमेकरात्रंवापंचगव्याहारंचेति ॥ एकरात्रपंचगव्याहारस्यपूर्वोक्तविषयःभक्ष्यादिसाहचर्य्याद्यानादीनामपि ॥ तावन्मूल्यलभ्यानामेवहरणेएकरात्रादिकंएकरात्रभोजनपर्याप्तभक्ष्यादित्रिगुणमूल्यलभ्यतृणकाष्ठादिहरणेत्रिरात्रं॥अनेनैवाभिप्रायेणमनुः ॥ ११ ॥ तृणकाष्ठद्रुमाणांचशुष्कान्नस्यगुडस्यच ॥ चैलचर्मामिषाणांचत्रिरात्रंस्यादभोजनम् ॥ १२ ॥ तथामणिमुक्ताद्यपहारेसएव ॥ मणिमुक्ताप्रवालानांताम्रस्यरजतस्यच ॥ अयःकांस्योपलानांचद्वादशाहंकणान्नता ॥ १३ ॥ भक्ष्यादित्रिगुणमूल्यकार्पासादिहरणेपिसएव ॥ कार्पासकीटजोर्णानांद्विखुरैकखुरस्यच ॥ पक्षिगंधौषधीनांचरज्ज्वाश्चैवत्र्यहंपयः ॥ १४ ॥ एवमन्यत्रापियोजनीयंमनुष्याणांचहरणेस्त्रीणांक्षेत्रगृहस्यच ॥ कूपवापीजलानांचशुद्धिःचांद्रायणेनतु ॥ एतच्चक्षत्रियादिमनुष्यापहारे ॥ निरपेक्ष्यस्यापहरणेनराश्वरजतस्यच ॥ भूमिवस्त्रमणीनांचरुक्मस्तेयसमंस्मृतम् ॥ इत्यत्रब्राह्मणसंबन्धिमनुष्याद्यपहरणस्यसुवर्णस्तेयसमत्वेनोक्तत्वात्वापीकूपजलानांचइत्यत्रकूपवापीभ्यांजलंविशेषणंघटादिजलव्यावृत्त्यर्थंतेनसजलवापीकूपाहारेप्रायश्चित्तमिदमितिस्यपरार्केसार्द्धशतद्वयपललभ्यजलापहारइदंचान्द्रायणंनियम्यतइति ॥ १५ ॥ देवद्रव्यापहारेष्वमंतुः ॥ देवद्विजद्रव्यहर्त्ताप्सुनिमग्नोघमर्षणमावर्त्तयेदिति ॥ अत्रसंवत्सरप्रक्रमात्तावत्कालीनावृत्तिर्ज्ञेया ॥ स्तेयप्रसंगात्वृत्त्युच्छेदेप्रायश्चित्तमाहशंखः ॥ यस्ययस्यतुवर्णस्यवृत्त्युच्छेदंसमाचरेत् ॥ तस्यतस्यवधेप्रोक्तंप्रायश्चित्तंसमाचरेत् ॥ १६ ॥ अपहृत्यतुवर्णानांविप्रोभूमिंप्रमादतः ॥ प्रायश्चित्तंवधेप्रोक्तंब्राह्मणानांचरेदिति ॥ १७ ॥ एतच्चवृत्त्यहंभूम्यपहारेज्ञेयं ॥ अत्रचापहारशब्दस्यबलाज्ञानपूर्वंपरस्वादानवाचित्वात्प्रमादतइति ॥ अत्रसर्वत्रसदृद्भ्यासद्रव्याल्पत्वमहत्वेदेशकालस्वाम्यपहर्तृगुणवैगुण्याद्यपेक्ष्यप्रायश्चित्तगुरुलघुताज्ञेया ॥ १८ ॥ इदंचस्तेयप्रायश्चित्तमपहृतद्रव्यप्रदानोत्तरकालमेवकार्यं ॥ तथाच ॥ दत्त्वैवापहृतंद्रव्यंधनिकस्याप्युपायतः ॥ प्रायश्चित्तंततःकुर्यात्कल्मषस्यापनुत्तये ॥ १९ ॥ स्तेयापवादमाहशंखः ॥ अस्तेयमग्न्यैकाष्टमस्तेयंचतृणंगवे ॥ कन्याहरणमस्तेयंपंथोहरत्यनलंकृतामिति ॥ कन्याहरणंराक्षसविवाहपरं

मनुरपिद्विजोप्यगःक्षीणवृत्तिर्द्वाविक्षुद्वेचमूलके ।। आददानःपरक्षेत्रान्नदंडदातुमर्हति ॥ २१ ॥ तथाचणकव्रीहिगोधूमयवानांमुद्गमाषयोः ॥ अनिवार्योगृहीतव्योमुष्टिरेकः पथिस्थितैः ॥ २२ ॥ तथैवसप्तमभक्तेभक्तानिषडनश्नता ॥ अश्वस्तनविधानेनहर्तव्यं हीनकर्मणाइति ॥ २३ ॥ ॥ इतिस्तेयप्रायश्चित्तनिर्णयः ॥

## आतां चौर्य प्रायश्चित्ताचा विचार सांगतों.

धान्यादिकाची चोरी केली असतां मनुचें वचन. धान्य, अन्न धन हे ब्राह्मणाच्या घरातून चोरून नेलें असता अर्ध कृच्छ्र प्रायश्चित्तानें शुद्धता होते. ॥ १ ॥ येथें धन शब्दानें सोन्याहून अन्य सार द्रव्य घ्यावयाचें आहे. मुळ वचनात द्विजोत्तम शब्द आहे. तेथें द्विजशब्दानें ब्राह्मण, क्षत्रिय, वैश्य, यांचे ग्रहण जरी होत आहे. तरी ब्राह्मण येवढाच घ्याना. क्षत्रीय वैश्यानें वरील पदार्थांची चोरी केली असता ब्राह्मणाहून पादोन पादोन प्रायश्चित्त सांगितलें आहे. ॥ २ ॥ ब्राह्मणानें क्षत्रियादिकाचें धान्य, अन्न धन याची चोरी केली असतां षाण्मासीक अथवा मनुनें सांगितलेले त्रैमासिक गोवध प्रायश्चित्त अथवा चांद्रायण प्रायश्चित्त केल्यानें शुद्धता होते. ॥ ३ ॥ क्षत्रीयानें वैश्यादिकाचें धान्यादिकाची चोरी केली असतां षाण्मासिक अथवा त्रैमासिक प्रायश्चित्त करावें वैश्यानीं शूद्रादिकाच्या धान्याची चोरी केली असतां त्रैमासिक व्रता चरण करावें. ॥ ४ ॥ येथे गोवध प्रायश्चित्ताचे वेळीं गोचर्म धारण गोसेवा इत्यादिकनिशेषानें रहित असें प्रायश्चित्ता चरण इच्छेनें चौर्य केलें असतां प्रायश्चित्त आहे. सहज रीतीनें झालें असतां सामर्थ्यादि पाहून त्रैमासिक गोवध व्रत प्रायश्चित्त सांगावें ॥ ५ ॥ चौर्य कर्माचें ठायीं धान्य दाहा १० कुंभापेक्षा अधीक असेल तर त्यास वध रूप प्रायश्चित्त सांगितलें आहे. येथें धान्य साहचर्या मुळें अन्न शब्दानें तांदूळ वगैरे याचेही ग्रहण आहे. दश कुंभा पेक्षां अधिक प्रमाणाची चोरी केली असतां वधादिक प्रायश्चित्त जाणावें. दश कुंभ परिमित जें धान्य तितक्या किंमतीचें रुपें वगैरे चोरलें असतां हेंच प्रायश्चित्त जाणावें. ॥ ६ ॥ कुंभ शब्दाचा अर्थ वीस हजार तोळे असें स्मृत्यर्थ सारांत सांगितलें आहे. दुसरीकडे कुंभ शब्दाचें प्रमाण लिहिलें तें असें. आठ मुठी धान्य झालें असतां त्यास किंचित ह्मणजे कोळवें अशी सज्ञा आहे. आठ किंचित ( कोळवी ) झाली असता १ पुष्कळ ( शेर ) होतो चार पुष्कळ ह्मणजे १ आढक ( पायली ) चार आढक झाले असतां एक द्रोण ( चोव्रा ) होतो. दहा द्रोण झाले असतां १ खारी ( पल्ला ) वीस द्रोण झाले असतां १ कुंभ होतो असें प्रायश्चित्तें न्दुशेखरांत सांगितलें आहे. ॥ ७ ॥ प्रायश्चित्त मयूखा मध्यें कात्यायनाचें असें वचन आहे कीं, १० द्रोणाची १ खारी २० द्रोणाचा कुंभ एक पळ, कुडव, प्रस्थ आढक, द्रोण हे धान्य मानाचे ठायीं क्रमानें चौपट चौपट जाणावें. ॥ ८ ॥ अल्प आहे सार याचें असें शिसे, कथील इत्यादिक चोरले असतां मनूनें प्रायश्चित्त सांगितलें आहे. दुसऱ्याच्या घरातून कथील शिसें

इत्यादिक चोरलें असतां सांतपन प्रायश्चित्तानें शुद्धता होते. येथें फर्थील शिर्से २५ पैसे किंमतीचे चोरलें असतांचें हें प्रायश्चित्त आहे. ॥ ९ ॥ भक्ष्य पदार्थ, भोज्य पदार्थ, शय्या, आसन, वाहन, पुष्प, फळें, मुळें, इत्यादिक चोरलें असतां पंचगव्य प्राशनानें शुद्धता सांगितली आहे. ॥ १० ॥ हे एक काळी भोजनास पुरे होणारे भक्ष्य भोज्य हरण केलें असतांचें प्रायश्चित्त आहे. दोन २ वेळा भोजनास पुरे होणारे असें हरण केले असतां त्रिरात्र पंचगव्य प्राशन रूप उपोषणें सांगितली आहेत. भक्ष्यादि शब्दाच्या साहचर्यानें वाहनादि तितक्या किंमतीचे असतां हें प्रायश्चित्त जाणावें. ॥ ११ ॥ मनूचें वचन तृण काष्ट, झाडें, सुकलेले अन्न, वस्त्र, गूळ कातडें, आमिष, हे हरण केले असतां त्रिरात्र उपोषण सांगितलें आहे. ॥ १२॥ मणी, मोती, पोवळें, तांबें, लोखंड, कासें, रुपें पाषाण हे हरण केलें असतां १२ दिवस पर्यंत धान्याचे कण खाऊन राहिल्यानें शुद्धता होते॥ १३॥ भक्ष्यादिकाच्या तिप्पट किंमतीचें कापूस वगैरे हरण केलें असतां प्रायश्चित्त कार्पास वस्त्रें रेशमी वस्त्रें, दोन खुराची जनावरें गाय इत्यादिक तशीच १ खुराची जनावरें घोडी इत्यादिक पक्षी सुगंध येणाऱ्या औषधी, चंदनादि, दोरी हे हरण केलें असतां तीन दिवस दूध प्राशन करून राहिल्यानें शुद्धता होते. ॥ १४ ॥ या प्रमाणें अन्य वस्तुच्या चौर्याचे ठायीं हीं प्रायश्चित्तें जाणावीं मनुष्य स्त्रिया, शेत, घर, विहीर, आड ही हरण केली असतां चांद्रायण प्रायश्चित्तानें शुद्धता होते. येथें विहीर शब्दानें विहिरींतील पाणी हजार तोळे घेतलें असतांचे आहे. ॥ १५ ॥ देवांचें द्रव्य हरण केलें असतां सुमतुचें वचन देव, ब्राम्हणयांचे द्रव्य हरण केलें असतां पाण्यांत बुडून अघमर्षण केल्यानें शुद्धता होत. वृत्युच्छेद केला असतां प्रायश्चित्त शंख स्मृतीचें वचन ज्या ज्या जातीच्या मनुष्याच्या वृत्तीचें हरण केलें असेल त्या त्या वर्णाचा वध केल्याचें प्रायश्चित्त आचरण करावें. ॥ १६ ॥ कोणत्याही जातीच्या मनुष्याची भूमी हरण केली असतां ब्रह्मवधाचें प्रायश्चित्त केल्यानें शुद्धता होते ॥ १७ ॥ येथें सर्व प्रकरणा मध्यें १ वेळा चोरी करणें किंवा निरंतर चोरी करणें किंवा द्रव्याचें अल्पत्व महत्व देश, काळ, इत्यादि सर्व विचार करून न्यूनाधिक प्रायश्चित्त जाणावें. ॥ १८ ॥ हें जें चोरीच्या संबंधानें प्रायश्चित्त सांगितलें ते सर्व चोरलेले द्रव्य ज्याच्या मालकीचें असेल त्यास देऊन नंतर करावें. त्यास वचन हरण केलेले द्रव्य स्वामी यास देऊन नंतर प्रायश्चित्त आपलें पातक नाश होण्याकरितां करावें. ॥ १९ ॥ कांहीं पदार्थ घेतलें असतां चोरी होत नाहीं. यास शंख स्मृतींतील वचन अग्नि करितां काष्ट, गाई करितां गवत जिच्या अंगावर दागिनें नाहींत अशी मुलगी लग्न करण्या करितां हरण केली असतां चौर्य होत नाही. हें कन्या हरण राक्षसविवाह संबंधाचें आहे. ॥ २० ॥ मनूचें वचन वाट चालणारा उपोषित असा ब्राम्हणानें दुसऱ्याच्या शेतांतून दोन ऊंस अथवा दोन रानाळें घेतली असतां त्यास त्यानें दंड करूं नये ओला हरभरा, साळी, गहूं, सातू, मूग उडीद, हे ओले शेतांत असलेले मूठभर दोनसनें घेतलें असतां चोरी होत नाही दिवसाचे सातवें भागाचे ठायीं उपो-

पीत असणाऱ्याने अन्यत्र मिळण्याचा संभव नसोन शिजलेलें अन्न पोटभर घेतलें असतां चौर्य होत नाहीं. ॥ २३ ॥ या प्रमाणें चोर्यप्रायश्चित्ताचा निर्णय जाणावा ॥

## ॥ अथ ऋणानपाकरणप्रायश्चित्तनिर्णयः ॥ ४ ॥

तत्र ऋणं द्विविधं लौकिकं वैदिकं च लौकिकंआत्मपितृपितामहादिभिरुत्तमर्णात् गृहीतंतस्यानपाकरणं ॥ वैदिकं तु जायमानो ब्राह्मणस्त्रिभिः ऋणैर्ऋणवान् जायते यज्ञेन देवेभ्यः प्रजया पितृभ्यो ब्रह्मचर्य्येण ऋषिभ्य इति श्रुतेश्च चतुर्धर्णं भवति॥१॥ एतस्यानपाकरणे तु उपपातकसामान्योक्तचांद्रादिष्वेकं शक्त्या कार्यं सर्वथा तद‑संभवे वर्षांते वैश्वानरेष्टिः कार्या ॥ सा च सत्याधानादिना तदधिकारे तदकरणे प्रतिवर्षं कार्या ॥ उत्तमर्णार्णादाने तु कालविलंबादिप्रयुक्तमेतचांद्रायणान्यतमं प्राय‑श्चित्तमुत्तमर्णाय तद्धनं दत्वा कार्यं सति धने ॥ २ ॥

## आतां ऋण न फेडल्याचें प्रायश्चित्त सांगतों ॥ ४ ॥

ऋण दोन प्रकारचें आहे तें असें. लौकीक आणि वैदीक लौकीक ह्मणजे आपण अथवा आपला बाप, आजा, पणजा, यानीं सावकारा पासून घेतलेलें कर्ज तें न देणें. व वैदीक ह्मणजे जन्मास आलेला जो ब्राह्मण त्यास तीन प्राकरचीं ऋणें असतात. तीं अशीं. १ यज्ञ करणें तें देवाचें ऋण २ प्रजा उत्पन्न करणें तें पितृऋण. ब्रह्मचर्यानें राहणें तें ऋषींचें ऋण या प्रमाणें चार प्रकारचीं ऋणें आहेत ॥ १ ॥ तीं दूर न केलीं असतां उपपातक दूर करण्यास सामान्यें करून सांगितलेलीं हीं चांद्रायणादि प्रायश्चित्तें त्यांतील एक प्रायश्चित्त शक्तीनें करावें; सर्व प्रकारानें तें होण्यास असंभव असल्यास वर्षांतीं वैश्वानरेष्टी करावी. सावकारा पासून घेतलेलें ऋण फेडलें नसेल तर कालविलंब जसा झाला असेल त्या मानानें चांद्रायणादिकांतील एक प्रायश्चित्त धनिकास घेतलेलें द्रव्य देऊन आचरण करावें. ॥ २ ॥

## ॥ अथानाहिताग्निप्रायश्चित्तम् ॥ ५ ॥

सा च सत्यधिकारेऽग्न्याधानाभावः अत्र सामान्येनोपपातकव्रतचतुष्टयमापदि संव‑त्सरादूर्ध्वं शक्त्यपेक्षयायोज्यम् ॥ अनापदि तु मानवं त्रैमासिकं ॥ १ ॥ अपूर्णे वत्सरे कार्ष्णाजिनिर्विशेषमाह ॥ काले त्वाधाय कर्माणि कुर्योद्विप्रो विधानतः ॥ तदकुर्वंस्त्रिरात्रेण मासिमासि विशुद्ध्यति ॥ २ ॥ दारकाले दायाद्यकाले चेत्याद्युक्तेः काले विप्रोऽग्निमाधाय नित्यानिकुर्यादितिविधिः ॥ अग्न्याधानमकुर्वन्मासि मासि त्रिरात्रव्रतेन शुद्ध्यति॥अनाहिताग्नौ पित्रादौ यक्ष्यमाणःसुतो यदि ॥ सहि व्रात्येन विधिना यजेत्तन्निष्क्रियाय त्विति॥३॥ एकाग्नेरविशेषस्तेनैवोक्तः ॥ एकाग्निरावसथ्या धाता ॥ कृतदारो गृहे ज्येष्ठोयो नादद्याद्उपासनम् ॥ चांद्रायणं चरेद्वर्षंप्रतिमासमहो पिवा ॥ ५ ॥ व्रात्येन क्रियमाणो व्रात्येन वा निमित्तेन विद्विवःपथरिति वैद्यधिक‑

रणेनान्वयः ॥ अत्र व्रात्यो यथाकालेऽनुपनीतो न गृह्यते तत्र व्रात्यस्तोमाख्यसोमयागविशेषस्यैव विधानात् किंतु यस्यपितापितामहोवा सोमं न पिबेत्स व्रात्य इति वाक्योक्तोगृह्यते ॥ ५ ॥ वर्षातिक्रमे चांद्रायणम् मासातिक्रमेऽहरुपवासः ॥ श्रौतस्मार्ताग्न्याधानाभावइदं प्रायश्चित्तं ॥ गृहितस्य नास्तिक्यादिवशात्परित्यागे धर्मकृत्यादिषु विशेषोऽभिहितः ॥ व्याघ्रपादः मासमेकंचयो वह्नि त्यजेदेवं समाचरेत् ॥ नास्तिक्यात् कृच्छ्रमेकं तु होमद्रव्य ददाति च ॥ ६ ॥ तथा योऽग्निं त्यजति नास्तिक्यात्प्राजापत्यं चरेद्विजः ॥ अन्यत्र पुनराधानमुपदिष्ट मनीषिभिः ॥ ७ ॥ मासचतुष्टयमाभिव्याप्याग्निपरित्यागे त्वतिकृच्छ्रः॥ तथा स एव ॥ चतुष्टये तु संपूर्णे मासानां तु हुताशनम् ॥ त्यक्त्वा तु कृच्छ्रं कुर्वीत ततः पापात्प्रमुच्यते ॥ ८ ॥ षण्मासपर्य्यन्तं पराकः अत ऊर्द्ध्वमब्दद्वयपर्य्यंत पयोव्रतम् ॥ यथाहोशनाः षण्मासंत्यजते यो वै पराकं स समाचरेत् ॥ ऊर्द्ध्वं पयोव्रतं कुर्यान्मासमेकं समाहितः ॥ ९ ॥ आलस्येन यदा वह्निं द्वादशाहं त्यजेत्प्रभो ॥ त्रिरात्रमुपवासं च चरेत्पापविशुद्धये ॥ १० ॥ प्रायश्चित्तं च होमद्रव्यं दत्वा कार्यं ॥ तथा च भारद्वाजगृह्ये यावत्कालमहोमी स्याद्यावद्द्रव्यमशेषतः ॥ तद्दात्रं चैव विप्रेभ्यो यथाहोमस्तथैवच ॥ ११ ॥

## आतां अग्निहोत्र न घेतल्यास प्रायश्चित्त सांगतों ॥ ५ ॥

अग्निहोत्र घेण्यास अधिकार असून न घेतलें असता उपपातकें दूर होण्यास जीं सामान्यें करून चांद्रायणादि चार प्रायश्चित्तें सांगितलीं. त्यांतील एक प्रायश्चित्त संवत्सरा नंतर शक्ति तारतम्यानें योजावें. आपत्काळ नसोन अग्निहोत्र घेतलें नसेल तर मनूनें त्रैमासिक प्रायश्चित्त सांगितलें आहे. ॥ १ ॥ वर्ष पूर्ण झालें नसतां या विषयीं कार्ष्णाजिनीनें विशेष सांगितला आहे. तो असा विवाह काळ अथवा विभाग काळ याकाळाचे ठायीं जो ब्राह्मण अग्नीचें आराधन करून विधीनें सांगितलेलीं कर्में करीत नाहीं. तो ब्राह्मण प्रत्येक महिन्याचे ठायीं त्रिरात्र उपोषण केल्यानें शुद्ध होतो. ॥ २ ॥ पिता अथवा वडील बंधू यांणीं अग्निहोत्र घेतलें नसेल आणि मुलगा जर अग्निहोत्र घेईल तर मुलानें पितराचा दोष जाण्या करितां व्रात्य निमित्तक सांगितलेला जो पशुयज्ञ त्याचें हवन करावें. ॥ ३ ॥ येथें व्रात्य शब्दाचा अर्थ यथाकालीं उपनयन न झालेला असा घ्यावयाचा नाहीं तर ज्याचा पिता अथवा पितामह यानें सोम प्राशन केलें नाहीं अथवा अग्निहोत्र ग्रहण केलें नसेल आणि पुत्रानें अग्नि होत्र ग्रहण केलें असतां त्यास व्रात्य ह्मणावें. तो येथें घ्यावयाचा आहे. ॥ ४ ॥ एकाग्नी विषयीं कार्ष्णाजिनीनें विशेष सांगितला आहे. लग्न झालें असतां आपण ज्येष्ठ असोन जो आवसथ्या अग्नी ग्रहण करीत नाहीं. त्यास प्रत्येक महिन्याचे ठायीं एक एक दिवस उपोषण सांगितलें आहे. वर्षातिक्रम झालें असतां चांद्रायण प्रायश्चित्त सांगितलें आहे. ॥ ५ ॥ हें प्रायश्चित्त श्रौत स्मार्त अग्नीचें ग्रहण न असतांचें आहे. अग्निहोत्र ग्रहण केलें असोन नास्तीक्यानें अग्निहोत्र

टाकिलें असतां धर्म कृत्यादि ग्रंथामध्यें विशेष सांगितला आहे. त्यास व्याघ्रपादाचें वचन. जो एक महिनाभर पर्यंत नास्तिक्याने अग्नित्याग करील त्यानें महिनाभर होमास लागणारें द्रव्य देऊन कृच्छ्र प्रायश्चित्त ग्रहण करावें. ॥ ६ ॥ आणि यास प्राजापत्य प्रायश्चित्त अन्यग्रंथामध्यें पुनराधान करण्यास सांगितलें आहे. ॥ ७ ॥ चार महिने पर्यंत अग्नी त्याग केला असतां अतिकृच्छ्र प्रायश्चित्त करावें. ॥ ८ ॥ सहा महिने पर्यंत त्याग केला असता १ महिनाभर पर्यंत दूध प्राशन करून रहावें. उशनाच्या वचनाचाही अर्थ असाच आहे. ॥ ९ ॥ आळसानें अग्नि टाकला असता अन्यस्मृतींत असें सांगितलें आहे कीं, आळसानें बारा दिवस अग्नि त्याग केला असतां तें पाप जाण्या करिता त्रिरात्र उपोषण करावें. ॥ १० ॥ जेथें प्रायश्चित्त करण्यास सांगितलें असेल तेथें होम द्रव्य देऊन नंतर प्रायश्चित्त करावें. भारद्वाजगृह्यसूत्रांत असें वचन आहे कीं, जों काळ पर्यंत होम झाला नसेल तों काळ पर्यंत लागणारें सर्व द्रव्य ब्राह्मणास द्यावें. म्हणजे होम केल्या प्रमाणेंच होतें. नंतर होमहानी निमित्तक प्रायश्चित्त करावें. ॥ ११ ॥ या प्रमाणें अनाहिताग्नि प्रायश्चित्ताचा निर्णय जाणावा.

## ॥ अथ क्रयविक्रयप्रायश्चित्तनिर्णयः ॥ ६ ॥

शंखलिखितौ ॥ न विक्रिणीयादविक्रेयाणि ॥ तिलतैलदधिक्षौद्रलवणद्राक्षामद्यमांसकृतान्नस्त्रीपुरुषहस्त्यश्ववृषगंधरसक्षौमकृष्णाजिनसोमोदकनीलीविक्रयात्सद्यःपतति ब्राह्मण इत्युपक्रम्य वत्सरं तप्तकृच्छ्रमाचरेत् ॥ १ ॥ हारीतः ॥ गुडतिलमूलफलपक्वान्नविक्रयेसोमायनम् ॥ लाक्षालवणमधुमांसतैलक्षीरदधिघृतगंधचर्मवाससामन्यतमविक्रये चांद्रायणम् ॥ २ ॥ तथोर्णाकेशकेशरभूधेनुवेश्माश्मशस्त्रविक्रये च ॥ मत्स्यमांसस्नाय्वस्थिशृंगनखशुक्तिविक्रये तप्तकृच्छ्र ॥ ३ ॥ हिंगुगुग्गुलहरितालमनःशिलांजनगैरिकक्षारलवणमणिमुक्ताप्रवालवैणववेणुमृन्मयेषु च ॥ आरामतडागोदपानपुष्करिणीसुकृतविक्रये, त्रिषवणं स्नायधःशायी चतुर्थकालाहारो दशसहस्रं जपन् गायत्रीं संवत्सरेण पूतो भवति ॥ हीनमानोन्मानसकार्व्याजद्रव्यसंकीर्णविक्रये चेति ॥ ४ ॥ पाराशरः ॥ विक्रीय कन्यकां गां च कृच्छ्रं सांतपनं चरेदिति ॥ चतुर्विंशतिमते ॥ सुराया विक्रयं कृत्वा चरेत्सोमचतुष्टयं ॥ लाक्षालवणमांसानांच-रेच्चांद्रायणत्रयं ॥ ५ ॥ मध्वाज्यतैलसोमानां चरेच्चांद्रायणद्वयं ॥ पयःपायसापूपानांचरेच्चांद्रायणव्रतं ॥ दध्नश्चेक्षुरसस्यैव, गुडखंडादिविक्रये ॥ सर्वेषां स्नेहपक्वानां पराक तु समाचरेत् ॥ ६ ॥ कदलीं नारिकेलं च नारिंगं बीजपूरकं ॥ एतेषां पादकृच्छ्रं स्याज्जंबीरादेस्तथैव च ॥७ ॥ कस्तुरीकादिगंधानां विक्रये कृच्छ्रमाचरेत् ॥ कर्पूरादेस्तदर्द्धं स्यादिनं हिंग्वादिविक्रये ॥ ८ ॥ तिलानां विक्रयं कृत्वा प्राजापत्यं समाचरेद् ॥ गोविक्रयं नरः कृत्वा लाभार्थं धनमो-

हितः ॥ प्राजापत्यं प्रकुर्वीत गजानामैंदवं स्मृतम् ॥ ९ ॥ खराश्वाश्वतराणां च करभाणां च विक्रये ॥ पराकं तत्र कुर्वीत सुतानां द्विगुणं चरेत् ॥ १० ॥ नारीणां विक्रयं कृत्वा चरेच्चांद्रायणं व्रतं ॥ द्विगुणं पुरुषस्यैव व्रतमाहुर्मनीषिणः ॥ ११ ॥ चांद्रायणं प्रकुर्वीत एकाहद्वेदविक्रये ॥ अंगानां तु पराकं स्यात्स्मृतीनां कृच्छ्रमाचरेत् ॥ १२ ॥ इतिहासपुराणानां चरेत्सांतपनं द्विजः ॥ रहस्यपंचरात्राणां कृच्छ्रमेव समाचरेत् ॥ १३ ॥ गाथानां नीतिशास्त्राणां प्राकृतानां तथैवच ॥ सर्वासामेव विद्यानां पादकृच्छ्रं समाचरेदिति ॥ १४ ॥ च्यवनः ॥ दधिमधुपिष्टसर्पिःपक्वान्नतैलतक्रक्षीररसविषशस्त्रतिलाश्वनीलीकौशेयवासोलाक्षारक्तलवणविक्रये प्राजापत्यं चरेत् ॥ १५ ॥ शातातपः ॥ आममांससुरासोमलाक्षालवणसर्पिषां ॥ विक्रये सर्वपण्यानां द्विजश्चांद्रायणं चरेत् ॥ १६ ॥ विष्णुः ॥ रक्तवस्त्ररंगरत्नगुडगंधमधुरसोर्णा विक्रयी त्रिरात्रमुपवसेत् ॥ माणिभूपुष्पसोमविक्रयी तप्तकृच्छ्रं कुर्यात् ॥ तं च भूपश्चोपनयेत् ॥ १७ ॥ शंखः ॥ धारयित्वा तुलां वक्रां विषमां कारयन्वणिक् ॥ सुरालवणमद्यानां कृत्वा क्षीरस्य विक्रयं ॥ लाक्षायाश्चैव मांसस्य कुर्यादेवंमहाव्रतं ॥ १८ ॥ पैठीनसिः ॥ अथाविक्रयाणि ॥ ब्राह्मणस्य लवणं पक्वान्नं मधुक्षीरं दधिघृतमुदकं सर्वगंधास्तिला रक्तं वासोगुडतैलग्राम्यपशुमेकशफः केशरिणश्च सर्वे चारण्याः पशवो विद्यागावः शंखश्चोर्णेश्चेति विक्रयणेनैकेषामेकस्मिन्प्राजापत्यं चरेदिति ॥ १९ ॥ भविष्यपुराणे गुडं तिलांस्तथा नीलीं केशगोधूमशल्यका ॥ विक्रीय ब्राह्मणो गां च कृच्छ्रं सांतपनं चरेदिति ॥ २० ॥ गोविक्रये निंदार्थवादमाह यमः ॥ गवां विक्रयकारी तु गवि रोमाणि यानि तु ॥ तावद्वर्षसहस्राणि गवां गोष्ठे कृमिर्भवेदिति ॥ २१ ॥ एतानि च लघुगुरुप्रायश्चित्तानि कामाकामसकृदसकृच्छक्त्याद्यपेक्षया योजनीयानि ॥ इदं च सर्वप्रायश्चित्तजातमापदि वैश्यवृत्त्या जीवतो ब्राह्मणस्यैव ॥ इतरेषां त्वापदि न दोषः ॥ २२ ॥ वैश्यवृत्त्या च विक्रये ब्राह्मणस्य पयोदधीतिनारदस्मृतेरिति मिताक्षरायां ॥ यत्र च निषेधता तत्रैव प्रायश्चित्तविधयः प्रवर्तंत अत एव कश्चित्प्रायश्चित्तविधौ ब्राह्मणग्रहणं कृतं ॥ शूलपाणिस्त्वापदि शूद्रस्यैव दोषाभावमाह ॥ २३ ॥ तथा च पराशरः ॥ लवणं मधु मद्यं वा दधि तक्रं घृतं पयः ॥ न दुष्येच्छूद्रजातीनां कुर्यात्सर्वेषु विक्रयम् ॥ २४ ॥ कालिकापुराणे ॥ विक्रयं सर्ववस्तूनां कुर्वन् शूद्रो न दोषभाक् ॥ मधुचर्मसुरां लाक्षां त्यक्त्वा मांसं च पंचममिति ॥ २५ ॥ एवं च ब्राह्मणानामेवापदि वैश्यवृत्त्या जीवतो दोष इति निष्कर्षः ॥ इदं च प्रायश्चित्तजातमपण्यविक्रयार्जितधनपरित्यागपूर्वकं कार्यमित्याह मनुः ॥ यद्गर्हितेनाऽर्जयंति कर्मणा ब्राह्मणा धन ॥ तस्योत्सर्गेण शुध्यंति जप्येन तपसैवेति ॥ २६ ॥ ॥ इति विक्रयाविक्रयप्रायश्चित्तनिर्णयः ॥

# आतां विकण्यास अयोग्य असे पदार्थ विकले असतां प्रायश्चित्ताचा निर्णय. ॥ ६ ॥

शंखलिखितांचें वचन विकण्यास अयोग्य पदार्थ विकूं नयेत. ते हे तीळ, तेल, दहि, मध, मीठ, द्राक्ष, मद्य, मांस शिजलेलें अन्न स्त्री, पुरुष, हत्ती, घोडा, बैल, गंधयुक्त पदार्थ, सर्व रस, रेशमी वस्त्र, हरणाचें कातडें, सोमोदक ( सोम वेलीचा रस ) नीळ हे पदार्थ विकूं नयेत. विकले असतां ब्राह्मण तत्काळ पतीत होतो. हा दोष जाण्याकरितां वर्षभर पर्यंत तप्तकृच्छ्र प्रायश्चित्त आचरण करावें. ॥ १ ॥ हारीतानें गुळ, तीळ, फुलें, मूळें, फळें, शिजलेलें अन्न हें विकलें असतां चांद्रायण प्रायश्चित्त सांगितलें आहे. लाख, मीठ, मध, मांस, तेल, दूध, दहीं, तूप, गंध, चामडें, वस्त्र, यांतील कोणताही पदार्थ विकला असतां चांद्रायण प्रायश्चित्त करावें. ॥ २ ॥ लोंकर, केशर, केंश, भूमी, गाय, घर, घोडे, शाले, मासे, मांस, स्नायू, हाडें, शिंगें, नखें, शिंपा हें विकलें असतां तप्तकृच्छ्र प्रायश्चित्त जाणावें. ॥ ३ ॥ हिंग, गुग्गुळ, हरीताल, मनशील, काजळ, सोनकाव, क्षार पदार्थ, मीठ, मणी, मोतीं, पोवळें, वेळू, वेळुचे अथवा मातीचे पदार्थ हे विकले असतां तसेंच याग, तळें, विहिरी, आपण केलेलें पुण्य. हें विकलें असतां त्रिकाळीं स्नान करून भूमीवर शयन करावें. चवथे प्रहरीं भोजन करून प्रतिदिवशीं दहा हजार गायत्रीजप करावा. या प्रमाणें वर्षभर केल्यानें पवित्र होतो तसेंच कमीमापानें अथवा ताजवा कमजास्ती करून विकले असतां तसेंच एखादे पदार्थांत दुसरा पदार्थ मिसळून कपटानें द्रव्य मिळविलें असतां पूर्वोक्त प्रायश्चित्त जाणावें. ॥ ४ ॥ पाराशराचें वचन कन्या अथवा गाय विकली असतां सांतपन प्रायश्चित्त सांगितलें आहे. चतुर्विंशतिमतांत मद्य विकलें असतां चार चांद्रायणें प्रायश्चित्तें सांगितलीं आहेत. लाख, मीठ, मांस, हें विकलें असतां तीन चांद्रायणें प्रायश्चित्तें सांगितलीं आहेत. ॥ ५ ॥ मध, तूप, तेल, सोमरस, हीं विकलीं असतां दोन चांद्रायणें. दूध, दुधाचे पदार्थ, अनारसे हे विकले असतां चांद्रायण प्रायश्चित्त. दहि, उसाचा रस, गूळ, साखर, साखरेचे पदार्थ सर्व तेलें, तुपांत तयार केलेले पदार्थ हे विकले असतां पराक प्रायश्चित्त सांगितलें आहे. ॥ ६ ॥ केळीं, नारळ, लिंबू, महाळुंग, जांभळें, हीं विकलीं असतां पादकृच्छ्र प्रायश्चित्त सांगितलें आहे. ॥ ७ ॥ कस्तुर्यादिक पदार्थ विकले असतां कृच्छ्रप्रायश्चित्त. कर्पूरादिक विकले असतां अर्धकृच्छ्र प्रायश्चित्त सांगितलें आहे. हिंगादि पदार्थ विकले असतां एक दिवस उपोषण सांगितलें आहे. ॥ ८ ॥ तीळ विकले असतां प्राजापत्य प्रायश्चित्त सांगितलें आहे. मनुष्यानें द्रव्य मोहित होऊन लाभाकरितां गाय विकली असतां प्राजापत्य प्रायश्चित्त करावें. हत्ती विकला असतां चांद्रायण प्रायश्चित्त सांगितलें आहे. ॥ ९ ॥ गाढव, घोडे, उंट, खेचर, विकले असतां पराक प्रायश्चित्त. मूळ विकले असता पराकें दोन सांगितलीं आहेत. ॥ १० ॥ स्त्री विकली

असतां चांद्रायण व्रत सांगितलें आहे. पुरुष विकीचे ठायीं दोन चांद्रायण प्रायश्चित्तें सांगितलीं आहेत. ॥ ११ ॥ एक दिवस वेद विक्रय केला असतां चांद्रायण प्रायश्चित्त. वेदांगें विकलीं असतां पराक प्रायश्चित्त आहे. ॥ १२ ॥ इतिहास, पुराण, यांचा विक्रय केला असतां सांतपन प्रायश्चित्त सांगितलें आहे. रहस्यें, पंचरात्र, यांचा विक्रय केला असतां कृच्छ्र प्रायश्चित्त आहे. गाथा, नीतिशास्त्र, तसेंच प्राकृत सर्व विद्यांचा विक्रय केला असतां पादकृच्छ्र प्रायश्चित्त करावें. ॥ १४ ॥ च्यवनानें असें सांगितलें आहे कीं, दही, मद्य, मीठ, तूप, शिजलेलें अन्न, तेल, ताक, दूध, रस, दीप, शस्त्र, तीळ, घोडा, नीळ, रेशमीवस्त्र, लाख, रक्तवर्ण, पीठ हे विकले असतां प्राजापत्य प्रायश्चित्त जाणावें. ॥ १५ ॥ शातातपानें कच्चे मांस, मद्य, सोमरस, लाख, मीठ, तूप हे ब्राह्मणानें विकले असतां चांद्रायण प्रायश्चित्त करावें. ॥ १६ ॥ तांबडें वस्त्र, रंग, रत्नें, गूळ, गंधयुक्त पदार्थ, मध, रस, लोंकर, हे विकले असतां त्रिरात्र उपोषण सांगितलें आहे. प्राणी, भूमि, पुण्य, सोमरस हे विकले असतां तप्तकृच्छ्र प्रायश्चित सांगितलें आहे. आणि पुनः उपनयन करावें. ॥ १७ ॥ शंख स्मृतींतील वचन वाण्यानें ताजवा विषम अथवा वांकडा करून विकले असतां तसेंच मद्य, मीठ, दूध, लाख, मांस हे विकले असतां चांद्रायण महा प्रायश्चित्त करावें. ॥ १८ ॥ पैठीनसी ऋषीचें वचन ब्राह्मणास विकण्यास अयोग्य पदार्थ, मीठ, शिजलेलें अन्न, मद्य, दूध, दहि, तूप, पाणी, सर्व गंधयुक्त पदार्थ, तीळ, तांबडें वस्त्र, गूळ, तेल, ग्राम्य पशु, स्त्रिया, गायी, शस्त्र, लोंकर यांतील कोणताही पदार्थ विकला असतां प्राजापत्य प्रायश्चित्त सांगितलें आहे. ॥ १९ ॥ भविष्यपुराणांत गूळ, तीळ, नीळ, केश, गहूं, साळी, गाय हें ब्राह्मणानें विकलें असतां त्यास कृच्छ्रसांतपनप्रायश्चित्त सांगितलें आहे. ॥ २० ॥ ब्राह्मणानें गाय विकली असतां- यमस्मृतींतील वचन गाय विक्रय करणारा ब्राह्मण गायीच्या अंगावर जितके केश असतील तितकीं वर्षेंपर्यंत किड्यांचा जन्म पुनः पुनः घेऊन गायीच्या गोठ्यांत कृमी होऊन राहतो. ॥ २१ ॥ हीं जीं सर्व अल्प महत् प्रायश्चित्तें सांगितलीं तीं जाणून न जाणून एक वेळां अथवा अनेक वेळां तसेंच शक्त्यादि पाहून करावीं. हा सर्व प्रायश्चित्त समुदाय वैश्यवृत्तीनें उपजीविका करणारा जो ब्राह्मण त्याचच आहे. इतरांस आपत्काळीं दोष नाहीं. ॥ २२ ॥ पाराशराचें वचन मीठ, मध, मद्य, दहि, लाख, दूध, तूप, हे शूद्रानें विकलें असतां त्यास दोष नाहीं. कालिकापुराणांत असें सांगितलें आहे कीं, शूद्रानें कोणतीही वस्तु विकली असतां त्यास दोष नाहीं. परंतु मध, कातडें, दारू, लाख, मांस, हे पांच विकले असतां शूद्रही दोषी होतो. परंतु ब्राह्मणानें वैश्यवृत्तीनें उपजीविका केली असतां दोष आहे. मनूचें प्रायश्चित्त विकण्यास अयोग्य असे पदार्थ विकून जें द्रव्य संपादन केलें असेल तें सर्व दान करून नंतर प्रायश्चित्त करावें. त्याच मनूचें वचन निषिद्धकर्मानें ब्राह्मणानें जें द्रव्य मिळविलें असेल तें सर्व दान करून नंतर जप आणि गायत्री घेतल्यानें ब्राह्मण शुद्ध होतो. ॥ २५ ॥ या प्रमाणें अविक्रेय विक्रय प्रायश्चित्ताचा निर्णय झाला.

## ॥ अथ परिवेदने प्रायश्चित्तम् ॥७॥

अकृतविवाहोग्रजोनुजेन प्रागात्मनोविवाहं कुर्वतातिक्रांतः सपरिवित्तिः ॥ तत्कनीयान् परिवेत्ता ॥ परिवेत्तानुजोऽनूढे ज्येष्ठे दारपरिग्रहात् ॥ परिवित्तिस्तु तज्ज्यायान् इत्यमरकोशात् ॥ मनुः ॥ दाराऽग्निहोत्रसंयोगं कुरुते योग्रजे स्थिते ॥ परिवेत्ता स विज्ञेयः परिवित्तिस्तु पूर्वजः ॥ १ ॥ गर्गोपि ॥ सोदर्ये तिष्ठति ज्येष्ठे न कुर्याद्दारसंग्रहम् ॥ आवसथ्यं तथाधानं पतितस्त्वन्यथा भवेदिति ॥ २ ॥ सोदर्यग्रहणादसोदर्य्ये न दोषः ॥ तत्र वशिष्ठः ॥ परिवित्तिः कृच्छ्रं द्वादशरात्रं चरित्वा निर्विशेत्तां चैवोपयच्छेदिति ॥ ३ ॥ परिवेत्ता कनीयान् तस्मै ज्येष्ठाय स्वोढां दत्वा इयं त्वदीयेत्युपचारार्थमिव दत्वा ब्रह्मचार्य्याहृतभैक्ष्यवन्निवेद्य कृच्छ्रातिकृच्छ्रौ कृत्वा पुनस्तामेव तेनानुज्ञातामुद्वहेदित्यर्थः ॥ ४ ॥ एतच्च देशांतरव्यवस्थिते ज्येष्ठे सति कृतविवाहे इति भ्रान्त्या कनीयसि कृतविवाहे निर्गुणे वा ज्येष्ठे द्रष्टव्यं प्रायश्चित्तस्याल्पत्वात् ॥ ज्येष्ठे गुणवति कनीयसः पित्राद्यनुज्ञामन्तरेण कामतः करणे हारिताद्युक्तं प्रायश्चित्तं द्रष्टव्यं ॥ ५ ॥ ज्येष्ठेऽनिर्विष्टे कनीयान् निर्विशमानः परिवेत्ता परिवित्तिः ज्येष्ठः परिवेदनीया कन्या परीदायी दाता परियष्टा याजकः सर्वे ते पतिताः संवत्सरं प्राजापत्येन कृच्छ्रेण वा पावयेयुरिति ॥ ६ ॥ अत्रापि परिवेत्रादीनां सर्वेषां कामतः प्रवृत्तौ प्रत्येकं संवत्सरं कृच्छ्रेण ते शुध्येरन् अज्ञानतः प्रवृत्तौ तु याज्ञवल्क्योक्तगोवधव्रतचतुष्टयं जातिशक्त्याद्यपेक्षया योजनीयम् ॥ ७ ॥ अत्रैवं विशेषमाह यमः॥ द्वौ कृच्छ्रौ परिवित्तेस्तु कन्यायाः कृच्छ्रमेव च ॥ अतिकृच्छ्रं चरेद्दाता होता चांद्रायणं चरेत् ॥ ८ ॥ अत्र पराशरः ॥ परिवित्तिः परिवेत्ता यया च परिविद्यते ॥ सर्वे ते नरकं यांति दातृयाजकपंचमाः ॥ ९ ॥ द्वौ कृच्छ्रौ परिवित्तुस्तु कन्यायाः कृच्छ्र एव च ॥ कृच्छ्रातिकृच्छ्रौ दातुस्तु होता चांद्रायणं चरेत् ॥ १० ॥ दत्तकादीनां तु नायं दोषः ॥ भिन्नोदरे च दत्ते च पितृव्यतनये तथा ॥ दाराग्निहोत्रसंयोगे न दोषः परिवेदने इति गौतमस्मरणात् ॥ ११ ॥ भिन्नोदर इति सापत्नभ्रातृविषयम् दत्ते चेति जनककुले ज्येष्ठभ्रातृसत्वेन दत्तकस्य विवाहादौ परिवेत्तृत्वं नापि ज्येष्ठस्य परिवित्तित्वमित्यर्थः ॥ कुब्जवामनषंढेषु गद्गदेषु जडेषु च । जात्यंधे बधीरे मूके न दोषः परिविंदतः ॥ १२ ॥ पितृव्यपुत्रः सापत्न परनारीसुतस्तथा ॥ दाराग्निहोत्रसंयोगे न दोषः परिवेदने ॥ १३ ॥ ज्येष्ठभ्राता यदा तिष्ठेदाधानं नैव कारयेत् ॥ अनुज्ञातस्तु कुर्वीत शंखस्य वचनं तथा ॥ १४ ॥ अत्रेदमपिविचार्य्यं परिवेत्ताऽनुजोऽनूढे ज्येष्ठे इत्यत्र ज्येष्ठपदं स्वजन्मतः पूर्वजन्मपरं न तु प्रथमोत्पन्नपरम् ॥ तेन भ्रातृत्रये प्रथमोत्पन्ने कृतविवाहे मध्यमेऽकृतविवाहे तत्कनिष्ठेन विवाहे कर्तव्ये

परिवेदनं भवति पूर्वजन्मनोऽकृतविवाहत्वात् ॥ यदा तु प्रथमोत्पन्नोऽकृतविवाहो मध्यमस्तु कृतविवाहस्तदापि तत्कनिष्ठेन विवाहे कर्तव्ये त्रयाणां दोषः एवं भ्रातृचतुष्टयादावपि ज्ञेयम् ॥ १९ ॥ कन्याविषयेतु एवं ज्येष्ठायामनूढायां या कनिष्ठा विवाहिता ॥ साग्रेदिधिषुः ज्येष्ठा तु दिधिषु स्मृता ॥ तथा च देवलः ॥ ज्येष्ठायां यद्यनूढायां कन्यायामूह्यतेनुजा ॥ या साग्रे दिधिषुर्ज्ञेया पूर्वा तु दिधिषुस्तथा ॥ १६ ॥ तत्राग्रेदिधिषुपतिः कृच्छ्रं कृत्वा पुनस्तामेवोद्वहेत् ॥ दिधिषुपतिस्तु कृच्छ्रातिकृच्छ्रौ कृत्वा कनीयस्याः पत्ये तां निवेद्य तस्मै नत्वा तेनानुज्ञातस्तां पुनरुद्वाहयेत् ॥ एवं कन्ययोर्योज्यम् ॥ १७ ॥ ज्ञानकामकारबलात्कारादिविषये पूर्वोक्तं संवत्सरादिकं व्यवस्थया योज्यम् ॥ १८ ॥

## ॥ अथानाहिताग्नितायां प्रायश्चित्तनिर्णयः ॥

अनाहिताग्नौ ज्येष्ठे तु कनीयानादधीत चेत् ॥ पर्याधाता कनिष्ठः स्यात् ज्येष्ठः पर्याहितः स्मृतः ॥ १९ ॥ तयोः संवत्सरव्रतम् ॥ इदं ज्ञात्वा कामतःकरणे ॥ अन्यथा प्राग्वद्योज्यम् ॥ धनधर्मविद्यार्जनार्थं देशांतरस्थे ज्येष्ठे द्वादशवर्षं प्रतीक्षा ॥ तथा च द्वादशैव तु वर्षाणि ज्यायान्धर्मार्थयोगतः ॥ न्याय्यः प्रतीक्षितुं भ्राता श्रूयमाणः पुनःपुनरिति हेमाद्रिः ॥ २० ॥ कार्यांतरार्थदेशांतरस्थे दशवर्षं प्रतीक्षा ॥ इति परिवेदनप्रायश्चित्तनिर्णयः ॥

## आतां परिवेदनाचें प्रायश्चित्त सांगतों ॥

वडील भावाचें लग्न झाल्या वांचून धाकट्या भावानें लग्न करूं नये. केलें असतां दोष सांगितला आहे. तो असा. त्या वडील भावास परिवित्ती असें ह्मणावें. धाकट्या भावास परिवेत्ता अशी संज्ञा आहे. अमरकोश आणि मनुवचन यांचा अर्थ असाच आहे. ॥ १ ॥ गार्ग्यांनीं असें सांगितलें आहे कीं, सख्या वडील भावाचें लग्न झालें नसून कनिष्ठ भावानें आपला विवाह केला असतां अथवा अग्निहोत्र घेतलें असतां. तो पतीत होतो. ॥ २ ॥ वशिष्ठानें असें सांगितलें आहे कीं, परिवित्ति ( लग्न न झालेला वडील भाऊ ) यानें बारा कृच्छ्र प्रायश्चित्त करून कनिष्ठ बंधूस लग्न करण्यास आज्ञा द्यावी. नंतर कनिष्ठ बंधूनें त्या स्त्रियेशीं लग्न करावें. ॥ ३ ॥ परिवेत्ता ( लग्न झालेला कनिष्ट बंधू ) त्यानें आपण ज्या स्त्रीशीं विवाह केला आहे, ती स्त्री वडील बंधूला ही तुमची स्त्री आहे- असें ह्मणून उपचारार्थ देऊन जसें ब्रह्मचर्यानें आणलेलें भिक्षान्न गुरूस निवेदन करावें. त्या प्रमाणें ती स्त्री देऊन आपण कृच्छ्रातिकृच्छ्र प्रायश्चित्त करून त्याची आज्ञा झाल्या नंतर कनिष्ठ बंधूनें त्या स्त्रियेशीं विवाह करावा. ॥ ४ ॥ हें प्रायश्चित्त ज्येष्ठ बंधू देशांतरीं असोन त्याचा विवाह झाला असेल अशा भ्रांतीनें अथवा गुण रहित असतां कनिष्ट बंधूनें विवाह केल्याचें आहे. ज्येष्ठ बंधु गुणवान् आणि

कनिष्ठ बधूनें पितरादिकांच्या आज्ञेवाचून स्वइच्छेनें विवाह केला असता हारीतानीं सांगितलेलें प्रायश्चित्त करावें. ॥ ५ ॥ ज्येष्ठाचें लग्न झाल्यावाचून कनिष्ठानें लग्न केलें असता तो ज्येष्ठ बंधु, कनिष्ठ बधु, त्याची बायको, तिचा बाप, याज्ञिक करणारा ब्राह्मण हे सर्व पतीत होतात. संवत्सर पर्यंत प्राजापत्य अथवा कृच्छ्र प्रायश्चित्त केल्यानें हे सर्व शुद्ध होतात. ॥ ६ ॥ इच्छेनें प्रवृत्त झाले असता प्रत्येकास संवत्सर पर्यंत कृच्छ्र प्रायश्चित्त सांगितलें आहे. अज्ञानानें प्रवृत्त झालें असता याज्ञवल्क्यानें सांगितलेलें गोवधादि प्रायश्चित्त चतुष्टयाचीं जाती, शक्ति इत्यादिक पाहून योजना करावी ॥ ७ ॥ यमस्मृतींत असें सांगितलें आहे कीं, परिवित्तीस दोन कृच्छ्र प्रायश्चित्त. कन्येस एक कृच्छ्र प्रायश्चित्त, दात्यास अतिकृच्छ्र प्रायश्चित्त. होम करण्यास चांद्रायण प्रायश्चित्त आहे. ॥ ८ ॥ पराशरानेंही हे सर्व पतित होऊन नरकास जातात असेंच सांगितलें आहे. ॥ ९ ॥ ह्मणून त्यानीं सांगितलेलें कृच्छ्रातिकृच्छ्र चांद्रायणादि प्रायश्चित्त करावें. ॥ १० ॥ दत्तकादिकास हा दोष नाहीं त्यास गौतमाचें वचन सापत्नबंधू, दत्तक चुलत बंधू यानीं लग्न केलें असतां अथवा अग्निहोत्र घेतलें असता दोष नाहीं, येथें दत्तक याचा जनक कुळांतील विवाह न झालेला वडील भाऊ विद्यमान असता दत्तकास व त्या वडील बधूस परिवेत्र्यादि दोष नाहीं. ॥ ११ ॥ तसेंच वडील बधू, कुबडा वामन ( ठामन ) नपुंसक, तोतरा, जड, जन्मांध, मुका असे असतां धाकट्या बधूस लग्न करण्यास दोष नाहीं. ॥ १२ ॥ चुलत भाऊ व सापत्न भाऊ हे जरी धाकटे असले तरी त्यास लग्न करण्यास हरकत नाहीं. ॥ १३ ॥ वडील बधूनें लग्न करण्यास अथवा अग्निहोत्र घेण्यास आज्ञा दिली असतां, कनिष्ठ बंधूस लग्न करण्यास व अग्निहोत्र घेण्यास दोष नाहीं. असें शंखस्मृतींत सांगितलें आहे. ॥ १४ ॥ येथें असा विचार आहे. ज्येष्ठ बधू ह्मणजे ( धाकट्या पेक्षा वडील बधू ) जेथें तीन भाऊ आहेत आणि वडील भावाचें लग्न झालें असोन मधल्याचें लग्न झालें नसेल तेथ कनिष्ठ भावाचें लग्न करते समयीं हा पूर्वोक्त जो निषेध सांगितलेला आहे तो लागू आहे. ॥ १५ ॥

आतां मुलीविषयीं विचार सांगतों. वडील मुलीचें लग्न झालें नसोन धाकट्या, मुलीचें लग्न झालें असतां त्या धाकट्या मुलीस अग्रेदिधिषु आणि ज्येष्ठ मुलीस दिधिषु अशी संज्ञा क्रमानें आहे. देवलस्मृतीच्या वचनाचा अर्थ असाच आहे. ॥ १६ ॥ अग्रे दिधिषुचा जो पती त्यानें कृच्छ्र प्रायश्चित्त करून दिधिषुचा जो पती त्यानें कृच्छ्राति कृच्छ्र प्रायश्चित्त करून आपल्या धाकट्या मेहुणीचा पती ( साडभाऊ ) त्यास ती आपली स्त्री निवेदन करून त्यास नमस्कार करून त्यानें आज्ञा दिल्या नंतर त्या वडील कन्येशीं लग्न करावें. अशी कन्येविषयीं योजना सांगितली आहे. ॥ १७ ॥ येथें जाणोन इच्छेनें अथवा बलात्कारानें विवाहादि केला असतां पूर्वोक्त प्रायश्चित्तें जाणावींत. ॥ १८ ॥ वडील भावानें अग्निहोत्र न घेतां धाकट्यानें घेतलें असताच्या प्रायश्चित्ताचा विचार ॥ वडील बंधूनें अग्निहोत्र घेतल्यावाचून

धाकट्या बधूनें अग्निहोत्र घेतले असतां धाकटे बंधूस पर्याधाता ज्येष्ठ बंधूस पर्याहित अशी सञ्ज्ञा आहे. ॥ १९ ॥ या उभयतास संवत्सरव्रत प्रायश्चित्त सांगितलें आहे. हें ज्ञानपूर्वक इच्छेनें केलें असतां प्रायश्चित्त आहे. तसें नसेल तर पूर्वी सांगितल्याप्रमाणेंच प्रायश्चित्त जाणावें. वडील बंधू द्रव्य, विद्या, धर्मकृत्य, इत्यादि संपादना करितां देशांतरीं गेला असतां बारा वर्षे-पर्यंत त्याची मार्गप्रतीक्षा करून नंतर धाकटे बंधूनें आपलें लग्न करावें. त्याहून इतर कृत्या करितां देशांतरीं गेला असतां दहा वर्षेपर्यंत मार्गप्रतीक्षा करण्यास सांगितलें आहे. याप्रमाणें परिवेदन प्रायश्चित्ताचा विचार जाणावा. ॥

## अथ भृतकाध्यापनादौ प्रायश्चित्तनिर्णयः ॥ ८ ॥

प्रतिनियतवेतनग्रहणपूर्वकमध्यापनं भृतकाध्यापनम् ॥ प्रतिनियतवेतनदानपूर्वक-मध्ययनं भृतकाध्यायनम् तत्कर्तारौ पयसा ब्राम्हीं सुवर्चलां त्रीन्पक्षान्निपत पिबेतां ॥ १ ॥ तथाच विष्णुः भृतकाध्यापनं कृत्वा भृतकाध्यापितस्तथा ॥ अनुयोगप्रदानेन त्रीन् पक्षान्निपतः पिबेत् ॥ २ ॥ अनुयोगः यशसे धनाय वा सम्यगधीयानश्च त्वया न सम्यगधीयते इत्याक्षेपः ॥ अनापदि शक्त्याद्यपेक्षया चांद्रादिष्वेकं कुर्यात् ॥ ३ ॥ इति भृतकाध्यापनादौ प्रायश्चित्तनिर्णयः ॥

## आतां भृतकाध्यापनाचें प्रायश्चित्त सांगतों. ॥ ८ ॥

नियमित पगार घेऊन जें शिकविणें त्यास भृतकाध्यापन असें ह्मणतात. गुरूस पगार देऊन जें अध्ययन शिकणें त्यास भृतकाध्ययन अशी सञ्ज्ञा आहे. या उभयतास हें प्रायश्चित्त सांगितलें आहे. वेतन देऊन अध्ययन करणारा व अध्ययन शिकविणारा या उभयतांनीं ब्राह्मीचा रस दुधांत मिश्रण करून दीड महिना प्राशन करून रहावें. आपत्ती नसेल तर चांद्रायणादिकांतील एक प्रायश्चित्त आचरण करावें. ॥ १ ॥ विष्णूनें असें सांगितलें आहे कीं, भृतकाध्यापन करणारा व भृतकाध्ययन करविणारा या उभयतांनीं अनुप्रयोगामुळें दीड महिनापर्यंत दुधांत ब्राह्मीचा रस घालून प्राशन करण्यास सांगितलें आहे. ॥ २ ॥ यश प्राप्तिकरितां अथवा धन-प्रीति करितां उत्तम प्रकारचें अध्ययन केलें असताही अध्ययन केलें नाहीं असा आक्षेप करणें हा दोष जाण्याकरितां वरील प्रायश्चित्त करावें. आपत्ति नसेल तर शक्तितारतम्य, जाणून चांद्रायणा-दिकांतील एक प्रायश्चित्त आचरण करावें. ॥ ३ ॥ याप्रमाणें भृतकाध्यापनाचा निर्णय जाणावा. ॥

## अथ पारदार्ये प्रायश्चित्तनिर्णयः ॥ ९ ॥

तत्र पारदार्यं च गुरुतल्पवदातिदेशिकतल्पतरमन्याधिरिक्तपरस्त्रीगमनरूपम् ॥ पुरुषांत-

राव्यभिचारितां जातिमात्रविप्रां ऋतौ विप्रोगत्वा पूर्वोक्तं वार्षिकब्रह्मचर्यव्रतं कुर्यात् ॥ धर्मकर्मशीलत्वादिगुणशालिनीं तादृशीं गंतुर्विप्रस्य द्विवार्षिकं प्रायश्चित्तम् ॥ श्रोत्रिय पत्न्यां तादृश्यां त्रिवार्षिकं तत् ॥ ताभिर्यदि द्रव्यं दत्तं भवेत्तर्हि तत्सत्यज्य प्रायश्चित्तम् ॥ द्वित्रिचतुर्वारगमने क्रमेण द्वित्रिचतुर्गुणं ॥ अग्रे च पातित्यम् ॥ एवं द्वितीय तृतीयादिगमने ज्ञेय ॥ १ ॥ क्षत्रियादीनां स्वस्ववर्णासु गमने पादहानि. ॥ विप्रस्य क्षत्रियादिस्त्रीषु द्विवार्षिकत्रिवार्षिकपाण्मासिकानि गुणवतिषु ॥ शूद्रस्य परकीयायां गुणवत्यां शुद्रां गंतुः पाण्मासिकं ॥ अकामतः सर्वत्रैतदर्धम् अनृतौ जातिमात्रविप्रां विप्रोगत्वा मानवं त्रैमासिकं कुर्यात् ॥ ईदृशक्षत्रियादिस्त्रीषु क्रमेण द्वैमासिकचांद्रायण मासिकानि ॥ क्षत्रियादीनां स्वस्ववर्णास्वनृतौ गमने द्वैमासिकान्येव ॥ आसु गर्भोत्पत्तौ तु तत्तद्विषये सर्वत्रोक्तमेव द्विगुणं कार्यम् ॥ शूद्रायां गर्भोत्पत्तौ तु त्रीणि वर्षाणि चतुर्थकाले नक्तं भुंजीत विप्रस्यानिच्छंतीषु विप्रादिस्त्रीषु गंतुरनुक्रमेण गोमूत्रे मासिकद्वैमासिकचांद्रमासिकानि ॥ २ ॥ अन्यत्र ॥ ब्राह्मणोब्राह्मणीं गच्छेदकामां यदि कामतः ॥ कृच्छ्रं चांद्रायणं कुर्यादर्द्धमेव प्रमादतः ॥ ३ ॥ अर्द्धमेव सकामायां तप्तं कृच्छ्रं सकृद्दतौ ॥ शूद्रागमने तु शूद्रांतु ब्राह्मणोगत्वा मासं मासार्द्धमेव वा ॥ गोमूत्रयावकाहारस्तिष्ठेत् पापविमोक्षक ॥४॥ स्वैरिणीगमने पुरुष चतुष्टय गामिन्यां स्वैरिणीसंज्ञकायां विप्रायां गंतुरुपहोपवासपूर्वकं घृतपात्रदानं ॥ ५ ॥ तादृश्यां क्षत्रियायां उपवासत्रयपूर्वकमाढकयवदानम् ॥ वैश्यायां गंता चतुर्थकालहारादगविप्रान्भोजयेत् ॥ शूद्रायां गंतुः सचैलस्नानपूर्वकं उदकुंभदानं ॥ इदं स्वैरिणीगमनप्रायश्चित्तं प्रमादात् सकृत् गमने ज्ञेयं ॥ द्वित्रिवारगमने द्विगुणत्रिगुणमेवप्रायश्चितमस्ति ॥ ६ ॥ वेश्यागमने प्रायश्चित्तमाह यम. वेशोभृतिः जीवनहेतुमर्हतीतिवेश्याशब्दार्थ माह माधवः ॥ वेश्यागमनजं पापं व्यपोहंति द्विजातयः ॥ पीत्वा सकृत्सकृत्तत्पापं सप्तरात्रं कुशोदक ॥ ७ ॥ विधवागमने चतुर्विंशतिमते विधवागमने कृच्छ्रमहोगत्र समान्वितम् ॥ व्रतस्थागमने कृच्छ्रं सपादं तु समाचरेदिति ॥ ८ ॥ पुरुषस्यांत्यजादिगमने प्रायश्चित्तम् ॥ तथा च संवर्तः ॥ रजकव्याधशैलूषवेणुचर्मोपजीवनः एतास्तु ब्राह्मणोगत्वा चरेच्चांद्रायणद्वयम् ॥ ९ ॥ आपस्तम्बोपि। रमेछीनटीचर्मकारी रजकी बुरुडीस्तथा ॥ एतासु गमनं कृत्वा चरेच्चांद्रायणद्वयम् ॥ १० ॥ रजकश्चर्मकारश्च नटोबुरुडएवच ॥ कैवर्तमेदभिल्लाश्च सप्तैते त्वन्त्यजाः स्मृता. ॥ ११ ॥ चांडाल्यादिगमने गुरुतरप्रायश्चित्त्वात् तत् गुरुतल्पप्रकरणे प्रसंगात् प्राकदर्शितम् ॥

## आतां परस्त्रीगमनाचें प्रायश्चित्त सांगतों. ॥ ९ ॥

येथें परस्त्रीशब्दानें गुरुपत्नी अथवा गुरुपत्नी असा व्याप्यावर अतिदेश केला आहे. त्या आणि गुरुपत्नी समान ज्या स्त्रीया त्यादून अन्य स्त्रीया घ्यावयाच्या आहेत. कारण या स्त्रीयांशीं

गमन केलें असतां महापाप आहे. त्यासंबंधाचें प्रायश्चित्त महापातक प्रकरणांत पूर्वीच सांगितलें आहे. अन्य पुरुषाशीं जिनें व्यभिचार केला नाहीं आणि जी स्त्री जातीची ब्राह्मणी अशा स्त्रियेशीं ऋतुकाळीं ( विटाळशी झाल्यापासून सोळा दिवसांत ) ब्राम्हणानें गमन केलें असतां पूर्वी सांगितल्याप्रमाणें वर्षभर पर्यंत ब्रम्हचर्य व्रत करावें. धर्म, कर्म, स्वभाव इत्यादि गुणांनीं युक्त अशा त्या ब्राम्हण स्त्रीयेशीं गमन करणाऱ्या ब्राम्हणास द्विवार्षिक ब्रम्हचर्य प्रायश्चित्त. उत्तम गुणांनीं युक्त अशा अग्निहोत्र्याच्या स्त्रियेशीं गमन केलें असतां त्रिवार्षिक ब्रम्हचर्य प्रायश्चित्त सांगितलें आहे. स्त्रियांनीं जर द्रव्य दिलें असेल तर तें टाकून प्रायश्चित घ्यावें. १। २। ३। ४ वेळां गमन केलें असतां क्रमानें दुप्पट, तीप्पट, चौपट प्रायश्चित्त सांगितलें आहे. यापेक्षां जास्त वेळां गमन केलें असतां पातित्य येतें. याप्रमाणें द्वितीय. तृतीय स्त्रीयेशीं गमन केलें असतांही असेंच प्रायश्चित्त जाणावें. ॥ १ ॥ क्षत्रियानें क्षत्रीय स्त्रियेशीं गमन केलें असतां नवमास ब्रह्मचर्य प्रायश्चित्त. वैश्यानीं वैश्य स्त्रियेशीं गमन केलें असतां सहा महिने प्रायश्चित्त. शूद्रानें शूद्र स्त्रियेशीं गमन केलें असतां त्रिमास प्रायश्चित्त. ब्राह्मणानें गुणयुक्त क्षत्रीय स्त्रीयेशीं गमन केलें असतां द्विवार्षिक प्रायश्चित्त. गुणयुक्त वैश्य स्त्रीयेशीं गमन केलें असतां त्रिवार्षिक प्रायश्चित्त. शूद्रानें आपल्या जातींतील गुणयुक्त पर स्त्रियेशीं गमन केले असतां षण्मास प्रायश्चित्त. अज्ञानानें गमन झालें असेल तर सर्वत्र अर्धे प्रायश्चित्त जाणावें. ब्राह्मणानें ऋतु काळाहून अन्यकाळीं आपल्या जातीच्या स्त्रियेशीं एक वेळा गमन केलें असतां मनूनें सांगितलेलें त्रैमासिक प्रायश्चित्त करावें. अशा क्षत्रीयादि स्त्रीयेशीं गमन केल्यास क्रमानें द्वयमासीक, चांद्रायण, मासीक हीं प्रायश्चित्तें जाणावीं. क्षत्रियादिकांसही ऋतुकाळाहून अन्य वेळीं गमन केलें असतां द्वैमासिकादि प्रायश्चित्तें जाणावीं या स्त्रियेसी गर्भोत्पत्ती झाली असतां व्यास जें प्रायश्चित्त सांगितलें आहे. त्याच्या द्विगुण प्रायश्चित्त आचरण करावें शूद्र स्त्रियेचे ठायीं गर्भस्थापना झाली असतां तीन वर्षें पर्यंत चतुर्थ काळीं रात्री भोजन करावें. ब्राह्मणास इच्छा न करणाऱ्या अशा ब्राह्मण क्षत्रियादिकांच्या स्त्रियांचे ठायीं गमन केलें असतां अनुक्रमानें गोहत्या, करणाराचें प्रायश्चित्त. त्रैमासिक, द्वैमासिक चांद्रायण प्रायश्चित्तें सांगितलीं आहेत. ॥ २ ॥ दुसरीकडे असें सांगितलें आहे की, इच्छा न करणाऱ्या अशा ब्राह्मण स्त्रियेशी जर ब्राह्मण कामानें गमन करील तर त्याग कृच्छ्र चांद्रायण प्रायश्चित्त सांगितलें आहे. प्रमादानें गमन केलें असतां अर्ध कृच्छ्र प्रायश्चित्त आहे. ॥ ३ ॥ ती स्त्री सकाम असतां गमन केलें असतांही अर्धकृच्छ्र प्रायश्चित्त आहे. ब्राह्मणानें इच्छेनें शूद्र स्त्रियेशीं गमन केलें असतां महिनाभर पर्यंत गोमूत्रांत शिजविलेले गहूं भक्षण करून त्यायोगानें शुद्धता होते. अनेच्छेनें गमन केलें असतां मासार्ध पर्यंत गोमूत्रांत शिजविलेले गहूं भक्षण करावे. ॥ ४ ॥

## आतां जारिणी गमनाचें प्रायश्चित्त सांगतों.

जारिणी अशा ब्राह्मण स्त्रियेशी गमन केलें असतां तीन दिवस उपोषण करून एक कृच्छ्र

दान करावें ह्मणजे शुद्धता होते. ॥ ५ ॥ जारिणी क्षत्रीयस्त्रियेशीं गमन केलें असतां तीन उ-पोषणें करून पायली भर गहूं दान करावे. वैश्यस्त्रियेशीं गमन केलें असता एक दिवस उपोष-ण करून दाहा ब्राह्मणास भोजन द्यावें. शूद्र स्त्रियेशीं गमन केलें असतां वस्त्र रहित स्नान करू-न पाण्यानें भरलेला कुंभ ब्राह्मणास द्यावा. हें जें प्रायश्चित्त सांगितलें तें प्रमादानें १ वेळा गमन केलें असतांचें आहे. तीन वेळां गमन केलें असतां द्विगुणीत त्रिगुणीत प्रायश्चित्तें आहेत. ॥ ६ ॥ वेश्येचे ठायीं गमन केलें असता यमस्मृतीचें वचन वेश ( किंमत ) ती घेण्यास जी योग्य होते तीस वेश्या म्हणावें. असा अर्थ माधवानें केलेला आहे. वेश्येचे ठायीं गमन केल्या पासून होणारे पाप त्या पापाप्रत ब्राह्मण तप्त केलेलें कुशोदक सात दिवस प्राशन करून राहिल्यानें दूर करि-तात. ॥ ७ ॥ विधवेचे ठायीं गमन केलें असता अहोरात्र उपोषण करून कृच्छ्र प्रायश्चित्त क-रावें. व्रताचारण कराणाऱ्या स्त्रियेशीं गमन केलें असतां १ उपोषण करून पाद सहित कृच्छ्र प्रायश्चित्त करावें. ॥ ८ ॥

## आतां अंत्यजादिकांच्या स्त्रियेशीं गमन केलें असतां प्रायश्चित्त सांगतों-

व्यास संवर्तांचें वचन-परीट, फाशीपारधी, नट ( वेणू वाजऊन उपजीविका करणारे ) चां-भार यांच्या स्त्रियेशीं ब्राह्मणानें गमन केलें असतां दोन चांद्रायणें प्रायश्चित्त सांगितलें आहे. ॥ ९ ॥ आपस्तंबाचें वचन-मुसलमान, नट, चांभार, परीट, बुरूड, यांच्या स्त्रीयेशीं गमन केलें असतां दोन चांद्रायणें प्रायश्चित्त आहे. ॥ १० ॥ परीट, चांभार, नट, बुरूड, कैवर्त्त ( समुद्रांती-ल मासे मारून उपजीविका करणारे कोळी ) मैंद, फाशी पारधी हे सात अंत्यज सांगितले आहेत. ॥ ११ ॥ चांडालादिकांच्या स्त्रियेशीं गमन केलें असतां अत्यंत प्रायश्चित्त सांगितलें आहे तें सर्व गुरु स्त्रियेच्या प्रकरणांत पूर्वी सांगितलें आहे. तेथें पहावें.

उशनाः ॥ बहूनामेकधर्मोणामेकस्यापि यदुच्यते ॥ सर्वेषां तद्भवेत्कार्यमेकरूपा हिते स्मृताः ॥ १२ ॥ यत्र पुक्लसादिस्त्रीगमने प्रायश्चित्तविशेषो नाम्नातः तत्र चां-डालादिस्त्रीगमने यत्प्रायश्चित्तं तदेव कर्त्तव्यम् ॥ रजक्यादिगमने यत्प्रायश्चित्तं तदेव सदृशीष्वपि कर्त्तव्यमित्यर्थः पूर्वोक्तं चांद्रायणद्वयं ब्राह्मणस्य कामतोरजक्यादिगमने क्षत्रियादीनां तु पादपादोनं कल्पनीयम् ॥ अकामतस्तु ब्राह्मणस्य संवर्तोक्तं ॥ रजक व्याधशैलूषवेणुचर्म्मोपजीविनाम् ॥ स्त्रियोविमोयदा गच्छेत्कृच्छ्रं चांद्रायणं चरेत् ॥ १३ ॥ अत्राप्यशक्तस्य आपस्तंबः अकामतः स्त्रियो गत्वा पराकंव्रतमाचरेत् ॥ रेतःसेकादर्व्वाक्निवृत्तौ तु शातातपोक्तम् ॥ कैवर्तिं रजकीं चैव वेणुचर्म्मोप-

जीविनीम् ॥ प्राजापत्यविधानेन कृच्छ्रेणैकेन शुद्ध्यति॥ १४ ॥ कपालिकीकैवर्त्त्यादिषु ज्ञानादज्ञानाद्वाभ्यासे ॥ उशनसोक्तम् ॥ कापालिकान्नभोक्तृणां तन्नारीगामिनां तथा ॥ ज्ञानात्कृच्छ्राद्बमुद्दिष्टमज्ञानादैन्दवद्वयम् ॥ १५ ॥ अज्ञानाच्चांडाल्यादिगर्भाधाने द्वादशवार्षिकं तेनैवोक्तं द्रष्टव्यम् ॥ चांडाल्यादिगर्भमारोप्य गुरुतल्पव्रतं चरेत् ॥ ज्ञानाद्द्वापस्तंबोक्तम् ॥ अंत्यजायां प्रसूतस्य निष्कृतिर्न विधीयते ॥ निर्वासनं कृताङ्कस्य तस्य कार्यमसंशयम् ॥ १६ ॥ एवमन्यान्यपि च वचनानि विषय विशेषेषु योज्यानि ॥ अनियुक्तोभ्रातृजायां गच्छन् चांद्रायणं चरेत् ॥ अकामतः सकृत् स्वभार्यायामपिरजस्वलायां गमने याज्ञवल्क्योक्तम् प्रायश्चित्तंज्ञेयं ॥ त्रिरात्रांते घृतं प्राश्य गत्वोदक्यां विशुद्ध्यति ॥ १७ ॥ त्रिरात्रांते त्रिरात्रोपवासांते ॥ कामतो भ्यासे बृहस्पतिवचोक्तम् ॥ रजस्वलांतु योगच्छेत् गर्भिणीं पतितां तथा ॥ तस्य पापविशुद्ध्यर्थं प्रतिकृच्छ्रं विशोधनम् ॥ १८ ॥

चांद्रायण प्रायश्चित्त सांगितलें आहे. रजस्वला अशा आपल्या बायकोचे ठायीं अज्ञानानें एक वेळा गमन केलें असतां त्रिरात्र उपोषण करून घृत प्राशन केल्यानें शुद्धता होते. ॥ १७ ॥ कामपूर्वक गमन केलें असतां संवर्त्ताचें वचन जो पुरुष रजस्वला स्त्रियेचे ठायीं गमन करितो तसेंच गर्भिणी अथवा पतीत झालेल्या स्त्रियेशीं गमन करितो त्यानें आपलें पातक जाण्यास अतिकृच्छ्र प्रायश्चित्त करावें. ॥ १८ ॥

## अथ व्यभिचारे स्त्रीणां प्रायश्चित्तनिर्णयः ॥

मनुः ॥ विप्रदुष्टां स्त्रियं भर्ता निरुंध्यादेकवेश्मनि ॥ यत्पुंसः परदारेषु तच्चैनां चारयेद्व्रतम् ॥ १ ॥ अत्र ॥ प्रायश्चित्तार्द्धमर्हन्ति स्त्रियोरोगिणएव च ॥ इति न प्रवर्त्तते यत्पुंसः परदारेषु सामान्येषु व्रतं स्मृतम् ॥ व्यभिचारात्तु भर्तुः स्त्री तदशेषं समाचरेत् ॥ २ ॥ इति बृहस्पतिस्मरणात् समानेषु सवर्णेषु एतदुत्कृष्टस्याप्युपलक्षणम् ॥ इदं च स्त्रीणां समानेषु उत्तमेषु वा वर्णेषु इच्छापूर्वकव्यभिचारे एव अनिच्छंत्याबलात्सवर्णोत्कृष्टोपभुक्तायाः प्राजापत्येन शुद्धिः ॥ तत्र संवर्तः ॥ बलात्प्रमध्य भुक्ता चेत् दह्यमानेन चेतसा ॥ प्राजापत्येन शुद्धिः स्यात्तस्यास्तत्पावनं महत् ॥ ३ ॥ तत्राशक्तौ ऋष्यशृंगः बलेन कामिता नारी सवर्णेन कथंचन ॥ प्रायश्चित्तं त्रिरात्रं वै तस्या. शुद्ध्यर्थमेवच ॥ ४ ॥ अकामतोब्राम्हण्यावैश्यक्षत्रीयगमने मासं तदर्धं चक्रमेण गोमूत्रयावकपानं ॥ तथाच संवर्तः ब्राह्मण्यकामा गच्छेचेत् क्षत्रियं वैश्यमेव वा ॥ गोमूत्रयावकैर्मासात्तदर्धाच विशुध्यति ॥ कामतोद्विगुणम् ॥ ५ ॥ बृहस्पचेताः ॥ विप्रा शूद्रेण संयुक्ता न चेत्तस्मात्प्रसूयते ॥ प्रायश्चित्तं स्मृतं तस्याः कृच्छ्रं चांद्रायणत्रयम् ॥ ६ ॥ चांद्रायणे द्वे कृच्छ्रश्च विप्राया वैश्यसंगमे ॥ कृच्छ्रचांद्रायणेस्यातां तस्याः क्षत्रियसंगमे ॥ ७ ॥ क्षत्रियाशूद्रसम्पर्के कृच्छ्रं चांद्रायणद्वयम् ॥ चांद्रायणं सकृत्कृच्छ्रंतुचरेद्वैश्येन संगता ॥ शूद्रं गत्वा चरेद्वैश्या कृच्छ्रंचांद्रायणोत्तरम् ॥ ८ ॥

## स्त्रियांनीं व्यभिचार केला असतां प्रायश्चित्त सागतों.—

मनुः ॥ विशेषें करून व्यभिचारानें दोषीत झालेल्या अशा स्त्रीयेस घरात अटकाव करून ठेवावा. आणि पुरुषानें परस्त्रीशीं गमन केलें असता जें प्रायश्चित्त पुरुषास सांगितलें आहे. तेंच त्या स्त्रीकडूनही करवावें. ॥ १ ॥ आता पुरुषास जे प्रायश्चित्त सांगितलें असेल त्याच्या अर्धें प्रायश्चित्त स्त्रिया आणि रोगी यास आहे. असें जें वचन आहे तें येथे घ्यावयाचें नाहीं. कारण व्यभिचाराहून अन्यस्थळीं तें वचन लागू करावयाचें आहे. ॥ २ ॥ त्यास बृहस्पतीचें वचन पुरुषानें पर स्त्रियेचें ठायीं गमन केलें असता जें सामान्यें करून प्रायश्चित्त सांगितलें असेल तें सर्व प्रायश्चित्त स्त्रियाकडून करवावें,

जीविनीम् ॥ प्राजापत्यविधानेन कृच्छ्रेणैकेन शुद्ध्यति॥ १४ ॥ कपालिकीकैवर्त्या- दिषु ज्ञानादज्ञानाच्चाभ्यासे ॥ उशनसोक्तम् ॥ कापालिकान्नभोक्तॄणां तन्नारीगामिनां तथा ॥ ज्ञानात्कृच्छ्रद्वयमुद्दिष्टमज्ञानादैन्दवद्वयम् ॥ १५ ॥ अज्ञानाच्चांडाल्यादि- गर्भाधाने द्वादशवार्षिकं तेनैवोक्तं द्रष्टव्यम् ॥ चांडाल्यादिगर्भमारोप्य गुरुतल्पव्रतं चरेत् ॥ ज्ञानाद्वापस्तंबोक्तम् ॥ अंत्यजायां प्रसूतस्य निष्कृतिर्न विधीयते ॥ निर्वा- सनं कृत्वाङ्कस्य तस्य कार्यमसंशयम् ॥ १६ ॥ एवमन्यान्यपि च वचनानि विषय विशेषेषु योज्यानि ॥ अनियुक्तोभ्रातृजायां गच्छन् चांद्रायणं चरेत् ॥ अकामतः सकृत् स्वभार्यायामपिरजस्वलायां गमने याज्ञवल्क्योक्तम् प्रायश्चित्तंज्ञेयं ॥ त्रिरात्रांते घृतं प्राश्य गत्वोदक्यां विशुद्ध्यति ॥ १७ ॥ त्रिरात्रांते त्रिरात्रोपवासांते ॥ कामतो भ्यासे बृहत्संवर्त्तोक्तम् ॥ रजस्वलांतु योगच्छेत् गर्भिणीं पतितां तथा ॥ तस्य पाप- विशुद्ध्यर्थं प्रतिकृच्छ्रं विशोधनम् ॥ १८ ॥

एक धर्मांचे पुष्कळ लोक असतां त्यांतील एकास जें प्रायश्चित्त सांगितलें असेल तेंच सर्वांनी जाणावें कारण ते एक दोषच सांगितले आहेत. ॥ १२॥ जेथें पुक्कसादिकांच्या ( चांडाळांतील भेद ) स्त्रियेशीं गमन केलें असतां प्रायश्चित्त सांगितलें नसेल तेथें चांडाळादिकांच्या स्त्रियेशीं गमन केलें असतां जें प्रायश्चित्त तेंच प्रायश्चित्त करावें. तसेंच परीटाच्या स्त्रियेशीं गमन केलें असतां जें प्रायश्चित्त तेंच प्रायश्चित्त बुरूड, मेद, फासीनारदी यांच्या स्त्रियेच्या गमनाच्या ठायीं जाणावें. पूर्वी सांगितलेलीं दोन चांद्रायणें प्रायश्चित्तें परीटाच्या स्त्रियेशीं इच्छेनें गमन केलें असतां आहे. क्षत्रियादिकांस रजकस्त्रियेचें प्रायश्चित्त एक एक पाद याप्रमाणें न्यून असें सांगितलें आहे. प्रमादानें अज्ञानानें गमन केलें असतां व्यास संवर्ताचें वचन. परीट, नट, [illegible], वेणु वाजऊन उपजीविका करणारे, चांभार यांच्या स्त्रियेशीं गमन केलें असतां कृच्छ्र चांद्रायण प्रायश्चित्त सांगितलें आहे. ॥ १३ ॥ तें करण्यास अशक्त असेल तर आपस्तंबाचें वचन–अनेकवेळां या स्त्रियेशीं गमन केलें असतां पराक प्रायश्चित्त करावें. रेतःसिंचन होण्याचे पूर्वी गमनापासून निवृत्ति झाली असतां शातातपाचें वचन असें आहे की, चांडालादिकांच्या स्त्रियेच्या ठायीं रेतःसिंचन होण्याचे पूर्वी निवृत्ति झाली असतां कृच्छ्र प्राजापत्यानें शुद्ध होतो. ॥ १४ ॥ कपालिकाच्या स्त्रियेचे ठायीं अज्ञानानें गमन केलें असतां दोन चांद्रायणें प्रायश्चित्त आहे. ज्ञानपूर्वक गमन केलें असतां कृच्छ्र प्रायश्चित्त सांगितलें आहे. ॥ १५ ॥ चांडाल्यादिकांच्या स्त्रियेचे ठायीं अज्ञानानें गर्भ [illegible] [illegible] गुरुतल्पीशीं गमन केलें असतां जें प्रायश्चित्त तेंच प्रायश्चित्त करावें. आपस्तंबाचें वचन–अंत्यज स्त्रियेचे ठिकाणीं [illegible] [illegible] [illegible] [illegible] प्रायश्चित्त नाहीं. [illegible] [illegible] [illegible] [illegible] करावें. ॥ १६ ॥ याचे [illegible] [illegible] स्त्रियेचे ठायीं [illegible] गमन केलें असतां [illegible]

चान्द्रायण प्रायश्चित्त सांगितलें आहे. रजस्वला अशा आपल्या बायकोचे ठायीं अज्ञानानें एक वेळा गमन केलें असतां त्रिरात्र उपोषण करून घृत प्राशन केल्यानें शुद्धता होते. ॥ १७ ॥ कामपूर्वक गमन केलें असतां सवर्त्ताचें वचन जो पुरुष रजस्वला स्त्रियेचे ठायीं गमन करितो तसेंच गर्भिणी अथवा पतीत झालेल्या स्त्रियेशीं गमन करितो त्यानें आपलें पातक जाण्यास अतिकृच्छ्र प्रायश्चित्त करावें. ॥ १८ ॥

## अथ व्यभिचारे स्त्रीणां प्रायश्चित्तनिर्णयः ॥

मनुः ॥ विप्रदुष्टां स्त्रियं भर्त्ता निरुंध्यादेकवेश्मनि ॥ यत्पुंसः परदारेषु तच्चैनां चारयेद्व्रतम् ॥ १ ॥ अत्र ॥ प्रायश्चित्तार्द्धमर्हन्ति स्त्रियोरोगिणएव च ॥ इति न प्रवर्त्तते यत्पुंसः परदारेषु सामान्येषु व्रतं स्मृतम् ॥ व्यभिचारात्तु भर्त्तुः स्त्री तदशेषं समाचरेत् ॥ २ ॥ इति बृहस्पतिस्मरणात् समानेषु सवर्णेषु एतदुत्कृष्टस्याप्युपलक्षणम् ॥ इदं च स्त्रीणां समानेषु उत्तमेषु वा वर्णेषु इच्छापूर्वकव्यभिचारे एव अनिच्छंत्याबलात्सवर्णोत्कृष्टोपभुक्तायाः प्राजापत्येन शुद्धिः ॥ तत्र संवर्तः ॥ बलात्प्रमथ्य भुक्ता चेत् दह्यमानेन चेतसा ॥ प्राजापत्येन शुद्धिः स्याचस्यास्तत्पावनं महत् ॥ ३ ॥ तत्राशक्तौ ऋष्यशृंगः बलेन कामिता नारी सवर्णेन कथंचन ॥ प्रायश्चित्तं त्रिरात्रं वै तस्याः शुद्ध्यर्थमेवच ॥ ४ ॥ अकामतोब्राम्हण्यावैश्यक्षत्रीयगमने मासं तदर्धं चक्रमेण गोमूत्रयावकपानं ॥ तथाच संवर्तः ब्राह्मण्यकामा गच्छेचेत् क्षत्रियं वैश्यमेव वा ॥ गोमूत्रयावकैर्मासात्तदर्धाच्च विशुध्यति ॥ कामतोद्विगुणम् ॥ ५ ॥ बृहस्पतेः ॥ विप्रा शूद्रेण संपृक्ता न चेत्तस्मात्प्रसूयते ॥ प्रायश्चित्तं स्मृतं तस्याः कृच्छ्रं चांद्रायणत्रयम् ॥ ६ ॥ चांद्रायणे द्वे कृच्छ्रश्च विप्राया वैश्यसंगमे ॥ कृच्छ्रचांद्रायणेस्यातां तस्याः क्षत्रियसंगमे ॥ ७ ॥ क्षत्रियाशूद्रसम्पर्के कृच्छ्रं चांद्रायणद्वयम् ॥ चांद्रायणं सकृत्कृच्छ्रंतुचरेद्वैश्येन संगता ॥ शूद्रं गत्वा चरेद्वैश्या कृच्छ्रंचांद्रायणोत्तरम् ॥ ८ ॥

## स्त्रियांनीं व्यभिचार केला असतां प्रायश्चित्त सांगतों.-

-मनुः ॥ विशेषें करून व्यभिचारानें दोषीत झालेल्या अशा स्त्रीयेस घरात अटकाव करून ठेवावा. आणि पुरुषानें परस्त्रीशीं गमन केलें असता जे प्रायश्चित्त पुरुषास सांगितलें आहे. तेंच त्या स्त्रीकडूनही करवावें. ॥ १ ॥ आता पुरुषास जें प्रायश्चित्त सांगितलें असेल त्याच्या अर्धे प्रायश्चित्त स्त्रिया आणि रोगी यास आहे. असें जें वचन आहे तें येथें घ्यावयाचें नाहीं.कारण व्यभिचाराहून अन्यस्थलीं तें वचन लागू करावयाचें आहे.॥२॥त्यास बृहस्पतीचें वचन पुरुषानें पर स्त्रियेचें ठायीं गमन केलें असतां जें सामान्यें करून प्रायश्चित्त सांगितलें असेल तें सर्व प्रायश्चित्त स्त्रियाकडून करवावें.

स्त्रियेनें आपल्या समान वर्णाशीं अथवा उत्तम वर्णाशीं इच्छेनें व्यभिचार केला असतां त्यास प्रायश्चित्त आहे. इच्छा नसोन बलात्कारानें समान अथवा उत्तम वर्णाच्या पुरुषानें उपभोग केला असतां स्त्री प्राजापत्य व्रताचरणानें शुद्ध होते त्यास संवर्त्ताचें वचन कामानें ज्याचें अंतःकरण अतिशय तप्त झालें आहे. अशा पुरुषानें इच्छा नसणाऱ्या स्त्रीशीं गमन केलें असतां ती स्त्री प्राजापत्याचरणानें शुद्ध होते. ॥ ३ ॥ प्राजापत्या चरणास ही अशक्त असेल तर ऋष्यशृंगाचें वचन समान जातीच्या अशा पुरुषानें बलात्कारानें स्त्रिशीं उपभोग घेतला असतां ती स्त्री त्रीरात्र उपोषण केल्यानें शुद्ध होते. ॥ ४ ॥ अनिच्छेनें ब्राह्मण स्त्रीनें वैश्य पुरुषाशीं समागम केला असतां गोमूत्रात शिजविलेलें सातूचें पीठ भक्षण करून एक महिनाभर राहावें. क्षत्रीयाशीं गमन केलें असतां पंधरा दिवस गोमूत्रांत शिजविलेलें सातूचें पीठ भक्षण करून राहावें ह्मणजे शुद्ध होते. संवर्त्ताच्या वचनाचा अर्थ असाच आहे. इच्छेनें वरील जातीच्या पुरुषाशीं गमन केलें असतां द्विगुणीत प्रायश्चित्त सांगितलें आहे. ॥ ५ ॥ ब्रह्मप्रचेताचें वचन ब्राह्मणस्त्री शूद्र जातीच्या पुरुषाशीं जर गमन करील आणि त्या पासून गर्भधारणा झाली नसेल तर ३ कृच्छ्र चांद्रायणें प्रायश्चित्त केल्यानें शुद्ध होईल ॥ ६ ॥ वैश्य जातीच्या पुरुषाशीं समागम केला असतां दोन कृच्छ्रें चांद्रायणें आणि क्षत्रिय जातीच्या पुरुषाशीं समागम केला असतांही कृच्छ्र चांद्रायणें प्रायश्चित्त सांगितलें आहे. ॥७॥ क्षत्रिय जातीच्या स्त्रियेनें शूद्र जातीच्या पुरुषाशीं गमन केलें असतां दोन कृच्छ्रें चांद्रायणें प्रायश्चित्त. वैश्य जातीच्या पुरुषाशीं गमन केलें असतां एक कृच्छ्र चांद्रायण प्रायश्चित्त वैश्य जातीच्या स्त्रीनें शूद्राशीं गमन केलें असतां कृच्छ्र चांद्रायण प्रायश्चित्त आहे.॥८॥

## ॥ अथ अंत्यजगमने तु स्त्रीणां प्रायश्चित्तनिर्णयः ॥

स्मृत्यंतरे ॥ रजकांत्यजशैलूषवेणुचर्मोपजीविनः ॥ ब्राह्मण्येतान् यदा गच्छेदकामान्दैन्दवत्रयम् ॥१॥ चांडालं पुक्कशं म्लेच्छं श्वपाकं पतितं तथा ॥ ब्राह्मण्यकामतोगत्वा चांद्रायणचतुष्टयम् ॥ २ ॥ अकामतः प्रायश्चित्तांतरमपि स्मर्य्यते ॥ चांडालेन तु संयोगं यदि गच्छेत्कथंचन ॥ सशिखं वपनं कुर्य्याद्भुंजीत यावकौदनम् ॥ ३ ॥ त्रिरात्रमुपवासः स्यादेकरात्रं जले वसेत् ॥ आत्मना संमिते कूपे गोमयोदककर्दमे ॥ ४ ॥ तत्र स्थित्वा निराहारा सा त्रिरात्रं ततः क्षिपेत् ॥ शंखपुष्पीलतामूलं पत्रं वा कुसुमं फलम् ॥ क्षीरं सुवर्णसंमिश्रं क्वाथयित्वा ततः पिबेत् ॥ ५ ॥ एकभक्तंचरेत्पश्चा यावत्पुष्पवती भवेत् ॥ बहिस्तावच्च निवसेत् यावच्चरति तद्व्रतम् ॥ ६ ॥ प्रायश्चित्ते सवधीर्णे कुर्यात् ब्राह्मणभोजनम् ॥ गोद्वयं दक्षिणां दद्यात् सतुस्वायम्भुवोऽब्रवीत् ॥ ७ ॥ कामतोऽन्त्यजगमने ॥ अन्त्यजेन तु सम्पर्के भोजने मैथुनेकृते ॥ प्रविशेत् संप्रदीप्तेग्नौ मृत्युनासौ विशुद्ध्यति ॥ ८ ॥ यदा तु प्रायश्चित्तं न करोति दर्पादिना तदा राजाक्षया पुंलिंगेनांकनीया वध्याच ॥वधोऽत्र नासिकादिकर्त्तनमित्यपरार्के॥९॥

## आतां अंत्यजाशीं गमन केलें असतां प्रायश्चित्त सांगतों.

परीट, नट, वेणू वाजऊन उपजीविका करणारे, चांभार, त्यांच्याशीं ब्राह्मण स्त्री भ्रांतीनें गमन करील तर ३ चांद्रायणें प्रायश्चित्त करावें. ॥ १ ॥ चांडाळ, पुल्कस म्लेंछ यांच्याशीं ब्राह्मण-स्त्री भ्रांतीनें गमन करील तर चार चांद्रायणें प्रायश्चित्त करावें. ॥ २ ॥ भ्रांतीनें गमन केलें असतां दुसरेंही प्रायश्चित्त सांगितलें आहे. तें असें सर्वकेशांचें वपन करून गोमूत्रात शिजविलेले सातू भक्षण करून त्रिरात्र उपोषण करावें आणि १ दिवसरात्र पाण्यांत उभे राहावें नंतर त्या स्त्रियेच्या शरीरा बरोबर उंचीचा आड बांधावा ॥ ४ ॥ आणि त्या मध्यें शेणाचें, पाणी करून घालावें नंतर त्या स्त्रीस ३ रात्रदिवस त्यास उभें करावें नंतर शंखपुष्पीची वेल मूळ, पानें, फुलें, फळें, हीं घेऊन दुधात घालून थोडें सोनें त्यात टाकून दूध तापवावें आणि तें दूध पिण्यास द्यावें. ॥ ५ ॥ नंतर ती विटाळशी होईपर्यंत १ वेळा अन्न खाऊन राहावें हे सर्व व्रताचरण होईपर्यंत आपल्या घरात न राहता वेगळें रहावें. ॥ ६ ॥ हें प्रायश्चित्त केल्या नंतर ब्राह्मणभोजन करावें. ब्राह्मणास दोन गोप्रदानें दक्षिणा सहीत करावी. ह्मणजे शुद्धता होते. असें स्वयंभूनें सांगितलें आहे. ॥ ७ ॥ इच्छेनें अंत्यजाशीं गमन केल्याचा विचार सांगतों–अंत्यजाशीं संपर्क भोजन अथवा मैथून केलें असता प्रदीप्त केलेला अग्नि त्याच्या ठायीं प्रवेश करावा ह्मणजे शुद्धता होते. ॥ ८ ॥ ह्मणजे यास प्रायश्चित्त नाहीं. असें दिसतें. जेव्हां गर्वानें प्रायश्चित्त घेत नसेल तेव्हां राजाची आज्ञा घेऊन पुरुषाचें लिंग लोखंडाचें करून तें तप्त करून मस्तकावर डागावें. आणि तिचा वध करावा. येथें वध शब्दाचा अर्थ नाक अथवा कान कापणें. असा परार्क ग्रंथात सांगितला आहे हें करणें तें राजानेंच करावें. ॥ ९ ॥

## अथ गर्भधारणे प्रायश्चित्तनिर्णयः

चतुर्विंशतिमते ॥ विप्रगर्भेपराकःस्यात्क्षत्रियस्यतथेन्दवम् ॥ ऐन्दवश्चपराकश्चवैश्यस्या कामकारतः ॥ ९ ॥ शूद्रगर्भेभवेत्त्यागश्चांडालोजायतेयतः ॥ गर्भश्रावेधातुदोषेचरेच्चांद्रायणत्रयम् ॥ १० ॥ कामकारेतुद्विगुणं ॥ गर्भश्रावे चांद्रायणत्रयंशूद्रगर्भेश्रावएव यदातुशूद्रगर्भप्रसवस्तदाप्रायश्चित्ताभावएव ॥ ११ ॥ तथाचवशिष्ठः ॥ ब्राह्मणक्षत्रियविशांभार्य्याःशूद्रेणसंगताः ॥ अप्रसूताविशुद्ध्यंतिप्रायश्चित्तेननेतराः ॥१२॥

## आतां गर्भधारण प्रायश्चित्ताचा निर्णय सांगतों.

चतुर्विंशति मतांत असें सांगितलें आहे की, ब्राह्मणस्त्रियेस ब्राह्मण पुरुषापासून गर्भ धारणा झाली असतां पराक प्रायश्चित्त. क्षत्रिया पासून झाली असतां चांद्रायण प्रायश्चित्त. वैश्या पासून झाली असतां चांद्रायण आणि पराक प्रायश्चित्त परंतु हीं प्रायश्चित्तें अज्ञानानें न समजून गर्भधारणा झाली असतांचें आहेत. ॥ ९ ॥ शूद्रा पासून गर्भ धारणा झाली असतां त्यागच करावा. कारण

तो गर्भ चांडाळ होतो. गर्भधारणा होऊन गर्भस्राव झाला असेल तर धातु दोषा मुळें तीन चांद्रायणें प्रायश्चित्तें करावीं. ॥ १० ॥ इच्छेनें वर लिहिल्लें कृत्य झालें असता द्विगुण प्रायश्चित्त करावें. गर्भ प्रसुती झाली असतां त्यागच करावा. त्यास प्रायश्चित्त नाहीं. ॥ ११ ॥ यास वसिष्ठाचें वचन ब्राह्मण, क्षत्रिय, वैश्य यांच्या स्त्रिया शूद्रांशीं गमन करितील आणि त्या पासून गर्भ धारणा झालीं नसेल तरच त्या शुद्ध होतात. गर्भिणी झाल्या असता त्या शुद्ध होत नाहींत. ॥ १२ ॥

## अथ गर्भिणीनां व्यभिचारे निर्णयः

यदा संवृद्धगर्भा व्यभिचरति तदा प्रसवोत्तरकाले प्रायश्चित्तम् ॥ अन्तर्वत्नी तु. या नारीसमेनाक्रम्य कामिता ॥ प्रायश्चित्तं न कुर्य्यात्सा यावद्गर्भोविनिःसृतः ॥ १ ॥ जाते गर्भे व्रतं पश्चात्कुर्य्यान्मासं तु यावकम् ॥ न गर्भदोषस्तत्रास्ति संस्कारश्च यथाविधि ॥ इति स्मरणात् ॥ २ ॥ आक्रम्य बलात् इच्छापूर्वंचेद्यदुक्तं तत्द्विगुणं ॥ यदा प्रायश्चित्तं न चिकीर्षति दर्पादिना तदा राजाज्ञया नार्य्याः कर्णादिकर्त्तनमित्यंगच्छेदः ॥ ३ ॥

## गर्भिणी स्त्रीनें व्यभिचार केला असतां प्रायश्चित्ताच्या निर्णयाचा विचार–

स्त्रीस पतीपासून गर्भधारणा झाल्यानंतर ती जर व्यभिचार करील तर प्रसूत झाल्या नंतर प्रायश्चित्त करावें. त्यास वचन–गर्भिणी स्त्री समान जातीच्या पुरुषाशी जर व्यभिचार करील तर प्रसूत झाल्या नतर प्रायश्चित्त करावें. ॥ १ ॥ प्रसूत झाल्या नतर एक महिनाभर पर्यंत सातुचें पीठ भक्षण करावें. येथें गर्भास दोष नाहीं. गर्भाचा यथाशास्त्र संस्कार करावाना. ॥ २ ॥ जेव्हां एखादि स्त्री व्यभिचारादि महादोष करून गर्वानें प्रायश्चित्त करीत नसेल तेव्हां राजाज्ञेनें कर्णादिकांचें कर्तन करावें. ॥ ३ ॥

## अथ मानसिकवाचिकव्यभिचारयोः प्रायश्चित्तनिर्णयः

वसिष्ठः ॥ मनसा भर्तृव्यभिचारे त्रिरात्रं यावकं क्षीरोदनं वा भुंजाना अधःशयीत ऊर्ध्वं त्रिरात्रात् अप्सु निमग्नायाः सावित्र्या चतुर्भिरष्टशतैः शिरोभिर्जुहुयादिति ॥ १ ॥ अष्टाधिकं शतमष्टशतं तैश्चतुर्भिः शिरोभिःशिरसैः ॥ इदं च मानसिकव्यभिचारे प्रायश्चित्तंरजोदर्शनादर्वाग्व्यवहार्यत्वसिद्ध्यै ॥ रजोदर्शने तु सति तेनैव

शुद्धिः ॥ २ ॥ तथा च मनुः ॥ मृत्तोयैः शुद्ध्यते शोध्यं नदीवेगेन शुद्ध्यति ॥ रजसा स्त्री मनोदुष्टा संन्यासेनद्विजोत्तमः ॥ ३ ॥ हीनवर्णव्यवाये तु पराशरः ॥ हीनवर्णोपभुक्ता या सांत्यज्या वध्यापि वा भवेदिति ॥ अंकपक्षे त्यागएव ॥ चतस्रस्तु परित्याज्याः शिष्यगागुरुगा च या ॥ पतिघ्नी च विशेषेण जुंगितोपगता च येति वसिष्ठोक्तेः ॥ जुंगितः प्रतिलोमजः ॥ अत्र च विशेषविधानात् ॥ परित्यागोगृहान्निर्यासनमेव ॥ ४ ॥ अन्यत्र तु ॥ विप्रदुष्टां स्त्रियं भर्त्ता निरुंध्यादेकवेश्मनीतिमनूक्तोविरोधः ॥ याज्ञवल्क्योपि ॥ हृताधिकारां मलिनां पिंडमात्रोपजीविनीं ॥ परीभूतामधःशय्यां वासयेद्व्यभिचारिणीमिति ॥ ५ ॥ अत्रचवासनं वैराग्यजननार्थमेव ॥ यत्तु चतुर्विंशतिमते ॥ स्त्रीणां नास्ति परित्यागोब्रह्महत्यादिभिर्विना ॥ तत्राऽपि गृहमध्ये तु प्रायश्चित्तानि कारयेत् ॥ परित्यक्ता चरेत्पापं वव्हल्पं वापि किंचन ॥ तत्पापं शतधा भूत्वा बांधवाननु गच्छति ॥ ६ ॥ तद्गर्भाऽनुत्पत्तिपरं ॥ तद्युक्तायास्तु परित्यागमाह पराशरः ॥ जारेण जनयेद्गर्भं मृते व्यक्ते गतेपतौ ॥ तांत्यजेदपरे राष्ट्रे पतितां पापकारिणीमिति ॥ अपरेराष्ट्रइत्युक्तेर्गृहान्निष्काशनं गम्यते ॥ ७ ॥ अतएवचतुर्विंशतिमते ॥ चतस्रएव संत्याज्याः पतिताः संत्यतःस्त्रियः ॥ श्वपाकोपहता या तु भर्तृघ्नी पतिपुत्रगेति ॥ ८ ॥ अत्रचशिष्यगादीनां त्यागोगर्भविषयएव ॥ व्यभिचारादृतौ शुद्धिर्गर्भे त्यागोविधीयते ॥ गर्भभर्तृवधादौ च तथा महतिपातकइति ॥ ९ ॥ याज्ञवल्क्योक्तेः ॥ गर्भः शूद्रादिकृतः ॥ ब्राह्मणक्षत्रियविशां भार्याः शूद्रेण संगताः ॥ अप्रजास्ता विशुद्ध्यंति प्रायश्चित्तेन नेतराइति वसिष्ठस्मरणात् ॥ १० ॥ मिताक्षरायां तु व्यवहारनिरोधएव त्यागशब्देनोक्तोनतु गृहान्निर्वासनमपीति ॥ इति स्त्रीप्रायश्चित्तम् ॥ ११ ॥

आतां मनानें अथवा वाणीनें व्यभिचार केला असतां प्रायश्चित्ताचा निर्णय—त्यास वसिष्ठाचें वचन-मनानें अथवा वाणीनें भर्त्याशीं व्यभिचार केला असतां तीन दिवस सातूचें पीठ अथवा दूध प्राशन करून रहावें. भोजन करूं नये. जमिनीवर निजावें याप्रमाणें तीनं दिवस केल्या नंतर चवथे दिवशीं पाण्यांत बुडून नंतर एकशें आठ वेळा गायत्रीमंत्र म्हणून मस्तकाचे ठायीं अभिषेक करावा ॥ १ ॥ असे चार वेळा केल्यानें शुद्धता होते. हें मानसिक व्यभिचाराचें प्रायश्चित्त रजोदर्शनाचे पूर्वी व्यवहाराची शुद्धता होण्या करितां सांगितलें आहे. रजो दर्शन झालें असतां तेणेंकरून शुद्धता होते. ॥ २ ॥ यास मनुचें वचन शुद्ध करण्यास योग्य अशी वस्तु माती आणि पाणी यांच्या योगानें शुद्ध होते. नदी वेगाच्या योगानें शुद्ध होते. मनानें दोष केला आहे अशी जी स्त्री ती रजोदर्शनानें शुद्ध होते. आणि ब्राह्मण संन्यास ग्रहणानें शुद्ध होतो. ॥ ३ ॥ हीनवर्ण पुरुषाशीं व्यभिचार केला असतां पाराशराचें वचन न्यूनजातीच्या पुरुषाशीं व्यभिचार करणारी जी स्त्री तिला त्यागावें अथवा नासिक, कर्ण

इत्यादिक कापून टाकावें. असें जेथें सांगितलें आहे. तेथें त्या स्त्रियांचा त्याग करावा. शास्त्रांत चार प्रकारच्या स्त्रिया टाकण्यास सांगितलें आहे. त्या अशा आपल्या शिष्याशीं गमन करणारी, गुरुशी, तसेंच पतीचा नाश करणारी, आणि हीन वर्णाशीं गमन करणारी, या स्त्रियांचा त्याग करावा. येथें त्याग शब्दाचा अर्थ घरांतून काढून देणें असा आहे. ॥ ४ ॥ दुसरीकडे व्यभिचार करणाऱ्या स्त्रीस प्रतिबंध करून घरांत ठेवावें असें सांगितलें आहे. याज्ञवल्क्यानें असें सांगितलें आहे कीं, व्यभिचार करणाऱ्या स्त्रीचे सर्व तऱ्हेचे अधिकार घ्यावेत. तिला मलीन रीतीनें ठेवावी. पोटास अन्न लागेल तेवढें द्यावें. भूमीवर शयन करवावें तिचा तिरस्कार करून तिला ठेवावें. ॥ ५ ॥ चतुर्विंशति मतांत असें सांगितलें आहे कीं, ब्रह्महत्यादी पातकें केल्या वांचून स्त्रियांचा त्याग करूं नये. घरांत ठेऊनच तिच्याकडून प्रायश्चित्ताचरण करवावें. कारण तिचा त्याग केला असतां ती कमजास्त रीतीनें पाप करील तर तें पाप शतप्रकारानें होऊन तिचे संबंधीक जे बांधवादिक त्यांस लागेल सबब त्याग करूं नये. ॥ ६ ॥ ती जारकर्मानें गर्भिणी झाली असतां त्याग करण्यास सांगितलें आहे. त्यास पाराशराचें वचन जारकर्मानें गर्भ धारणा झाली असतां ती स्त्री पतित होते. अशी पतित स्त्री अन्यराष्ट्राचे ठिकाणीं सोडून द्यावी तिचा नवरा मृत झाला असो अथवा व्यक्त असो अथवा देशांतरीं गेलीं असो. तिला घरांतून काढून द्यावी. ॥ ७ ॥ चतुर्विंशति मतांत असें सांगितलें आहे कीं, चांडाळाशीं गमन करणारी, पतीचा नाश करणारी, संन्याशी अथवा पुत्राशीं गमन करणारी, अशा प्रकारच्या स्त्रिया सोडून द्याव्या. ॥ ८ ॥ पूर्वी शिष्यादिकांशीं गमन करणाऱ्या स्त्रियांचा त्याग करावा असें लिहिलें आहे. तें गर्भधारणा झाली असतांचेंच आहे. कारण व्यभिचाराची शुद्धि ऋतु प्राप्त झाल्या नंतर प्रायश्चित्तानें होते. गर्भधारणा झाली असतां त्याग करण्यास सांगितलें आहे गर्भपात अथवा पतीचा नाश इत्यादि महा पातकें केली असतां त्याग करावा. येथें गर्भ या शब्दानें शूद्रादिका पासून झालेलाच घ्यावयाचा आहे. कारण ब्राह्मण, क्षत्रिय, वैश्य, यांच्या स्त्रिया शूद्राशीं संग करून गर्भिणी न झाल्या असता त्या शुद्ध होतात. असें वशिष्ठाचें वचन आहे. ॥ १०॥ मिताक्षरामध्यें त्याग शब्दाचा अर्थ व्यवहाराचा निरोध करण्यास सांगितलें आहे. तसेंच त्याग शब्दानें घरांतून काढून टाकणें असाही आहे. या प्रमाणें व्यभिचारनिर्णय जाणावा १ ॥१ ॥

## अथ पशुगमने प्रायश्चित्तनिर्णयः ॥

गोभिन्नासु तिर्यग्योनिषु महिषीगर्दभादिषु गमने सचैलस्नानं गोम्यस्तृणभारदानं च ॥ एकरात्रवासो वा ॥ कामतोभ्यासे कृच्छ्रपादम् ॥ अत्यंताभ्यासे प्राजापत्यं ॥ शुनीगमनाभ्यासे अतिकृच्छ्रं तथाच चतुर्विंशतिमते ॥ शुनीं चैव द्विजोगत्वा अतिकृच्छ्रं समाचरेत् ॥ १ ॥

## अथ गोगमनप्रायश्चित्तम् ॥

गवि सकृद्गमने उपवासत्रयपूर्वकं गोदानम् तथा च पराशरः गोगामी च त्रिरात्रेण गामेकां ब्राह्मणे दद्यात् ॥ इदमकामतः सकृद्गमने कामतो विष्णुः गोव्रतं गोगमने च॥ त्रैमासिकं गोव्रतं कार्यम् ॥ कामतोभ्यासे प्राजापत्यं त्रैमासिकं च ॥ कामतोऽत्यंताभ्यासे संवत्सरव्रतम् ॥ आजन्मात्यंताभ्यासे गुरुतल्पसम ज्ञेयम् ॥ २ ॥

## पशुगमनाच्या प्रायश्चित्ताचा विचार.

गाईहून भिन्न अशा ज्या महिषादि त्या पशु योनीचे ठायीं गमन केलें असतां सचैल स्नान करून भाराभर गवत गाईस घालावें. इच्छापूर्वक गमन करण्याचा अभ्यास असेल तर पादकृच्छ्र प्रायश्चित्त करावें. अत्यंत अभ्यास असेल तर प्राजापत्य कृच्छ्र प्रायश्चित्त करावें. चतुर्विंशति मतांतील वचनाचा अर्थ असाच आहे. ॥ १ ॥ गाईशीं गमन केलें असताच्या प्रायश्चित्ताचा निर्णय सांगतों.— गाईशीं गमन १ वेळीं केलें असता तीन उपोषणें करून एक गोप्रदान करावें. यास पाराशराचें वचन–गाईशीं गमन करणाऱ्या पुरुषानें त्रिरात्र उपोषण करून ब्राह्मणास गोप्रदान द्यावें. हें न जाणून एक वेळा गमनाचें प्रायश्चित्त आहे. इच्छापूर्वक गमन केलें असता विष्णूनें असें सांगितलें आहे कीं, गाईचा नाश करणाऱ्यास जें त्रैमासिक गोव्रत सांगितलें आहे तेंच करावें. इच्छेनें निरंतर गमन करण्याचा अभ्यास असेल तर प्राजापत्य आणि त्रैमासिक गोव्रत करावें. अत्यंत अभ्यास असेल तर संवत्सर व्रत करावें. जन्मभर पर्यंत अत्यंत गमन करण्याचा अभ्यास असेल तर गुरुपत्नी गमनास जें प्रायश्चित्त सांगितलें आहे तें करावें. ॥ २ ॥ या प्रमाणें पशुगमन प्रायश्चित्त निर्णय जाणावा.

## अथ परिवित्तिवार्धुष्यलवणक्रियाप्रायश्चित्तनिर्णयः ॥ १० ॥ ॥ ११ ॥ ॥ १२ ॥

तत्र कनीयसि कृतविवाहे ज्येष्ठस्य विवाहराहित्यं पारिवित्यं तद्वान्परिवित्तिस्तस्यायश्चित्तं परिवेदनप्रकरणे एवोक्तम् ॥ १ ॥ वार्धुष्य निषिद्धवृद्ध्युपजीवनं ॥ मुद्रिकाशतर्णदाने संबंधकाबंधकविभागशः ॥ सपादमुद्रिकाधिकं द्विकाधिकं वा प्रतिषिद्धवृद्धिः ॥ तत्रचांद्रादिष्वेकं त्रैमासिकं वा जातिशक्तिगुणाद्यपेक्षया योज्यम् ॥२॥ लवणक्रियालवणोत्पादनम् ॥ तत्रयोगीश्वरोक्तं सामान्योपपातकप्रायश्चित्तानि जातिशक्तिगुणाद्यपेक्षया योज्यानि ॥ ३ ॥

## आतां परिवित्ति, वार्धुष्य ( व्याज वट्टयानें उपजिवीका करणारा ) लवण क्रिया ( मीठ तयार करणें ) यांच्या प्रायश्चित्ताचा विचार ॥ १० ॥ ११ ॥ १२ ॥

धाकटया बंधूचें लग्न झालें असतां ज्या वडील बंधूचें लग्न झालें, नाहीं. त्यास परिवित्ति ह्मणावें त्यासंबंधाचें प्रायश्चित्त परिवेदनप्रायश्चित्त प्रकरणांत सांगितलें आहे. ॥ १ ॥ वार्धुष्य ( शास्त्रांत निषेध केलेली अशी जी वृद्धि ह्मणजे व्याज वाढी दिढी इत्यादिकानें उपजीविका करणारे गहाण ठेऊन शंभर रुपये दिले असतां सवा रुपया, गहाण न ठेवितां शंभर रुपयास दोन रुपये यापेक्षांही ज्यास्त व्याज घेऊन उपजिविका केली असतां उपपातकास चांद्रायण, महिनाभर दूध पीऊन राहणें, पराक प्रायश्चित्त, त्रैमासिक प्रायश्चित्त, यांतील एक प्रायश्चित्त जाती, शक्ति, गुण इत्यादिकांचा विचार करून सांगावें. ॥ २ ॥ लवणक्रिया मीठ उत्पन्न करणें यास याज्ञवल्क्यानें सांगितलेलें चांद्रायणादि सामान्य उपपातक प्रायश्चित्त जाती, गुण, शक्ति इत्यादिकांचा विचार करून योजना करावी. ॥ ३ ॥ याप्रमाणें परिवित्ति, वार्धुष्य, लवणक्रिया यांच्या प्रायश्चित्ताच्या निर्णयाचा विचार जाणावा.

## अथ क्षत्रियादिवधप्रायश्चित्तनिर्णयः ॥ १३ ॥

तुरीयोब्रह्महत्यायाः क्षत्रियस्य वधे स्मृतः ॥ वैश्येऽष्टमांशो व्रतस्थे शूद्रे ज्ञेयस्तु षोडशः ॥ १ ॥ अकामतस्तु राजन्यं विनिपात्य द्विजोत्तमः ॥ वृषभैकसहस्राश्च गादद्यात्सुचरितव्रतः ॥ २ ॥ त्र्यब्दं चरेद्वानियतो जटी ब्रह्महणोव्रतम् ॥ वसन्दूरतरे ग्रामाद्वृक्षमूलनिकेतनः ॥ ३ ॥ एतदेव चरेदब्दं प्रायश्चित्तं द्विजोत्तमः ॥ प्रमाप्य वैश्यं व्रतस्थं दद्याच्चैकशतं गवाम् ॥ ४ ॥ एतदेव व्रतं कृत्स्नं षण्मासान् शूद्रहा चरेत् ॥ वृषभैकादशवापि दद्याद्विप्राय गाः सिताः ॥ ५ ॥ अत्र प्रयोजकादीनां पादपादहानिःसर्वत्र ॥ अत्र सर्वत्रशवशिरःकपालध्वजतावश्यकी ॥ ६ ॥

## क्षत्रियादिकांचा वध केल्याचें प्रायश्चित्त. १३

क्षत्रियाचा वध केला असतां, ब्रह्महत्या करणारास जें बारा वर्षें प्रायश्चित्त सांगितलें आहे, त्याच्या चतुर्थांश त्रैमासिक प्रायश्चित्त केल्यानें शुद्धता होते. वैश्याचा वध केला असतां अष्टमांश प्रायश्चित्त, शूद्राच्या वधाचे ठायीं षोडशांश प्रायश्चित्त जाणावें. ॥ १ ॥ ब्राह्मणानें इच्छे वाचून क्षत्रियाचा वध केला असतां यथाशास्त्र प्रायश्चित्त करून १ बैल व हजार गाई याचें दान करावें. ॥ २ ॥ अथवा जटा धारण करून नियमयुक्त होऊन गावाचे बाहेर झाडाखाली राहून ब्रह्महत्येचें

प्रायश्चित्त ३ वर्षे पर्यंत करावें. हें प्रायश्चित्त केल्यानें क्षत्रियवधाच्या दोषापासून मुक्त होतो. ॥ ३ ॥ वैश्याचा वध केला असतां, सांगितल्या प्रमाणें १ वर्ष पर्यंत ब्रह्महत्या प्रायश्चित्त करावें. अथवा १०१ गाई ब्राह्मणास द्याव्या. हें इच्छा रहित वध झाल्याचें प्रायश्चित्त आहे. ॥ ४ ॥ शूद्राचा वध केला असतां वर लिहिल्या प्रमाणें सहा महिने पर्यंत ब्रह्महत्या व्रत करावें. १ बैल व पांढऱ्या १० गाई ब्राह्मणास द्याव्यात. ह्मणजे शूद्रहत्येपासून मुक्त होतो. हें सहज रीतीनें ह्मणजे इच्छा न करितां वध झाल्याचें प्रायश्चित्त आहे. ॥ ५ ॥ वध करण्यास जें प्रयोजकादि पूर्वी ब्रह्महत्या प्रकरणांत सांगितलेलें त्यास पाद दांद न्यून प्रायश्चित्त जाणावें. येथें कपालध्वज धारणा दिकांची अवश्यकता आहे. ॥ ६ ॥

## अथ स्त्रीवधप्रायश्चित्तनिर्णयः ॥

तत्र अंगिराः ॥ आहिताग्नेर्द्विजाग्र्यस्य तथा पत्नीं मनिंदितां ॥ ब्रह्महत्याव्रतं कुर्या दात्रेयीघ्नस्तथैवच ॥ १ ॥ एवं क्षत्रियवैश्यशूद्रस्त्रीवधे पादेपादन्यूनयोजनया प्रायश्चित्तयोजनादेशकालाद्यपेक्षया कल्पनीया ॥ सर्वत्र गुणानामाधिक्ये प्रायश्चित्ताधिक्यं विज्ञातस्त्रीगर्भवधेतु साधारणं स्त्रीवधप्रायश्चित्तमेव विशेषानुक्तेः ॥ २ ॥ बालघ्नांश्च कृतघ्नांश्च विशुद्धानपि धर्मतः ॥ शरणागतहंतृंश्च स्त्रीहंतृंश्च न संवसेदिति ॥ ३ ॥ मनुः ॥ तथा च याज्ञवल्क्यः शरणागतबालस्त्रीहिंसकान्संविशेन्नतु ॥ चीर्णव्रतानपि सतःकृतघ्नसहितानिमान् ॥ ४ ॥

## स्त्रीवधाचें प्रायश्चित्त.

अंगिराचें वचन—अग्निहोत्रि अशा ब्राह्मणाची धर्म सदाचार संपन्न अशा स्त्रीचा नाश केला असतां किंवा रजस्वला स्त्रीचा नाश केला असतां ब्रह्महत्या व्रत करावें.॥ १॥ या प्रमाणें क्षत्रिय, वैश्य, शूद्र स्त्रियांचा वध केला असतां एक एक पाद पाद न्यून अशा प्रायश्चित्ताची योजना देश काल इत्यादिकांचा विचार करून करावें. सर्व ठिकाणीं गुणाचें आधिक्य असतां प्रायश्चित्ताधिक्य जाणावें स्त्रियांच्या गर्भाचा वध केला असतां साधारणेंकरून स्त्रीवधाचें प्रायश्चित्त करावें. ॥ २ ॥ बालहत्या करणारे, आणि केलेल्या उपकाराला न जाणणारे शरणागतांचा नाश करणारे, स्त्रियांचा नाश करणारे, अशीं जीं मनुष्यें यांनीं प्रायश्चित्त केलें असतांही यांच्याशीं व्यवहार करूं नये. याज्ञवल्क्य स्मृतीचा अर्थ असाच आहे. ॥ ३ ॥ ४ ॥

## अथ गजादिवधप्रायश्चित्तनिर्णयः १४

याज्ञवल्क्यः॥गजेनीलवृषान् पंचशुकेवत्सोद्विहायनः॥ खराजमेषेषु वृषोदेयः क्रौंचे त्रिहानः ॥ १ ॥ मनुः ॥ वासोदद्याद्धयं हत्वा पंच नीलान् वृषान्गजे ॥ अजमेषावन

क्षाहं खरं हत्वैकहायनं ॥ २ ॥ इदमकामत. ॥ कामतो द्वैगुण्यं ॥ याज्ञवल्क्यः ॥ मार्जारगोधानकुलमंडूकांश्च पतत्रिणः ॥ हत्वात्र्यहं पिबेत्क्षीरं कृच्छ्रं वा पादकं चरेत् ॥ ३ ॥ वशिष्ठः ॥ श्वमार्जारनकुलमंडूकतर्पदहरमूपकान् ॥ हत्वा कृच्छ्रं द्वादशरात्रं चरेत् किंचिद्दद्यादिति ॥ ४ ॥ एतत्कामतोभ्यासविपयंवेदितव्यम् दहरोल्पमूपकच्छुच्छुंदरिर्वा ॥ याज्ञवल्क्यः ॥ हंसश्येनकपिक्रव्याज्जलस्थलशिखंडिनः ॥ भासं हत्वा च दद्याद्गांक्रव्यादंस्तु सवत्सिकाम् ॥ ५॥ उरगेष्वायसोदंडः पंडके त्रपुसीसकम् ॥ कोले घृतघटोदेयउष्ट्रे गुंजाहयेंशुकम् ॥ ६ ॥ मनुःहत्वा हंसं बलाकं च बलंबर्हिणमेवच ॥ वानरश्येनभासौ च स्पर्शयेद् ब्राम्हणायगां ॥७॥ क्रव्यादांस्तु मृगान्हत्वा धेनुं दद्यात्पयस्विनीं ॥ अक्रव्यादान् वत्सतरीमुष्ट्रं हत्वातु कृष्णलं ॥ ८ ॥ एतदज्ञानविपयमिति शूलपाणिः ॥ मिताक्षरायां पराशरः ॥ मृगरोहिवराहाणामविकाबस्तघातने ॥ वृकजंबूकऋक्षाणां तरक्षूणां च घातकः ॥ ९ ॥ तिलप्रस्थं त्वसौ दद्याद्वायुभक्षोदिनत्रयं ॥ खरवानरसिंहानां चित्रकव्याघ्रघातकः ॥ १० ॥ शुद्धिमेति त्रिरात्रेण ब्राम्हणानां च भोजनैः ॥ अपरार्के शूलपाणौ च संवर्त्तः सर्वासामेकजातीनां मृगाणां वनचारिणां ॥ अहोरात्रोपोपित स्तिष्ठेज्जपन्वै जातवेदसं ॥ ११ ॥ माधवीये तु चतुष्पदानां सर्वेषामित्याद्यः पादः कृच्छ्रस्यार्धः पादः ॥ तत्रैव शंखः पशून्हत्वा तथा ग्राम्यान्मासं कुर्याद्विचक्षणः ॥ आरण्यपशुवधे मासेनैकेन शुद्ध्यति ॥ १२ ॥ तत्रैवच्यवनः ग्राम्यपशुवधे प्राजापत्यं चरेत् हिरण्यं दक्षिणां दद्यात् ॥ अरण्यमृगवधेतदर्धं तिलद्रोणं दद्यात् ॥ शकुनिवधे नक्तं भोजनं पयसा ब्राम्हणान् भोजयेत् ॥ १३ ॥ याज्ञवल्क्यः ॥ फलपुष्पान्नरसजसत्वघाते घृताशनं ॥ किंचित्सास्थिवधे देयः प्राणायामस्त्वनास्थिके ॥ १४ ॥ मनुः ॥ अस्थिमतां तु सत्वानां सहस्रस्य प्रमापने ॥ पूर्णे चानस्यनस्थ्नां तु शूद्रहत्याव्रतं चरेत् ॥ १५ ॥ यमः ॥ क्रमिकीटपिपीलिकापतंगभ्रमरदंशमशकमक्षिकादीनां सहस्रं हत्वा शूद्रवधप्रायश्चित्तं ॥ अथवा दशधेनुदानं कार्यं॥कोकिलशुककपोतकपिंजलकुक्कुटटिट्टिभखंजरीटादीनां पुरुषभारवधे शूद्रवधप्रायश्चित्तं ॥ १६ ॥ अथ जलचरवधप्रायश्चित्तं ॥ शूलपाणौ शंखः ॥ हत्वा द्विजं तथा सर्पं जलेशेयबिलेशयौ ॥ सप्तरात्रं तु कुर्वीत व्रतं ब्रम्हहणस्तु पद ॥ १७ ॥ एतत्कामतः

## गजादिकांचा वध केल्याचें प्रायश्चित्त ॥ १४ ॥

याज्ञवल्क्याचें वचन. हत्ती मारिला असता पांच काळे बैल दोन करावे. राघू मारला असता दोन वर्षाचें वांसरूं दान करावें. गाढव, बोकड, मेंढरूं यांचा नाश केला असतां १ बैल द्यावा. क्रौंच पक्षी मारला असतां तीन वर्षाचा बैल दान द्यावा.॥ १ ॥ मनूचें वचन. घोड्याचा नाश

केला असतां एक वस्त्र दान करावें. हत्ती मारला असतां पांच काळे बैल दान करावे. बोकड, मेंढा मारला असतां एक वृषभ दान करावे, गाढव मारलें असतां एक वर्षाचा बैल दान करावा. ॥ २॥ येथें बोकड, मेंढरूं, गाढव हे मारले असतां १ एक वर्षाचा बैल देण्यास सांगितलें आहे हे अनिच्छेनें वध घडल्याचें आहे. इच्छेनें नाश केला असतां दुप्पट प्रायश्चित्त. याज्ञवल्क्याचें वचन. मांजर, घोरपड, मुंगुस, बेंडकुळी, पक्षी यांचा नाश केला असतां ३ दिवस पर्यंत दूध पीऊन रहावें, अथवा पाद कृच्छ्र प्रायश्चित्त करावें. ॥ ३ ॥ वासिष्ठाचें वचन. कुत्रें, मांजर, मुंगुस, बेंडकुळी, सर्प, चुचुंदरी, याचा नाश केला असतां द्वादशरात्र कृच्छ्र प्रायश्चित्त आचरण करावें. ॥ ४ ॥ हंस पक्षी, श्येनपक्षी, ससाना, तसेंच मांस खाणारे वाघ वगैरे व पाण्यावर संचार करणारे बगळे, व जमिनीवर संचार करणारे बगळे, मोर, मासपक्षी यांतील कोणाचाही नाश केला असतां १ गोप्रदान ब्राह्मणास द्यावें. तसेंच हरणादिक यांचा नाश केला असतां १ लहान कालवड ब्राह्मणास द्यावी. ॥५॥ सर्प मारला असतां लोखंडांचा दंड द्यावा, हिजडा मारला असतां कथील आणि सिसे मासाभर द्यावें. डुकर मारलें असतां तुपानें भरलेली घागर द्यावी. उंट मारला असतां गुंजभर सोनें ब्राह्मणास द्यावें, घोडा मारल्यास वस्त्र द्यावें. ॥ ६ ॥ मनुचें वचन. हंस, बगळा, मोर, वानर, श्येनपक्षी, भासपक्षी, यातून कोणत्याही एकाचा नाश केला असतां ब्राह्मणास १ गोप्रदान द्यावें. ॥ ७ ॥ मांस खाणारे असे मृग ह्मणजे व्याघ्रादिक मारिले असतां तो दोष जाण्यास्तव पुष्कळ दूध देणारी गाय ब्राह्मणास द्यावी. मास न खाणारे असे हरणादिक मारिले असतां कालवड द्यावी. उंट मारला असतां रतिभर सोनें द्यावें. हें अज्ञानानें झाल्याचें प्रायश्चित्त असें शूलपाणीने लिहिलें आहे. मिताक्षराचे ठायीं पराशराचें वचन. हरीण, रोही, ( हरणाची जात ) डुकर, मेंढा, बोकड, खंडगा, कोल्हा, अस्वल, यांचा नाश केला असतां तीन उपोषणें करून ब्राह्मणास एक पायलीभर तीळ द्यावेत. गाढव, वानर, सिंह, चित्ता, वाघ, यांचा नाश केला असतां त्रिरात्र उपोषण करून ब्राह्मणास भोजन दिल्यानें शुद्धता होते. ॥ ९ ॥ १० ॥ संवर्ताचें वचन. जंगलांत राहणारे असे जे हरिणादिक सर्व जातीचे पशु यापैकीं कोणाचाही नाश केला असतां १ दिवसरात्र उपोषण करून अग्निदेवतात्मक मंत्राचा जप करीत अग्निजवळ बसावें. ॥ ११ ॥ माधवानें येथें कृच्छ्राचा अर्थ कृच्छ्र प्रायश्चित्त सांगितला आहे. शंखाचें वचन गांवांत राहणारे जे पशु तसेंच अरण्यांत राहणारे पशु यांचा नाश केला असतां महिनाभर अग्निदेवता मंत्राचा जप केल्यानें शुद्धता होते. ॥ १२ ॥ च्यवनानें असें सांगितलें आहे कीं, ग्राम्य पशूंचा नाश केला असतां प्राजापत्याचरण करावें. आणि सुवर्ण दक्षिणा द्यावी. अरण्यांतील पशुंचा वध केला असतां अर्धतीळद्रोण ह्मणजे दोन पायल्या तीळ ब्राह्मणास द्यावेत. पक्ष्याचा वध केला असतां नक्त भोजन करावें. आणि ब्राह्मणास दूध पिण्यास द्यावें. ॥ १३ ॥ याज्ञवल्क्याचें वचन, उंबरादिकांच्या फळांत, मोहादिकांच्या फुलांत तसेंच चिरकाळ राहिलेले भात • इत्यादि अन्नांत गुळादिकांच्या रसांत जे प्राणी होतात

त्यांचा नाश केला असतां १ दिवस दूध प्राशन करून राहिल्यानें शुद्धता होते. ज्यांस हाडें आहेत असे सरडादिक प्राणी मारले असतां आठ मुठी धान्य द्यावें. ज्यांस हाडें नाहींत असे ढेकूण, उवा इत्यादि प्राणी मारले असतां १ प्राणायाम केल्यानें शुद्धता होते. ॥ १४ ॥ मनूचें वचन. ज्यांस हाडें आहेत असे सरडादिक प्राणी हजार मारिले असतां आणि अस्थि रहित ढेकूण उवा, माशा, इत्यादिक मनुष्याचा गाडा भरेल इतके प्राणी मारिले असतां एक शूद्र हत्या केल्याचें जें प्रायश्चित्त तें करावें.॥१५॥ शृंखपार्गीतील यमाचें वचन. आळ्या, किडे, मुंग्या, पतंग, भुंगे, वनमाशा, चिलटें, इत्यादिक हजार मारले असतां शूद्र वध प्रायश्चित्त करावें. अथवा दहा गाई दान कराव्या कोकीळ, राघू, कपिंजल पक्षी, कोंबडा, खंजीरीटपक्षी, इत्यादिक प्राणी मनुष्याचें ओझें इतके मारले असतां शूद्र वधाचें प्रायश्चित्त जाणावें. ॥ १६ ॥ शातातपाचें वचन. पक्षी, सर्प, पाण्यांत राहणारे व बिळांत राहणारे असे प्राणी मारले असतां सात दिवस पर्यंत ब्रह्महत्येचें व्रत करावें हें इच्छेनें केलें असतांचें आहे. याप्रमाणें प्राणी वध प्रायश्चित्ताचा निर्णय जाणावा.

## अथ द्रुमादिछेदने प्रायश्चित्तनिर्णयः ॥ १४ ॥

## झाडें वगैरे तोडलीं असतां प्रायश्चित्त. ॥ १४ ॥

फळें, फुलें, पानें, इत्यादिकांच्या योगानें उपयोग करणारे असे अशोक,आम्र,फणस,इत्यादिक झाडें माललत्यादिगुल्म, द्राक्षादिकलता कोन्हांटी इत्यादिक गुच्छ कन्हेर इत्यादिक लहान लहान झाडें सारिवादि प्रतान औषधी म्हणजे ज्यांचीं फळें पक्क झालीं म्हणजे नाहींशीं होतात ते साळी वगैरे गुळवेल इत्यादिक वीरुध ह्या पंचमहायज्ञादिक जे अदृष्ट कारण त्या वांचून यांपैकीं कोणतेहि एकाचा छेद असतां न समजून बहुत वेळा आणि समजून एक वेळ जरी छेद केला असतांही शंभर वेळा गायत्री जप केल्यानें शुद्धता होते, गांवांत अथवा अरण्यांत उत्पन्न होणाऱ्या ज्या औषधी त्यांचा तोडण्याचा अत्यंत अभ्यास असेल तर दिवसा गाईची सेवा करून रात्रीं दूध पीऊन शयन करावें. इतरान्न भक्षण करूं नये ॥ १ ॥ त्यास याज्ञवल्क्य आणि मनूचें वचन वृक्षादिकांचा छेद केला असतां गायत्र्यादिक ज्या ऋचा त्यांचा १०० जप करावा. गांवांत किंवा अरण्यांत उत्पन्न होणाऱ्या ज्या औषधी त्यांचा व्यर्थ नाश केला असतां १ दिवस पर्यंत गाईच्या बरोबर संचार करून इतर आहार न करितां रात्रीं दूध पीऊन शयन करावें. मनुवचनाचाही अर्थ असाच आहे ॥ २ ॥ ३ ॥ झाडें तोडूं नयेत. परंतु नागरणें इत्यादिकां करितां तोडावींत असें वसिष्ठाचें वचन आहे. ह्मणोन कृष्यादिकर्माकरितां तोडलें असतां दोष नाहीं मोठीं फळादि देणारीं अशीं नारिकेलादि झाडें यांचा वारंवार तोडण्याचा अभ्यास असेल तर संवत्सर व्रत करावें. एक वेळा तोडलें असेल तर पूर्वीं जो जप सांगितला त्याचा द्विगुणित जप करावा. या प्रमाणें चैत्य (चव्हाटा) स्मशान, सीमा, पुण्यस्थानें, देवालय येथें असणारें जें झाड तसेंच चव्हाट्यावर नसणारें झाड आणि दाट ज्याची सावली आहे. असें झाड प्रसिद्ध स्थानचें हें तोडलें असतां द्विगुणित जप करून प्राजापत्य प्रायश्चित्त करावें. ॥ ४ ॥ दुसऱ्या वचनाचा अर्थ असाच आहे. ॥ ५ ॥ गायत्र्यादिक ऋचेचा जप सांगितला आहे. हा ब्राह्मणास लागू आहे. शूद्रानें द्विरात्र उपोषण करावें.इच्छेनें निरंतर वृक्षादि तोडण्याचा अभ्यास असेल तर उपपातकास चांद्रायणादिक जीं चार प्रायश्चित्तें सांगितलीं त्यांतील एक प्रायश्चित्त करावें. ॥ ६ ॥

## अथ प्रसंगाच्छ्वादिदंशे प्रायश्चित्तम् ॥ १५ ॥

श्ववृकसृगालखरोष्ट्रविड्वराहकाककुक्कुटवानरपुंश्चलीक्रव्यादनराश्वैर्नाभेरधर्ध्वदष्टोविप्रो जले प्राणायामत्रयं कृत्वा घृतं प्राश्य शुध्यति ॥ अत्र घृतप्राशनं भोजनस्थाने ॥ तेन हारांतरनिवृत्तिः ॥ १ ॥ तथा च मनुः ॥ श्वसृगालखरैर्दष्टोग्राम्यैः क्रव्याद्भिरेव च ॥ नराश्वोष्ट्रवराहैश्च प्राणायामेन शुध्यति ॥ २ ॥ तथा च याज्ञवल्क्यः ॥ पुंश्चलीवानर खरैर्दष्टश्वोष्ट्रादिवायसैः ॥ प्राणायामं जले कृत्वा घृतं प्राश्य विशुध्यति ॥ ३ ॥ तथाच अंगिरः ॥ ब्रह्मचारी शुना दष्टस्त्र्यहं सायं पिबेत्पयः ॥ गृहस्थश्चेद्द्विरात्रं तु एकाहं योग्निहोत्रवान् ॥ ४ ॥ नाभेरूर्ध्वं तु दष्टस्य तदेवद्विगुणं भवेत् ॥ स्यादेतत् त्रिगुणं

वक्रे मस्तके च चतुर्गुणम् ॥ ५ ॥ शूद्रस्यामंत्रकप्राणायामाः उपवासादेव शूद्रस्यशुद्धिरित्यन्ये ॥ स्त्रीणां तु श्वादिदंशे स्नात्वोदितस्य नक्षत्रचंद्रादेर्दर्शनात् शुद्धिः ॥ ६ ॥ रजस्वलायाःश्वादिदंशे तु एकोपवासमुपवासपंचकं वा कृत्वा षष्ठे पंचगव्यपानं ॥ नाभेरूर्ध्वं तु प्रागुक्तक्रमेण द्वित्रिचतुर्गुणं बोध्यं ॥ अत्यंतासमर्थस्य दिवादंशे आनक्षत्राद भोजनम् ॥ ७ ॥ शातातपः ॥ शुना घ्रातावलीढस्य नखैर्विलिखितस्य च ॥ अद्भिः प्रक्षालनं शौचमग्निना चापचूर्णनमिति ॥ ८ ॥ यदा.श्वादिदंशे शास्त्रघातादिजनित व्रणे कृमयउत्पद्यंते तथा मनुना विशेषउक्तः ब्राम्हणस्य व्रणद्वारे पूयशोणितसंभवे ॥ कृमिरुत्पद्यते यस्य प्रायश्चित्तं कथं भवेत् ॥ ९ ॥ गवां मूत्रपुरीषेण त्रिसंध्यं स्नानमाचरेत् ॥ त्रिरात्रं पंचगव्याशी त्वधोनाभ्याविशुध्यति ॥ १० ॥ नाभिकंठांतरोद्भूते व्रणे चोत्पद्यते कृमिः ॥ षड्रात्रं तु त्र्यहं पंचगव्याशनोमिति स्मृतम् ॥ ११ ॥ एवं शस्त्रादिजनितव्रणे एतदेव त्र्यहं पंचगव्याशनादिकं कार्यमिति विशेषः क्षत्रियादिषु तु प्रतिवर्णं पादपादऱ्हासः कल्पनीयः ॥ इति श्वादिदंशे निर्णयः ॥ १२ ॥

## कुत्र्यादिक चावले असतां प्रायश्चित्त विचार ॥ १५ ॥

कुत्रें, लांडगा, कोल्हें, गाढव, उंट, विष्ठा भक्षण करणारे डुकर, कावळा, कोंबडा, वानर, जारिणी स्त्री, मांस भक्षण करणारें मनुष्य, घोडा, यांतील कोणीही नाभीचे खालच्या भागाच्या ठायीं चावलें असतां ब्राह्मणास पाण्यात तीन प्राणायाम करून १ दिवस तूप प्राशन करून राहिल्यानें शुद्धता येथें तूप प्राशन करणें भोजन बदलचें आहे. सबब दुसरे भोजना करावयाचें नाही. ॥ १ ॥ मनु आणि याज्ञवल्क्य यांच्या वचनाचा अर्थ असाच आहे. ॥ २ ॥ ३ ॥ अंगिराच्या वचनाचा अर्थ ब्रह्मचार्यास कुत्रें चावलें असतां तीन दिवस पर्यंत सायंकाळीं दूध प्राशन करून रहावें. गृहस्थानें दोन दिवस अग्निहोत्र्यानें एक दिवस दूध पीऊन रहावें. ॥ ४ ॥ हा दंश नाभीचे खालील भागीं झाला असतांचे आहे. नाभींचे वरचे भागीं चावलें असतां दुप्पट प्रायश्चित्त सांगितलें आहे. मुखाचे ठायीं चावलें असतां त्याची ही द्विगुणीत मस्तकाचे ठायीं दंश केला असतां त्याच्या चतुर्गुण प्रायश्चित्त सांगितलें आहे. ॥ ५ ॥ शूद्रास चावलें असतां त्यास प्राणायाम करण्याचा अधिकार नसल्यामुळें उपोषण केल्यानें शुद्धता येते. स्त्रीयांस चावलें असतां स्नान करून चंद्रदर्शन घेतल्यानें शुद्धता होते. ॥ ६ ॥ रजस्वला स्त्रियांस चावलें असतां १ उपोषण अथवा पांच उपोषणें करून सहावे दिवशीं पंचगव्य प्राशन करावें. नाभींचे वरचे भागीं चावलें असतां पूर्वी सांगितल्या क्रमानें द्विगुण, त्रिगुण, चतुर्गुण प्रायश्चित्तें जाणावीत. अत्यंत असमर्थ जो असेल त्यानें दिवसा दंश झाला असतां नक्षत्रदर्शनपर्यंत भोजन करूं नये. ॥ ७ ॥ शातातपाचें वचन. कुत्र्यानें अंगास चाटलें असतां किंवा नखांनीं ओरबडलें असतां ती जागा पाण्यानें धुऊन अग्नितानें तप्त करावी म्हणजे शुद्ध होते. ॥ ८ ॥ कुत्र्यादिकां-

नीं चावलेल्या ठिकाणीं अथवा शस्त्रादिक लागल्यानें त्या जागीं व्रण उत्पन्न होऊन त्यामध्यें कृमि जर होतील तर मनुनें त्या बद्दलचा विशेष सांगितला आहे. तो असा—ब्राह्मणाच्या रक्त पुवानीं युक्त अशा व्रणामध्यें कृमि होतील तर ब्राह्मणानें त्रिकाळ संध्येचे वेळीं गाईचे शेण आणि मूत्र यानें स्नान करावें. हे नाभीचे खाली झाल्याचे आहे. ॥९॥१०॥ नाभीपासून वरच्या जर व्रणामध्यें कृमि उत्पन्न झालें असतां सहा दिवस अथवा ३ दिवस पंचगव्य प्राशन केल्यानें शुद्धता येते. ॥ ११ ॥ शस्त्रादिकानीं झालेल्या व्रणाचेठायीं कृमि दिसले असतां हेंच प्रायश्चित्त आणि तीन किंवा पाच दिवस पंचगव्य प्राशन करावें ह्मणजे शुद्धता होते. क्षत्रिय, वैश्य, शूद्र या वर्णांचेठायीं क्रमानें एक एक पादानें न्यून असें प्रायश्चित्त जाणावें. या प्रमाणें कुत्र्यादिक चावलें असतां प्रायश्चित्ताचा निर्णय जाणावा. ॥

## ॥ अथ निंदितार्थोपजीवनप्रायश्चित्त निर्णयः ॥ १६ ॥

शास्त्रोक्तोपायार्जितार्थादन्यतरेणोपजीवनं निंद्यार्थजीवनं ॥ तत्र चांद्रादिष्वेकं त्रैमासिकं वा जातिशक्त्याद्यपेक्षया योजनीयं ॥

## निंदितार्थानें उपजीविका करणाराच्या प्रायश्चित्ताचा विचार.

उपजीविका करण्यास द्रव्यमिळविण्याकरिता शास्त्रात जे उपाय सांगितले आहेत. त्याहून भिन्न उपायानें द्रव्य मिळवून जी उपजीविका करावयाची. तशी केली असतां उपपातक प्रकरणामध्यें चांद्रायणादि तसेंच त्रैमासिक इत्यादिक जी प्रायश्चित्तें सांगितली आहेत.त्यां पैकी जाति, शक्ति, इत्यादिकांचा विचार करून एक प्रायश्चित्त करावें.

## अथ नास्तिक्यप्रायश्चित्तनिर्णयः ॥ १७ ॥

नास्तिक्यं वेदनिंदनं तेन जीवनं च परलोकोनास्तीत्यभिनिवेशश्च ॥ तस्मिन् सकृत्कृते कृच्छ्रः ॥ तेन जीवनेऽतिकृच्छ्रः ॥ अज्ञानतोर्धम् ज्ञानतोभ्यासे चांद्रादिष्वेकम्॥ अत्यंताभिनिवेशेन बहुकालाभ्यासे ग्रीष्मवर्षाहेमंतर्तुषु क्रमेणातपाभ्रावकाशजलशयनानि ॥ पंचवर्षे प्रतिग्रहेषु भैक्ष्यं वा ॥

## नास्तिक्य प्रायश्चित्ताचा विचार ॥ १७ ॥

नास्तिक्य म्हणजे वेदाची निंदा करणें, तसेंच परलोक नाहीं असा आग्रह धरणें एक वेळां वेदाची निंदा केली असतां कृच्छ्र प्रायश्चित्त केल्यानें शुद्धता होते. वेदनिंदा करून उपजीविका करीत असल्यास अतिकृच्छ्र प्रायश्चित्त, अज्ञानानें वेदनिंदा केली असतां अर्ध कृच्छ्र प्रायश्चित्त. ज्ञानें करून वेदनिंदा करण्याचा निरंतर अभ्यास असल्यास उपपातकास जीं चांद्रायणादिक प्रायश्चित्तें सांगितलीं त्यातील. एक प्रायश्चित्त करावें बहुतकालपर्यंत

अत्यंत आग्रहानें वेदनिंदादिक करण्याचा अभ्यास असेल तर ग्रीष्म ऋतु म्हणजे ज्येष्ठ आषाढ यांचेठायीं उन्हांत बसून रहावें. वर्षा ऋतु म्हणजे श्रावण भाद्रपद यांचे ठायीं पाऊस असो अथवा अभ्र अच्छादित असो अथवा नसो. वसावें व शयन करावें. हेमंत ऋतु याच्यामध्यें पाण्यांत पडून रहावें. हीं प्रायश्चित्तें करावीत. अथवा पांच वर्षेपर्यंत भिक्षान्नानें उपजीविका करावी. या प्रमाणें नास्तिक्य प्रायश्चित्ताचा विचार जाणावा.

## अथ ब्रम्हचारिणोव्रतलोपे प्रायश्चित्तम् ॥ १८ ॥

सच ब्रम्हचारिणः मैथुनरूपः सर्वसाधारणस्तु देवताराधनाद्यर्थं ग्रहीतव्रतलोपः किंचित् व्रतं संकल्प्य त्यागश्च ॥१॥ तत्र मनुः। अवकीर्णीतु काणेन गर्दभेन चतुष्पथे॥पाकयज्ञविधानेन यजेत निर्ऋतिं निशि॥ हुत्वाग्नौ विधिवद्धोमानंतरं च समेत्यृचा॥ वातेंद्रगुरुवन्हीनां जुहुयात्सर्पिषाहुतीः॥ २॥ पशोरभावे चरुणा यष्टव्यम्॥ निर्ऋतिं वा चरुं निर्वपेत्॥ तस्य जुहुयात् कामाय स्वाहा काम कामाय स्वाहा निर्ऋत्यै स्वाहा रक्षोदेवताभ्यः स्वाहेति वशिष्ठस्मरणात् एतच्चाशक्तविषयम्॥कामतोरेतसः सेकं व्रतस्थस्य द्विजन्मनः॥ व्यतिक्रमं व्रतस्याहुर्धर्मज्ञाब्रम्हवादिनः ॥ ४ ॥ मारुतं पुरुहुतं च गुरुं पावकमेवच ॥ चतुरोव्रतिनोभ्येति ब्राम्हं तेजोऽवकीर्णिनः ॥ ५ ॥ एतस्मिन्नेनसि प्राप्ते वसित्वा गर्दभाजिनम् ॥ सप्तागारांश्चरेद्भैक्षं स्वकर्म परिकीर्तयन् ॥ ६ ॥ तेभ्योलब्धेन भैक्ष्येणवर्तयन्नेककालिकम् ॥ उपस्पृशंस्त्रिषवणं त्वब्देन सविशुद्ध्यति ॥ ७ ॥ स्वप्नस्कंदने तु मनुः ॥ स्वप्ने सिक्त्वा ब्रह्मचारी द्विजः शुक्रमकामतः ॥ स्नात्वार्कमर्चयित्वा त्रिःपुनर्मामित्युचं जपेदिति ॥ ८ ॥ यमोपि ॥ प्रकीर्य रेतः स्वप्ने तु ब्रम्हचार्यप्यकामतः ॥ स्नात्वार्कमीक्ष्य प्रयतोगायत्र्यष्टशतं जपेत् ॥ ९ ॥ तथा ब्रम्हचारी तु योगच्छेत्स्त्रियं कामप्रपीडितः ॥ प्राजापत्यं चरेत्कृच्छ्रमब्दमेकं सुयंत्रितः ॥ १० ॥ भूयोऽभ्यासविषयमेतत् ॥ वानप्रस्थादीनां चेदमेव ब्रह्मचर्यखंडनेअवकीर्णिव्रतं कृच्छ्रत्रयाधिकं भवति ॥ वानप्रस्थोयतिश्चैव स्कंदने गति कामतः ॥ पराकत्रयसंयुक्तमवकीर्णिव्रतं चरेदिति ॥ ११॥ तत्र यतौ मैथुने पातित्यं ॥ अतएव वशिष्ठः यस्तु प्रव्रजितोभूत्वा पुनः सेवेत मैथुनम् ॥ षष्टिवर्षसहस्राणि विष्ठायां जायते क्रमिरिति ॥ १२ ॥ ग्रहीतव्रतत्यागे देशकालशक्त्यादिकं पर्यालोच्य उपपातकसामान्यप्रायश्चित्तयोजना कार्या ॥ अथ प्रसंगादुच्यतेब्रह्मचारिणः प्रायश्चित्तम् ॥ उपनयनोत्तरंदिनचतुष्टयव्रतमध्ये मेखलायज्ञोपवीतदंडादीनां नाशे वस्त्रं सूत्रांतरं वा धृत्वा मनोज्योतिरित्यादिमनोलिंगाभिस्त्वमग्नेव्रतपाअसीत्यादीव्रतलिंगाभिश्चतस्रआज्याहुतीर्हुत्वोपनयनोक्तविधिना धारयेत् ॥ १ ॥ संवर्तः ॥ भिक्षाटनमकृत्वा यः स्वस्थएकोन्नमश्नुते ॥ अस्नात्वा चैव योभुंक्ते गायत्र्यष्टशतं जपेत् ॥ २ ॥ उपागीत नचेत्संध्यामग्निकार्यं भचेत्कृतम् ॥ स्नात्वा ग्रयं सम-

भ्यर्च्य प्राणायामेन शुद्ध्यति ॥ ३ ॥ दिवा स्वपिति चेत्स्वस्थो ब्रम्हचारी कथंचन ॥ स्नात्वा सूर्यं समभ्यर्च्य गायत्र्यष्टशतं जपेत् ॥ ४ ॥ ब्रह्मसूत्रं विना येन संध्योपास्तिर्यदा कृता ॥ गायत्र्यष्टशतेनैव प्राणायामेण शुध्यति ॥ ५ ॥ यमः ॥ सूर्योदये तुयः शेते स सूर्योदितउच्यते ॥ अस्तंगते तु यः शेते सूर्यनिर्मुक्त एवसः ॥ ७ ॥ ब्रह्मस्तेनावुभौ सम्यगहोरात्रोपितौ शुची ॥ गायत्र्यादशसाहस्रं कुर्यातामान्हिकं पृथक् ॥ ब्रह्मचारिणः श्राद्धान्नभोजने प्रायश्चित्तं वर्तते ॥ मासिकान्नं तु योश्नियादसमावृत्तकोद्विजः ॥ सत्रीण्यहान्युपरमेदेकाहं चोदके वसेत् ॥ ९ ॥ सूतके तु यदा विप्रोब्रह्मचारी विशेषतः ॥ पिबेत्पानीयमज्ञानात्समश्नीयात्स्पृशेत वा ॥ १० ॥ पानीयपाने कुर्वीत पंचगव्यस्य भक्षणम् ॥ त्रिरात्रं भोजने प्रोक्तं स्पृष्ट्वा स्नानं विधीयते ॥ ११ ॥ याज्ञवल्क्यः ॥ मयितेजइतिच्छायां स्वां दृष्ट्वांबुगतां जपेत् ॥ सावित्रीमशुचौ दृष्टे चापल्ये चानृतेपि च ॥

## आतां ब्रम्हचारी याचें ब्रम्हचर्य रूपव्रताचालोप झाल्याचें प्रायश्चित्त ॥ १८ ॥

ब्रम्हचर्य या लोप म्हणजे मेथुन करणें, देवतादिकाच्या आराधना करिता एखादे व्रत स्वीकारून त्याचा लोप करणें, एखाद्या व्रताचा संकल्प करून तें व्रत सोडून देणें. ॥ १ ॥ ज्याच्या ब्रम्हचर्य व्रताचा नाश झाला आहे अशा ब्रम्हचर्यानें रात्रीं चतुःपथाचे ठायीं पाकयज्ञ विधानेंकरून निर्ऋति देवतेस काणगर्दभे करून याग करावा ॥ १ ॥ अग्नीचे ठायीं निर्ऋतिदेवतेकारणें विधानपूर्वक त्या गर्दभाचा चतुष्पथावर होम करून नंतर ( मासिंचंतुमरुत ) या वेदऋच्यें करून वायु, इंद्र, बृहस्पति, अग्नि या देवतेच्या उद्देशानें तुपाच्या आहोतीचा होम करावा ॥ २ ॥ पशु नसेल तर चरूनें होम करावा. निर्ऋतिदेवताक चरूनें हवन करावें. आणि काम, काम,काम व रक्षो देवता, निर्ऋति याला हवन करावें. असें वाशिष्ठानें सांगितलें आहे. हें अशक्त संबंधाचे आहे. ॥ ३ ॥ ब्रम्हचर्यव्रती असलेले जे ब्राह्मण, क्षत्रिय, वैश्य, यानीं इच्छेनें स्त्रीचें गमन केलें असता ब्रह्मचर्याचें उल्लंघन होतें. ॥ ४ ॥ ज्याच्या ब्रह्मचर्यव्रताचा नाश झाला आहे. त्याचें ब्रह्मतेज, वायू, इंद्र, बृहस्पति, अग्नि, याच्या मध्यें जातें. यास्तव त्याच्या उद्देशानें आहुती द्याव्या. ॥ ५ ॥ हे अवकीर्णाख्य ( नष्टव्रतत्व ) पाप प्राप्त झालें असतां गाढवाचें कातडें परिधान करून आपलें कर्म लोकास सांगत होत्साता सात घरीं भिक्षा मागावी. ॥ ६ ॥ या सात घरांत मिळालेलें भिक्षान्न तेणेंकरून १ वेळ भोजन करून सायंकाळीं, मध्यान्हकाळीं प्रातःकाळीं, असें त्रिकाल स्नान करावें. या प्रमाणें एक संवत्सर पर्यंत केल्यानें शुद्धता होते. ॥ ७ ॥ स्वप्नामध्यें रेत स्खलन झालें असता मनुचें वचन–ब्रह्मचर्याचें अनेच्छेनें स्वप्नांत रेतःपतन झालें असतां स्नान करून सूर्याची पूजा करून मा मी सिः या ऋचेचा ३ वेळा जप करावा.

॥ ८ ॥ यमानें स्नान करून सूर्याची पूजा करून १०८ वेळां गायत्री जप करण्यास सांगितलें आहे. ॥ ९ ॥ ब्रह्मचारी कामपीडित होऊन स्त्रीशीं गमन करील तर १ वर्षभरपर्यंत कृच्छ्र प्राजापत्य प्रायश्चित्त केल्यानें शुद्धता होते. ॥ १० ॥ पुनः पुनः स्त्रीगमन करीत असतांचें प्रायश्चित्त आहे. वानप्रस्थ अथवा यती यानें इच्छेनें रेतःपात केलें असतां तीन पराक प्रायश्चित्त करून अवकीर्णव्रत ( ब्रह्मचर्यव्रत नष्ट झालें असतां जें प्रायश्चित्त सांगितलें आहे तें करावें. ) ॥ ११ ॥ वसिष्ठाचें वचन. जो मनुष्य संन्यास ग्रहण करून पुनः मैथुन करतो. तो साठ हजार वर्षेपर्यंत विष्ठेचे ठिकाणीं कृमी होतो. ॥ १२ ॥ साधारण देवतेच्या उद्देशानें घेतलेलें व्रत सोडलें असतां देश, काळ, शक्ति, इत्यादिकांचा विचार करून उपपातकास सांगितलेलीं जीं प्रायश्चित्तें त्यांपैकीं एका प्रायश्चित्ताची योजना करावी.

## आतां ब्रह्मचर्याच्या प्रायश्चित्ताचा निर्णय.

मुंज झाल्यानंतर चार दिवसांत मेखला, यज्ञोपवीत, दंड इत्यादिकांचा नाश झाला असतां वस्त्र अथवा दुसरें सूत्र धारण करून मनोज्योति इत्यादिक मनोलिंगांनीं तोमग्नेव्रत पा आसी इत्यादिक ऋचेनें चार तुपाच्या आहुतीनें होम करून उपनयनांत सांगितलेल्या विधीनें धारण करावें. ॥ १ ॥ संवर्त्ताचें वचन-जो ब्रह्मचारी स्वस्थ रोगरहित असोन भिक्षाटन न करितां अन्न भक्षण करितो, तसेंच स्नान न करितां अन्न भक्षण करितो त्यानें १०८ गायत्री जप केल्यानें शुद्धता होते. ॥ २ ॥ जो संध्या करीत नाहीं, तसेंच होमादिक अग्निकार्य करीत नाहीं. त्यानें स्नान करून सूर्याची पूजा करून प्राणायाम केल्यानें शुद्धता होते. ॥ ३ ॥ जो ब्रह्मचारी स्वस्थ असोन दिवसा झोंप घेतो. त्यानें स्नान करून सूर्याची पूजा करून १०८ गायत्री जप करावा. ॥ ४ ॥ जो ब्रह्मचारी यज्ञोपवीत तुटलें असतां संध्यादिक कर्मे करितो त्यानें १०८ गायत्री जप व प्राणायाम केल्यानें शुद्धता होते. ॥५ ॥ तसेंच शौच्यादिकास-ही हेंच प्रायश्चित्त जाणावें. पाण्यात आपलें प्रतिबिंब पाहिलें असतां " मयि तेज इंद्रिय " या मंत्राचा जप करावा. अमंगळ पदार्थ दृष्टिस पडला असतां गायत्री मंत्राचा जप करावा याणी, हात, पाय, इत्यादिकांनीं चपलता केली असतां तसेंच एक वेळ खोटें भाषण केलें असतां गायत्री जप केल्यानें शुद्धता होते. ॥ ६ ॥ यमाचें वचन-सूर्योदय झाला असतां जो शयन करितो त्यास सूर्योदित असी संज्ञा आहे व जो सूर्यास्त झाला असतां शयन करितो त्यास सूर्यनिर्मुक्त म्हणावें. ॥ ७ ॥ या दोहो प्रकारें निजणारांनीं अहोरात्र उपोषण करून १०००० गायत्री जप केल्यानें शुद्धता होते. ॥ ८ ॥ श्राद्धान्न भोजन केलें असता ब्रह्मचर्यास प्रायश्चित्त सांगितलें आहे तें जो ब्रह्मचारी मासिकश्राद्धान्न भक्षण करितो त्यानें १ दिवस पाण्यांत बसून त्रिरात्र उपोषण करावें. ॥९॥ ब्रह्मचारी यानें सूतकांत पाणी प्यालें असतां,तसेंच सूतकी मनुष्याचें अन्न खालें असतां, सूतकी यास स्पर्श केला असतां प्रायश्चित्ताचा विचार. ॥ १० ॥ सूतकीयाचें पाणी प्यालें

असतां एकादिवस पंचगव्य प्राशन करून रहावें. भोजन केलें असतां त्रिरात्र पंचगव्य प्राशन करून रहावें. स्पर्श केला असतां स्नान करावें. ॥ ११ ॥ या प्रमाणे ब्रह्मचर्य व्रतलोप प्रायश्चित्ताचा निर्णय जाणावा.

## अथाभिशंसिप्रायश्चित्तनिर्णयः ॥ १९ ॥

यस्तु विप्रोविप्रं महापातकादिना मिथ्या अभिशंसेत् ॥ अनेन ब्रह्महत्त्यादिकं गोहत्त्यादि वा कृतमिति संव्यहर्तृजनान्प्रति मिथ्या ब्रूयात्समासमंबुभक्षोनियतेंद्रियः शुद्धमतिर्मंत्रजपशीलः शुद्धयेत् ॥ १ ॥ योगीश्वरः॥मिथ्याभिशंसिनोदोषोद्विःसमाभूतवादिनः॥ मिथ्याभिशस्तदोषं च समादत्ते मृषावदन् ॥ २॥ महापापोपपापाभ्यां योभिशंसेन्मृषा परम् ॥ अब्भक्षोमासमासीत सजपी नियतेन्द्रियः ॥ ३ ॥ अथ मिथ्याभिशस्तस्य प्रायश्चित्तनिर्णयः ॥ तत्र योगीश्वरः ॥ अभिशस्तोमृषा कृच्छ्रं चरेदाग्नेयमेव च ॥ निर्वपेत्तु पुरोडाशं वायव्यं पशुमेव वा ॥ ४ ॥ गुरुविषये कामतोमिथ्याभिशंसनप्राप्तौपंचवर्षं विप्रकुले भैक्ष्याचरणं संवत्सरं वा षण्मासं वा गवानुगमनम् ॥ अत्राभ्यासाभिनिवेशादितारतम्येन व्यवस्था ॥ ५ ॥ इति अभिशंसिमिथ्याभिशस्तयोः प्रायश्चित्तनिर्णयः ॥

## दुसऱ्या मनुष्यावर पापाचा खोट्या रितीनें आरोप करून सांगितलें असतांचें प्रायश्चित ॥

जो ब्राम्हण दुसऱ्या ब्राम्हणास ब्रम्हहत्यादिक पातक केलें असा खोटा आरोप करील जसें.या मनुष्यानें ब्रम्हहत्या, गोहत्या इत्यादिक पाप केलें या प्रमाणें त्याच्याशीं व्यवहार करणाऱ्यामनुष्यास खोटें सांगतो त्या मनुष्यानें एक महिनाभर पर्यंत इत्तर कांहीं न खातां केवळ पाणी पीऊन राहून इंद्रिय जिंकून शुद्धमति असें होऊन गायत्रीमंत्राचा जप करीत राहिल्यानें शुद्ध होतो. ॥ १ ॥ याज्ञवल्क्याचें वचन. जो मनुष्य दुसऱ्याच्या उत्कर्षादिकानें कलुषित अंतःकरण होऊन लोका समक्ष ब्रम्हहत्यादि पातकें न केलेल्या अशा मनुष्यास तीं पातकें केलीं असें म्हणतो, त्यास त्या पातकाचें द्विगुणीत पाप लागतें. जो मनुष्य झालेले दोष लोकास माहित नसेल तर तो दोष लोकांच्या समक्ष प्रसिद्ध करील त्यास त्या दोषी मनुष्यास जें पाप तें पाप प्रसिद्ध करणारास लागतें म्हणजे त्या पापानीं युक्त होतो. ॥ २ ॥ सबब त्यानें एकमहिनाभर जळ प्राशन करून , जितेंद्रिय असें होऊन ( द्विजांनीं वेदाचा आणि शूद्रानें हरिनामाचा ) जप करावा. म्हणजे तो शुद्ध होईल. ॥ ३ ॥

## दोषारोप केलेल्या मनुष्यांस प्रायश्चित्त.

पाप केलें नसून पाप केलें असा अपवाद ज्यांच्यावर आला असेल, त्यानें १ कृच्छ्र प्राय-

श्चित्त आचरण करावें. अथवा अग्निदेवताक अथवा वायुदेवताक पुरोडाश ( शिजविलेलें तांदळाचें पीठ ) यानें हवन करावें. ॥ ४ ॥ जो आपल्या गुरुविषयीं इच्छेनें वारंवार व्यर्थ पापाचा आरोप करितो त्यानें ५ वर्षे पर्यंत अथवा १ वर्ष पर्यंत किंवा, ६ महिने ब्राह्मणाचें घरीं भिक्षा मागून तें भिक्षान्न खावून गाईचे बरोबर रानांत जात जावें असें केल्यानें शुद्धता होते. ॥ ५ ॥ आरोप करण्याचा जसा अभ्यास असेल त्याच्या तारतम्यानें ५ वर्षे १ वर्ष ६ महिने यांची व्यवस्था जाणावी. या प्रमाणें दोषारोप करणाऱ्याच्या प्रायश्चित्ताचा निर्णय जाणावा.

## अथ सुतविक्रये प्रायश्चित्तनिर्णयः ॥ २० ॥

सच धनं गृहीत्वा दास्यार्थं कन्यापुत्रादेर्दानम् ॥ एवं भार्याविक्रयेप्यूह्यम् ॥ तत्र कन्याविक्रये देवगृहउद्यानारामपुष्करणिसभाप्रपापुण्यसरःसेतुविक्रये सुकृतविक्रिये च चांद्रादिष्वेकम् ॥ अथवा त्रैमासिकम् आपदि तप्तकृच्छ्रः अत्यंतापदि सांतपनम् ॥ पुत्रविक्रये च सर्वं द्विगुणम् ॥ १ ॥ एकपुत्रस्यानापदि कामतः विक्रये त्रिषवणस्नायी अधःशायी चतुर्थकालाशी वत्सरेण शुद्ध्यति ॥ ईदृशकन्याविक्रये तदर्द्धेन शुद्धिः ॥ कामतोनापदि अनेकपुत्रस्य सुतविक्रये चांद्रम्॥२॥ कामतोऽनेकपुत्रस्यानापदि कन्यापुत्रयोर्विक्रेतुश्चतुर्विंशन्मते ॥ नारीणां विक्रयं कृत्वा चरेच्चांद्रायणं व्रतं ॥ द्विगुणं पुरुषस्यैव व्रतमाहुर्मनीषिणः ॥ ३ ॥ आपद्यकामतः कन्याविक्रये तु ॥ विक्रीय कन्यकां गां च कृच्छ्रं सांतपनं चरेदिति ॥ ४ ॥ इत्यपत्यविक्रयप्रायश्चित्तनिर्णयः ॥

## आतां मुलाची विक्री केली असतां प्रायश्चित्ताचा विचार ॥ २० ॥

द्रव्य घेऊन चाकरी करण्या करितां मुलगी मुलगा इत्यादिक यांचें देणें असा विक्रय शब्दाचा अर्थ येथें आहे. या प्रमाणें स्त्रीविक्रया विषयींही जाणावें. त्यांतून कन्येचा विक्रय केला असतां, तसेंच देवगृह, क्रीडार्थ केलेला बाग, साधारण बाग, विहीर, सभा, पाणपोई, सेतु, पुण्य यांचा विक्रय केला असतां चांद्रायणादिकांतील १ प्रायश्चित्त करावें. अथवा त्रैमासिक प्रायश्चित्त करावें. आपत्ति असेल तर तप्तकृच्छ्र प्रायश्चित्त करावें. अत्यंत आपत्ती असेल तर सांतपन करावें. मुला विषयीं तर सर्वप्रायश्चित्त द्विगुणित करावें.॥१॥ १ मुलगा असून गरीबी नसता इच्छेनें त्याची विक्री केली असतां त्रिकाळीं स्नान करून, भूमीवर शयन करून चतुर्थकाळीं आहार करणें या प्रमाणें वर्षभर केल्यानें शुद्धता होते. असेंच कन्येची विक्री केली असतां अर्धप्रायश्चित्त केल्यानें शुद्धता होते. पुष्कळ मुलें असोन आपत्ती नसता इच्छेनें मुलांची विक्री केली असतां चांद्रायण प्रायश्चित्त जाणावें. ॥२॥ १ एकच मुलगा असोन आपत्ती असेल आणि इच्छेनें त्याची विक्री केली असतां दोन चांद्रायण प्रायश्चित्त सांगितलें आहे. चतुर्विंशतिमतांत असेंच सांगितलें आहे. स्त्रियांचा विक्रय केला असतां चांद्रायण व्रत करावें. ॥ ३ ॥ पुरुषाचा विक्रय केला अ-

सतां द्विगुणित प्रायश्चित्त सांगितलें आहे. कन्या अथवा गाय विकली असतां सांतपन कृच्छ्र प्रायश्चित्त करावें या प्रमाणें पुत्रविक्रयनिर्णय जाणावा. ॥ ४ ॥

## अथ धान्यपशुकुप्यस्तेयप्रायश्चित्तनिर्णयः॥ २१ ॥

धान्यं व्रिह्या दि कुप्यमसारंत्रपुसीसादि पशवोगवादयः तेपामपहरणम् ॥ एतेपां प्रायश्चित्तं स्तेयप्रकरण एवोक्तं ॥

## धान्य कुप्य पशुस्तेय प्रायश्चित्ताचा निर्णय.

धान्य ह्मणजे तांदूळ गहू वगैरे, कुप्य ह्मणजे कथील, शिसे, इत्यादि पशु ह्मणजे गायी ह्मसी वगैरे. हें चोरलें असतां यास प्रायश्चित्त चौर्यप्रकरणांत पान ६९।७० सांगितलें आहे. याप्रमाणें धान्य कुप्यपशुस्तेयप्रायश्चित्ताचा निर्णय जाणावा.

## अथायाज्ययाजने प्रायश्चित्तम् ॥ २२ ॥

तत्र व्रात्ययाजको व्रात्योपनेता व्रात्याध्यापकः अहीनयाजकः अहीनोद्विरात्रादिद्वादशाहपर्यंतोहर्गणयागः शूद्रांतेष्टिकर्मयाजको वेदविप्लावी तस्करेतरशरणागतत्यागी तस्कररक्षकः वशीकरणोच्चाटनादिरूपाभिचारकर्त्तांचामत्याकृच्छ्रसांतपनातिकृच्छ्रेषु त्रिषु यथायोग्यं क्वचित्समुदितं क्वचिदेकं कुर्यात् ॥१॥ तथा च मनुः ॥ व्रात्यानां याजनं कृत्वा परेपामंत्यकर्मच ॥ अभिचारमहीनं च त्रिभिः कृच्छ्रैर्व्यपोहति ॥ २ ॥ शरणागतं परित्यज्य वेदं विप्लाव्य च द्विजः ॥ संवत्सरं यवाहारस्तत्पापमपसेधति ॥ ३ ॥ यमः ॥ पुरोधाः शूद्रवर्णस्य ब्राह्मणोयः प्रवर्तते ॥ स्नेहादर्थप्रसंगाद्वातस्य कृच्छ्रो विशोधनमिति ॥४ ॥ पैठीनसिः ॥ शूद्रयाजकः शूद्रद्रव्यत्यागात्कृच्छ्राचरणेन पूतोभवति ॥ ५ ॥ इति अयाज्ययाजनप्रायश्चित्तनिर्णयः ॥

## यज्ञ करण्यास अयोग्य असे जे त्याजकडून यज्ञ करविला असतां प्रायश्चित्त.

व्रात्य (संस्कारहीन) त्याकडून यज्ञ करविणें, त्याचीं उपनयनें करणें, त्यास अध्ययन शिकविणें, अहीनयज्ञ करणें, शूद्राची अंतेष्टी करणें, वेदाला बुडविणें. ( अनाध्यायादिवशीं वेदपाठ करणें तसेंच चांडाळादिकांच्या कानीं वेद पडणें ) चोराहून इतर मनुष्य शरण आला असता त्याग करणें, चोराचें रक्षण करणें, वशीकरण, उच्चाटनादि अभिचार कर्में करणें याचें ठायीं कृच्छ्र सांतपन, अतिकृच्छ्र, या पैकीं प्रायश्चित्त बुद्धिपूर्वक अथवा सहज रीतीनें तसेंच यातील एखादें कृत्य अथवा ज्यास्त कृत्य जरीं असतील तरीं प्रायश्चित्तें सांगावीं. ॥ १ ॥ मनूचें वचनव्रात्याचीं ऋत्विज कर्मे करणें. पिता. गुरु. इत्यादिकांहून वेगळीं माणसें ज्यांचा कांहीं संबंध नहीं

त्यांचें क्रियाकर्मांतर करणें, अहीननामकयाग करणें, हीं पातकें दूर होण्या करितां तीन कृच्छ्रें प्रायश्चित्त करावें. ॥ २ ॥ शरण आलें असतां त्याचा त्याग करणारा, वेद बुडविणें, (वेद, शिकण्यास अयोग्य त्यास वेद शिकविणें) हें केलें असतां वर्षभर पर्यंत सातू खाऊन रहावें. म्हणजे वरील दोषांची निवृत्ति होते. ॥३ ॥ यमानें असें सांगितलें आहे कीं, जो ब्राम्हण स्नेहानें अथवा द्रव्यलोभानें शूद्रवर्णाचा उपाध्याय होतो त्यानें तें प्राप्त झालेलें द्रव्य टाकून कृच्छ्र प्रायश्चित्ताचरण केल्यानें शुद्धता होते. ॥४ ॥ या प्रमाणें यज्ञ करण्यास अयोग्य असे जे त्यांच्या प्रायश्चित्ताचा निर्णय जाणावा. ॥ ५ ॥

## अथ पितृमातृसुतत्यागे प्रायश्चित्तम् ॥ २३ ॥

पितृमातृगुरूणां गृहान्निष्कासनं त्यागउच्यते॥ तत्र श्राद्धप्रकरणे अकारणपरित्यक्ता मातापित्रोर्गुरोस्त्यथैत्यपंक्तियमध्ये पाठः ॥ १ ॥ तत्र प्रायश्चित्तमाह मनुः ॥ पष्ठान्नकालता मासं संहिताजपएवहि ॥ होमश्च शाकलोनित्यमपांक्तेयानां विशोधनमिति ॥ २ ॥ शाकलोयद्देवादेवहेलनमित्यादिपञ्चमंत्रकारगणकः॥ पष्ठान्नकालतायामयमभिप्रायः ॥ सायंप्रातर्द्विजातीनामशनं मुनिनोदितम् ॥ याममध्ये न भोक्तव्यं यामयुग्मं नलंघयेदित्युक्तप्रतिदिनभोजनद्वयनियमेन तृतीयदिनोत्तरार्द्धभोजनकालः ॥ जलपानं तु प्रातिदिनकमेवेति बोध्यम् ॥ ३ ॥ भार्यासुतत्यागेप्येवम् मातुस्तुसर्वदोषेप्यत्याज्यत्वैव सर्वथा रक्षणीयत्वात् ॥ इति पित्रादित्यागप्रायश्चित्तनिर्णयः ॥

## आतां आई, बाप, मुलें, यांचा त्याग केला असतां प्रायश्चित्ताचा विचार ॥

बाप, आई, गुरु,यांस घरांतून काढून देणें, यास त्याग असें म्हणतात. श्राद्धप्रकरणांत पंक्तीस बसविण्यास अयोग्यअशा मनुष्यांच्या गणनेच्या प्रसंगीं कारणा वांचून मातापितरांचा त्याग करणारा तो पंक्तीस बसण्यास अयोग्य असें सांगितलें आहे.॥१॥त्यास मनूनें प्रायश्चित्त सांगितलें आहे. तें असें एका पंक्तीस बसण्यास अयोग्य असे जे पतित त्यानें एक महिनाभर पर्यंत दोन दिवस उपोषण करून तिसरे दिवशीं सायंकाळीं भोजन करावें. याप्रमाणें एक महिना करावें. ' यद्देवादेवहेळन'' या मंत्रानें प्रतिदिवशीं होम करावा म्हणजे शुद्धता होते. ॥ २ ॥ पष्ठान्नकाळाचा अभिप्राय असाकी, सायंकाळीं, प्रात.काळीं, असे दोन वेळां ब्राम्हणांनीं भोजन करावें. प्रहरामध्यें भोजन करूंनये, दोन प्रहर उलंघन करूं नयेत, या नियमानें तिसऱ्या दिवसाचा उत्तर काळ तो भोजनाचा काळ येतो. अर्थात् तिसरे दिवशीं भोजन करावें. पाणी पिणें हें प्रतिदिनचें आहे. ॥ ३ ॥ स्त्री पुत्र यांचा त्याग केला असतां हीं तेंच प्रायश्चित्त जाणावें. मातोश्री दोषयुक्त असेल तरी तिचा त्याग करूंनये

कारण ती कशी असेल तरी सर्व प्रकारें तिचे रक्षण करण्यासच सांगितलें आहे. या प्रमाणें पित्यादिकांचा त्याग केला असतांचा निर्णय जाणावा.

## अथ तडागारामविक्रयप्रायश्चित्तनिर्णयः ॥ २४ ॥

एतत्प्रायश्चित्तं तु सुतविक्रयप्रसंगे उक्तं वेदितव्यं ॥

## तळें, बाग यांची विक्री केली असतां प्रायश्चित्ताचा निर्णय ॥२४॥

*तळें, बाग हें विकलें असतांचें प्रायश्चित्त " सुत विक्रय प्रायश्चित्त प्रकरणीं " सांगितलें आहे तें* तेथें पहावें.

## अथ कन्यादूषणे प्रायश्चित्तम् ॥ २५ ॥

तच्चांगुल्यादिना तस्याः क्षतयोनिकरणं मिथ्यातद्दोषख्यापनं च ॥ आनुलोम्ये नासवर्णकन्यादूषणे मासं पयःपानं ॥ १ ॥ तत्र सवर्णानां कन्यादूषणे चांद्रं त्रैमासिकं वा ॥ प्रातिलोम्येतु क्षत्रियवैश्ययोः कृच्छ्राद्धं ग्रीष्मवर्षाहेमंतेषु क्रमेणातपाभ्रावकाशजलाशयपूर्वकं मासं गोमूत्रयावकपानं वा ॥ शूद्रस्यतु विप्रादिकन्यादूषणे वधएव ॥ अत्यंताभ्यासे सवर्णस्यापिकृच्छ्राद्धं ॥ ९ ॥ सोमविक्रयी वृषलीपतिः कौमारदारत्यागी शूद्रयाजको गुरोः प्रतिहंता ब्राह्मणवृत्तिघ्नः कूटव्यवहारी मित्रध्रुक् शरणागतघाती प्रतिरूपवृत्तिश्चैतेऽमत्त्या प्रवृत्तास्त्रैमासिकं व्रतंकुर्युः ॥ मत्यापाण्मासिकं ॥ अभ्यासे कृच्छ्राब्दम् ॥ ३ ॥ इति कन्यादूषणादिप्रायश्चित्तनिर्णयः ॥

## आतां कन्या दूषीत केली असतां प्रायश्चित्त विचार ॥ २५ ॥

*कन्येच्या योनींत अंगुली घालून तिजला दूषित करणें, अथवा व्यर्थ तिजवर दोषारोप करणें* यास कन्यादूषण ह्मणावें. आपल्या समान वर्णाच्या कन्येस दूषीत केलें असतां तीन महिने पर्यंत चांद्रायण प्रायश्चित्तें करावीं. अनुलोम्यानें ( ब्राह्मणानें क्षत्रिय कन्येस, क्षत्रियानें वैश्य कन्येस ) भिन्न जातीची कन्या दुषीत केली असतां एक महिना पर्यंत दूध पिऊन रहावें. ॥ १ ॥ प्रातिलोम्यानें ( क्षत्रियानें ब्राह्मण कन्येस, वैश्यानें क्षत्रिय कन्येस अशा दूषीत केल्या असतां कृच्छ्राद्ध प्रायश्चित्त करावें असें सांगितलें आहे. आणि ग्रीष्म ऋतुचे ठायीं उन्हांत उभें राहणें, वर्षा ऋतूचे ठायीं पावसांत उभें राहणें, हेमंत ऋतूचे ठायीं पाण्यांत उभे राहून कृच्छ्राद्ध प्रायश्चित्त करावें. अथवा महिनाभर पर्यंत गोमूत्रांत शिजविलेलें सातु भक्षण करून रहावें. शूद्रानें ब्राह्मणादिकांची कन्या दूषीत केली असतां प्राणांत होईपर्यंत प्रायश्चित्त आचरणनें शुद्धता येते, असें करण्याचा अत्यंत अभ्यास असेल तर एक वर्णाच्या मनुष्याशीं कृच्छ्राद्ध प्रायश्चित्त

आहे. ॥ २ ॥ सोमवल्लीचा रस विकणारा, शूद्रस्त्रियेशीं गमन करणारा, मूलत्रयाची अशा स्त्रीचा त्याग करणारा, शूद्रानिमित्त यज्ञ करणारा, गुरूस उलट मारणारा, ब्राह्मणाच्या वृत्तींचा नाश करणारा, खोटा व्यवहार करणारा, मित्रद्रोह करणारा, शरणागताचा त्याग करणारा, आपल्या जातीस विरुद्ध अशा व्यवहाराने उपजीविका करणारा, इतकी मनुष्यें हीं सांगितलेलीं दुष्कृत्यें यांचे ठायीं सहज रीतीनें प्रवृत्त झाले असतां त्रैमासिक व्रताचरणानें शुद्धता येते. बुद्धिपूर्वक प्रवृत्त झालें असतां षाण्मासव्रताचरणानें शुद्धता होते. ॥ ३ ॥ या प्रमाणें कन्यादूषण प्रायश्चित्ताचा निर्णय जाणावा. ॥

## अथ क्रमप्राप्तपरिवेदकयाजनादौ प्रायश्चित्तम् ॥ २६

परिवेदकयाजने १ तस्मैकन्यादाने२गुरौकौटील्ये ३ आत्मार्थे पाकारंभेच मद्यपायाः स्वस्त्रियाअपि उपभोगरूपे मद्यपस्त्रीनिषेवणे देवताराधनाद्यर्थं गृहीतव्रतलोपेन्यस्मिन्व्रतलोपे चैतेषूपपातकेषुचांद्रादिष्वेकं त्रैमासिकं वा प्रायश्चित्तं कार्यं इतिपरिवेदकयाजनादिप्रायश्चित्तम् ॥ २६ ॥

## आतां परिवेदक ( वडीलभावाचें लग्न नसोन धाकटे भावाचें लग्न झालें असेल ) त्यांजकडून वेदादि करविलें असतां प्रायश्चित्ताचा विचार ॥ २६ ॥

परिवेदक (वडील भावाचें लग्न झालें नसोन ज्या धाकट्या भावाचें लग्न झालें असेल तो)त्यांजकडून यज्ञ करविणें, त्यास कन्या देणें, गुरूशी कुटिलता करणें, आपल्या करितां स्वयंपाक करणें, मद्य प्राशन करणारी अशा आपल्या बायकोशीं उपभोग करणें, ( हें सच्छूद्र दिकांविषयीं आहे ) देवतेच्या आराधना करितां घेतलेलें व्रत त्याचा लोप करणें, तसेंच अन्य गृहीत व्रत तें सोडणें, या सर्व उपपातकास सांगितलेलीं जीं चांद्रायण, त्रैमासिक, इत्यादिकप्रायश्चित्तें त्यांतील १प्रायश्चित्ताचरणानें शुद्धता होते. या प्रमाणें परिवेदकयाजनादि प्रायश्चित्ताचा विचार जाणावा.

## अथ स्वाध्यायाग्निसुतत्यागे प्रायश्चित्तम् ॥ २७ ॥

तत्रात्यंतापदि स्वल्पकालमधीतवेदत्यागे त्र्यहम् ॥ अधिककालेतिकृच्छ्रं ॥ ततोप्यधिके पराकः ॥ मासोत्तरवेदत्यागे चांद्रम् ॥ १ ॥ यदा तु धनार्जनाद्यासक्ततया अनन्धाद्यभ्यासकुटुंबलालनाद्याकुलतया चिरकालं वेदं त्यजति तदा चांद्रादिष्वेकं त्रैमासिकं वा ॥ नास्तिक्याद्यनासक्त्या वा वेदत्यागोब्रह्महत्यासमः ॥ तद्विषये प्राय श्चित्तविचारो ब्रह्महत्याप्रकरणे कथितः ॥ २ ॥ अग्नित्यागे तु अनाहिताग्निप्रकरणे अभिहितम् ॥ संस्काराद्यकरणरूपे विभवे सत्यरक्षणरूपे च सुतत्यागे चांद्रादिष्वेकम् इति स्वाध्यायाग्निसुतत्यागेप्रायश्चित्तनिर्णयः ॥

## आतां वेदाध्ययन, अग्निहोत्र, पुत्र, यांचा त्याग केला असतां प्रायश्चित्ताचा विचार ॥ २७ ॥

अत्यंत आपत्ति असतां स्वल्प काल पर्यंत अध्ययन केलेला जो वेद त्याचा त्याग केला असतां काय प्रायश्चित्त सांगितलें आहे अधिक दिवस अध्ययन केलेला वेद अध्ययन न करितां सोडिला असतां अतिकृच्छ्र प्रायश्चित्त त्याहून ही अधीक दिवस झाले असल्यास पराक प्रायश्चित्त जाणावें. १ महिन्या पेक्षा जास्त दिवस सोडिल्यास चांद्रायण प्रायश्चित्त आचरण करावें. ॥ १ ॥ जेव्हा तर द्रव्य मिळविणें इत्यादिका विषयीं आसक्तता झाल्यानें तसेंच बोद्धादिक त्याच्या असच्छास्त्राच्या अभ्यासा मुळें, तसेंच कुटुंबाच्या पालनादि कारणानें, चिरकाल वेदत्याग केला असता चांद्रायण अथवा त्रैमासिक प्रायश्चित्ताचरण करावें. नास्तीकपणानें अथवा दुर्व्यसनाच्या आसक्ततेनें वेद त्याग केला असता ब्रह्महत्या समान दोष सांगितला आहे. त्या बद्दलचें प्रायश्चित्त ब्रह्महत्या प्रकरणात पान ३९ सांगितलें आहे. तें तेथें पहावें. ॥२॥ ऐश्वर्य असोन मुलांचे संस्कारादिक केले नसता अथवा त्यांचें संरक्षण केलें नसतां चांद्रायणादिका पैकीं१ प्रायश्चित्त करावें. ॥ ३ ॥ या प्रमाणें स्वाध्यायाग्निसुतत्यागाचा निर्णय जाणाना.

## अथ बांधवत्यागप्रायश्चित्तनिर्णयः ॥ २८ ॥ २९ ॥ ३० ॥

पातित्यादित्यागकारणाभावेपि पितृव्यमातुलादिरूपबांधवैः सह संभाषणसहभोजनादिवर्जनरूपे शक्तौ सत्यां पालनाद्यकरणरूपे च बांधवत्यागे ॥ १ ॥ भार्यायाः वेश्यात्वकरणेन जीवनरूपे स्त्रीधनोपजीवनकरणे च स्त्रिया जीवने ॥ २ ॥ हिंसया जीवनेवश्याद्यौषधीभिः जीवने जालवडिशादिविधानरूपेतिलेक्ष्वादिपीडनयंत्रप्रवर्तन रूपे च हिंस्रयंत्रप्रवर्तने मृगयाद्यूताद्यष्टादशव्यसनेषु च चांद्रादिष्वेकं त्रैमासिकवा ॥ ३ ॥ अत्यंताभ्यासे द्यूते मृगयायां च पांचवार्षिकव्रतम् ॥ अनृतवादी तस्करोराजभृत्योवृक्षारोपणवृत्तिर्गरदोग्निदोहयगजरथारोहणजीवी रंगोपजीवीश्वगणिकः शूद्राध्यापकोवृषलीपतिर्भांडिकः श्ववृत्तिर्ब्रह्मजीवी क्षत्रोपजीवी चिकित्सकोदेवलकोराजपुरोहितः कितवोमद्यपः कूटकारकोपत्यनरपशुविक्रेता पाखंडयागाभोज्यान्नाशीचेत्येते ब्राह्मण्यमिच्छंतोलब्धद्रव्यं त्यक्त्वा त्रैमासिकं कुर्युः ॥ बहुकालाभ्यासे संवत्सरं चतुर्थकालाहारः ॥ ४ ॥ तत्र श्वगणिकः श्वगणजीवी भांडिकः कस्तूर्यादिजिवी बंदी वा ॥ श्ववृत्तिर्नीचसेवकः ब्रह्मजीवी मूल्येन द्विजकर्मकर्ता ॥ द्रव्यग्रहणेन परहास्यकरणरूपे दासभवनरूपे वा आत्मविक्रये शूद्रसेवारूपे शूद्रप्रेष्यत्वे हीनजातिषु मैत्रीरूपे हीनसख्ये च चांद्रादिष्वेकं त्रैमासिकं वा ॥ बहुकालशूद्रसेवायां चतुर्थकाले मितभोजनत्रिकालस्नानाभ्यां त्रिवर्षेण शुद्धिः ॥ ५ ॥ ब्राह्मण्याद्यपहरणे सर्वपण्यै-

र्व्यवहारे बहुअनृते च शूद्रसेवावत् उत्तमजातिसख्यविघट्टने उपोष्य परदिने पयःपारणम् ॥ ६ ॥ अकृतसवर्णविवाहस्य हीनवर्णविवाहोहीनयोनिनिषेवणं साधारणस्त्रीसंज्ञकवेश्यादिसंभोगश्च तत्राद्ये चांद्रादिष्वेकंवा ॥ सकृदमतिपूर्वकवेश्यादिगमने प्राजापत्यम् ॥ द्विरात्राभ्यासेकामतश्च सकृद्गमने सप्तरात्रं तप्तकुशोदकपानम् ॥ मतिपूर्वकाभ्यासेचांद्रम् ॥ अत्यंताभ्यासे त्रैमासिकम् ॥ ७ ॥

## बांधवांचे त्यागाचे प्रायश्चिताचा विचार ॥ २८ ॥ २९ ॥ ३०॥

पातित्यादिक जीं त्याग करण्याची कारणें ती नसता ही चुलता, मामा इत्यादिक जे बांधव ( आप्तवर्ग ) याच्याशीं सहवर्तमान संभाषण, एकत्र भोजन, इत्यादिक न करणें. तसेंच आपणास शक्ती असोन ही त्याचें पोषणादिक न करणें. यास बांधवत्याग असें म्हणावें. ॥ १ ॥ आपल्या स्त्रियेस वेश्या ( कसबीणीचा धंदा ) तिच्याकडून करवून त्या पासून द्रव्य मिळवून तेणें करून उपजीविका करणें, अथवा आपल्या स्त्रियेचें जें स्त्रीधन ( तिच्या बाप बंधू इत्यादिकानीं दिल्लें तसेंच लग्नाचे वेळीं स्त्रियेस दिलेलें जें द्रव्य त्यास स्त्रीधन असें म्हणावें. ) ते घेऊन त्याजवर उपजीविका करणें त्यास स्त्रीजीवन अशी संज्ञा आहे. ॥ २ ॥ प्राण्याची हिंसा करून उपजीविका करणें वशीकरणादिका करिता सांगितलेल्या ज्या औषधी त्याहीं करून उपजीविका करणें, जाळें, गळ इत्यादिक तयार करून त्याचे विक्रीवर उपजीविका करणें, तीळ, ऊस, इत्यादिकगाळण्या करिता घाणा लावून त्याजवर उपजीविका करणें ज्याच्या योगानें हिंसा होईल अशीं यंत्रें तयार करणें, मृगया म्हणजे शिकार करणें, द्यूत म्हणजे जुगार खेळणें इत्यादिक जीं अठरा प्रकारचीं व्यसनें यांचे ठायीं चान्द्रायणादिक तसेंच त्रैमासिक जीं प्रायश्चित्तें सांगितलीं आहेत त्यापैकीं एक प्रायश्चित्त करावें. ॥ ३ ॥ मृगया द्यूत हे खेळण्याचा अत्यंत अभ्यास असेल तर ५च वार्षिक प्रायश्चित्त करावें. खोटे भाषण करणारा, राजाची नोकरी करणारा, झाडें लावून त्याजवर उपजीविका करणारा विष देणारा व लोकाच्या घरास अग्नि लावणारा, घोडा, हत्ती, रथ, यांचे वर बसण्याचें योगाने उपजीविका करणें रंगारी पणानें उपजीविका करणें, कुत्रे बाळगून उपजीविका करणें, शूद्रास वेद शिकविणारा, शूद्र स्त्रियेशीं गमन करणारा, कस्तुरी इत्यादिकानीं उपजीविका करणारा, स्तुतिपाठक, नीच जातीची नोकरी करणारा, किंमत घेऊन ब्राह्मणपणाचें काम करणारा, क्षत्रियपणाचें काम करणारा, राज पुरोहित, ठकबाजी करणारा, मद्यप्राशन करणारा, खोटें कर्म करणारा, मुलगा, मुलगी, पशू, यांची विक्री करणारा पाखंडी मनुष्याच्या घरीं अन्न भक्षण करणारा, हे जे सांगितले त्यास आपलें ब्राह्मण्य रहावें अशी इच्छा असल्यास पूर्वोक्त प्रकारानें मिळविलेलें द्रव्य टाकून त्रैमासिक प्रायश्चित्त ग्रहण करावें. असें करण्याचा फार दिवस अभ्यास असेल तर एक वर्षभर पर्यंत चौथे प्रहरीं भोजन करून रहावें म्हणजे शुद्धता होते.॥४॥ द्रव्य गृहण करून दुसऱ्याचा उपहास करण्याचें कवुत्व करणें, किंवा नौकरी करणें याचें न॰

आत्मविक्रय. शूद्राची सेवा करणें, अशी नौकरी पतकरली असतां किंवा आपल्यापेक्षां कमी जातीच्या मनुष्यांशीं स्नेह केला असतां, चांद्रायणांतील एक प्रायश्चित्त करावें, वहुत काळ पर्यंत शूद्राची चाकरी केली असेल तर चतुर्थकालीं नियमित अन्नभक्षण करून त्रिकाळ स्नान करावें. या प्रमाणें तीन वर्षें केल्यानें शुद्धता होते. ॥ ५ ॥ ब्राह्मणाची ठेव हरण केली असतां सर्वपदार्थ विकण्याचा व्यवहार केला असेल, अनृतभाषण केलें असतां शूद्रसेवे प्रमाणेंच प्रायश्चित्त करावें. उत्तमवर्णाचा स्नेह तोडला असतां एक दिवस उपोषण करून दुसरे दिवशीं दूध पिऊन रहावें. ॥ ६ ॥ आपल्या जातीच्या स्त्रियेशीं लग्न न करितां कमी जातीच्या स्त्रियेशीं लग्न करणें, अथवा वेश्यादिक ज्या स्त्रिया त्यांच्याशीं संभोग करणें यास हीनयोनीनिषेवण अशी संज्ञा आहे हें न जाणोन एक वेळा झालें असतां चांद्रायणादिक अथवा त्रैमासिक प्रायश्चित्त करावें. जाणोन दोन तीन वेळां वेश्या गमनाचा अभ्यास असेल तर सप्तरात्र पर्यंत कुशोदकपान बुद्धिपूर्वक अत्यंत अभ्यास असेल तर चांद्रायण त्रैमासिक प्रायश्चित्त करावें. ॥ ७ ॥

## अथानाश्रमित्वप्रायश्चित्तनिर्णयः॥ ३१ ॥

तत्र हारीतः ॥ अनाश्रमी संवत्सरं प्राजापत्यं कृच्छ्रं चरित्वाश्रममुपेयात् ॥ परपाकरतिः परान्नपुष्टता ॥ चार्वाकादिशास्त्राभ्यासोसच्छास्त्राधिगमनं ॥ स्वर्णाद्युत्पत्तिस्थानेषु राजाज्ञयाधिकारित्वमाकराधिकारस्तेषु भार्याविक्रये च चांद्रादिष्वेकं त्रैमासिकं वा ॥ १ ॥ अथ गुरुद्विष्टेषु विष्णुः ॥ समुत्कर्षानृतंगुरोश्चालीकनिर्बंधे तदक्षारणे च मासं पयसावर्तेतेति ॥ इदं च मतिपूर्वकं ॥ अक्षारणमभिशापः शंखः क्षिप्त्वाग्रावर्थाचि द्रव्यं तथैवांभसि मानवः ॥ मासमेकं व्रतं कुर्यादपाक्रम्य तथा गुरुम् ॥ १ ॥ *अश्वविमलमुक्तादि ॥*

## आश्रमावांचून राहिले असतां प्रायश्चित्ताचा विचार ॥ ३१ ॥

त्यास हारीताचें वचन. आश्रमावांचून कोणी वर्षभर जर दुसरा आश्रम स्वीकार न करतां राहील तर त्यानें कृच्छ्र प्राजापत्य प्रायश्चित्ताचरण करून आश्रमाचा स्वीकार करावा. दुसऱ्याच्या पाकाविषयीं अभिरुचि धरणें, व परान्नाच्या योगानें शरीर पुष्ट करणें. चार्वाकादिक जे नास्तिक त्यांच्या शास्त्राचा अभ्यास करणें, याचें नांव असत् शास्त्राधिगमन. सुवर्णादिकांच्या ज्या खाणी यांचे ठायीं राजाच्या आज्ञेनें अधिकार स्वीकारणें हे जे सर्व परपाकरती इत्यादिक दोष यांचे ठायीं. तसेंच आपले स्त्रियेचा विक्रय केला असतां उपपातकास जीं चांद्रायणादि प्रायश्चित्तें सांगितलीं त्यापैकीं

एक प्रायश्चित्त अथवा त्रैमासिक प्रायश्चित्त आचरण करावें. ह्मणजे त्या त्या पातकापासून शुद्धता होते. ॥ १ ॥ गुरूचा द्वेष करणाऱ्या विषयीं प्रायश्चित्त विष्णु सांगतो. दोघांचा वाद चालत असतां त्यापैकीं ज्याचा उत्कर्ष असेल त्या बद्दल खोटें बोललें असतां, तसेंच गुरूस खोटें बोललें असतां गुरूचा तिरस्कार व गुरूशीं कपट केलें असतां, एक महिनाभर पाणी पिऊन राहिल्यानें शुद्धता येते. शंखाचें वचन. अग्नीचे ठायीं अथवा पाण्यामध्यें मलमूत्रादिक अमंगल पदार्थ टाकीलें असतां, अथवा गुरूची आज्ञा उल्लंघन केली असतां, महिनाभर पर्यंत पाणी पिऊन रहावें ह्मणजे त्या पातकापासून शुद्धता होते.

## अथ आत्मविक्रयप्रायश्चित्तनिर्णयः ॥

तत्प्रायश्चित्तं स्कंदपुराणे पातालखण्डे पानमक्षःस्त्रियश्चैव मृगयाचोग्रदंडनम्॥ अतीव पुरुषं वाक्यं सर्वस्वदानमेवच ॥ एतानि सप्त व्यसनानि ॥ १ ॥ अथापराणि सप्त व्यसनानि अनृतं गंधपुष्पाणां सेवनं दोषचारिणाम् ॥ ऋणं कृत्वा घृतं पीत्वा प्रत्यहं भोजने स्पृहा ॥२॥ स्वं किंचनपणं कृत्वा ऋणं कृत्वा व्रतं चरेत् ॥ एषु भोगासक्तः स्वात्मानं विक्रयित्वा वर्तयेत् ॥ ३ ॥ वर्षं वाथ तदर्द्धं वा भगवदाराधनं चरेत् ॥ इतीव संविदं कृत्वा वर्त्तयेद्यदि पापधीः ॥ नित्यकर्माणि काम्यानि इष्टापूर्तादिकानि च ॥ सर्वं तत्रैव भवति स्वयं वैनिष्फलोभवेत् ॥ अग्नौ दग्धं जले मग्नं भूमौ निपतितं च यत् ॥ तत्सर्वं परलोकाय द्यूते नष्टं विनश्यति ॥ ४ ॥ पतितः सभवेत्पापी भ्रंशाद्वैनित्यकर्मणाम् ॥ नरके नियतं वासः पापकारी भवेद्यतः ॥ ५ ॥ तस्य वैनिष्कृतिर्दृष्टा मुनिभिर्धर्मकोविदैरिति ॥ हिरण्यगर्भप्रतिग्रहप्रायश्चित्तवत्सर्वं कुर्यात् ॥ तत्तु प्रायश्चित्तं तुलादानादिप्रतिग्रहप्रायश्चित्तप्रकरणे द्रष्टव्यम् ॥ ६ ॥ इत्यात्मविक्रयप्रायश्चित्तम् ॥

## आत्मविक्रयाचें प्रायश्चित्त.

स्कंदपुराणांत पाताळखंडातील वचन. मद्य प्राशन करणें, जुवा खेळणें, शिकार करणें, थोडें पाप असतां बहू दंड सांगणें, अत्यंत कठोर भाषण करणें, कुटुंबांतील मनुष्यांचा निर्वाहाचा विचार न करतां सर्वस्व दान करणें, हीं सात व्यसनें सांगितलीं आहेत. ॥१॥ खोटें बोलणें, गंधपुष्पाचें सेवन करणें, मद्य प्राशन करणें, वेश्याशीं गमन करणारे, दुष्ट पुरुषांसीं स्नेह करणें, कर्ज काढून यथेष्ट घृतादिक खाणें, प्रतिदिवशीं नवीन पदार्थ खाण्याची इच्छा करणें. ॥२॥ मला इतकें द्रव्य दिलें असतां मी आपलें व्रत करीन असा व्यवहार करणें, आपले पाशीं द्रव्य नसतां लोकांचें कर्ज काढून व्रतास व उद्यापनादिकांस पुष्कळ द्रव्य खर्चून मनोयापन करणें, या व्यसनाचे भोगाविषयीं आसक्त झालेला मनुष्य आपलाहि विक्रय करील.॥३॥

आपला विक्रय करण्याचा प्रकार. वर्षभर अथवा सहामहिने तुह्मा बद्दल मी भगवंताची आराधना करीन, असी प्रतिज्ञा करून द्रव्य घेऊन जो राहतो तो मनुष्य आत्मविक्रय करणारा जाणावा. या मनुष्याची स्नान संध्यादिक जीं नित्यकर्मे, तसेंच यज्ञादिक काम्यकर्मे, इष्टापूर्तादिक (विहीर, आड, तळाव) इत्यादिक कर्म करणें, तीं सर्व निष्फळ होतात.॥४॥ अग्नीचे ठायीं दग्ध झालेलें, पाण्यांत बुडालेले, भूमीचे ठिकाणीं पडलेले, ते सर्व परलोका कारणें होतें. परंतु जुव्वा खेळ ण्यामध्यें गेलेलें द्रव्य नाशाच पावतें तें या लोकीं व परलोकीं कधींही मिळत नाहीं. जो मनुष्य नित्यकर्मे करीत नाहीं,तो पतित होतो आणि पापकर्माविषयीं प्रवृत्त होतो आणि त्याचा निश्चयानें नरकांत वास होतो. ॥५॥ धर्म जाणणारे असे जे ऋषि त्यांनीं त्या पुरुषास पापा पासून दूर करण्यास प्रायश्चित्त हिरण्यगर्भप्रतिग्रहप्रायश्चित्ता प्रमाणें सर्व करण्यास सांगितलें आहे. तें प्रायश्चित्त,तुलादानादिप्रायश्चित्त प्रकरणांत पहावें. याप्रमाणें आत्मविक्रय प्रायश्चित्त जाणावें. ॥६॥

## ॥ अथासत्प्रतिग्रहप्रायश्चित्तनिर्णयः ॥

तत्रोपार्जितधनत्यागपूर्वकमित्याह मनुः ॥ यद्गर्हितेनार्जयंति कर्मणा ब्राह्मणा धनम् ॥ तस्योत्सर्गेण शुध्यंतिजप्येन तपसैवच ॥ १ ॥ जपित्वा त्रीणि सावित्र्याः सहस्राणि समाहितः ॥ मासं गोष्ठे पयः पीत्वा मुच्यतेसत्प्रतिग्रहात् ॥ २ ॥ याज्ञवल्क्यः ॥ गोष्ठे वसन्ब्रह्मचारी मासमेकं पयोव्रतः ॥ गायत्रीजाप्यनिरतःशुध्यतेसत्प्रतिग्रहात् ॥ ३ ॥ प्रतिग्रहस्य चासत्वं कालदेशद्रव्यकर्तृदात्रादिभेदात् तत्र कालत उपरागादौ देशतः कुरुक्षेत्रादौ ॥ द्रव्यतोमेष्यादेः ॥ कर्तृतस्तु विद्यातपोहीनस्य दातृतस्तु द्वेधा जातितः कर्मतश्च ॥ यथा चांडालादेः पतितादेश्च ॥ षट्त्रिंशन्मते पवित्रेष्ट्या विशुद्ध्यंति सर्वे घोराः प्रतिग्रहाः ॥ ऐन्दवेन मृगारेष्ट्या कदाचिन्मित्रविन्दया ॥ देव्यालक्षजपेनैव शुध्यंतेदुष्प्रतिग्रहतः ॥ ४ ॥ चतुर्विंशतिमते॥ भिक्षामात्रं गृहित्वा तु पुण्यं मंत्रमुदीरयेत् ॥ प्रतिग्रहेषु सर्वेषु पष्ठांशं परिकल्पयेत् ॥ ५ ॥ जपहोमादिकं कुर्यात्कृत्वा राज्ञः प्रतिग्रहं ॥ हारीतः ॥ मणिवासोगवादीनां प्रतिग्रहे सावित्र्याः सहस्रं जपेत् ॥ ६ ॥ पाद्मे ॥ न तीर्थे प्रतिगृण्हीयात्प्राणैः कंठगतैरपि ॥ अपि कामातुरोजंतुरेकां रक्षति मातरं ॥ ७ ॥ तीर्थे प्रतिगृही यस्तु तीर्थविक्रयएव सः ॥ विक्रीतायां तु गंगायां विक्रीतः स्याज्जनार्दनः ॥ ८ ॥ जनार्दने तु विक्रीते विक्रीतं भुवनत्रयं ॥ यस्तुद्विजः क्षेत्रे प्रतिग्रहरुचिर्भवेत् ॥ ९ ॥ नैव तस्य परोलोकोनायं लोको दुरात्मनः ॥ ब्राह्मे ॥ प्रवाहमवधिं कृत्वा यावध्दस्तचतुष्टयम् ॥ तत्र नारायणः स्वामी नान्यः स्वामी कदाचन ॥ १० ॥ तत्र न प्रतिगृण्हीयात्प्राणैः कंठगतैरपि ॥ दानधर्मे ॥ भाद्रशुक्लचतुर्दश्यां यावदाक्रमते जलं ॥ तावद्गर्भं विजानीयात्तदूर्ध्वं तीरमुच्यते ॥ ११॥ ब्राह्मे ॥ सार्द्धहस्तशतं यावद्गर्भतस्तीरमुच्यते ॥ स्कांदे ॥ तीराद्गव्यूतिमात्रं तु पर

तः क्षेत्रमुच्यते ॥ १२ ॥ अत्र दानं जपो होमो गंगायां नात्रसंशयः ॥ तटयोः प्रत्येकं कोशद्वयं ॥ गव्यूतिमात्रं याज्ञवल्क्यः ॥ विद्यातपोभ्यां हीनेन न तु ग्राह्यःप्रतिग्रहः ॥ ग्रण्हन्प्रदातारमधोनयत्यात्मानमेवचेति ॥ १३ ॥ श्राद्धहेमाद्रौ पाद्मे ॥ अतिदुष्टा प्रेतशय्या न ग्राह्या द्विजसत्तमै ॥ गृहीतायां तु तस्यां च पुनः संस्कारमर्हति ॥१४॥ एतानि च प्रायश्चित्तानि प्रतिगृहीतद्रव्यमुत्सृज्यैव कार्याणि ॥ एवं दुष्प्रतिग्रहप्रायश्चित्तनिर्णयः ॥

## वाईट दान घेतलें असतां प्रायश्चित्ताचा विचार.

दुष्ट दान घेतलें असतां त्या दाना संबंधानें जें मिळालेलें द्रव्य तें सर्व टाकून नंतर प्रायश्चित्त घ्यावें. या विषयीं मनूचें वचन-ब्राह्मण निंद्यकर्मानें जें द्रव्य संपादन करितात तें द्रव्य टाकल्यानें, तसेंच गायत्रीजपानें अथवा अन्यतपश्चर्येनें शुद्ध होतात. ॥१॥ प्रतिदिवशीं समाधान अंतःकरणानें तीन हजार गायत्रीजप करून इतर कांहीं भक्षण न करितां दूध प्राशन करून रहाणें, या प्रमाणें महिनाभरपर्यंत केल्यानें दुष्ट दान घेतलेल्या दोषापासून मनुष्य मुक्त होतो. ॥ २ ॥ याज्ञवल्क्याचें वचन. गायीच्या गोठ्यामध्यें वासकरून ब्रह्मचर्यव्रत धारण करून तसेंच दूध प्राशन करून महिनाभरपर्यंत गायत्रीजपयुक्त राहिल्यानें मनुष्य दुष्टदान घेतलेल्या पातकापासून मुक्त होतो. ॥ ३ ॥ दानास दुष्टपणा काळ, देश, द्रव्य, कर्ता, दाता इत्यादिकाच्या भेदानें प्राप्त होतो. त्या मध्यें काळाविषयाचें उदाहरण सूर्यचंद्रादिग्रहणामध्यें दान घेणें देश-कुरुक्षेत्रादि महाक्षेत्रांचे ठायीं दान घेणें, द्रव्य मेंढी उभयतो मुखी गाय इत्यादिकांचें दान घेणें, विद्या, तपश्चर्या हें आपल्या मध्यें नसून दान घेणें, कर्त्याचे उदाहरण दाता जातीनें अथवा कर्मानें हीन असतां त्यां पासून दान घेणें, जसें चांडाळादिका पासून दान घेणें अथवा पतिता पासून दान घेणें षट्त्रिंशन्मतामध्यें असें सांगितलें आहे कीं, सर्व भयंकर प्रतिग्रह ( दानें ) हीं घेतलीं असतां जे दोष उत्पन्न होतात ते पवित्रेष्टी नामक यज्ञ केल्यानें नाहींसे होतात. अथवा चांद्रायण केल्यानें अथवा मृगारेष्टीनें अथवा मित्रविंदानामक यज्ञ केल्यानें अथवा लक्षगायत्रीजप केल्यानें सर्व दुष्ट दानाच्या दोषापासून मुक्त होतात. ॥४॥ चतुर्विंशतिमतामध्यें असें सांगितलें आहे कीं, भिक्षाग्रहण केली असतांही गायत्रीमंत्राचा जप करावा सर्व प्रतिग्रहांचे ठायीं जें मिळालें असेल त्यांतील सहाव्या हिस्याचें दान करावें. ॥५॥ राजापासून दान घेतलें असतां जप होम इत्यादिक केल्यानें शुद्धता होते. हारीतानें असें सांगितलें आहे कीं, मणी, वस्त्र, गायी इत्यादिकांचें दान घेतलें असतां दशसहस्रगायत्रीजप करावा. ॥ ६ ॥ पद्मपुराणांत असें सांगितलें आहे कीं, कंठगत प्राण झाले असतांही तीर्थाचें ठायीं दान घेऊं नये. कितीही मनुष्य पापातुर झाला असतांही भारता मनुष्याचें रक्षण करितो. ॥ ७ ॥ जो तीर्थाचेठायीं दान घेतो त्यानें तीर्थाची विक्री केल्या प्रमाणें होतें. गंगेचें विक्रय केलें असतां विष्णूचें-विक्रय केल्या प्रमाणें होतें. ॥ ८ ॥

विष्णूचें विक्रय केलें असतां त्रैलोक्य विक्रयाप्रमाणें होतें, जो ब्राह्मण क्षेत्राचेठायीं प्रतिग्रह घेण्याविषयीं तत्पर होतो. ॥ ९ ॥ त्यास हा लोक व परलोकही प्राप्त होत नाहीं. ब्रह्मपुराणात असें सांगितलें आहे कीं, प्रवाहापासून चारहातपर्यंत जो भाग त्याचा विष्णु स्वामी आहे तेथें दान कधींही घेऊ नये. ॥१० ॥ दानधर्मांतील वचन. भाद्रपद शुक्ल चतुर्दशी पर्यंत जेथ पर्यंत नदीचें पाणी राहात असेल त्या भागास गर्भ असें ह्मणावें, त्याच्या पुढील भागास तीर असें ह्मणावें. ॥ ११ ॥ ब्रह्मपुराणांत गर्भापासून दीडशें हाताच्या पलीकडेचा जो भाग त्यास तीर असें ह्मणावें असें सांगितलें आहे. स्कंधपुराणात तीरा पासून पलीकडील दोन कोस परमित जो भाग त्यास क्षेत्र असे ह्मणावें. ॥ १२ ॥ तेथें दान, जप, होम हें केलें असतां गंगेच्या ठायींच केल्या प्रमाणें आहे. याज्ञवल्क्याचें वचन. विद्या आणि तपश्चर्या यानें जो॰ रहितः मनुष्य त्यानें दान कधींही घेऊ नये. घेतलें असता आपणास व दान देणारास अधोगतीस नेईल. ॥१३॥ श्राद्धहेमाद्रींतील वचन. प्रेताची शय्या अत्यंत दोष करणारी आहे. ह्मणून ती घेऊं नये घेतली असतां पुनः मौंजीबंधन करावें. ॥ १४ ॥ हीं जी प्रायश्चित्तें सांगितलीं तीं घेतलेलें जें दान द्रव्य तें टाकल्या नंतर करावीं. या प्रमाणें दुष्प्रतिग्रहप्रायश्चित्ताचा निर्णय जाणावा.

## ॥ अथ निंदितान्नभक्षणे प्रायश्चित्तम् ॥ ३२ ॥

तत्रान्नमदनीयमात्रं ॥ तस्य निंदितत्वं च स्वभावकालसंपर्कक्रियाभावपरिग्रहैः ॥ तत्र स्वभावाल्लशुनादेः ॥ स्वभावदुष्टमेवजातिदुष्टमुक्तं ॥ कालतः पर्युषितादेः संपर्कात् श्वस्पृष्टादेः ॥ क्रियातोहस्तदानादिना व्यंजनादेः ॥ भावादिक्षुरसादेः भवंति हि कस्यचिदिक्षुरसे भावोमदिरेयमिति ॥ परिग्रहात्पतितान्नादेः ॥ अन्यत्र वाक्दुष्टमिति सप्तममुक्तं ॥ तथाच ॥ क्षुधार्तश्च न कोभुंक्ते मामकं त्वन्नमेवहीत्यादि ॥ १ ॥ तत्र स्वभावदुष्टलशुनगृंजनच्छत्राकविड्वराहग्रामकुक्कुटपलांडूनां प्रत्येकममत्या सकृत् भक्षणे सांतपनम् ॥ अन्यत्र चांद्रायणमुक्तं ॥ तथा पलांडुं विड्वराहं च छत्राकं ग्रामकुक्कुटं ॥ लशुनं गृंजनं चैव जग्ध्वा चांद्रायणं चरेत् ॥ अत्यंताभ्यासे सुरापानसमं प्रायश्चित्तांते पुनरुपनयनमेतेषु सर्वत्र ॥ २ ॥ छत्राकादिभक्षणे मनुः॥ छत्राकं विड्वराहं च लशुनं ग्रामकुक्कुटम् ॥ पलांडुं गृंजनं चैव मत्या जग्ध्वा पतेन्नरः ॥ ३ ॥ अथ गृंजनं विषदिग्ध बाणहतमृगमांसमिति कश्चित् ॥ कालिंजमितितन्नामेतिच प्रांचः गृंजनं लशुनतुल्यः कंदइति मिताक्षरा ॥ गाजराख्यं मूलं यदीयं पत्रं गायकाः कंठशुध्यर्थं भक्षयंति विटा श्च मदार्थं सपत्रविशेषश्चेति माधवः ॥ चरकादिवैद्योक्तपलांड्वंतरभेदेपुच्छत्रादिभेदे च नरगोमांसादौचैवमेवयोज्यम् ॥ एतेषां मुखप्रवेशमात्रे बलात्कारेणभक्षणे चानुपनीतत्वा लेन सकृद्भक्षणे च गायत्र्याअष्टाधिकसहस्रेण मूर्धनि संततपातेनोपवासेन च शुद्धिः

॥ ५ ॥ इतरौषधानाश्यव्याधियुक्तस्यैतद्भक्षणे दोषोन ॥ अत्रापि पूर्वोक्तसंततजलाभि भिषेक उपवासश्चेतिस्मृत्यर्थसारे ॥ सर्वत्र तत्कालच्छर्दितेऽर्धप्रायश्चित्तम् ॥ गंधवर्णरसे र्लशुनादितुल्यस्य भक्षणे सांतपनम् ॥ यतिव्रतिब्रह्मचारिणां तप्तकृच्छ्रादि ॥ ६ ॥ चतुर्विंशतिमते ॥ लशुनं गृंजनं चैव तृणराजफलं तथा ॥ निर्लीचैवद्विजो भुक्त्वाचरेच्चांद्रायणव्रतम् ॥ ७ ॥ अकामतोऽभ्यासे कामतो वा सकृद्भक्षणे एतत् ॥ तृणराजस्तालः अलाबुंशुभ्रवृंताकं कुसुंभकमकंटकम् ॥ नीलिकाशणपुष्पं च जग्ध्वा दिनमभोजनम् ॥ ८ ॥ कंदमूलफलादीनि संभ्रांतानि न भक्षयेत् ॥ उपवासो भवेत्तत्र शातातपवचस्तथा ॥ ९ ॥ संभ्रांतानि भक्ष्याभक्ष्यत्वेन संदिग्धानि शणपुष्पंशाम्रलं च करनिर्मथितं दधि ॥ बर्हिर्वेदिपुरोडाशं जग्ध्वा नाद्यादहर्निशम् ॥ लशुनादिषु येतुल्यागंधवर्णरसादिभिः ॥ अभक्ष्यास्ते द्विजातीनां भुक्त्वा चांद्रायणं चरेत् ॥ ११ ॥

## निंदित अन्नभक्षण केलें असतां प्रायश्चित्त विचार. ॥ ३२ ॥

खाण्यास योग्य जें त्यास अन्न असें ह्मणावें, त्या अन्नास निंदितपणा, स्वभाव, काल, संपर्क, क्रिया, भाव, परिग्रह या कारणानें होतो त्यामध्यें लसुनादिपदार्थास स्वभावेंकरून दुष्टपणा आहे. अन्यग्रंथामध्यें स्वभावदुष्टासच जातिदुष्ट अशी संज्ञा सांगितली आहे. कालानें ह्मणजे चांगल्या पदार्थासही पर्युषितपणा झाला ह्मणजे निंदितत्व येतें. संपर्कानें ह्मणजे जें स्पर्शास अयोग्य असें कुत्र्यादि प्राणी त्यांचा स्पर्श झाला असतां निंदितपणा येतो. क्रियेनें, हातानें, घटण्या, फाशिवंती, मीठ इत्यादि वाढिलें असतां निंदितपणा येतो. भाव ह्मणजे दुसऱ्या वस्तूची भावना होणें. जसें उमाच्या रसाचेठायीं मद्याची भावना होणें. परिग्रह ह्मणजे स्वीकार. पतितादिकां पासून अन्न घेणें. अन्यग्रंथाचेठायीं वाणीनें निंदितत्व येतें असेंही सांगितलें आहे. जसें क्षुधेनें पीडित झालेला असा कोणता मनुष्य माझें अन्न खात नाहीं. ॥ १ ॥ प्रथम स्वभाव दुष्टाचा विचार ॥ लसुन, गाजर, छत्राक ( पावस पडला ह्मणजे छत्री सारिखें उत्पन्न होतें तें. ) विष्ठाभक्षण करणारा वराह गांवांतील कोंबडे, कांदा यांतील कोणताही पदार्थ अज्ञानानें एक वेळ भक्षण केलें असतां सांतपन प्रायश्चित्त सांगितलें आहे. अन्यग्रंथामध्यें हे पदार्थ खालें असतां चांद्रायण प्रायश्चित्त सांगितलें आहे. निरंतर हे पदार्थ खाण्याचा अभ्यास असेल तर मद्यपान केल्याप्रमाणें आहे. म्हणून पूर्वोक्त प्रायश्चित्त आचरण करून पुनः मौंजीबंधन करावें ॥२॥ मनूनें छत्राक, लसून, कांदा, गाजर हे खालें असतां मनुष्य पतित होतो.॥३॥ कोणी गाजर [illegible] अर्थ [illegible] असा जो [illegible] त्या [illegible] मारलेला जो मृग त्याचें मांस असें [illegible]. [illegible] ह्मणजे [illegible] असें [illegible]. मिताक्षरेंत लसुना सारिखा जो [illegible] त्यास गृंजन असें नांव आहे. असें सांगितलें आहे. गाजर त्यास गृंजन नाहीं [illegible] कारणें [illegible] गाजर [illegible]. त्यास भक्षण करावें

असें माधवानें सांगितलें आहे. चरकादिक जे वैद्यशास्त्राचे ग्रंथ त्यांनीं सांगितलेलें पलांडु ( कांदा ) इत्यादिकांचे भेद त्या भेदांचे ठिकाणीं तसेंच छत्रकचे भेदांविषयीं मनुष्य आणि गायी यांच्या मांसादि भक्षण केलें असतां अशाच प्रायश्चित्ताची योजना करावी.॥४॥ यापदार्थांचा मुखांत प्रवेश होतांच थुंकून टाकिलें असतां अथवा बलात्कारानें कोणी भक्षण करविलें असतां अथवा मौंज न झालेला अशा बालकानें भक्षण केलें असतां एक हजार आठ वेळां गायत्रीजप ह्मणून मस्तकाचे-ठायीं पाण्यानें अभिषेक करावा. आणि एक उपोषण केल्यानें शुद्धता येते.॥ ५॥ अन्यऔषधानें न बरे होणारे असे जे रोग त्यांच्या नाशाकरितां हें भक्षण केलें असतां दोष नाहीं. स्मृत्यर्थसारामध्यें असें सांगितलें आहे कीं, आरोग्यप्राप्तीनंतर गायत्रीमंत्रानें पूर्वोक्तरीतीनें अभिषेक करून उपोषण करावें. खाण्यास अयोग्य असा पदार्थ तोंडांत गेल्याबरोबर तत्काळ ओकून टाकिला असला, अर्धे प्रायश्चित्त सांगितलें आहे. गंध,वर्ण, रस इत्यादिकांनीं ल्हसुनादिकांसारिखा जो पदार्थ तो भक्षण केला असतां सांतपन प्रायश्चित्त घ्यावें. संन्याशी, व्रताचरण करणारा मनुष्य, ब्रह्मचारी यांनीं भक्षण केलें असतां तप्तकृच्छ्रप्रायश्चित्त आचरण करावें.॥६॥ चतुर्विंशतिमतांत असें सांगितलें आहे कीं, ल्हसुन, गाजर ताडवृक्षाचें फळ. नीळ यांतील कोणतांही पदार्थ. द्विज ( ब्राह्मण, क्षत्रिय, वैश्य ) यांनीं भक्षण केलें असतां चांद्रायणव्रत आचरण करावें. ॥७॥ अनिच्छेनें पुष्कळ वेळ भक्षण केलें असतां आणि इच्छेनें एकवेळही खाल्लें असतां हेंच प्रायश्चित्त सांगितलें आहे. काळामोपळा, पांढरें वांगें, ज्यास काटे नाहींत असा कुसुंबा, नीळ, तागाचीं फुलें हीं भक्षण केलीं असतां एकदिवस उपोषण करावें.॥८॥ खावें अथवा न खावें असा ज्याबद्दल संशय आहे अशीं कंद, मूळ, फळें भक्षण करूं नयेत, खाल्लें असतां एकदिवस उपोषण करावें. असें शातातपाचें वचन आहे. ॥९॥ तागाचीं फुलें, सांबरीचीं फुलें, हातानें घुसळलेलें दहीं. अविधीनें केलेल्या यज्ञ त्यांतील पुरोडाश भक्षण करूं नये खाल्लें असतां एकदिवस उपोषण करावें. ॥१०॥ गंध, वर्ण, रस इत्यादिकानें जें पदार्थ ल्हसुनादिकांसारखे आहेत ते ब्राह्मण, क्षत्रिय, वैश्य, यांनीं भक्षण करूं नयेत. भक्षण केलें असतां चांद्रायण प्रायश्चित्त करावें. ॥११॥

बृहद्यमः ॥ खट्वावार्ताकुकुंभीक व्रश्चनप्रभवास्तथा ॥ भूस्तृणं शिग्रुकं चैव खुदवंडं कवकानिच ॥ १२ ॥ एतेषां भक्षणं कृत्वा प्राजापत्यं चरेद्द्विजः ॥ खट्वापक्षिविशेषः शाकविशेषो वा॥ वार्ताकुं श्वेतं श्वेतवृंताकमितिदेवलस्मरणात् ॥१३॥ व्रश्चनप्रभवालोहिताः ॥ लोहितान्वृक्षनिर्यासानितिस्मरणात् ॥ तथाच शिग्रुइति केचन कवकं सर्षपशाकं तद्विशेषः कुरवुंडम् ॥ यमः ॥ तंडुलीयक कुंभीकव्रश्चनप्रभवांस्तथा ॥ नलिकां नारिकेरीं च श्लेष्मातकफलानिच ॥ एतेषां भक्षणं कृत्वा प्राजापत्यं चरेद्द्विजः ॥ १४ ॥एतदपि पूर्वोक्तविषये नालिका नालिकेरीच शाके निलीभक्षणेच आपस्तंभः॥ भक्षयेद्यदि नीलींतु प्रमादाद्ब्राह्मणः क्वचित् ॥ चांद्रायणेन शुद्धिः स्यादापस्तंबोऽब्रवीन्मुनिः ॥ १५ ॥ कामतोभ्यासे तु द्विगुणादिकं कल्प्यम् ॥ सामान्यतः अभक्ष्यभक्षणे

प्रायश्चित्तमाह विष्णुः॥ अभोज्यानामपेयानामभक्ष्याणां च भक्षणे॥ कृच्छ्रपादं विशुध्यर्थं चरेयुः क्षिप्रशोधनम् ॥ १६ ॥ इदंत्वज्ञानात्सकृद्भक्षणेज्ञानतस्तु संवर्तः ॥ अभोज्यभोजनं कृत्वा ब्रह्मक्षत्रविशां गणः ॥ गोमूत्रयावकाहारः सप्तरात्रेण शुध्यति ॥ १७ ॥ अभ्यासेतु बृहस्पतिः ॥ अलेह्यानामपेयानामभक्ष्याणां च भक्षणे ॥ रेतोमूत्रपुरीषाणां शुद्ध्यै चांद्रायणंचरेदिति ॥१८॥ शिष्टविगीतमात्रे तमाखूभंगादिद्रव्यविशेषे तु अपरार्के भरद्वाजः ॥ शिष्टानाश्नंति यत्किंचिदन्नमूलफलादिकं ॥ न तद्भोज्यं द्विजातीनां भुक्त्वा चोपवसेदहः ॥ १९ ॥

## बृहद्यमाचें वचन.

खट्वनांवाचा पक्षी, पांढरी वांगीं, कायफळ, वृक्षास छेद केल्यानें उत्पन्न होणारे पदार्थ ह्मणजे तांवडा डिंक वगैरे सेवगा खुखंड नांवाची भाजी कवक ह्मणजे मोहऱ्याची भाजी हें भक्षण केलें असतां प्राजापत्य प्रायश्चित्त करावें. ॥ १२ ॥ १३ ॥

॥ यमस्मृतींतील वचन ॥ तांदुळजा, कुंभीक, तोंडल्या पासून उत्पन्न होणारे तांवडा डिंक नालीका, नालीकेरी, या नावाच्या भाज्या, भोकरीचीं फळें हें ब्राह्मणानीं खाल्लें असतां प्राजापत्य प्रायश्चित्त घ्यावें. ॥ १४ ॥ जो ब्राह्मण प्रमादानें निळीचें भक्षण करितो. त्यास चांद्रायण केल्यानें शुद्धता येते असें आपस्तंभ ऋषीनें सांगितलें आहे.॥१५॥आतां येथें जें प्रायश्चित्त सांगितलें असेल तो दोष ज्ञानपूर्वक केलें असतां अथवा निरंतर करण्याचा अभ्यास असेल तर द्विगुणादिक प्रायश्चित्ताची योजना करावी. सामान्येंकरून न खाण्यास योग्य असे पदार्थ खाल्ले असतां प्रायश्चित्ताचा विचार.

विष्णुस्मृतीचें वचन—खाण्यास अयोग्य असे पदार्थ भक्षण केले असतां, पिण्यास अयोग्य असे पदार्थ प्राशन केले असतां शुद्धता होणेकरितां कृच्छ्रपाद प्रायश्चित्त आचरण करावें.॥१६॥ हें अज्ञानानें एक वेळा भक्षण केलें असतांचें प्रायश्चित्त आहे. ज्ञानपूर्वक भक्षण केलें असतां " संवर्तांचें वचन. " ब्राह्मण, क्षत्रिय, वैश्य यानीं न खाण्यास योग्य असे पदार्थ भक्षण केले असतां गोमूत्रांत शिजविलेले सातु सात दिवस भक्षण करावे ह्मणजे शुद्धता येते. ॥ १७॥ अभक्ष्यभक्षणाचा अभ्यास असतां " बृहस्पतीचें वचन "—चाटण्यास अयोग्य असे पदार्थ चाटिले असतां पिण्यास अयोग्य असे पदार्थ प्राशन केले असतां, भक्षणास अयोग्य असे पदार्थ भक्षण केले असतां, रेत, मूत्र, विष्टा हे खाल्ले असतां शुद्धतेकरितां चांद्रायणप्रायश्चित्त करावें.॥१८॥ शिष्टपुरुषानें निंदित असे तंबाखू, भांग इत्यादि पदार्थ भक्षण केलें असतां. अपरार्कांतील भरद्वाजाचें वचन. शिष्ट मनुष्य जें अन्न, मूळ, फळें इत्यादिक भक्षण करीत नाहींत ते भक्षण करूं नयेत, भक्षण केले असतां एकदिवस उपोषण करावें. ॥१९ ॥

## अथ क्षीरपाने प्रायश्चित्तविचारः ॥

. शंखः ॥ माहिषं गव्यमाजं च भक्ष्यं क्षीरेषु निर्दिशेत् ॥भुक्त्वा परस्य च क्षीरं मासं कुर्यात् व्रतं बुधः ॥ १ ॥ अनिर्दशाहं गोक्षीरं माहिषं वाजमेव च ॥ गोश्च क्षीरं विवत्सायाः संधिन्याश्च तथा पयः ॥ २ ॥ संधिन्यमेध्यभक्षायाभुक्त्वा पक्षं व्रतं चरेत् ॥ क्षीराणि यान्यभक्ष्याणि तद्विकाराशने बुधः ॥ सप्तरात्रव्रतं कुर्यात्यतेस्तत्परिकीर्तितमिति ॥ ३ ॥ अनभ्यासेतुसंवर्तः ॥ अवत्सैकशफस्त्रीणां क्षीरं प्राश्यद्विजोत्तमः ॥ अनिर्दशायागोश्चैव त्रिरात्रं पावकं पिवेदिति ॥ ४ ॥ अकामतोऽभ्यासेतु शेषेपूपवसेदहरितिमनूक्तउपवासः॥ उष्ट्र्यादिक्षीरे तु शातातपः॥ उष्ट्रीक्षीरपाने मानुषीक्षीरपाने पुनरुपनयनं तप्तकृच्छ्रं च ॥ ५ ॥ अन्यत्रच ॥ स्त्रियः क्षीरं द्विजः पीत्वा कथंचित्काममोहितः ॥ पुनः संस्कृत्य चात्मानं प्राजापत्येन शुध्यति ॥ ६ ॥ कपिलाक्षीरपानेविशेषस्तु भविष्यपुराणे ॥ कापिलं यः पिवेच्छूद्रो नरके सविपच्यते ॥ तत्र शूद्रस्य कपिलाक्षीरपाने च्यवनेन ब्रह्महेति ताक्ष्र्याऽतिदेशः कृतस्तेन तस्य तत्र नवाब्दं इतरयोश्चांद्रायणमनादिष्टत्वात् ॥ ७ ॥ ब्रह्मपुराणे ॥ घृतात्फेनं घृतान्मांडं पीयूषमथवार्द्रगोः ॥ दधिक्षीरमथाज्यं च दुष्टायाश्चैवगोः पयः॥अनिर्दशायाश्च तथासंधिन्याश्च तथैवच ॥ सगुडं मरिचैर्युक्तं च तथापर्युषितं दधि ॥ जीर्णतक्रमपेयं तु नष्टस्वादं च फेनवत् ॥ ८ ॥ प्रमादाद्भक्षितेरेभि र्वने पक्षव्रतं चरेदिति ॥ आर्द्रगोः सद्यप्रसूतायाः दुष्टाया व्याध्यादिना ॥ क्वचिच्छुद्धद्रव्याणामपि मिथः संयोगाद्दुष्टत्वं ॥ यथा लवणपयसोः संयोगे मद्यत्वं ॥ तद्भक्षणे चांद्रायणं पुनरुपनयनंचेत्यादि ॥ गुडेन सह दधिभक्षणे चांद्रायणं पुनरुपनयनंचेत्यादि ॥ ताम्रपात्रस्थगव्यादिभक्षणे हेमाद्रौ ॥ ताम्रपात्रस्थितं गव्यं गोमूत्रं तक्रमेवच ॥ दधि वा माक्षिकं वापि नालिकेलोदकं तथा ॥ ९ ॥ नालिकेलोदकं कांस्यपात्रस्थं गव्यमेवच ॥ लवणाक्तं पयश्चैव मद्यप्राणं तथैवच ॥१०॥ अज्ञानतोज्ञानतोवा सुरापानसमं विदुः॥तत्र चांद्रायणंचोक्तं ज्ञानतस्तद्द्वयं भवेदिति॥११॥

## आतां दूध प्राशन केलें असतां प्रायश्चित्ताचा विचार.

शंखस्मृतींतील वचन.–म्हशीचें गायीचें शेळीचें, हें दूध प्राशन करण्यास सांगितलें आहे. याहून अन्याचें दूध प्राशन केलें असता एक महिनापर्यंत व्रत आचरण करण्यास सांगितलें आहे. गाय, म्हैस, शेळी यांचें दूध व्याल्यापासून दहा दिवस पर्यंत खाऊं नये. तें खाल्लें असतां, तसेंच जिला वासरू नाहीं अशा गाईचें दूध. ॥ २ ॥ तसेंच गर्भधारणार्थ बैलाची इच्छा करणाऱ्या गाईचें दूध, अपवित्रपदार्थ खाणारे गाईचें दूध भक्षण केलें असतां पंधरा दिवस पर्यंत व्रताचरण करावें. जीं दुग्धें भक्षणास अयोग्य सांगितलीं त्या दुधाचें दध्यादिक विकार. भक्षण केलें असतां सप्तरात्र पर्यंत व्रताचरण करावें. ॥ ३ ॥ यतीनें ही भक्षण केलें

असतां असेंच व्रताचरण करावें. एकवेळा भक्षण केलें असतां " संवर्ताचें वचन " जीस वासरूं नाहीं अशा गाई म्हशी इत्यादिकांचें दूध, एकखुराच्या जनावराचें दूध, दहा दिवसाचे आंतील गाईचें दूध प्राशन केलें असतां त्रिरात्र यावक भक्षण करावें. ॥ ४ ॥ न समजून एक वेळा हें दूध प्राशन केलें असतां एक दिवस उपोषण करावें, असें मनुचें वचन आहे. शातातपाचें वचन— उंटिणीचें दूध प्राशन केलें असतां तप्तकृच्छ्र प्रायश्चित्त करून पुनरुपनयन करावें. ॥ ५ ॥ दुसरीकडे असें सांगितलें आहे कीं, ब्राह्मणांनीं कामामोहित होऊन स्त्रियांचें दूध प्राशन केलें असतां प्राजापत्यव्रत आचरण करून पुनः संस्कार केल्यानें शुद्धता होते. ॥ ६ ॥ भविष्यपुराणांत असें सांगितलें आहे कीं, काळ्या रंगाच्या गाईचें ( कपिलागाईचें ) दूध शूद्रानें प्राशन केलें असतां तो नरकाप्रत जातो. शूद्रानें कपिलागाईचें दूध प्राशन केलें असतां त्यास ब्रह्महत्याचें पातक आहे असें च्यवनानें सांगितलें आहे यास्तव त्यास नवाब्द प्रायश्चित्त आहे. ॥ ७ ॥ ब्रह्मपुराणांत असें सांगितलें आहे कीं, तुपाचा फेस, तुपाची निवळी व्यालेल्या गायींचे दहादिवसांच्या आंतील दूध, रोगानें व्याप्त झालेल्या गाईचें दूध दही, तूप, तसेंच गुळानें युक्त दही, तसेंच मिर्च्यानें युक्त दही, पर्युषित ( शिळें ) दही, पुष्कळ दिवसांचें ताक, ज्याचा स्वाद नाहींसा झाला आहे व फेस वर आला आहे असें ताक भक्षण करूं नये. ॥ ८ ॥ खाल्लें असतां अरण्यांत पंधरा दिवस राहून व्रताचरण करावें. कचित् स्थळीं शुद्ध द्रव्यासही संयोगानें दुष्टत्व येतें. जसें दुधांत मिठाचा संयोग झाला असतां मद्य होतें तें भक्षण केलें असतां चांद्रायण प्रायश्चित्त करून पुनरुपनयन करावें. गुळ आणि दही याच्या भक्षणाच्या ठायीं हेंच प्रायश्चित्त सांगितलें आहे. हेमाद्रींतील वचन. तांब्याच्या भांड्यांत गाईचें दूध, दहीं, ताक, गोमूत्र, मध, नारळाचें पाणि. ॥९॥ तसेंच कांशाचें भांड्यांत नरळाचें पाणि गाईचें दूध हे भक्षण केलें असतां, किंवा मद्याचा वास घेतला असतां, अज्ञानानें आचरण केलें असतां चांद्रायण प्रायश्चित्त सांगितलें आहे. ज्ञानपूर्वक केलें असता दोन चांद्रायणप्रायश्चित्तें आचरण करावीत. ॥ १० ॥ ११ ॥

## ॥ अथ मांसभक्षणप्रायश्चित्तनिर्णयः ॥

॥ मनुः ॥ ना कृत्वा प्राणिनां हिंसां मांसमुत्पाद्यते कचित् ॥ न च प्राणिवधः स्वर्ग्यस्तस्मान्मांसं न भक्षयेत् ॥ १ ॥ जग्ध्वा मांसमभक्ष्यं तु सप्तरात्रं यवान् पिबेत् ॥ योगीश्वरः॥ वसेत्सनरके घोरे दिनानि पशुरोमभिः॥ संमितानि दुराचारोयोहंत्यविधिना पशून् ॥२॥ मदनपारिजाते वराहैकशफानां च काककुक्कुटयोस्तथा ॥ क्रव्यादानां चैव सर्वेषामभक्ष्याणे च कीर्तिताः॥३॥ मांसमूत्रपुरीषाणि प्राश्य गोमूत्रमेवच ॥ श्वगोमायुकपीनां च तप्तकृच्छ्रं विधीयते ॥ ४ ॥ उपोष्य वा द्वादशाहं कूष्मांडैर्जुहुयाद्घृतम् ॥ जग्ध्वा मांसं नराणां च विड्वराहं खरं तथा ॥ ५ ॥ गवाश्वकुंजरोष्ट्राणां सर्वं पंचनखं तथा ॥ क्रव्यादं कुक्कुटं ग्राम्यं कुर्यात्संवत्सरं व्रतम् ॥ ६ ॥ पाराशरः ॥ अगम्यागमने

चैवं मद्यगोमांसभक्षणे ॥ शुद्ध्यै चांद्रायणं कुर्यान्नदीं गत्वा समुद्रगां ॥ ७ ॥ अनडुत्सहितां गां च दद्याद्विप्राय दक्षिणाम् ॥

## आतां मांस भक्षण केलें असतां प्रायश्चित्ताचा विचार.

मनुचें वचन. प्राण्यांची हिंसा केल्यावांचून मांस उत्पन्न होत नाहीं. प्राण्यांचा तर वध स्वर्गास प्रतिबंधक आहे. ह्मणून मांस भक्षण करूं नये. ॥ १ ॥ मांस भक्षण केलें असता सप्तरात्र पर्यंत गोमूत्रांत शिजविलेले सातु प्राशन करावें. याज्ञवल्क्यानें असें सांगितलें आहे कीं, जो मनुष्य अविधीनें पशूस मारितो तो पशूच्या अंगावरील जितके रोम असतील तितके दिवस पर्यंत नरकामध्यें वास करितो. ॥ २ ॥ मदनपारिजातांतील स्मृतिवचन. वराह, एकखुराचे प्राणी, कावळा, कोंबडा हे प्राणी भक्षण करण्यास अयोग्य असें सांगितलें आहे. यांचें मांस, मूत्र आणि पुरीष हें प्राशन केलें असता, तसेंच कुत्रा, कोल्हा, वानर यांचें मांस भक्षण केलें असता तप्तकृच्छ्र प्रायश्चित्त सांगितलें आहे. तसेंच बारा दिवस उपोषण करून कूष्मांड सहित घृतानें हवन करावें. इच्छापूर्वक निरंतर खाण्याचा अभ्यास असेल तर अन्यस्मृतींतील वचन. मनुष्याचें तसेंच विष्ठा खाणारा वराह, गाढव, गाय, घोडा, हत्ती, उंट पांचनखाचे प्राणी, मांस खाणारे प्राणी, गांवांतील कोंबडा यांचें मांस भक्षण केलें असता संवत्सर पर्यंत व्रताचरण करावें. गोमांस भक्षण केलें असतां पाराशराचें वचन. गमन करण्यास अयोग्य अशा स्त्रीशीं गमन केलें असतां, मद्य अथवा गोमांस भक्षण केलें असता समुद्रास मिळणाऱ्या नदीस जाऊन तेथें चांद्रायण व्रताचरण करावें. आणि ब्राह्मणास भोजन घालून दक्षिणासहित एक गोप्रदान आणि वृषभदान करावें.

## ॥ अथ क्रियादुष्टभक्षणे प्रायश्चित्तनिर्णयः ॥

तत्र उच्छिष्टभक्षणे मनुः ॥ बिडालकाकाखूच्छिष्टं जग्ध्वाथ नकुलस्य च ॥ केशकीटावपन्नं च पिबेत् ब्राह्मीं सुवर्चलां ॥ १ ॥ पानं त्वेकस्मिन्नेव दिने ॥ एतच्चाकामतः सकृद्भक्षणे कामतोविष्णुः ॥ पक्षिश्वापदजग्धस्य रसस्यान्नस्य भूयसः ॥ संस्काररहितस्यापि भोजने कृच्छ्रपादकः ॥ २ ॥ अभ्यासे शंखोक्तं ॥ शुनामुच्छिष्टकं भुक्त्वा मांसमेकं व्रती भवेत् ॥ काकोच्छिष्टं गवाघ्रातं भुक्त्वा पक्षं व्रती भवेदिति ॥ ३ ॥ बृहद्विष्णुः ब्राह्मणः शूद्रोच्छिष्टाशने सप्तरात्रं पंचगव्यं पिबेद्वैश्योच्छिष्टाशने पंचरात्रं राजन्योच्छिष्टाशने त्रिरात्रं ब्राह्मणोच्छिष्टाशने त्वेकाहं ॥ एतच्च कामतः सकृद्भक्षणे पंचगव्यप्राशनमाहोतरनिवृत्त्यर्थतपसः क्लेशरूपत्वात् ॥ ४ ॥ अत्रैवाभ्यासे यमोक्तं भुक्त्वासह ब्राह्मणेन मजापत्येन शुद्ध्यति ॥ भूभुजा सह भुक्त्वान्नं तप्तकृच्छ्रेण शुद्ध्यति ॥ ५ ॥ वैश्येन सह भुक्त्वान्नमतिकृच्छ्रेण शुद्ध्यति ॥ शूद्रेण सह भुक्त्वान्नं चांद्रायण समाचरेत् ॥ ६ ॥ सहभोजनमेकपात्रभोजनं ॥ अकामत.

शंखोक्तं ब्राह्मणोच्छिष्टाशने महाव्याहृतिभिरभिमंत्र्यापः पिबेत् ॥ क्षत्रियोच्छिष्टाशने ब्राम्हीरसविपक्केन त्र्यहं क्षीरेण वर्तयेत् ॥ वैश्योच्छिष्टभोजने त्रिरुपोषितो ब्राह्मीं सुवर्चलां पिबेत् ॥ ७ ॥ शूद्रोच्छिष्टाशने षड्रात्रमभोजनम् ॥ अत्राभ्यासे द्वैगुण्यादिकं कल्प्यम् ॥ क्वचिदुच्छिष्टभोजनस्याप्यनुज्ञा दर्शितापस्तंबेन ॥ पितुर्ज्येष्ठस्य च भ्रातुर्गुरोरुच्छिष्टं भोज्यम् ॥ ८ ॥ शूद्रोदकपाने शातातपः ॥ यदि विप्रःप्रमादेन शूद्रतोयं पिबेत्स्वयम् ॥ प्रायश्चित्तं कथं तत्र येन शुद्धिमवाप्नुयात् ॥ उपोष्य बिल्वपत्रानां पलाशस्य कुशस्य च ॥ एतेषामुदकं पीत्वा तेन शुद्धिमवाप्नुयात् ॥ ९ ॥ अपवादमाह शंखः घृतदधिपयस्तक्राणामाकरभांडस्थितानामदोषइति ॥ शातातपः ॥ घृतं तैलं दधि क्षीरं तथैवेक्षुरसोगुडः ॥ शूद्रभांडस्थितं तक्रं तथा मधु न दुष्यति॥१०॥

## आतां क्रियेनें जे दुष्ट पदार्थ ते भक्षण केले असतां प्रायश्चित्ताचा निर्णय.

मनूचें वचन. मांजर, कावळा, उंदीर, मुंगस यांनीं उच्छिष्ट केलेला पदार्थ तसेंच केश, किडे यानीं युक्त झालेला पदार्थ भक्षण केलें असतां एकदिवस पर्यंत ब्राह्मीरसाचें पान करावें. ॥ १ ॥ हें प्रायश्चित्त एक वेळा न समजून मांजरादिकाचें उच्छिष्ट भक्षण केलें असतां सांगितलें आहे. इच्छेनें भक्षण केले असतां विष्णुस्मृतीचें वचन. पक्षी, जनावरें यानीं भक्षण केलेला रस अथवा अन्न तसेंच संस्कार रहित अन्न भक्षण केलें असतांना कृच्छ्रपाद प्रायश्चित्त आचरण करावें. ॥ २ ॥ शंखाचें वचन. कुत्र्याचें उच्छिष्ट भक्षण केलें असतां महिनाभर पर्यंत व्रतयुक्त रहावें. कावळ्यानें अथवा गाईनें हुंगलेला पदार्थ भक्षण केले असतां एकपक्ष पर्यंत व्रतयुक्त रहावें. ॥ ३ ॥ वृद्धविष्णूचें वचन. ब्राह्मणानीं शूद्रोच्छिष्ट भक्षण केलें असतां सप्तदिवसपर्यंत पंचगव्य प्राशन करून रहावें. वैश्योच्छिष्ट भक्षण केलें असतां पांच दिवस पंचगव्य प्राशन करावें. क्षत्रियोच्छिष्ट भक्षण केलें असतां त्रिरात्र पंचगव्य प्राशन करावें. ब्राह्मणाचें उच्छिष्ट भक्षण केलें असतां एकरात्र पंचगव्य प्राशन करावें. पंचगव्यावांचून इतर आहार करूं नये. ॥ ४ ॥ उच्छिष्ट खाण्याचा निरंतर अभ्यास असेल तर यमस्मृतीचें वचन. ब्राह्मणासहवर्तमान भोजन केलें असतां प्राजापत्य प्रायश्चित्तानें शुद्धता होते. क्षत्रियासहवर्तमान भोजन केलें असतां तप्तकृच्छ्र प्रायश्चित्तानें शुद्धि होते. ॥ ५ ॥ आणि वैश्यासहवर्तमान भोजन केलें असतां अतिकृच्छ्र प्रायश्चित्तानें शुद्धता होते. शूद्रासहवर्तमान भोजन केलें असतां चांद्रायण प्रायश्चित्तानें शुद्धता होते. ॥ ६ ॥ येथें सहभोजन याचा अर्थ एक पात्रांत भोजन करणें असा आहे. शंखाचें वचन. अजाणतेनें ब्राह्मणाचें उच्छिष्ट भक्षण केलें असतां महाव्याहृतीनें अभिमंत्रण केलेलें उदक प्राशन करावें. क्षत्रियाचें उच्छिष्ट भक्षण केलें असतां ब्राह्मीरसानें शिजविलेलें दूध तीन दिवस प्राशन करावें. वैश्योच्छिष्ट प्राशन केलें असतां त्रिरात्र पर्यंत उपोषण करून ब्राह्मीरस

प्राशन करावा. ॥ ७ ॥ शूद्रोच्छिष्ट भक्षण केले असतां सहा दिवस पर्यंत उपोषण करावें. निरंतर अभ्यास असता द्विगुणादिक प्रायश्चित्ताची योजना करावी. क्वचित् स्थळीं उच्छिष्ट भक्षण केलें असता दोष नाहीं. असें आपस्तंबानें सांगितलें आहे. तें असें पिता, ज्येष्ठ भ्राता, गुरु याचे उच्छिष्ट भक्षण केलें असता निषेध नाहीं. ॥ ८ ॥ शूद्राचें उदक प्राशन केलें असता शातातपाचें वचन. शूद्राचें पाणी ब्राह्मणानें प्रमादेंकरून प्राशन केलें असता प्रायश्चित्ताचा विचार. उपोषण करून वेळ, कमळ, पळस, दर्भ याचे पाणी प्राशन करावें ह्मणजे शुद्धता होते. ॥ ९ ॥ शंखाचें वचन. तूप, दूध, दवि, ताक हे कोरेभांडें (नवें गाडगें) यांत असताना घ्यावें. शातातपाचें वचन. तूप, तेल, दही, दूध, उसाचा रस, गूळ, ताक, मध हें शूद्राच्या भांड्यातील घेतलें असता दोष नाहीं. ॥ १० ॥

## ॥ अथ चांडालाद्यन्नभोजने प्रायश्चित्तम् ॥

तत्र सकृच्चांडालाद्यन्नभक्षणे चांद्रम् ॥ एकप्रयत्नोपक्रमाणां ग्रासानामेकस्मिन् प्रयोगे भोजनं सकृद्भोजनम् ॥ एवं पुनर्भोजनेऽभ्यासः ॥ वारत्रयेऽत्यंताभ्यासः एवं सर्वत्र बोध्य ॥ १ ॥ भवदेवस्तु अज्ञानतःसकृद्भोजने तप्तकृच्छ्रंअभ्यासेचांद्रायणंज्ञानतोद्वैगुण्यमित्याह शुष्कान्ने ॥ बलात् सकृत्शुष्कतदन्नभोजने उपवासत्रयम् ॥ बलात्सिद्धान्नभोजने पराकः ॥ २ ॥ चांडालादिपक्वान्नाशने सर्वत्र च द्वादशवार्षिकं प्रायश्चित्तम् ॥ ३ ॥ अंगिराः ॥चांडालपतितादीनामुच्छिष्टान्नस्य भक्षणे ॥ चांद्रायणं चरेद्विप्रः क्षत्रः सांतपनं चरेत् ॥ ४ ॥ षड्रात्रं च त्रिरात्रं च वर्णयोरनुपूर्वशः ॥ यवनादेः अन्नभोजनेप्येवं ॥ अत्रप्रायश्चित्तेन पापनाशेपि वचनान्न व्यवहार्यता ॥ द्विजस्य ज्ञानात् स्वेच्छया चांडालयवनादीनां दासत्वांगीकारे तु प्राजापत्यद्वयम् ॥ पाराशरः ॥ आपत्काले तु विप्रेण भुक्तं शूद्रगृहे यदि ॥ मनस्तापेन शुद्ध्येत द्रुपदानां शतं जपेदिति ॥५॥ षट्त्रिंशन्मते ॥ दीपोच्छिष्टं तु यत्तैलं रात्रौ रथ्याहृतं च यत् ॥ अभ्यंगाच्चैव यच्छिष्टं भुक्त्वा नक्तेन शुद्ध्यतीति ॥ ६ ॥ वृद्धशातातपः ॥ पीतोच्छिष्टं तु पानीयं पीत्वा तु ब्राह्मणः क्वचित् ॥ त्रिरात्रं तु व्रतं कुर्याद्वामहस्तेन वा पुनरिति ॥ ७ ॥ एतच्च कामतः अकामतस्तदर्धं ॥ शंखः अमेध्यपतितचांडालपुक्कसरजस्वलावधूतकुणिकुष्ठिकुनखिसंस्पृष्टानि भुक्त्वा कृच्छ्रं चरेदिति ॥ ८ ॥ कुणिर्हस्तविकलः ॥ एतच्च कामतः॥ अकामतस्तदर्धं ॥ रजकाद्यस्पृश्यस्पर्शे विष्णूक्तम् ॥ भुक्त्वास्पृश्यैस्तथाशौचिकेशकीटैश्च दूषितम् ॥ कुशोदुंबरबिल्वाद्यैः पनसांबुजपत्रकैः॥ शंखपुष्पीसुवर्चादिकाथं पीत्वा विशुद्ध्यतीति ॥ ९ ॥ १० ॥ ब्राह्मणस्योच्छिष्टभोजनेक्रतुराह प्रायश्चित्तं कथं तत्र येन शुद्धिमवाप्नुयात् ॥ अहोरात्रोपितोभूत्वा पंचगव्येन शुद्ध्यतीति ॥ एतदकामतः ॥ उच्छिष्टं चात्रैकपंक्त्युपविष्टविप्रादीनां भोजनमध्ये एकेनापि पात्रत्यागे शेष-

मन्नं ॥ ११ ॥ शूद्रादिविषये तद्भोजनोत्तर पाकपात्रेवशिष्टमप्युच्छिष्टं ॥ एवंविध- शूद्रोच्छिष्टभोजने त्रिरात्रोपवासोघमर्षणजपः ॥ कामतस्त्वेतद्विषये पंचरात्र सप्तरात्रं उपवासः चांद्रवाभ्यासादितारतम्येन योज्यम् ॥ १२ ॥ पराशरः ॥ एकपंक्त्युप विष्टानां विप्राणां सह भोजने ॥ यद्यकोपि त्यजेत्पात्र शेषमन्नं न भोजयेत् ॥ १३ ॥ मोहाद्भुजीत यस्तत्र पक्त्यामुच्छिष्टभोजनः ॥ प्रायश्चित्त चरेद्विप्रः कृच्छ्र सांतपन चरेत् ॥ १४ ॥ त्यजेत्पात्र अमृतापिधानमसीत्यनेनाप्रीकरणोदकपान कृत्वा त्यजे दित्यर्थः ॥

## चांडालादिकांचें अन्न भक्षण केलें असतां प्रायश्चित्ताचा विचार.

एकवेळा चांडाळादिकाचें अन्न भक्षण केलें असता चांद्रायण प्रायश्चित्त. एकवेळा याचा अर्थ एकाच ठिकाणीं एकवेळा एक प्रयत्नानें उपक्रमित केलेले जे ग्रास त्याचा एकप्रयोगानें भोजन करणें याचें नाव एकवेळा भोजन करणें. याप्रमाणें द्वितीय प्रसर्गी भोजन केलें असता अभ्यास असें ह्मणावें. असें त्रिवार झालें असता अत्यताभ्यास ह्मणावें. ॥ १ ॥ भवदेवतर अज्ञानानें एकवेळा भोजन केलें असता तप्तकृच्छ्र प्रायश्चित्त. अभ्यास असता चांद्रायण, ज्ञानपूर्वक असता द्विगुणीत प्रायश्चित्त. हें सर्व शुष्कान्न, आमान्न हें भक्षण केलें असतां प्राय- श्चित्त जाणावें. बलात्कारानें शुष्क असें चांडाळाचें अन्न भक्षण केलें असता तीन उपोषणें करावीत. बलात्कारानें सिद्धान्न भक्षण केलें असता पराक प्रायश्चित्त करावें. ॥ २ ॥ चांडाळादिकाचें पक्कान्न भक्षण केलें असता पुनः मौंजीबंधन करावें. इच्छेनें एकवेळा भोजन केलें असता पतित होतो. अज्ञानानें द्विगुण भोजन केलें असता द्वादश वार्षिक प्रायश्चित्त करावें. ॥ ३ ॥ अंगिराचें वचन. ब्राह्मणानें चांडाळादिकांचें उच्छिष्टान्न भक्षण केलें असता चांद्रायण प्रायश्चित्त. क्षत्रियास सांतपन. वैश्यास षड्रात्र. शूद्रास त्रिरात्र याप्रमाणेंच यवनादिकांचें- अन्न भक्षण करणारास प्रायश्चित्त जाणावें. प्रायश्चित्तानें पापनाश झाला असताही त्या अन्नभक्षण करणारे मनुष्याबरोबर व्यवहार करूं नये. कारण तो व्यवहारास अयोग्य आहे असें सांगितलें आहे. ब्राह्मणानें ज्ञान पूर्वक इच्छेनें चांडाळ यवन इत्यादिकांचें दास्यत्व स्वीकारलें असतां दोन प्राजापत्य प्रायश्चित्त आचरण करावेत. ॥ ४ ॥ पराशराचें वचन. आपत्काळीं ब्राह्मणानें शूद्राचे घरीं भोजन केलें असतां मनस्ताप आणि द्रुपदाना० या ऋचेचा शंभरवेळां जप केला असतां शुद्धता होते. ॥ ५ ॥ षट्त्रिंशन्मताताील वचन दीपोच्छिष्टतैल, तसेंच रात्रीं गल्लींतून आणिलेलें तेल, अभ्यंग लावून राहिलेलें तेल, भक्षण केलें असता नक्त भोजनानें शुद्धता होते ॥६॥ वृद्धशा- तातराचें वचन॥ पिऊन अवशेष राहिलेलें पाणी ब्राह्मणानें प्राशन केलें असता, तसेंच डाव्या हातानें पाणी प्यालें असतां त्रिरात्र उपोषण करावें ॥७॥ हें इच्छेनें केलें असता पूर्ण अनिच्छेनें अर्धप्रायश्चित्त सांगितलें आहे. शाख स्मृतीचें वचन--अपवित्र, पतीत, चांडाळ, पुल्कस ( चांडाळाचा भेद ) विटाळशी, नग्न, हस्तविकळ, कुष्ठी, ज्याचे नखें वाईट आहेत तो या मनुष्यांतून कोणीही स्पर्श केलेलीं

वस्तु भक्षण केली असतां कृच्छ्र प्रायश्चित्ताचरण करावें. अनेच्छेनें अर्ध प्रायश्चित्त सांगितलें आहे. विष्णुस्मृतींतील वचन-स्पर्श करण्यास अयोग्य अशा मनुष्यानीं दूषित केलेलें, तसेंच केश, किडे इत्यादिकानीं दूषित केलेला पदार्थ भक्षण केला असतां दर्भ, उंबर, बेल, पळस, कमलपत्र यांनीयुक्त जी शखपुष्पी तिचा काढा प्राशन केल्यानें शुद्धता होते. ॥ ९ ॥ १० ॥ ऋतुचें वचन—जो ब्राह्मण उच्छिष्ट पंक्तीचे ठायीं भोजन करितो तो अहोरात्र उपोषण करून पंचगव्य प्राशन केल्यानें शुद्ध होतो. एका पंक्तीमध्यें भोजनास ब्राह्मण बसले असतां सर्व ब्राह्मण न उठतां, ते जेवित असताही मध्यें एकच जर उठेल तर बाकिचें राहिलेलें अन्न उच्छिष्ट होतें. ॥ ११ ॥ शूद्रादिकांविषयीं असें आहे कीं, शूद्राचें भोजन झाल्यानंतर जें पाकपात्रामध्यें अवशिष्ट अन्न राहील तें उच्छिष्टान्न असें जाणावें. हें शूद्राचें उच्छिष्टान्न भक्षण केलें असता त्रिरात्र उपोषण आणि अघमर्षण जप करावा. इच्छेनें भक्षण केलें असता पंचरात्र अथवा सप्तरात्र उपोषण करावें. निरंतर असें भोजन करण्याचा अभ्यास असेल तर चांद्रायण प्रायश्चित्त करावें. ॥ १२ ॥ पराशराचें वचन एकपंक्तीचे ठायीं ब्राह्मण भोजन करित असता जर एकच मनुष्य पात्र टाकून जाईल तर अवशेष राहिलेलें अन्न भक्षण करूं नये. ॥ १३ ॥ केलें असतां उच्छिष्ट भोजन केल्यासारिखें होतें अशा उच्छिष्ट भोजन करणारे ब्राह्मणानीं कृच्छ्र सांतपन प्रायश्चित्त आचरण करावें. ॥ १४ ॥ येथें टाकणें याचा अर्थ असा आहे कीं, " अमृतापिधानमसि " या मंत्रानें अग्नौकरणोदक प्राशन करून टाकणें.

## अथ शूद्रान्नप्रायश्चित्तनिर्णयः ॥

तत्र शूद्रान्नभक्षणे मिताक्षरायां भविष्यपुराणं॥शूद्रान्नं शूद्रसंपर्कः शूद्रेण च सहासनं ॥ शूद्राद्विद्यागमः कश्चिज्ज्वलंतमपि पातयेत् ॥ १ ॥ तथा च हारीतः ॥ शूद्रान्नेन तु भुक्तेन हृदयस्थेन योमृतः ॥ सवै स्वरत्वमुष्ट्रत्वं शूद्रत्वं चापि गच्छति ॥ २ ॥ वशिष्ठः ॥ शूद्रान्नेनतु भुक्तेन मैथुनं योधिगच्छति ॥ यस्यान्नं तस्य ते पुत्रानसस्वर्गार्हकोभवेदिति ॥ ३ ॥ व्यासोपि ॥ शूद्रान्नरसपुष्टस्य दित्सोरपि च नित्यशः ॥ यजतोजुव्हतश्चापिगतिरूर्ध्वानविद्यते ॥ ४ ॥ मृतसूतकपुष्टांगोद्विजः शूद्रान्नभोजनः ॥ अहमेव न जानामि कां कां योनिं हि गच्छति ॥ गृध्रोद्वादशजन्मानि दशजन्मानि सूकरः ॥ श्वा चैव सप्तजन्मानीत्येवं मनुरुवाचह ॥ ५ ॥ शूद्रान्नेनोदरस्थेनयः कश्चिन्म्रीयते द्विजः ॥ सभवेत्सूकरोग्राम्यस्तस्य वा जायते कुले ॥ ६ ॥ आपस्तंबोपि ॥ यस्तु भुंजीत शूद्रान्नं मासमेकं निरंतरं ॥ इह जन्मनि शूद्रत्वं मृतः श्वा चाभिजायते ॥ ७ ॥ कारुकान्नं प्रजा हंति बलं निर्णेजकस्यच ॥ गणान्नं गणिकान्नं च लोकेभ्यः परिकृंतति ॥ ८ ॥ रूपं चिकित्सकस्यान्न पुंश्चल्याश्चान्नमिंद्रियं ॥ विष्णोर्वार्धुषिकस्यान्नं शस्त्रविक्रयिणोमलं ॥ ९ ॥ एतेभ्योन्येत्वभोज्यान्नाः क्रमशः परिकीर्तिताः ॥

तेषां त्वगस्थिरोमाणि वदंत्यन्नं मनीषिणः ॥ प्रायश्चित्तं लिखितः भुक्त्वा वार्धुषिक-स्यान्नं परपाकरतस्य च ॥ शूद्रस्य त्वायथाभुक्त्वा त्रिरात्रं स्यादभोजनमिति ॥१०॥ एतदज्ञानतः कामतोद्वैगुण्यं ॥ आपदिपराशरः ॥ आपत्काले तु विप्रेण भुक्तं शूद्रगृहे यदि ॥ मनस्तापेन शुध्येत दुपदानां शतं जपेत् ॥ ११ ॥ आपदि शरीरधारणमात्र-पर्याप्तान्नभक्षणमल्पदोषार्थं प्रशंसंति ॥ मनुः ॥ सर्वतः प्रतिगृह्णीयात् ॥ ब्राह्मणश्च वनंगतः ॥ पवित्रं सत्कातिं ह्येपधर्मतोनोपपद्यते ॥ १२ ॥ नाध्यापनाद्याजनाद्वागर्हि-ताद्वाप्रतिग्रहात् ॥ दोषोभवति विप्राणां ज्वलनार्कसमाहिते ॥ १३ ॥ अनापद्येव सशूद्रदासातिव्यतिरेकेण भूयोदुष्टान्नानाहपराशरः ॥ मद्यमांसरतं नित्यं नित्यं हिंसा-प्रवर्तकं ॥ तं शूद्रं वर्जयेद्विप्रः श्वपाकमिव दूरतः ॥ १४ ॥ द्विजशुश्रूषणरतान्मद्यमां-सविवर्जितान् ॥ स्वकर्मनिरतान्नित्यंतान् शूद्रान्नत्यजेद्विजइति ॥१५॥ याज्ञवल्क्यः ॥ शूद्रेषु दासगोपालकुलमित्रार्धशीरिणः ॥ भोज्यान्नानापितश्चैव यश्चात्मानं निवेदयेत् ॥ १६ ॥ अर्धशीरीकृषिफलार्धग्राही ॥ तथादेवलः ॥ स्वदासोनापितोगोपः कुंभकारः कृषीवलः ॥ ब्राह्मणैरपि भोज्यान्नाः पंचैते शूद्रयोनिनः ॥ १७ ॥ दासादीनां लक्षण-माह ॥ पराशरः ॥ शूद्रकन्यासमुत्पन्नोब्राह्मणेन तु संस्कृतः ॥ असंस्कारात् भवेद्दासः संस्कारादेव नापितः ॥ क्षत्रियात् शूद्रकन्यायां समुत्पन्नस्तु यः सुतः ॥ सगोपालइति ज्ञेयो भोज्योविप्रैर्न संशयः ॥ वैश्यकन्यासमुद्भूतोब्राह्मणेन तु संस्कृतः ॥ कुंभकारकइति यो भोज्योविप्रैर्न संशयइति ॥ कुलमित्रं पितामहादिक्रमायातआप्तशूद्रः ॥ १८ ॥

## शूद्रान्नभक्षणाचा विचार.

भविष्य पुराणांतील वचन. शूद्राचें अन्न, शूद्रांशीं संपर्क, शूद्रासहवर्तमान एके ठायीं वसणें, शूद्रापासून एकादे विद्येची प्राप्ती होणें. हीं कारणे मोठा तपस्वीब्राम्हण असेल तरी त्यासही अधोगतीस नेतील. हारीताचें वचन. शूद्रान्न भक्षण केलें असोन अथवा हृदयांत तसेंच असोन जो मनुष्य मृत होतो तो गाढव, उंट, अथवा शूद्र याच्या जन्मा प्रत जातो. ॥ २ ॥ वशिष्ठाचें वचन. शूद्रान्न भक्षण करून जो स्त्रीशीं समागम करितो त्यावेळीं गर्भधारणा झाली असतां त्या पासून जी संतती होईल ती शूद्राची जाणावी. आणि तोही स्वर्गास जाण्यास योग्य होत नाहीं. ॥ ३ ॥ व्यासाचें वचन—शूद्रान्नानें पुष्ट झालेला असा मनुष्य मोठा दान करणारा, असा जरी असेल तरी त्याला मोठी उत्तम गती प्राप्त होत नाहीं. ॥ ४ ॥ जननाशौच अथवा मृताशौचाचें अन्न खाऊन पुष्ट झालेला किंवा शूद्रान्न भक्षण करणाऱ्या ब्राह्मणास बारावेळ गृध्राचा जन्म होतो. दहावेळ डुकराचा जन्म येतो. व सात वेळ कुत्र्याचा जन्म होतो, असें मनूनें सांगितलें आहे. ॥ ५ ॥ जो ब्राम्हण पोटांत राहिलें शूद्रान्न तसेंच असोन मरण पावेल त्यास ग्राम्यसूकर किंवा त्याच शूद्रकुळांत जन्म होतो. ॥ ६ ॥ आपस्तं-

वाचें वचन. जो निरंतर एकमहिना शूद्राचें अन्न भक्षण करील त्यास जीवंतपणीं शूद्रत्व, मेल्यानंतर कुत्र्याचा जन्म प्राप्त होतो. ॥ ७ ॥ शिल्पी, चितारी, रंगारी इत्यादिकांचें अन्न संततीचा नाश कारितें. परिटाचें अन्न बळहानी करणारें आहे. गणान्न, वेश्येचें अन्न हें स्वर्गादिक लोकांचें नाश करणारें होतें. वैद्याचे अन्न रूपाचा नाश करणारें होतें. जारिणी स्त्रियेचें अन्न इंद्रियांच्या पटुत्वाचे नाश कारितें. वाढीदिढी किंवा व्याज वढ्याचा धंदा करणारे लोकांचें अन्न भक्षण केलें असतां निष्णुलोकास ह्मणजे सद्गतीचा नाश कारितें. शस्त्रविकणारे यांचे अन्न भक्षण केलें असतां मल ह्मणजे पातक प्राप्ती होते. ॥ ९ ॥ याहून अन्यही, ज्यांचें अन्न भक्षण करूं नये असे पुष्कळ सांगितलें आहेत त्यांचें अन्न भक्षण केलें असतां त्वचा, अस्ति, रोम इत्यादिकांचा नाश करितें. लिखिताचें वचन. वाढीदिढी अथवा व्याजबट्टा करून उपजीविका करणारांचें अन्न, तसेंच दुसऱ्याचे येथें निरंतर भोजन करणाराचें अन्न, किंवा शूद्राचें अन्न भक्षण केलें असतां त्रिरात्र उपोषण करावें. ॥ १० ॥ हें अज्ञानानें घडलें असेल तर ज्ञानपूर्वक भक्षण केलें असतां सहादिवस उपोषण करावें. पराशराचें वचन–अत्यंत आपत्ती असेल तर ब्राम्हणानें शूद्राचे घरीं भोजन केलें असतां मनाच्या पश्चात्तापानें आणि द्रुपदानां० या ऋचेचा शंभर वेळा जपकेल्यानें शुद्धता होते.॥ ११॥आपत् काळीं शरीराचें धारण होईल इतक्या पुरतें शूद्रान्न भक्षण केलें असतां मोठा दोष नाहीं असें कित्येक स्मृतिकार ह्मणतात. मनूचें वचन–ब्राह्मण अरण्यांत जाऊन राहिला असतां सर्वांपासून प्रतिग्रह घेतला असतांही त्याच्या पवित्रतेस व सत्कीर्तीस व त्याचे धर्माचरणास नाश करणारें होतनाहीं. ॥ १२ ॥ अग्नी सूर्य यांच्यासारिखे जे ब्राह्मण यांनीं अध्ययन शिकविल्यानें दोष होत नाहीं. यज्ञकरविल्याने व निंद्यप्रतिग्रह घेतल्यानेंही दोष होत नाहीं. ॥ १३ ॥ पराशराचें वचन–मद्यमांसाचे ठिकाणी निरंतररत होणारा व निरंतर हिंसा करणारा असा जो शूद्र त्यास चांडाळा प्रमाणें दूर करावा. त्याच्या पासून दानादिक ग्रहण करूं नयेत. ॥ १४ ॥ ब्राह्मणांच्या सेवेविषयीं तत्पर, मद्य, मांस न सेवन करणारे, स्वधर्माचरणा विषयीं निरंतर तत्पर असे जे शूद्र या पासून ब्राह्मणानें आपत्काळींदान घेण्यास हरकत नाहीं. ॥ १५ ॥ याज्ञवल्क्याचें वचन–शूद्रामध्यें दास, गोपाळ, कुलमित्र, अर्धशिरी, नापित, जो आपणास निवेदन करीन ( आपला दास होऊन राहील ) त्याचें अन्न भक्षण करावें. ॥ १६ ॥ अर्धशिरी ह्मणजे शेतकीमध्यें उत्पन्न होणारें फल त्याचा अर्धभाग घेणारा. देवलाचें वचन–आपला दास, नापित, कुमार, गौळी, आपला शेतकरी शूद्र हे पांच जे शूद्र कुलोत्पन्न यांचें अन्नभक्षण करण्यास हरकत नाहीं. ॥ १७ ॥ दासादिकांचें लक्षण प्रायश्चित्त दिनकरद्योतांतील पराशराचे वचन–ब्राह्मणापासून शूद्रकन्येचे ठायीं उत्पन्न झालेला जो पुत्र त्याचा संस्कार केला नसेल तर त्यास दास अशी संज्ञा आहे. संस्कार केला असतां नापित ( न्हावी ) क्षत्रियापासून शूद्रकन्येचें ठायीं उत्पन्न झालेला मुलगा गोपाळ जाणावा. सवर्णाचें अन्न भक्षण करण्यास ब्राम्हणास हरकत नाहीं. वैश्यकन्येपासून उत्पन्न झालेला पुत्र त्याचा ब्राम्हणांनीं संस्कार

केलेला तो कुंभकार श्रेष्ठ जाणावा कुलमित्र म्हणजे पितामहादिक्रमानें आलेला असा आप्त शूद्र जाणावा. ॥ १८ ॥

पर्यायान्नदानेतु ॥ ब्राह्मणान्नं ददच्छूद्रः शूद्रान्नं ब्राह्मणोददत् ॥ द्वयमेतदभोज्यं स्यात् भुक्त्वा तूपवसेदहरिति वृद्धयाज्ञवल्क्योक्तमवगंतव्यम् अत्रान्नमामंन्नेयं ॥ १९ ॥ संवर्तः ॥ शूद्राणां भाजने भुक्त्वा भुक्त्वावाभिन्नभाजने ॥ अहोरात्रोषितोभूत्वा पंचगव्येन शुध्यतीति ॥ २० ॥ तथा ॥ वटार्काश्वत्थपत्रेषु कुंभीतिंदूकपत्रयोः ॥ कोविदारकदंबेषु भुक्त्वा चांद्रायणं चरेत् ॥२१॥ पलाशपद्मपत्रेषुगृही भुक्त्वैंदवं चरेत् ॥ वानप्रस्थोयतिश्चैव लभतेचांद्रकं फलमिति ॥ २२ ॥ पलाशपत्राणिवल्लीपलाशपत्राणि इति केचन

## पर्यायानें अन्न दिलें असतां प्रायश्चित्त.

ब्राह्मणाचें अन्न शूद्रानें दिलें असतां आणि शूद्राचें अन्न ब्राह्मणानें दिलें असतां तें भक्षण करूं नये. केलें असतां एक उपोषणानें शुद्धता होते. येथें अन्न शब्द आमान्नवाचक आहे.॥१९॥ संवर्ताचें वचन—शूद्राच्या पात्रामध्यें अथवा फुटक्या पात्रामध्यें भोजन केलें असता अहोरात्र उपोषण करून पंचगव्य प्राशन केल्यानें शुद्धता होते. ॥२०॥ वड, रुई, पिंपळ, कुंभीचीं पानें, टेंभुर्णी, कांचन, कदंब, पळस, कमळ, याच्या पानाच्या ठायीं भोजन केलें असतां चांद्रायण प्रायश्चित्त सांगितलें आहे. ॥२१॥ वानप्रस्थ आणि संन्यासी यानीं पळस, कमळ, याचे पानावर भोजन केलें असतां चांद्रायण व्रत केल्याचें फळ प्राप्त होतें. येथें पळस शब्दानें पळशाच्या वेलीचीं पानें ग्रहण केलीं आहेत म्हणून पळसाच्या झाडाचे पानास दोष नाहीं.

शवादिसंयुक्तकूपाद्युदकपाने प्रायश्चित्तनिर्णयः तत्रविष्णूक्तम् ॥ मृतपंचनखात् कूपादत्यंतोपहताद्वोदकंपीत्वा ब्राह्मणस्त्र्यहमुपवसेद्व्यहं राजन्यएकाहं वैश्यः शूद्रोनक्तं सर्वे चांते पंचगव्यं पिबेयुरिति ॥ १ ॥

> अत्यंतोपहतात्मूत्रपुरीषादिभिः ॥
> कामतोमानुषशवोपहतकूपजलपाने हारीतः ॥
> छिन्ने भिन्ने शवे तोयं तत्रस्थं यदि तत्पिबेत् ॥
> शुद्ध्यै चांद्रायणं कुर्यात्तप्तकृच्छ्रमथापि वा ॥ २ ॥
> यदि कश्चित्प्रमादेन तत्र स्नायी द्विजोत्तमः ॥
> जपंस्त्रिषवणं स्नायी अहोरात्रेण शुद्ध्यतीति ॥ ३ ॥
> अकामतोदेवलोक्तम् ॥
> छिन्नं भिन्नं शवं श्चैव कूपस्थं यदि दृश्यते ॥
> पयः पिबेत् त्रिरात्रेण मानुषे द्विगुणं स्मृतमिति ॥ ४ ॥

आपस्तंबः ॥

चांडलकूपभांडस्थं नरः कामाज्जलं पिबेत् ॥
प्रायश्चित्तं कथं तत्र वर्णे वर्णे विनिर्दिशेत् ॥ ५ ॥
चरेत् सांतपनं विप्रः प्राजापत्यं तु भूमिपः ॥
तदर्धं तु चरेद्वैश्यः शूद्रे पादं विनिर्दिशेदिति ॥ ६ ॥

देवलः

यस्तु चांडालभांडस्थमज्ञानादुदकं पिबेत् ॥
सतु त्र्यहेण शुद्ध्येत्तुशूद्रस्त्वेकेन शुद्ध्यतीति ॥ ७ ॥

आपस्तंबः

म्लेंच्छादीनां जलं पीत्वा पुष्करिण्यां ह्रदेपि वा ॥
जानुदघ्नं शुचि ज्ञेयमधस्तादशुचि स्मृतम् ॥ ८ ॥
तत्तोयं यः पिबेद्विप्रः कामतोकामतोपि वा ॥
अकामान्नक्तभोजी स्यादहोरात्रं तु कामतः ॥ ९ ॥
अत्रैवाभ्यासे प्राजापत्यं ॥
एवं स्नात्वा च पीत्वा च प्राजापत्येन शुद्ध्यतीति आपस्तंबस्मरणात् ॥१०॥

पराशरः

भांडस्थमंत्यजानां तु जलं दधि पयः पिबेत् ॥
ब्राह्मणः क्षत्रियोवैश्यः शूद्रश्चैव प्रमादतः ॥ ११ ॥
ब्रह्मकूर्चोपवासेन द्विजातीनां च निष्कृतिः ॥
शूद्रस्यचोपवासेन तथा दानेन शक्तितः ॥ १२ ॥
एतदकामतः कामतोद्विगुणं ॥

आपस्तंबः ॥

मूत्रोच्चारं द्विजः कुर्यादकृत्वा शौचमात्मनः ॥
मोहाद्भुक्त्वात्रिरात्रं तु यवान् पीत्वा विशुद्ध्यतीति ॥ १३ ॥
मूत्रं कृत्वा द्विजोमार्गे स्मृतिभ्रंशाज्जलं पिबेत् ॥ अहोरात्रोपितोभूत्वा पंचगव्येन शुद्ध्यति ॥ १४ ॥

कामतोद्विगुण संवर्त्तः

समुत्पन्ने तु योस्नायी भुंजीतापः पिबेत्तुवा ॥
गायत्र्यष्टसहस्रं वा जपेत्स्नात्वा समाहितः इति ॥ १५ ॥

एतदकामतः

स्नानार्हस्तु यदा भुंक्ते द्विजोवैज्ञानदुर्बलः ॥
प्राजापत्येन शुद्धयेत कामादन्यस्तदर्धकः ॥ १६ ॥

इतिषट्त्रिंशन्मतभिधानात् ॥

## प्रेतादिक पडल्यानें दूषित झालेल्या कूपादिकांचें पाणी प्यालें असतां प्रायश्चित्त. ॥

विष्णुस्मृतींतील वचन ॥ पाच नखे ज्यास आहेत असा प्राणी मृत होऊन त्यांत पडला आहे, आणि त्यामुळें ज्याचें पाणी अत्यंत बिघडलें आहे अशा अडाचें पाणी ब्राम्हणानें प्राशन केलें असतां तीन दिवस ब्राह्मणानें उपोषण करावें. क्षत्रियानें दोन दिवस, वैश्यानें एक दिवस, शूद्रानें सायंकाळपर्यंत उपोषण करावें. अथवा सर्वांनीं पंचगव्य प्राशन करावें. ॥ १ ॥ हारीताचें वचन–ज्या अडामधें प्रेत कुजलें आहे अशा कूपाचें पाणी प्यालें असतां शुद्धता होण्याकरितां चांद्रायण अथवा ततकृच्छ्र प्रायश्चित्ताचरण करावें. ॥ २ ॥ ब्राम्हण अशा पाण्यामध्यें प्रमादानें जर स्नान करील तर त्रिकाळ स्नान करून गायत्रीजप करून एक उपोषण केल्यानें शुद्धता होते. ॥ ३ ॥ देवलाचें वचन–छिन्नभिन्न झालेलें असें प्रेत आडांत पडलेलें दिसत असून जो तेथें पाणी प्राशन करील तो त्रिरात्र उपोषणानें शुद्ध होतो. मनुष्याचें प्रेत पडलें असेल तर सहादिवस उपोषण करावें. ॥ ४ ॥ चांडालानें खणिलेला जो कूप त्याचें पाणी समजून ब्राम्हणानें प्राशन केलें असतां सांतपन प्रायश्चित्त घ्यावें. क्षत्रियानें प्राजापत्य वैश्यानें अर्ध प्राजापत्य, शूद्रानें पादप्राजापत्य प्रायश्चित्त घ्यावें. ॥ ६ ॥ ७ ॥ देवलाचें वचन–चांडालाच्या भांड्यांतील पाणी अज्ञानानें प्राशन केलें असतां ब्राम्हण, क्षत्रिय, वैश्य यांनीं त्रिरात्र उपोषण करावें. व शूद्रानें एक उपोषण करावें, म्हणजे शुद्ध होतो. ॥ ७ ॥ आपस्तंबाचें वचन म्लेच्छादिकांनीं खणिलेले आड, विहारी, तळें यांतील पाणी गुडघ्या इतकें जर असेल तर तें शुद्ध जाणावें. कमी असल्यास अपवित्र आहे असें जाणावें. ॥ ८ ॥ हें पाणी ब्राम्हणानें प्यालें असतां सायकाळपर्यंत उपोषण करावें. ॥ ९ ॥ निरंतर अभ्यास असेल तर प्राजापत्य प्रायश्चित्ताचरण करावें. या पाण्यामध्यें स्नानादिही केलें असतां हेंच प्रायश्चित्त सांगितलें आहे. ॥ १० ॥ पराशराचें वचन–अंत्यजाचे भांड्यांतील पाणी, दूध, दही हे प्रमादानें प्यालें असतां ब्रम्हकूर्च (पंचगव्य आणि दर्भ हे घालून पूर्वोक्त मंत्रानें अभिमंत्रण केलेलें) पाणी हें पाणि प्राशन करून एकदिवस उपोषण केल्यानें ब्राम्हण, क्षत्रिय, वैश्य हे शुद्ध होतात. शूद्र हा उपवास अथवा शक्तीनुसार दान केल्यानें शुद्ध होतो. जाणून जलादिक प्राशन केलें असतां द्विगुणित प्रायश्चित्त जाणावें ॥ ११ ॥ १२ ॥ आपस्तंबाचें वचन–ब्राम्हणानें मूत्रशौचादिक केलें असून त्याची शुद्धता न करितां तसेंच भोजन केलें असतां त्रिरात्र यवप्राशनकरून राहिल्यानें शुद्ध होतो. ॥ १३ ॥

ब्राह्मणानें मार्गामध्यें मूत्र करून स्मृतिभ्रंशामुळें तसेंच जल प्राशन करील तर पंचगव्य प्राशन केल्यानें शुद्ध होतो. ॥ १४ ॥ ज्ञानपूर्वक घडलें असतां द्विगुणित प्रायश्चित्त जाणावें. संवर्ताचें वचन–जो स्नानाचें निमित्त उत्पन्न झालें असून स्नान न करितां जो भोजन अथवा जलपान करील त्यानें स्नान करून आठ हजार गायत्री जप करावा. हें न समजून झाले असताचें प्रायश्चित्त आहे. ॥ १५ ॥ स्नान करण्यास योग्य असून जो ब्राह्मण अज्ञानयुक्त होऊन तसेंच भोजन करितो तो प्राजापत्य प्रायश्चित्तानें शुद्ध होतो. ( असें षट्त्रिंशन्मतामध्यें सांगितलें आहे. ) ब्राह्मणाहून इतर जातीनें इच्छापूर्वक ह्मणजे जाणून पूर्वोक्त रीतीनें केलें असतां त्यास अर्धप्रायश्चित्त जाणावें. असें षट्त्रिंशन्मतामध्यें सांगितलें आहे. ॥ १६ ॥

## अथ भावदुष्टादिभक्षणे प्रायश्चित्तनिर्णयः ॥

तत्र यद्वर्णतआकारतोवा सदृशतया जुगुप्सितभावनां जनयति अभियुक्तगरादिशंकां वा जनयति तद्भावदुष्टम्॥१॥तत्र पराशरः॥वाग्दुष्टंभावदुष्टं च भाजने भावदूषिते॥ भुक्त्वान्नं ब्राह्मणः पश्चात्त्रिरात्रेण विशुद्ध्यति ॥ २ ॥ एतत्कामकारविषयम् ॥ शंकायांतु ॥ शंकास्थाने समुत्पन्ने अभोज्याभक्ष्यसंज्ञिते ॥ आहारशुद्धिं वक्ष्यामि तन्मे निगदतः शृणु ॥ ३ ॥ अक्षारलवणां रुक्षां पिबेद्ब्राह्मीं सुवर्चलाम् ॥ त्रिरात्रं शंखपुष्पीं वा ब्राह्मणः पयसा सह ॥ ४ ॥ पलाशबिल्वपत्राणि कुशान् पद्ममुदुंबरम् ॥ अपः पिबेत्क्वाथयित्वा त्रिरात्रेण विशुध्यति ॥ ५ ॥ मनुनाप्यभोज्यभोजनशंकायामुक्तं ॥ संवत्सरस्यैकमपि चरेत्कृच्छ्रं द्विजोत्तमः ॥ अज्ञानभुक्तशुध्यर्थं ज्ञातस्य च विशेषतइति ॥ ६ ॥ प्रायश्चित्तविवेके संवर्तः ॥ आपोशानमकृत्वा तु यो भुंक्ते नापदि द्विजः ॥ भुंजानस्तु यदा ब्रूयाद्गायत्र्यष्टशतं जपेत् ॥ ७ ॥ अष्टशतमष्टोत्तरशतम् ॥ स्मृत्यंतरे ॥ भोजनकाले मौनं विहितं ॥ यस्त्वन्विच्छति सर्वेषां पापानां च विनिष्कृतिम् ॥ मौनेनान्नं समश्नीयादगस्त्यशिरसा स्वपेदिति ॥ ८ ॥ भोजनसमये भगवन्नामोच्चारणं कायेंमेव ॥ तेननमौनहानिश्च निराहारत्वादिविशेषफलावाप्तिर्भवति ॥ भरद्वाजः ॥ अतिथौ तिष्ठति द्वारि अपः प्राश्नाति यो नरः ॥ रुधिरं तद्भवेत्तोयं भुक्त्वाचांद्रायणं चरेत् ॥ ९ ॥ सएव ॥ अनाचांतः पिबेद्यस्तु भक्षयेद्वापि किंचन ॥ गायत्र्यष्टसहस्रं तु जपं कृत्वा विशुध्यति ॥ १० ॥ लघुहारीतः ॥ रेतोमूत्रपुरीषाणामुत्सर्गंश्चेत्प्रमादतः ॥ तदादौतु प्रकर्तव्या तेन शुद्धिर्मृदंबुभिः ॥ पश्चादाचम्य तु जले जप्तव्यमघमर्षणम् ॥ ११ ॥ आपस्तंबः ॥ भुंजानस्य तु विप्रस्य कदाचित्स्रवते गुदं ॥ उच्छिष्टमशुचित्वं च प्रायश्चित्तं कथं भवेत् ॥ १२ ॥ आदौ कृत्वा तु वै शौचं ततः पश्चादुपस्पृशेत् ॥ अहोरात्रोपितोभूत्वा पंचगव्येन शुद्ध्यति ॥ १३ ॥ यत्तुशातातपः ॥ मूत्रोच्चारसमुत्सर्गे मोहाद्भुंक्तेथवा पिबेत् ॥ त्रिरात्रं तत्र कुर्वीत इतिशातातपोब्रवीत् ॥ १४ ॥ तद्रूपोग्रासा

शने ॥ आपस्तंबः ॥ मूत्रोच्चारं सकृत्कृत्वा ह्यकृत्वाशौचमात्मनः ॥ मोहाद्भुक्त्वा त्रिरात्रं तु यवान्पीत्वा विशुद्ध्यतीति ॥ १५ ॥ मूत्रपदं पुरीषादेरुपलक्षणम् ॥ शातातपः ॥ अथ भोजनकाले चेदशुचिर्भवति द्विजः ॥ भूमौ निक्षिप्य तं ग्रासं स्नात्वा विप्रोवि शुद्ध्यति ॥ १६ ॥ अशित्वा सर्वमन्नं तु त्रिरात्रेण विशुद्ध्यतीति ॥ १७ ॥ तैलाभ्यंगादिना स्नाननिमित्तेऽकृतस्नानस्य ॥ संवर्तः ॥ समुत्पन्ने द्विजः स्नाने भुंजीताथ पिबेत वा ॥ गायत्र्यष्टसहस्रं तु जपेत्स्नातः समाहितः ॥ १८ ॥ अष्टसहस्रमष्टाधिकसहस्रम् ॥ एतच्चसकृत् ॥ शंखः ॥ नीलं वस्त्रं परीधाय भुक्त्वा स्नानार्हकोभवेत् ॥ त्रिरात्रं तु व्रतं कुर्याच्छित्वा गुल्मं लतां तथेति ॥ १९ ॥ स्मृत्यंतरे ॥ एवमेवस्थितो गच्छन् व्यायामैरन्नभोजनएवमेवेति ॥ एकाहादीन्यभक्ष्यभक्षणप्रायश्चित्तानि योजनीयानि ॥ २० ॥ पराशरः ॥ भुंजानश्चैव योविप्रः पादं हस्तेन संस्पृशेत् ॥ स्वमुच्छिष्टमसौ भुंक्ते योभुंक्ते भुक्तभाजने ॥ २१ ॥ पादुकास्थोन भुंजीत पर्यंकस्थः स्थितोपिवा॥ श्वानचांडालदृष्टं च भोजनं परिवर्जयेदिति ॥२२॥ इतिभावकर्तृदुष्टाशनेप्रायश्चित्तम् ॥

## अथ भावदुष्ट पदार्थ भक्षण केले असतां प्रायश्चित्त विचार.

जे वर्णानें अथवा अकारानें किंवा सारखे पणाने निंदितपदार्थाची भावना उत्पन्न करिते अथवा शत्रूनीं योजिलेल्या विषादिकाची शका करिते त्यास भावदुष्ट असें ह्मणानें. ॥ १ ॥ या विषयीं पराशराचें वचन–वाणीनें दुष्ट, भावदुष्ट, सर्से भावदुष्टपात्राचे ठायीं वाढलेलें अन्न ब्राह्मणानीं भक्षण केलें असतां त्रिरात्र उपोषण केल्यानें शुद्धता होते. ॥ २ ॥ हे समजून भोजन केल्याचें आहे. पायसादिक जे पदार्थ त्यास भोज्य अशी सज्ञा आहे. लाडु वगैरे जे पदार्थ त्यास भक्ष्य अशी संज्ञा आहे भक्ष्यभोज्यपदार्थाविषयीं शका उत्पन्न झाली असता आहारशुद्धीप्रत सागतो. ॥ ३ ॥ क्षार आणि लवण यानें रहित रस असी ब्राह्मी ही वनस्पती अथवा शंखपुष्पी दुधामध्यें कढवून तीन दिवस पर्यंत ब्राह्मणानें प्राशन करावी. ॥ ४ ॥ पळस, वेल, ह्याचीं पानें दर्भ, कमळ, उंबर हे घालून पाणी कढवून तें पाणी त्रिरात्र प्राशन करावें ह्मणजे मनुष्य शुद्ध होतो. ॥ ५ ॥ मनूनें खावें न खावें अशा शंके विषयीं सांगितलें आहे. ब्राह्मणानीं वर्षामध्यें न समजून जें शंकायुक्त अन्न भक्षण झालें असेल त्यावद्दल एककृच्छ्र प्रायश्चित्त आचरण करावें. ॥ ६ ॥ संवर्ताचें वचन–आपत्ती नसोन जो ब्राह्मण मंत्रोच्चार युक्त आपोशन न करितां भोजन करितो अथवा भोजनकाळीं जो भाषण करितो त्यानें एकशें आठ गायत्रीजप करावा. ॥७॥ अन्यस्मृतींत असें सांगितलें आहे कीं, सर्वपापाचा नाश व्हावा अशी ज्यास इच्छा असेल त्यानें मौन धारण करून भोजन करावें. आणि दक्षिणेकडे मस्तक करून शयन करावें. ॥ ८ ॥ भोजन समयीं भगवन्नामोच्चारण अवश्य करावें, तेणेंकरून मौनहानि होत नाहीं. नामोच्चारण करीत भोजन केलें असतांही निराहार केल्याचें फळ प्राप्त होतें.

भरद्वाजाचें वचन-अतिथी द्वारांत उभा असतां जो मनुष्य पाणी प्राशन करितो त्यानें रक्त प्राशन केल्याप्रमाणें होतें. भोजन केलें असतां चांद्रायण प्रायश्चित्त सांगितलें आहे. ॥ ९ ॥ भोजनानंतर आचमन करावें. तें आचमन न करितां पाणी प्राशन केलें असतां अथवा कोण-ताही पदार्थ भक्षण केला असतां आठ हजार गायत्री जपानें शुद्धता होते. ॥ १० ॥ लघु हारितांचें वचन. प्रमादानें रेत, मूत्र, पुरिष, याचा त्याग केला असतां प्रथमतः मृत्तिका आणि पाणी याचे योगानें शुद्धता करून नंतर आचमन करून अघमर्षण जप करावा. ॥ ११ ॥ आपस्तंबाचें वचन-ब्राह्मण भोजन करित असता जर गुदस्राव होईल तर उच्छिष्ट पदार्थ अशुचि होतो. ॥ १२ ॥ त्यास प्रायश्चित्त प्रथमतः शुद्धता करून नंतर आचमन करावें, आणि एक दिवस उपोषण करून पंचगव्य प्राशन केल्यानें शुद्धता होते. ॥ १३ ॥ शातातपाचें वचन-मूत्र अथवा मलोत्सर्ग केला असूनही जो मोहानें भोजन करितो त्यानें त्रिरात्र उपोषण करावें. आपस्तंबाचें वचनाचाही अर्थ असाच आहे. ॥ १४ ॥ १५ ॥ शातातपाचें वचन-ब्राम्हण भोजन करीत असता कांहीं कारणानें तो जर अपवित्र होईल, तर त्याच वेळीं तो मुखांतील ग्रास काढून भूमीवर टाकावा. आणि स्नान करावें म्हणजे तो शुद्ध होईल. ॥ १६ ॥ तो ग्रास भक्षण केला असतां अहोरात्र उपोषण करावें. सर्वान्न भक्षण केलें असतां त्रिरात्र उपोषणानें शुद्धता होते. ॥ १७ ॥ तेल लावणें इत्यादिक स्नान करण्याचें कारण उत्पन्न झालें असून स्नान न करितां भोजन केलें असतां अथवा जलपान केलें असतां स्नान करून आठ हजार गायत्रीजप करावा. म्हणजे शुद्धता येते. ॥ १८ ॥ शंखाचें वचन-स्नान करण्यास कारण उत्पन्न झालें असून स्नान न करिता तसेंच काळें वस्त्र धारण करून भोजन केलें असतां त्रिरात्र व्रत करावें. याप्रमाणेंच गुल्मवेळी याचा छेद केला असतां त्रिरात्र व्रताचरण करण्यास सांगितलें आहे. ॥ १९ ॥ तसेंच उभे राहून चालत असतां व्यायाम करीत असोन अन्न भक्षण केलें असतां एक दिवस उपोषण करावें. ॥ २० ॥ पराशराचें वचन-जो ब्राम्हण भोजन करीत असता हातानें पायास स्पर्श करितो त्यानें स्वतःचें उच्छिष्ट भक्षण केल्या प्रमाणें होते. तसेंच जेवलेले पात्रांत भोजन केलें असता जाणावें. ॥ २१ ॥ खडावावर पाय ठेऊन अथवा पलंगावर बसून किंवा उभें राहून भोजन करूं नये. तसेंच कुत्रे चांडाल यांनीं अवलोकन केलेलें अन्न भक्षण करूं नये. ॥ २२ ॥ याप्रमाणें कर्त्याच्या संबंधानें जें दुष्टान्न त्याचें प्रायश्चित्त जाणावें.

ब्रह्मपुराणे-भक्ष्यं त्वभक्ष्यवाक्येन योदद्यादोपधर्मतः ॥ गुरोरपि न भोक्तव्यं वाग्दुष्टं तन्महाघकृदिति ॥ १ ॥ अकामतः सकृद्भक्षणे भावदुष्टादिमक्रम्य गौतमः ॥ छर्दनं घृतप्राशनं चेति ॥ हारीतः ॥ शंकितं प्रतिदत्तान्नं विद्विष्टान्नमथापि च ॥ यदि भुंजीत विमोयः प्रायश्चित्तं कथं भवेत् ॥ एकरात्रोपवासश्च गायत्र्यष्टशतं जपेत् ॥ प्राशयेत्पंचभिर्मंत्रैः पंचगव्यं पृथक्पृथगिति ॥ २ ॥ अन्यस्मै परिविष्टचान्यस्मै दत्तं प्रतिदत्तान्नम् ॥

ब्रम्हपुराणांतील वचन—खाण्यास योग्य जो पदार्थ त्यास खाण्यास अयोग्य आहे अशा शब्दानें जो रागानें सांगेल तो जरी आपला गुरु असेल तरी त्याचें तें अन्न भक्षण करूं नये.॥१॥ भक्षण केलें असतां महापातक सांगितलें आहे. कारण तो पदार्थ वाक्दुष्ट होतो. गौतमानें वाक्दुष्ट, भावदुष्ट असे पदार्थ भक्षण केले असतां तात्काळ तें अन्न वोकून टाकावें. आणि घृत प्राशन करावें. ह्मणजे शुद्धता होते. असें सांगितलें आहे. हारीताचें वचन—शंकायुक्त अन्न, प्रतिदत्तान्न ( एकास वाढिलेलें अन्न काढून दुसऱ्यास वाढणें. ) शत्रूचें अन्न हें भक्षण केलें असतां एकरात्र उपोषण करून आठशें गायत्रीजप करावा. आणि पांच मंत्रांनीं वेगळे वेगळे पंचगव्य प्राशन करावें. ह्मणजे शुद्धता होते. ॥ २ ॥

॥ अथ गुणदुष्टाशने मनुः ॥ शुक्तानि च कषायांश्च पीत्वामेध्यानपि द्विजः ॥ तावद्भवत्यप्रयतोयावत्तन्न व्रजत्यधः ॥ १ ॥ कामतस्तु ॥ केवलानि च शुक्तानि तथा पर्युषितं च यत् ॥ ऋजीषपक्वं भुक्त्वा च त्रिरात्रं तु व्रती भवेदितिशंखस्मरणात् ॥ शुक्तानीति ॥ यानि स्वभावतोमधुरादिरसानि कालयोगेनोदकपरिणामादिनाऽम्लं भावं व्रजंति तानि शुक्तानि ॥ कषायान् विभीतकादीन् क्कथितानि अमतिपिद्धान्यपि पीत्वा यावन्नजीर्णानि भवंति तावदशुचिः पुरुषोभवति ॥ ऋजीषपक्वंगतरसंशाकादितत्पुनः पक्वं भुक्त्वेत्यर्थः ॥ २ ॥

## गुणदुष्ट पदार्थ भक्षणाचें प्रायश्चित्त. ॥

मनूचें वचन—शुक्तें, आणि कांढे हे प्राशन केलें असतां जो काळ पर्यंत हे खालीं गेले नाहींत तो काळ पर्यंत पिणारा मनुष्य अशुद्ध होतो. सबब ते अनिच्छेनें प्राशन केले असतां एक उपोषण करावें. ॥१॥ शुक्तेंपर्युषितपदार्थ,ऋजीषपक्वपदार्थ, हे भक्षण केलें असतां त्रिरात्र व्रताचरण करावें शुक्तें ह्मणजे जे रसमानें करून गोड असून काळयोगानें अथवा उदकाच्या परिणामादिकानें अंबटपणा ज्यामध्यें उत्पन्न होतो त्यास शुक्तें असें ह्मणावें. कषाय ह्मणजे बेहडे वगैरे इत्यादिकांचें काढे, ऋजीषपक्व ह्मणजे एकवेळा शिजविलेले शाकादिक पदार्थ रसहीन झाल्यामुळें पुन्हा शिजविणें त्यास ऋजीषपक्व असें ह्मणतात. ॥ २ ॥

## अथ हस्तदत्तादिभक्षणे प्रायश्चित्तनिर्णयः ॥

॥ तत्रपमः ॥ माक्षिकं फाणितं शाकं गोरसं लवणं घृतम् ॥ हस्तदत्तानि भुक्त्वा तु भोक्ता सांतपनं चरेत् ॥ १ ॥ एतत्कामतः ॥ सांतपनं दिनत्रयसाध्यं ॥ अकामतस्त्वाह पराशरः ॥ माक्षिकं फाणितं शाकं गोरसं लवणं घृतं ॥ हस्तदत्तानि भुक्त्वा तु दिनमेकमभोजनमिति ॥ २ ॥ फाणितं इक्षुरसविकारविशेषः ॥ घृतं वा यदि वा तैलं विप्रो न्याद्यान्नखच्युतं ॥ यमस्तदशुचि प्राह तुल्यं मांसस्य भक्षणैः ॥३॥

ब्रह्मपुराणे–हस्तदत्ताश्च ये स्नेहालवणव्यंजनानि च ॥ दातारं नोपतिष्ठंति भोक्ता भुंक्ते तु किल्बिषं ॥ ३ ॥ तस्माद्दंतरितं देयं पर्णेनैव तृणेन वा ॥ प्रदद्यान्नतु हस्तेन नायसेन कदाचन ॥ ४ ॥ भविष्ये ॥ आयसेन तु पात्रेण यदन्नमुपनीयते ॥ भोक्ता पापसमं भुंक्ते दाता तु नरकं व्रजेत् ॥ ५ ॥ तथा ॥ एकेन पाणिना दत्तं शूद्रदत्तं न भक्षयेत् ॥ घृततैले च लवणं पानीयं पायसं तथा ॥ भिक्षा च हस्तदत्ता च न ग्राह्या यत्र कुत्रचिदिति ॥ ६ ॥ कामतस्तु हस्तदत्तभोजने ॥ अब्राह्मणसमीपभोजने दुष्ट पंक्तिभोजने पंक्त्यग्रतोभोजनेऽभ्यक्तमूत्रपुरीषकरणे ॥ मृतसूतकशूद्रान्नभोजने शूद्रैः सह स्वमे त्रिरात्रमभोजनमितिहारीतोक्तं विज्ञेयम् ॥७॥ अनापोशनभोजने संवर्तः ॥ आपोशनमकृत्वा तु योभुंक्तेनापदि द्विजः ॥ भुंजानश्चैव योब्रूयाद्गायत्र्यष्टशतं जपेत् ॥ ८ ॥ मनुः ॥ घृतहीनं तु योभुंक्तेनरस्त्वाहूतिपंचकं ॥ पश्चाद्घृतेन योभुंक्ते भुक्त्वा चांद्रायणं चरेत् ॥ ९ ॥ लघुहारीतः ॥ विना यज्ञोपवीतेन भुंक्ते तु ब्राह्मणोयदि ॥ स्नानं कृत्वा जपं कृत्वा उपवासेन शुद्ध्यति॥१०॥वृथापाकान्नभक्षणे शातातपः ॥ यत्र नाश्नंति देवाश्च पितरश्च यथाविधि ॥ वृथापाकः सविज्ञेयस्तस्य नाद्यात्कथंचन॥११॥ वृथापाकस्य भुंजानः प्रायश्चित्तं चरेत् द्विजः ॥ प्राणायामं त्रिरभ्यस्य घृतं प्राश्य विशुध्यति ॥ १२ ॥ शखलिखितावपि ॥ यस्य चाग्नौ न क्रियते यस्य चान्नं न दीयते ॥ न तद्भोज्यं द्विजातीनांभुक्त्वा तूपवसेदहः ॥ १३ ॥ वृथाकृशरसंयावपाय सापूपशष्कुलीः ॥ आहिताग्निर्द्विजोभुक्त्वा प्राजापत्यं समाचरेदिति ॥ १४ ॥ अना हिताग्नेस्तूपवासः अतिथिदेवतादिप्रयोजनमनुद्दिश्य वृथापक्वस्य कृसरसंयावपायसा पूपशष्कुल्यादिभक्षणे॥आसनारूढपादोवा वस्त्रार्द्धप्रावृतोपि वा ॥ मुखेन धामितं भुक्त्वा कृच्छ्रं सांतपनं चरेत् ॥ १५ ॥ आपस्तंबः ॥ नाप्रसवितृकन्यायाअश्नीयात्तद्गृहेपि वा ॥ अथ भुंक्ते तु योमोहात्कृच्छ्रं सांतपनं चरेत् ॥ १६ ॥ अप्रसवितृकन्या अप्रसूतकन्या ॥

## हातानीं दिलेले पदार्थ भक्षण केले असतां प्रायश्चित्ताचा निर्णय.

यमस्मृतीचें वचन–मध, राब, ( घट्ट झालेली काकवी ) भाजी, दूध, दही, ताक, तूप, मीठ हे पदार्थ हातानें वाढिले असतां खाऊ नयेत खाल्ले असता सांतपन प्रायश्चित्त सांगितलें आहे॥१॥ सांतपन प्रायश्चित्त दोन दिवसांनीं होते पा.२५ हे पदार्थ न समजून हातानें वाढिलेले भक्षण केले असता एक दिवस उपोषण करावें. ॥२॥ तूप, तेल हे नखानें टाकिलें असता ते ब्राम्हणानें खाऊ नयेत. यमानें तर तें खाल्लें असता मांसभक्षण केल्यासारखें आहे.असें सांगितलें आहे. ब्रम्हपुराणातील वचन–हातानें दिलेले स्निग्ध पदार्थ,तूप,तेल इत्यादि मीठ,चटण्या,कोशिंबिरी हे भक्षण करूं नयेत खाल्लें असता पातक भक्षण केल्यासारखें होतें॥३॥सत्व पानानें अथवा कांहीं नसेल तर गवतानें

तरी वाढावें. भविष्यपुराणांतील वचन—लोखंडाच्या पात्रानें अन्न वाढूं नये, तसें अन्न भक्षण केलें असतां भक्षण करणारास पाप लागतें. अन्न वाढणारा नरकास जातो.॥५॥ एका हातानें वाढलेले अन्न तसेंच शूद्रानें दिलेलें अन्न भक्षण करूं नये. तूप, तेल, मीठ, पाणी, क्षीर, भिक्षा, हे पदार्थ हातानें दिले असतां केव्हांही घेऊं नयेत. ॥६॥ इच्छेनें हातानें दिलेले पदार्थ खाल्ले असतां तसेंच ब्राह्मणांहून इतर मनुष्य समीप मार्गी असून भोजन केलें असतां दुष्टपंक्तीचे ठायीं भोजन केलें असतां, पंक्तीमध्यें सर्वांचे अगोदरच आपण भोजन करूं लागले असतां, तेल लावलें असून तसेंच मूत्र, पुरीष केलें असतां मृतक, सूतक, शूद्र यांचें अन्न खाल्लें असतां शूद्रासह एका शय्येचे ठायीं शयन केलें असतां त्रिरात्र उपोषण करावें.असें हारीतानें सांगितलें आहे.॥७॥ संवर्ताचें वचन—मंत्रोचार युक्त आपोशन न करितां जो भोजन करितो किंवा जो जेवत असतां बोलतो त्यास एकशें आठ गायत्रीजपें करून शुद्धता होते. ॥ ८ ॥ मनूचें वचन—जो मनुष्य प्रथम पंचप्राणाहुती तूपानें रहित अशा भक्षण करून नंतर तूपानें युक्त जो भोजन करील त्यास चांद्रायण प्रायश्चित्त सांगितलें आहे. ॥९॥ लघुहारीत—जो ब्राह्मण यज्ञोपवीत नसून भोजन करितो त्यानें स्नान करून गायत्रीजप करून एक उपोषण करावें ह्मणजे शुद्ध होतो.॥१०॥ शातातपाचें वचन—ज्या स्वयंपाकामध्यें देवास नैवेद्य समर्पण करीत नाहींत आणि पितरांसही यथाशास्त्र भाग देत नाहींत त्यास वृथापाक असें ह्मणावें॥११॥ त्या स्वयंपाकांतील अन्न भक्षण करूं नये. भक्षण केलें असतां तीन प्राणायाम करून घृत प्राशन केल्यानें शुद्धता होते.॥१२॥ शंखलिखितानें असें सांगितलें आहे कीं, जें अन्न अग्नीचे ठायीं दिलें जात नाहीं, (वैश्वदेव होत नाहीं) तसेंच इतरास दिलें जात नाहीं तें अन्न ब्राह्मणांनीं भक्षण करूं नये.केलें असतां एक उपोषण करावें.॥१३॥अतिथी,देव इत्यादि कारणावांचून पक्क केलेले खिचडी,मोहनभोग,आटीव दुधाची क्षीर ( पायस ) अनारसे,शष्कुली ( खाजी करंजी आणि जिलिबी ) हें अन्न अग्नि होत्र्यानें भक्षण केलें असतां प्राजापत्य प्रायश्चित्त सांगितलें आहे.॥१४॥इतर मनुष्यानें भक्षण केलें असतां एक उपोषण करावें. असनावर पाय उभे करून बसून तसेंच नेसलेलें निमेवस्त्र पांघरूण अन्न तोंडानें फुकून भक्षण केलें असतां कृच्छ्र सांतपन प्रायश्चित्त सांगितलें आहे. ॥१५॥ आपस्तंबाचें वचन—मुलीस अपत्य झाल्यावांचून तिचें घरीं भोजन करूं नये. केलें असतां कृच्छ्रसांतपन प्रायश्चित्त सांगितलें आहे. ॥ १६ ॥

## अथ श्राद्धभोजने प्रायश्चित्तनिर्णयः ॥

तत्रांतर्दशाहे नवश्राद्धानि एकादशाहश्राद्धमारभ्योनाब्दांतानि षोडशैकोद्दिष्टानि नवमिश्राणि ॥ सपिंडीकरणं मिश्रं ततः पराणि पुराणानि ॥ १ ॥ तत्रानापदि श्राद्धभोजने शंखः ॥ चांद्रायणं नवश्राद्धे पराकोमासिके मतः ॥ पक्षत्रयेतिकृच्छ्रं स्यात् षण्मासे कृच्छ्रमेवच ॥२॥ आब्दिके कृच्छ्रपादं स्यादेकाहः पुनराब्दिके ॥ अत ऊर्ध्वं न दोषः स्याच्छंखस्य वचनं तथा ॥ ३॥ अत्र पाण्मासिकशब्देन ऊनषाण्मा-

सिकमेव गृह्यते ॥ एवमाब्दिकपदेन ऊनाब्दिकमपि ग्राह्यं ॥ चांद्रायणेऽष्टधेनवः ॥ षट्त्रिंशन्मते॥ प्राजापत्यं नवश्राद्धे पादोनं चाद्यमासिके ॥ त्रैपक्षिके तदर्द्धं तु पादोद्वैमासिके तथा ॥ ४ ॥ पादोनकृच्छ्रं निर्दिष्टं षाण्मासे च तथाब्दिके ॥ त्रिरात्रं चान्यमासेषु प्रत्यब्दं चेदहः स्मृतं ॥ त्रैपक्षिके तदर्द्धं स्यादित्यादिकामकारविषयं ॥ षाण्मासे च तथाब्दिकइत्येतत्प्रथमाब्दिकविषयम् ॥ प्रत्यब्दं तदहइत्येतत् द्वितीयाब्दिकविषयम् ॥ एतद्ब्राह्मणविषयम् ॥ ५ ॥ भरद्वाजः–भुक्तंचेत्पार्वणश्राद्धे प्राणायामान् षडाचरेत् ॥ उपवासस्त्रिमासादिवत्सरांतं प्रकीर्तितः ॥ प्राणायामत्रयं वृद्धेरहोरात्रंसपिंडने॥ असपुरुषे स्मृतं नक्तं व्रतपारणकेतथा ॥ ७ ॥ द्विगुणं क्षत्रियस्येतत्त्रिगुणं वैश्यभोजने ॥ साक्षात् चतुर्गुणं ह्येतत् स्मृतं शूद्रस्य भोजने ॥ ८ ॥ आपद्विषयं आमश्राद्धविषयं वा ॥ एवं उत्तरत्रापि श्राद्धप्रायश्चित्तानि योजनीयानि ॥ अधिकप्रायश्चित्तानि कामकारे अनापद्विषये वा बोद्धव्यानि॥९॥ सर्पादिहतविषये भरद्वाजः ॥ चांडालादुदकात्सर्पाद्ब्राह्मणाद्वैद्युतादपि॥दंष्ट्रिभ्यश्च पशुभ्यश्च मरणं पापकर्मणाम्॥११॥पतनानाशकैश्चैव विषोद्बंधनकैस्तथा ॥ भुक्त्वैषां षोडशश्राद्धे कुर्यादिंदुव्रतं द्विजइति ॥ १२ ॥ अपांक्तेयान् समुद्दिश्य श्राद्धमेकादशेहनि ॥ ब्राह्मणस्तत्र भुक्त्वान्नं शिशुर्चांद्रायणं चरेत् ॥१३॥ ब्रह्मचारिषु बृहद्यमोविशेषमाह ॥ मासिकादिषु योश्नीयादसमाप्तव्रतोद्विजः॥ त्रिरात्रमुपवासोवै प्रायश्चित्तं विधीयते ॥ प्राणायामत्रयं कृत्वा घृतं प्राश्य विशुद्ध्यतीति ॥१५॥ इदमज्ञानविषयम् ॥ कामतोपिसएवाह ॥ मधुमांसं च योश्नीयात् ब्रह्मचारी कथंचन ॥ प्राजापत्यं चरेत्कृच्छ्रं व्रतशेषं समापयेदिति ॥ १६ ॥ तदुत्तरं प्रत्याब्दिके त्रिवर्षपर्यंतं नक्तं ॥ अनापदि तूपवासः ॥ गुरुविप्रार्थर्थकद्रव्यार्थं नवश्राद्धभोजने महैकोद्दिष्टे द्वादशाहादौ च त्रिरात्रं ॥ तथापट्त्रिंशन्मते॥ आमश्राद्धे भवेदर्धं प्राजापत्यादि सर्वदेति ॥ अनुक्तप्रायश्चित्ते तु सर्वत्र उशनाः॥ दशकृत्वः पिबेदापोगायत्र्याश्राद्धभुग्द्विजः॥ ततः संध्यामुपासीत शुध्येच तदनंतरम् ॥ १७ ॥

## आतां श्राद्धीं भोजन केलें असतां प्रायश्चित्ताचा विचार.

मृताच्या दहा दिवसांचे आतील जीं श्राद्धें त्यास नवश्राद्धें अशी संज्ञा आहे. अकरा दिवसापासून ऊनाब्दिक पर्यंत जीं सोळा एकोद्दिष्टश्राद्धें त्यास नवमिश्र अशी सज्ञा आहे. सपिंडीकरणापर्यंत मिश्र असें नांव आहे. सपिंडीकरणानतर जीं जीं श्राद्धें त्यास पुराण अशी सज्ञा आहे. ॥ १ ॥ आपत्ती नसतां श्राद्धीं भोजन केलें असतां प्रायश्चित्त. त्यास शंखस्मृतीचें वचन. नवश्राद्धाचे ठायीं भोजन केलें असतां चाद्रायण प्रायश्चित्त. मासिकाचे ठायीं भोजन केलें असता पराक् प्रायश्चित्त. सार्धमासिकाचे ठायीं अतिकृच्छ्र, षण्मासिकाचे ठायीं कृच्छ्र प्रायश्चित्त. ॥ २ ॥ आणि ऊनाब्दिकाचे ठायीं भोजन केलें असता कृच्छ्रपाद प्रायश्चित्त. अब्दि-

काचे ठायीं एकाह प्रायश्चित्त सांगितलें आहे. या पुढील श्राद्धभोजनास विशेष प्रायश्चित्त सांगितले नाहीं. ॥ ३ ॥ षट्त्रिंशन्मतांतील वचन. नवश्राद्धाचे ठायीं भोजन केलें असतां प्राजापत्य प्रायश्चित्त, अद्यमासिकाचे ठायीं पादोनप्राजापत्य प्रायश्चित्त, त्रिपक्षकाचे ठायीं अर्ध प्राजापत्य, द्व्यमासिकाचे ठायीं द्विपाद प्रायश्चित्त. ॥ ४ ॥ षण्मासिक आणि प्रथमाब्दिक याचे ठायीं पादोनकृच्छ्र प्रायश्चित्त सांगितलें आहे. याहून अन्यमासिक श्राद्धाचे ठायीं त्रिरात्र प्रायश्चित्त. द्वितीयाब्दिकाचे ठायीं भोजन केलें असतां एक दिवस उपोषण करणें हें प्रायश्चित्त सांगितलें आहे. हें सर्व ब्राह्मणाच्या श्राद्ध भोजनाच्या संबंधाचे आहे. ॥ ५ ॥ चतुर्थादि पार्वण श्राद्धाचे ठायीं भोजन केलें असतां सहा प्राणायाम करावेत. त्रिमासादि संवत्सर पर्यंत जीं श्राद्धें त्याचे ठायीं भोजन केलें असतां एक उपवास प्रायश्चित्त. ॥ ६ ॥ नांदीश्राद्धाचे ठायीं भोजन केलें असतां तीन प्राणायाम प्रायश्चित्त सांगितलें आहे. गुण स्वभाव इत्यादिकांनीं भिन्न अशाच्या सपिंडनश्राद्धाचे ठायीं नक्ताचरण सांगितलें आहे. व्रतपारणा निमित्तानें जें श्राद्ध त्याचें ठायीं भोजन केलें असतां नक्तभोजन सांगितलें आहे. असें भारद्वाजानें सांगितलें आहे. ॥ ७ ॥ ब्राह्मणाच्या श्राद्ध भोजनाचे ठायीं जें प्रायश्चित्त सांगितलें असेल त्याच्या द्विगुणित क्षत्रियांच्या श्राद्धभोजनीं, वैश्याच्या श्राद्धभोजनीं त्रिगुणित आणि शूद्रश्राद्धभोजनाचे ठायीं चतुर्गुणित प्रायश्चित्त जाणावें. ॥ ८ ॥ जीं न्यूनाधिक प्रायश्चित्तें श्राद्ध भोजनास सांगितलीं असतील, तीं आपत्ची आमश्राद्ध आणि अनेच्छेनें झालेलें जें श्राद्धभोजन त्यासंबंधाचें आहे. ॥ ९ ॥ या प्रमाणें पुढेंही श्राद्धभोजनीं योजना करावी. जेथें अधिक प्रायश्चित्त सांगितलें असेल तेथें इच्छेनें आणि आपत्ची नसतां श्राद्धभोजन केलें असतां जाणावें. ॥ १० ॥ सर्पादिकांच्या दंशानें मृत झालेल्या मनुष्याच्या श्राद्ध भोजनाविषयीं भरद्वाजांचें वचन. चांडाळ आणि साप ब्राह्मण, वीज, व्याघ्रादिक प्राणी यापासून मरण पापी मनुष्यास येतें. तसेंच पडून नाश पावलेले, विष खाऊन मरण पावलेले यांच्या षोडशश्राद्धाच्या ठायीं भोजन केलें असतां चांद्रायण व्रताचरण करावें. ॥ ११ ॥ १२ ॥ जे पंक्तीस अन्नव्यवहार करण्यास अयोग्य अशा मनुष्यांच्या अकराव्या दिवसाच्या श्राद्धाचें ठायीं भोजन केलें असतां शिशुचांद्रायण प्रायश्चित्त सांगितलें आहे. ॥ १३ ॥ ब्रह्मचर्यानें मासिकादिक श्राद्धाच्या ठायीं भोजन केलें असतां त्रिरात्र उपोषण करावें, आणि तीन प्राणायाम करून घृत प्राशन केल्यानें शुद्धता होते. ॥ १४ ॥ १५ ॥ हें न समजून भोजन केल्याचें आहे. जो ब्रह्मचारी मधु, मांस भक्षण करितो त्यानें प्राजापत्य कृच्छ्र करून ब्रह्मचर्य व्रताची समाप्ती करावी. पूर्व युगाचे ठायीं मांसानें श्राद्ध करण्याची चाल असे. कलियुगाचे ठायीं श्राद्धास मांसाचा निषेध सांगितला आहे. द्वितीय, तृतीय वार्षिक श्राद्धाचे ठायीं भोजन केलें असतां नक्त भोजन करावें. आपत्ची नसून भोजन केलें असतां उपवास करावा. ॥ १७ ॥ गुरु, ब्राह्मण इत्यादिकांस द्रव्य देण्याकरितां नवश्राद्ध, महैकोद्दिष्ट श्राद्ध, द्वादशाह श्राद्ध याचे ठायीं भोजन केलें असतां त्रिरात्र उपोषण करावें. आमश्राद्ध, हेमश्राद्ध यांचे ठायीं

अर्ध प्रायश्चित्त जाणावें. षट्त्रिंशन्मतांतील वचनाचा अर्थ असाच आहे. ज्या श्राद्धभोजनास प्रायश्चित्त सांगितलें नसेल त्यास उशनाचें वचन. श्राद्धभोक्ता यानें गायत्री मंत्रानें दहा वेळा अभिमंत्रण केलेलें पाणी प्राशन करून नंतर संध्या करावी ह्मणजे तो शुद्ध होतो. ॥ १७ ॥

## अथ संस्कारान्नभोजने प्रायश्चित्तनिर्णयः ॥

चौलनामकरणजातकर्मांगश्राद्धेषु चूडाहोमांते च सीमंते सोमे चाधानांगब्रह्मोदने चामत्यापदि च भुक्तौ सांतपनम् मत्यापदि चांद्रं॥ अन्यसंस्कारेषूपवासः ॥ अनापदि त्रिरात्रं ॥ १ ॥ तथाचांगिराः ॥ जन्मप्रभृति संस्कारे बालस्यान्नस्य भोजने ॥ असपिंडैर्नभोक्तव्यं स्मशानांते विशेषतः ॥ २ ॥ निर्वृत्ते व्रतहोमे तु प्राक् नामकरणात्तथा ॥ चरेत्सांतपनं भुक्त्वा जातकर्मणि चैव हि॥ ३ ॥ अतोन्येषु तु भुक्त्वान्नं संस्कारेषु द्विजोत्तमः ॥ नियोगादुपवासेन शुध्यते निंद्यभोजनैः ॥ ४ ॥ धौम्यः ॥ ब्रम्होदने च सोमे च सीमंतोन्नयने तथा ॥ जातकर्मनवश्राद्धे द्विजश्चांद्रायणं चरेत् ॥ ब्रम्होदने उपनयनांगभूते ॥ ५ ॥ आपस्तंबः ॥ याजकान्नं नवश्राद्धं संग्रहे चैव भोजनं ॥ स्त्रीणां प्रथमगर्भे च द्विजश्चांद्रायणं चरेदिति ॥ ६ ॥

## संस्कारान्नभोजनाच्या प्रायश्चित्ताचा विचार.

चौलसंस्कार, नामकरण, जातकर्मसंबंधाचें श्राद्ध, चूडाहोम, सीमंतोन्नयन, सोमयाग, आधानांगभूत ब्रह्मोदन, याचे ठायीं न समजून आपत्काळ असतां भोजन केलें तर सांतपन प्रायश्चित्त सांगितलें आहे. समजून या संस्काराचे ठायीं भोजन केलें असतां चांद्रायण प्रायश्चित्त सांगितलें आहे अन्यसंस्काराचे ठायीं भोजन केलें असता त्रिरात्र उपोषण करावें. ॥ १ ॥ यास अंगिराचें वचन–जन्मापासून जे संस्कार त्याचे ठायीं, तसेंच बाळकाचें अन्न प्राशननिमित्तक जें भोजन त्याचे ठायीं सपिंडाहून भिन्न मनुष्यानें भोजन करूं नये. तसेंच प्रेतोद्देशश्राद्धाचे ठायीं भोजन करूं नये. ॥ २ ॥ व्यासाचें वचन–व्रत होम झाले असतां, तसेंच नामकर्णाचे पूर्वी, तसेंच जातकाचे ठायीं भोजन केलें असतां सांतपन प्रायश्चित्त आचरण करावें. ॥ ३ ॥ याहून अन्य संस्काराचे ठायीं भोजन केलें असतां एक उपवासानें शुद्धता होते. ॥ ४ ॥ धौम्याचें वचन–उपनयनांगभूत जे ब्रह्मोदन त्याचे ठायीं, तसेंच सोमयाग, सीमंतोन्नयन, जातकर्मनिमित्त श्राद्ध, नवश्राद्ध याचे ठायीं भोजन केलें असता चांद्रायण प्रायश्चित्त सांगितलें आहे. ॥ ५ ॥ आपस्तंबाचें वचन–यज्ञकरणाराचें अन्न, नवश्राद्ध, विवाह, स्त्रियांचा प्रथमगर्भसंस्कार याचे ठायीं भोजन केलें असतां चांद्रायण प्रायश्चित्तानें शुद्धता होते. ॥ ६ ॥

## अथ परिग्रहाभोज्यभोजनप्रायश्चित्तनिर्णयः ॥

यत्स्वरूपतोऽनिषिद्धमप्यशिष्टपुरुषस्वामिकतया अभोज्यं भण्यते तत्परिग्रहा

शुचि॥तत्र मनुः॥नाश्रोत्रियतते यज्ञे ग्रामयाजिहुते तथा॥स्त्रिया क्लीवेन च हुते भुंजीत ब्राह्मणः क्वचित् ॥ १ ॥ मत्तक्रुद्धातुराणां तु न भुंजीत कदाचन ॥ गणान्नं गणिकानां च विदुषा च जुगुप्सितम् ॥ २ ॥ स्तेनगायकयोश्चान्नं तक्ष्णोवार्द्धुषिकस्यच ॥ दीक्षितस्य कदर्यस्य बद्धस्य निगडैस्तथा ॥ ३ ॥ अभिशस्तस्यपंढस्य पुंश्चल्यादांभिकस्य च ॥ चिकित्सकस्य मृगयोः क्रूरस्योच्छिष्टभोजिनः ॥४॥ उग्रान्नं सूतिकान्नं च पर्याचांतमनिर्दशम् ॥ अनर्चितं वृथामांसमवीरायाश्च योषितः॥५॥द्विषदन्नं नगर्यन्नं पतितान्नमवक्षुतं॥पिशुनानृतिनोश्चैव क्रतुविक्रयकस्य च॥६॥शैलूषतंतुवायान्नं कृतघ्नस्यान्नमेव च ॥ कर्मारस्य निषादस्य रंगावतरणस्य च ॥ ७ ॥ सुवर्णकर्तुर्वेणस्य शस्त्रविक्रयिणस्तथा ॥ श्ववतां शौंडिकानां च चैलनिर्णेजकस्य च ॥ ७ ॥ रंजकस्य नृशंसस्य यस्य चोपपतिर्गृहे ॥ मृष्यंति ये चोपपतिं स्त्रीजितानां च सर्वशः ॥ ९ ॥ अनिर्दशं च प्रेतान्नमतुष्टिकरमेवच ॥ १० ॥ एवं कदर्यस्यान्नमपि न भक्षयेत् ॥ तत्र कदर्यलक्षणंआत्मानं धर्मकृत्यं च पुत्रदारांश्च पीडयेत् ॥ लोभाद्यः पितरौ भृत्यान् सकदर्यइति स्मृतः ॥ ११ ॥

## भोजन करण्यास अयोग्य जे त्याचें अन्न भक्षण केलें असतां प्रायश्चित्ताचा विचार.

जे वस्तु निषिद्ध नसूनही नीचादि पुरुषांच्या स्वामित्वानें भोजन करण्यास अयोग्य असें होतें. त्यास परिग्रहाशुची अशी संज्ञा आहे. याविषयीं मनूचें वचन ज्या यज्ञात वेदपठन करणारे ब्राह्मण नाहींत त्या यज्ञांतील अन्न भक्षण करूं नये. तसेंच सर्व गांवाबद्दलचा जो यज्ञ असेल त्याही भोजन करू नये. ( समुदायाचें अन्न जेथें असेल ) स्त्रियेनें अथवा नपुंसकानें केलेला जो होम त्याचे ठायीं भोजन करू नये. ॥ १ ॥ उन्मत्त, क्रोधयुक्त, अत्यंत रोगी त्याचें अन्न भक्षण करूं नये. समुदायाचें अन्न जेथें असेल तेथें भोजन करूं नये. तसेंच वेश्यास्त्रीचें अन्न विद्वान मनुष्यानें ज्याची निंदा केली आहे तें अन्न खाऊं नये. ॥ २ ॥ चोर, गायन करणारा, सुतार, वाढीदिढीनें अथवा व्याजवट्यानें उपजीविका करणारा, त्याचें, ज्यानें पूर्वी यज्ञ केला आहे त्याचें अन्न. अत्यंत कृपण मनुष्याचें अन्न, निगडा ( बेड्यानें ) नें बंधन ज्याचें केलें आहे त्याचें अन्न. ज्याचेवर महत्पाप केलें असा आरोप असेल त्याचें अन्न, नपुंसकाचें, जारिणी स्त्रीचें, दांभिक मनुष्याचें अन्न भक्षण करूं नये. वैद्याचें, शिकार करणारे ( व्याध पारधी ) लोकांचें, क्रूर मनुष्याचें, लोकांचें उच्छिष्ट भक्षण करणारा याचें अन्न भक्षण करूं नये. ॥ ३ ॥ ४ ॥ क्षत्रियापासून शूद्र कन्येचे ठायीं जो उत्पन्न झाला त्यास उग्र अशी संज्ञा आहे. त्याचें अन्न खाऊं नये. सूतिकान्न म्हणजे बाळंतिणीचें अन्न भक्षण करूं नये. पर्याचांत एकांतांत बसलेले त्यास अवमान करून अग्रभागीं एकानें भोजन केलें असेल आणि दुसऱ्यानें

आचमन केलें असेल, तर त्यास पर्याचांत असें ह्मणतात. तें अन्न भक्षण करूं नये. अनिर्देशं ज्यांस सूतक अथवा मृतक असेल त्याचे दहादिवसांचे आंतील अन्न, सत्कार करण्यास योग्य असोन त्याचा जेथें अपमान केला जातो, तें अन्न, देवतादिकांच्या उद्देशानें न केलेलें अन्न भक्षण करूं नये. पतिपुत्ररहित अशा स्त्रियेचें अन्न भक्षण करूं नये. ॥ ५॥ शत्रूचें अन्न, सर्व गांवांनीं मिळून जें भोजन केलें असेल तें अन्न भक्षण करूं नये. पतित जो असेल त्याचें अन्न, ज्याचे वर शिंकलें आहे तें अन्न भक्षण करूं नये. चहाडी खोर, खोटें बोलणारा, यज्ञविक्रय करणारा, याचें अन्न भक्षण करूं नये. ॥ ६ ॥ नट, कोष्टी, यांचें अन्न भक्षण करूं नये. केलेले उपकार न जाणणारा यांचें अन्न भक्षण करूं नये. लोहार, फासीपारधी, रंगारी, ॥ ७ ॥ सोनार, बुरूड, शास्त्रें विकणारा, कुत्रें बाळगून शिकार करणारा कलाल, परीट, ॥ ८ ॥ वस्त्रें रंगविणारा, क्रूर मनुष्य, ज्याच्या घरामध्ये जार असोन त्यांस जे सहन करितात त्याचें अन्न, ज्या घरांत मनुष्य मेला असेल त्या घरचें अन्न. ॥ ९ ॥ मनास संतोष न देणारें असें अन्न भक्षण करूं नये. ॥ १० ॥ याप्रमाणें कृपणाचेही अन्न भक्षण करूं नये. कृपणाचें लक्षण. जो आपल्या प्रत धर्मकृत्य, पुत्र, स्त्री, आई, बाप, चाकर यांस द्रव्यलोभानें पीडा करितो त्यास कृपण असें ह्मणावें. ॥ ११ ॥

पैठीनसिः—कुनखीश्यावदंतः पित्राविवदमानः स्त्रीजितः कुष्ठी पिशुनः सोमविक्रयी वाणिजको ग्रामयाजकोभिशस्तोवृषल्यामभिजातः परिवित्तिः ॥ परिविधिदानो दिधिषूपतिः पुनर्भूपुत्रश्चौरः ॥ कांडपृष्ठः सेवकश्चेत्यभोज्यान्नाः ॥ अभोज्यान्ना अपांक्त्या अश्राद्धार्हाः ॥ एषां भुक्त्वाचाविज्ञानात् त्रिरात्रमुपवासः ॥ ब्रह्मचर्याद्यन्नभोजने वृद्ध याज्ञवल्क्यः ॥ पतिश्च ब्रह्मचारी च पक्वान्नस्वामिनावुभौ तयोरन्नं न भोक्तव्यं भुक्त्वा चांद्रायणं चरेदिति भरद्वाजः ॥ पक्षे वा यदि मासे यस्य नाश्नंति देवताः ॥ भुक्त्वा दुरात्मनस्तस्य द्विजश्चांद्रायणं चरेदिति ॥ निराचारस्य विप्रस्य निषिद्धाचरणस्य च ॥ अन्नं भुक्त्वा द्विजः कुर्याद्दिनमेकमभोजनमिति षट्त्रिंशन्मतोक्तं ॥ उपपातकयुक्तस्य अब्दमेकं निरंतरम् ॥ अन्नं भुक्त्वा द्विजः कुर्यात्पराकं तु विशोधनमिति ॥ यस्तु बलात्कारेण भोज्यते तस्य विशेषमाहापस्तंबः ॥ बलाद्दासीकृता ये तु म्लेंच्छचांडालदस्युभिः ॥ अशुभंकारिताः कर्मगवादिप्राणिहिंसनं ॥ १ ॥ उच्छिष्टमार्जनं चैव तथोच्छिष्टस्य भोजनं ॥ खरोष्ट्रविड्वराहाणामामिषस्य च भक्षणं ॥ २ ॥ तत् स्त्रीणां च तथासंगस्ताभिश्च सहभोजनम् ॥ मासोषिते द्विजातौ तु प्राजापत्यं विशोधनम् ॥ ३ ॥ चांद्रायणं त्वाहिताग्नेः पराकस्त्वथवा भवेत् ॥ चांद्रायणं पराकं च चरेत्संवत्सरोषितः ॥ ४ ॥ संवत्सरोषितः शूद्रो मासार्द्धं यावकं पिबेत् ॥ मासमात्रोषितः शूद्रः कृच्छ्रपादेन शुध्यति ॥ ऊर्ध्वं संवत्सरात्कल्प्यं प्रायश्चित्तं द्विजोत्तमैः ॥ संवत्सरैस्त्रिभिश्चैव तद्भावं संनिपच्छतीति ॥ ५ ॥

पैठीनसीचें वचन. ज्याचीं नखें वाईट आहेत त्याचें अन्न भक्षण करू नये. ज्याचे दात काळे आहेत त्याचे अन्न, आपल्या बापाबरोबर जो वाद करितो त्याचें अन्न, स्त्रीचे स्वाधीन झालेला त्याचें अन्न, कुष्टी मनुष्याचें अन्न, चाढी सागणाराचें अन्न, सोमरस विकणाराचे अन्न, याणीपणा करणाराचें अन्न, सर्व गांवाबद्दल यज्ञ करणाराचें अन्न, ज्याच्या संबधानें पातकाचा आरोप आहे त्याचें अन्न, शूद्रस्त्रियेपासून जाहलेला त्याचें अन्न, ज्येष्ठभ्रात्याचें लग्न न होतां कनिष्ठ बंधूचें लग्न झालें आहे त्याचें अन्न, ज्या स्त्रियेचें दोनवेळा लग्न झालें आहे, तिचे मुलाचें अन्न, चोराचें अन्न, धनुष्यकरणाराचें अन्न, नोकरमनुष्याचें अन्न भक्षण करू नये. व हे श्राद्धासही बसवू नयेत. न समजून यांचें अन्न भक्षण केलें असता त्रिरात्र उपोषण करावें. ब्राम्हचर्यादिकांचें अन्न भक्षण केलें असता वृद्धयाज्ञवल्क्याचें वचन—यति आणि ब्रम्हचारी हे शिजलेल्या अन्नाचे मालक आहेत. सबब त्याचें अन्न भक्षण करू नये. केलें असता चांद्रायण प्रायश्चित्त सांगितलें आहे. भरद्वाजाचें वचन—ज्या मनुष्याचे घरीं एका पक्षामध्यें अथवा महिन्यामध्यें देवाच्या उद्देशानें कांहीं भोजन होत नाहीं त्या दुष्टाच्या घरीं भोजन केलें असता चांद्रायण प्रायश्चित्त करावें. आचार रहित अथवा निषिद्ध आचरण करणारा अशा ब्राम्हणाचें अन्न भक्षण करू नये. केलें असतां एक दिवस उपोषण करावें असें षट्त्रिंशन्मतांत सांगितलें आहे. जो वर्षभर पर्यंत उपपातकानें युक्त झाला असेल त्याचें अन्न भक्षण केलें असता पराक प्रायश्चित्त सांगितलें आहे. बलात्कारानें अभक्ष्यभक्षण झालें असता त्याचा विचार—आपस्तंबाचें वचन—यवन, चांडाळ, चोर यांनीं बलात्कारानें दास करून अशुभ कर्म करण्यास लावून गाई इत्यादिकांची हिंसा ॥१॥ तसेंच उच्छिष्ट पदार्थांचें सेवन भक्षण, गाढव, उंट, डुकर यांचें मांस भक्षण ॥२॥ त्यांच्या स्त्रियांसी समागम, त्यांच्याशीं सहवर्तमान भोजन असें करून एक महिना ब्राह्मण राहिला असता ब्राह्मणानें प्राजापत्य प्रायश्चित्त केल्यानें शुद्धता होते ॥३॥ अग्निहोत्री असल्यास चांद्रायण आणि पराक हे दोन्हीं प्रायश्चित्ताचरण करावेत ॥४॥ शूद्र संवत्सर पर्यंत चांडालादिकांच्या घरामध्यें राहिला असता पधरा दिवस पर्यंत यवाचा काढा प्राशन करावा महिनाभर पर्यंत राहिला असता याच प्रमाणानें प्रायश्चित्ताची योजना करावी. तीन वर्षे पर्यंत चांडालादिकाचे घरीं राहिला असतां तद्रूपच होतो त्यास प्रायश्चित्त नाहीं.

## अथ जातमृताशौचान्नभोजने प्रायश्चित्तनिर्णयः ॥

॥ विष्णुः ॥ ब्राम्हणादीनामशौचे यः सकृदेवान्नमश्नाति तस्य तावदशौच ॥ यावत्तेषामशौच तदव्यपगमे प्रायश्चित्त कुर्यादिति ॥ १ ॥ कामकारे मार्कंडेयः ॥ भुक्त्वा ब्राम्हणाशौचे चरेत्सांतपन द्विज ॥ भुक्त्वातु क्षत्रियाशौचे तथाकृच्छ्रो विधीयते ॥२॥ वैश्याशौचे तथा भुक्त्वा महासांतपन चरेत् ॥ शूद्रस्यैव तथा भुक्त्वा द्विजश्चांद्रायण चरेत् ॥३॥ अत्र सर्वत्र मृतकग्रहणं मृतस्याप्युपलक्षणम्॥अत्राभ्यासे शास्रोक्त ॥

शूद्रस्यसूतके भुक्त्वा षण्मासान्कृच्छ्रमाचरेत् ॥ वैश्यस्य तु तथाभुक्त्वा त्रीन्मासान्व्रतमाचरेत् ॥ ४ ॥ क्षत्रियस्य तथा भुक्त्वाद्वौ मासौ व्रतमाचरेत् ॥ ब्राह्मणस्य तथाशौचे भुक्त्वा मासं व्रती भवेदिति ॥ ५ ॥ अकामतः छागलेनोक्तं ॥ अज्ञानाद्भुंजते विप्राः सूतके मृतके तथा ॥ प्राणायामशतं कृत्वा शुध्यंते शूद्रसूतके ॥ ६ ॥ वैश्ये षड्भिर्भवेद्राज्ञो विंशतिर्ब्राह्मणे दश॥ एकाहं चत्र्यहं पंचसप्तरात्रमभोजनम् ॥ ७ ॥ ततः शुद्धो भवेद्विप्रःपंचगव्यंपिबेत्ततः॥ एकाहादयः क्रमेणब्राह्मणाद्यशौचान्नभोजनेविज्ञेयाः॥ अंगिराः ॥ सूतके तु यदाविप्रो ब्रह्मचारीव्रतेस्थितः ॥ पिबेत्पानीयमज्ञानात्समश्नीयात्स्पृशेद्यदि ॥ ८ ॥ पानीयपाने कुर्वीत पंचगव्यस्य भक्षणम् ॥ त्रिरात्रं भोजने प्रोक्तं स्पृष्ट्वा स्नानंविधीयते ॥ ९ ॥ ब्राह्मे ॥ योगोमघात्रयोदश्याः कुंजरच्छायसंज्ञकः ॥ भवेन्मघायां संस्थेदोहंसश्चैवकरे स्थितः ॥ १० ॥ सूतके मृतके वाथग्रस्तयोः शशिसूर्ययोः ॥ च्छायायां कुंजरस्याथ भुक्त्वा तु नरकं व्रजेत् ॥११॥ भुक्त्वा प्रमादाद्विप्रस्तु सकृचांद्रायणं चरेत्॥एतच्च प्रायश्चित्तं यज्जातीयस्याशौचिनोन्नं भुक्तं तज्जात्युचितमाशौचं कृत्वा तदंते कार्यं॥१२॥तथा च विष्णुः ॥ ब्राह्मणादीनामाशौचे यः सकृदन्नमश्नाति तस्य तावदाशौचं यावत्तेषां॥अशौचापगमे प्रायश्चित्तं कुर्यादिति ॥१३॥ ब्राह्मे ॥ मत्तोन्मत्तातुराणां च प्रभूर्पोवा कदाचन ॥ तद्गृहेनान्नमश्नीयात्प्रवसत्यग्निहोत्रिणि ॥ एतेषां तु गृहे भुक्त्वा द्विजश्चांद्रायणं चरेत् ॥ जाताशौचे आहिताग्न्याशौचे च लघुप्रायश्चित्तंयोज्यंइत्येके ॥ अशौचे भुक्तवंतं न स्पृशेदापुरीषोत्सर्गात् ॥ इदं च प्रायश्चित्तं तत्तद्वर्णानामाशौचव्यपगमे कार्यं ॥ तावदाशौचान्नभोजिनोप्याशौचात् ॥ एतच्चाशौचिस्वामिकान्नभोजनएव अशौचिस्पृष्टाशौचिस्वामिकान्नभोजने तु तत्तत्प्रायश्चित्तद्वयसमुच्चयइत्यन्यत्रविस्तरः ॥ १५ ॥ अशौचिगृहेन्यदीयान्नभोजनेपिनक्तमुपवासोवा प्रायश्चित्तम् ॥ अन्नसत्रप्रवृत्तस्याग्निहोत्रिणश्चाशौचवत्त्वेपि तदीयामान्नेपु दोषोनतयोः पक्वान्नग्रहणे तु क्रमेणैकरात्रं यावकव्रतं द्वादशचतुर्विंशतिप्राणायामावा ॥ १६ ॥

## वृद्धी अथवा सूतकयांतील अन्न भक्षण केलें असतां प्रायश्चिताचा विचार.

विष्णूचे वचन–ब्राह्मणादिकांच्या अशौचामध्यें जो एकवेळा अन्न भक्षण करितो त्यास जो काळ पर्यंत अशौच अशौची मनुष्य न असेल तों पर्यंत अन्नभक्षण करणारासही आहे. सबब अशौच निवर्त्त झाल्यावर प्रायश्चित्त करावें. ॥ १ ॥ इच्छेनें भोजन केलें असतां मार्कंडेयाचें वचन–ब्राह्मणाच्या अशौचामध्यें ब्राह्मणानें भोजन केलें असतां सांतपन प्रायश्चित्ताचरण करावें. क्षत्रियाच्या अशौचामध्ये भोजन केलें असतां कृच्छ्र प्रायश्चित्ताचरण करावें. ॥ २ ॥ वैश्याच्या

अशौचामध्यें भोजन केलें असता महासांतपन प्रायश्चित्ताचरण करावें. शूद्राच्या अशौचाचे ठायीं ब्राह्मणानें भोजन केलें असता चांद्रायण प्रायश्चित्त करावें. ॥ ३ ॥ येथें सूतक या शब्दानें मृतकही घ्यावयाचें आहे. निरंतर भोजनाचा अभ्यास असेल तर शंखस्मृतींतील वचन-शूद्राच्या सूतकामध्यें भोजन केलें असता साहा महिनेपर्यंत कृच्छ्र प्रायश्चित्ताचरण करावें. वैश्याच्या अशौचाचे ठायीं तीन महिने. ॥ ४ ॥ क्षत्रियाच्या अशौचामध्यें दोन महिने, ब्राह्मणाच्या अशौचामध्यें भोजन केलें असता महिनाभरपर्यंत व्रताचरण करावें. ॥ ५ ॥ छागलाचेंवचन–अज्ञानानें ब्राह्मणाच्या जननाशौचामध्यें अथवा मृताशौचामध्यें भोजन केलें असता शमर प्राणायाम केल्यानें शुद्धता होते. ब्राह्मण, क्षत्रिय, वैश्य, आणि शूद्र याचे अशौचाचे ठायीं भोजन केलें असता, एक दिवस, तीन दिवस, पांच दिवस, सात दिवस, असें क्रमानें भोजन करूं नये. नंतर पंचगव्य प्राशन करावें. अंगिराचें वचन–ब्रह्मचाऱ्यानें सूतकामध्यें अज्ञानानें सूतकी मनुष्याचें पाणी प्यालें असता पंचगव्य प्राशन करावें. भोजन केलें असता त्रिरात्र उपोषण करावें. स्पर्श केला असता स्नान करावें. ॥ ८ ॥ ९ ॥ ब्रह्मपुराणांतील वचन-त्रयोदशीदिवशीं मघानक्षत्र आलें असता गजच्छाया योग होतो. तसेंच सूर्य हस्तनक्षत्रीं असता, चंद्र मघानक्षत्रास आला असता गजछाया योग होतो. या योगाचे ठायीं तसेंच जननाशौच अथवा मृताशौच, चंद्रसूर्याच्या ग्रहणामध्यें भोजन केलें असता, तसेंच कुंजरच्छायेचे ठायीं भोजन केलें असता मनुष्य नरकास जातो. ॥ ११ ॥ अज्ञानानें भोजन केलें असता चांद्रायण प्रायश्चित्त करावें. हें प्रायश्चित्त ज्याचें अन्न भक्षण केलें असेल त्याचें अशौच सपल्यानंतर करावें. ॥ १२ ॥ विष्णुस्मृतीच्या वचनाचा असाच अर्थ आहे.॥१३॥ ब्रह्मपुराणांतील वचन-मत्त, उन्मत्त, आतुर, मुमूर्षु ज्या घरांतील अग्निहोत्री गांवास गेला आहे त्या घराचे ठायीं भोजन करूं नये भोजन केलें असता चांद्रायण प्रायश्चित्त करावें. ॥१४॥ जननाशौच, अग्निहोत्र्याचें अशौच याचे ठायीं भोजन केलें असता अल्पप्रायश्चित्ताची योजना करावी. असें कित्येक ग्रंथकार ह्मणतात. अशौचाचे ठायीं भोजन करणारास पुरीषोत्सर्ग होईपर्यंत स्पर्श करूं नये. हें सर्व प्रायश्चित्त ज्या वर्णास जें अशौच सांगितलें असेल तें अशौच गेल्यानंतर प्रायश्चित्त करावें. कारण ज्यास सूतक आहे त्याचें अन्न भक्षण केलें असता जोंपर्यंत सुतकी मनुष्यास सूतक आहे तोंपर्यंत अन्न भक्षण करणारास अशौच जाणावें. अशौचीनें शिवलेलें, आणि अशौचिस्वामिक, असें अन्न भक्षण केलें असता अशौचस्पृष्टान्नाबद्दलचें प्रायश्चित्त आणि अशौचिस्वामिकान्न भक्षणा बद्दल असे दोन प्रायश्चित्ता ची योजना करावी. ॥ १५ ॥ अशौचिमनुष्याच्या घरामध्यें ज्यास अशौच नाहीं अशाचें अन्न भक्षण केलें असतां सायंकाल पर्यंत उपोषण करावें. अन्नसत्राचे ठायीं तसेंच अग्निहोत्र्याच्या अशौचामध्यें आमान्नग्रहण केलें असतां दोष नाहीं. शिजलेलें अन्न भक्षण केलें असतां क्रमें करून एकरात्र पायसप्राशन, द्वादश, चोवीस प्राणायाम केल्यानें शुद्धता होते. ॥ १६ ॥

## अथ नटादिकर्मकरणप्रायश्चित्तनिर्णयः ॥

वशीकरणोच्चाटनादिरूपेऽभिचारे शक्तौ सत्यामपालनरूपे विनाकारणं गृहान्निष्कासने संभोगादित्यागरूपेच भार्यात्यागेपि उपपातकसामान्यप्रायश्चित्तानि शक्त्याद्यपेक्षया योज्यानि ॥ अत्रोपपातकप्रायश्चित्तेषु यथोपदिष्टं विप्रस्यैव ॥ क्षत्रियस्य पादोनं ॥ वैश्यस्यार्धं ॥ शूद्रस्य पादं तत्स्त्रीणां तदर्धं ॥ रजस्वलानां तत्रतत्रोक्तमेव कार्यम् ॥ इतिश्रीधारूरकरेत्युपनामकेन पौंडरीकक्षेत्रनिवासिना दाजीसूनुना विठ्ठलेन विरचिते प्रायश्चित्तव्यवहारप्रकाशे उपपातकप्रायश्चित्तनिर्णयः समाप्तः ॥ श्रीरस्तु ॥ शुभं भवतु ॥ पांडुरंगार्पणमस्तु ॥

## नटादिकर्म केलें असतां प्रायश्चित्ताचा विचार.

नटादिकांचें कर्म केलें असतां, तसेंच वशीकरण, उच्चाटन इत्यादिक अभिचारी कर्मे केलीं असतां, आपल्या स्त्रियेचा त्याग केला असतां, येथें त्याग ह्मणजे आपणास शक्ती असतांही तिचें पालन न करणें, तसेंच कारणा वांचून तिजला घराचे बाहेर काढून देणें, तिच्याशीं संभोग इत्यादिक न करणें, असें केलें असतां उपपातकास सामान्येकरून प्रथम जीं प्रायश्चित्तें सांगितलीं तीं प्रायश्चित्तें शक्त्यादिकांचा विचार करून योजना करावी. हीं जीं उपपातक प्रायश्चित्तें सांगितलीं त्यांतील शास्त्रांत सांगितल्याप्रमाणें पूर्ण प्रायश्चित्त ब्राह्मणासच आहे क्षत्रियास पाऊणपट, वैश्यास अर्धे, शूद्रास पाद, शूद्रस्त्रियेस त्याचें अर्धें, रजस्वलास्त्रियांस त्या त्या प्रकरणीं सांगितल्या प्रमाणें प्रायश्चित्त जाणावें.

या प्रमाणें पंढरपूरक्षेत्रांत राहणारे विठ्ठल दाजी शास्त्री धारूरकर यांनीं केलेला प्रायश्चित्त व्यवहारप्रकाशग्रंथांतील उपपातकप्रायश्चित्ताचा निर्णय जाणावा. ॥ श्रीरस्तु ॥

## ॥ अथ जातिभ्रंशकरप्रायश्चित्तनिर्णयः ॥

विप्रपीडाकरणं अनाघ्रेयमद्यलशुनादिघ्राणं मित्रकौटिल्यं पुंसि मैथुनमेतानि जातिभ्रंशकराणि ॥ १ ॥ तथा च मनुः ॥ ब्राह्मणस्य रुजः कृत्वाघ्रातिरघ्रेयमद्ययोः ॥ जैम्ह्यं पुंसि च मैथुन्यं जातिभ्रंशकरं स्मृतं ॥ २ ॥ विष्णुस्तु पशुमैथुनमपि पपाठ ॥ एतत्प्रत्येकं जातिभ्रंशकरं न तु समस्तं ॥ इमान्येव प्रायश्चित्तप्रकरणप्रायश्चित्तरत्न, प्रायश्चित्तमुक्तावलि, प्रायश्चित्तेंदुशेखर, प्रायश्चित्तमयूखप्रायश्चित्तकदंबादौ प्रोक्तानि ॥ ॥ ३ ॥ प्रायश्चित्तमाह मनुः ॥ जातिभ्रंशकरं कर्म कृत्वान्यतममिच्छया ॥ चरेत्सांतपनं कृच्छ्रं प्राजापत्यमनिच्छया ॥ ब्राह्मणस्य रुजाद्युक्तजातिभ्रंशकरकर्मोक्तंतन्मध्यादन्यतममपिकर्म कृत्वा सांतपनं सप्ताहसाध्यं कृच्छ्रं व्रतं चरेत् ॥ अनिच्छयाप्राजापत्यं चरेत् ॥ बृहस्पतिनात्रविशेषउक्तोयथा ब्राह्मणस्य रुजः कृत्वा रासभादिप्रमापणं ॥

निंदितेभ्योधनादानं कृच्छ्रार्द्धं व्रतमाचरेदिति ॥ ५ ॥ प्रायश्चित्ताशक्तौ धेनुदानं तदभावे पट् कार्षापणाः ब्राह्मणाय देयाः ॥ इति जातिभ्रंशकरप्रायश्चित्तनिर्णयः ॥

## जातिभ्रंशकर प्रायश्चित्ताचा विचार.

ब्राम्हणास पीडाकरणें, वास घेण्यास .अयोग्य असें दारू, लसून इत्यादिक पदार्थ त्याचा वास घेणें, मित्राविषयीं कुटिलपणा करणें पुरुषाचे ठायीं मैथुन करणें हीं जातिभ्रंश करणारीं पातकें सांगितलीं आहेत. ॥ १ ॥ त्याविषयीं मनूचें वचन – ब्राम्हणास पीडा करणें, वास घेण्यास अयोग्य जे मद्यादिपदार्थ यांचा वास घेणें, कुटिलस्वभावानें वागणें, पुरुषाचे ठायीं मैथुन करणें हीं जातिभ्रंशकारक पातकें जाणावीं. ॥ २ ॥ विष्णूनें पशुमैथुनाचीही यांतच गणना केली आहे. हे प्रत्येक जातिभ्रंश करणारें आहे. प्रायश्चित्तरत्न, प्रायश्चित्तमुक्तावलि, प्रायश्चित्तेंदुशेखर, प्रायश्चित्तमयूख, प्रायश्चित्तकदंब, इत्यादिक ग्रंथांचे ठायीं हींच पातकें सांगितलीं आहेत. ॥ ३ ॥ या विषयीं मनूचें वचन. जातिभ्रंश करणारे पातकांपैकीं कोणतें हैं पातक इच्छेनें केलें असतां सांतपनकृच्छ्र प्रायश्चित्त आचरण करावें. अनेच्छेनें केलें असतां प्राजापत्यकृच्छ्राचरण करावें. ॥ ४ ॥ बृहस्पतीनें या विषयीं विशेष सांगितलें आहे तें असें, ब्राह्मणास पीडा करणें गर्धभादिपशूस प्रमाणकरणें ( नाश करणें ) निंदितमनुष्या पासून द्रव्य घेणें हीं पातकें केलीं असतां अर्धकृच्छ्र प्रायश्चित्ताचरण करावें. ॥ ५ ॥ प्रायश्चित्त करण्यास शक्ति नसेल तर एक गोप्रदान करावें ॥ गोप्रदान करण्यास शक्ती नसल्यास साहा रुपये दान करावे. याप्रमाणें जातिभ्रंशकरप्रायश्चित्ताचा निर्णय जाणावा.

## अथ अपात्रीकरणप्रायश्चित्तनिर्णयः

तत्रमनुः ॥ निंदितेभ्यो धनादानं वाणिज्यं शूद्रसेवनं ॥ अपात्रीकरणं ज्ञेयमसत्यस्य च भाषणमिति ॥ १ ॥ उपपातकेषु शूद्रसेवाऽनापदि इदं तु सच्छूद्रस्यापदिसेवनमितिभेदः ॥ एवमन्यत्र ॥ तत्रविष्णुः ॥ अपात्रीकरणं कृत्वा तप्तकृच्छ्रेण शुध्यति ॥ शीतकृच्छ्रेण वा भूयो महासांतपनेन वा ॥ २ ॥ अज्ञानादपात्रीकरणे तप्तकृच्छ्रं वा ॥ ज्ञानात्तु महासांतपनं चांद्रायणं वा पूर्ववत् कार्यं ॥ ३ ॥

## अपात्रीकरणप्रायश्चित्ताचा विचार.

त्याविषयींचें मनूचें वचन–प्रतिग्रह घेण्यास अयोग्य अशीं जीं निंदितमनुष्यें त्यांपासून द्रव्य प्रतिग्रह घेणें, वाणीपणाचा व्यापार करणें, शूद्राची चाकरी करणें हे प्रत्येक अपात्रीकरण पातकास उत्पन्न करणारें आहे. ॥ १ ॥ उपपातकामध्यें शूद्राची सेवा आपत्ती नसतां केली असतांचें आहे. येथें जें सांगितलें शूद्रसेवन तें आपत्ती असल्यामुळें सत् शूद्राची चाकरी करणें असा भेद आहे याप्रमाणें अन्यहीं जाणावें. याविषयीं विष्णूनें प्रायश्चित्त सांगितलें आहे. ॥ २ ॥ अज्ञानानें अपात्रीकरण प्रायश्चित्त केलें असतां महासांतपन अथवा चांद्रायण प्रायश्चित्त करावें.

## अथ संकरीकरणप्रायश्चित्तनिर्णयः ॥

तत्र मनुः ॥ खराश्वोष्ट्रमृगेभानामजाविकवधस्तथा ॥ संकरीकरणं ज्ञेयं मीनाहिमहिषस्य च ॥ १ ॥ विष्णुः ॥ ग्रामारण्यपशूनां हिंसनं संकरीकरणमिति ॥ तत्र प्रायश्चित्तमाह विष्णुः ॥ संकरीकरणं कृत्वा मासमश्नीत यावकं ॥ कृच्छ्रातिकृच्छ्रमथवा प्रायश्चित्तं तु कारयेदिति ॥ २ ॥ अत्राज्ञानात्संकरी करणानुष्ठाने मासं यावकाशनम् ॥ ज्ञानात्कृच्छ्रातिकृच्छ्रं॥अज्ञानाभ्यासेतु चांद्रायणं॥ज्ञानाभ्यासेतु चांद्रायणद्वयं कल्प्यम्॥

## संकरीकरणप्रायश्चित्ताचा निर्णय.

त्याविषयीं मनूचें वचन—गर्दभ, घोडा, उंट, हरिण, हत्ती, बोकड, मेंढा, मच्छ, सर्प, महीष यांपैकीं कोणत्याही पशूचा वध केला असतां संकरीकरण पाप होतें. ॥ १ ॥ विष्णूनें गांव, अरण्य यांत उत्पन्न झालेले जे पशू यांची हिंसा करणें यास संकरीकरण पातक असें सांगितलें आहे. अज्ञानानें संकरीकरण पातक केलें असतां महिनाभर पर्यंत सातू गोमूत्रांत शिजवून भक्षण करून राहावें. ज्ञानानें केलें असतां कृच्छ्रातिकृच्छ्र प्रायश्चित्ताचरण करावें. ॥ २ ॥ अज्ञानानें पातक करण्याचा अभ्यास असेल तर चांद्रायण प्रायश्चित्त करावें. ज्ञानपूर्वक अभ्यास असेल तर दोन चांद्रायण प्रायश्चित्तें करावीं. याप्रमाणें संकरीकरण प्रायश्चित्ताचा निर्णय जाणावा. ॥ ३ ॥

## अथ मलिनीकरणप्रायश्चित्तनिर्णयः ।

तत्रमनुः ॥ कृमिकीटवयोहत्यामद्यानुगतभोजनं ॥ फलैधकुसुमस्तेयमधैर्यं च मलावहमिति ॥ १ ॥ कृमयः क्षुद्रजंतवः तेभ्यईषत्स्थूलाः कीटाः ॥ मद्यानुगतं मद्यपानसमयेयदवस्थितं फलमूलादि ॥ अत्र जातिभ्रंशकरत्वादिसंज्ञा रूढा नयौगिकी ॥ अघ्रेयाघ्राणेपि जातिभ्रंशापत्तेः ॥ क्षत्रियादीनां पात्रत्वाऽभावाचान् भत्यपात्रीकरणसंज्ञाबाधाच ॥ त्रिषु प्रायश्चित्तमाहमनुः संकरीपात्रकृत्यासुमासःशोधनमैंदवं ॥ मलिनीकरणीयेषु तप्तः स्यायावकस्त्र्यहमिति ॥ विष्णुः ॥ २ ॥ मलिनीकरणीये तु तप्तकृच्छ्रं विशोधनं ॥ कृच्छ्रातिकृच्छ्रमथवा प्रायश्चित्तं विशोधनं ॥ ३ ॥ अज्ञानान्मलिनीकरणानुष्ठानेत्र्यहंयावकं ॥ ज्ञानात्तप्तकृच्छ्रः ॥ अज्ञानतोभ्यासेकृच्छ्रातिकृच्छ्रं ॥ एतानिजातिभ्रंशकरादिषुसामान्यप्रायश्चित्तानि ब्राह्मणरुजः करणादिमध्ये यत्र प्रातिस्विकं प्रायश्चित्तं नोक्तं यत्र वोक्तं तत्रापि जातिशक्तिगुणाद्यपेक्षया योज्यानि ॥ ४ ॥

## मलिनीकरण प्रायश्चित्ताचा निर्णय.

या विषयीं मनूचें वचन—कृमि म्हणजे क्षुद्र जंतु, कीट म्हणजे किंचित् स्थूल जंतु आणि पक्षी यांचा नाश करणें, मद्या जवळ पडलेलें जें फलमूलादि तें भक्षण करणें फलें, लांकडें, फुलें यांची चोरी करणें धैर्य न धरणें या प्रत्येकास मलिनीकरणपातक असी संज्ञा सांगितली

आहे. ॥ १ ॥ देवाविषयीं फुलें न विचारितां घेतलीं असतां दोष नाहीं. येथें जातिभ्रंशकर, संकरीकरण, मलिनीकरण इत्यादिक ज्या संज्ञा सांगितल्या त्या रूढ आहेत यौगिक नाहींत. कारण या संज्ञा जर यौगिक असत्या तर वास घेण्यास अयोग्य अशा पदार्थांचा वास घेतला असतां जातिभ्रंशत्व येऊं लागेल, तसेंच क्षत्रियादिकांस पात्रत्वाचा अभाव आहे असें असोनही त्याप्रत या अपात्रीकरण संज्ञेचा बाध आहे. सबब यारूढ संज्ञा जाणाव्या. याविषयीं मनूनें प्रायश्चित्त सांगितलें आहे. संकरीकरण, अपात्रीकरण या पातकांपैकीं कोणतेंही पाप केलें असतां महिनाभर पर्यंत चांद्रायण करावें. मलिनीकरण पापांतील कोणतेंही पाप केलें असतां पश्चात्तापयुक्त होऊन तीन दिवस पर्यंत सातूची यवागू म्हणजे पेज प्राशन करावी. ॥ २ ॥ विष्णुस्मृतींतील वचन—अज्ञानानें मलिनीकरण पातक केलें असतां तीन दिवस यवागू प्राशन करावी. ज्ञानानें आचरण केलें असतां तप्तकृच्छ्र, अज्ञानानें निरंतर करण्याचा अभ्यास असेल तर कृच्छ्रातिकृच्छ्रप्रायश्चित्त आचरण करावें. ॥ ३ ॥ हीं जीं जातिभ्रंशकरादि पातकें सांगितलीं त्यामध्यें ब्राम्हणास पीडा करणें इत्यादिकांबद्दल जेथें प्रायश्चित्त सांगितलें नसेल तेथें जाति, शक्ति, गुण इत्यादिकांचा विचार करून प्रायश्चित्ताची योजना करावी. ॥ ४ ॥ याप्रमाणें मलिनीकरण प्रायश्चित्ताचा निर्णय जाणावा. ॥

## ॥ अथप्रकीर्णप्रायश्चित्तनिर्णयः ॥

खरेणोष्ट्रेण वा युक्तं यानं रथगंत्र्यादि आरुह्याध्वगंता नग्नस्नायी नग्नतयान्नभोक्ता दिवास्वदारगामी च सचैलस्नानपूर्वकं प्राणायामेन शुद्ध्यति ॥ तथा च याज्ञवल्क्यः॥ प्राणायामी जले स्नात्वा खरयानोष्ट्रयानगः ॥ नग्नः स्नात्वा च भुक्त्वा च गत्वा चैव दिवा स्त्रियम् ॥ चतुरधिकाऽभ्यासे एकउपवासः ॥ अत्यंताभ्यासे त्रिरात्रं ॥ साक्षात् खरोष्ट्रारोहिणां द्विगुणं ॥ तथा गुरुं हुंकृत्य तुंकृत्य विप्रंनिर्जित्य वादतः ॥ बध्वा वा वाससाक्षिप्रं प्रसाद्योपवसेद्दिनम् ॥ अभ्यासे यमोक्तम् ॥ वादेन ब्राह्मणं जित्वा प्रायश्चित्तंविधीयते ॥ त्रिरात्रोपोषितः स्नात्वा प्रणिपत्य प्रसादयेत् ॥ तथा विप्रदंडोद्यमे कृच्छ्रः स्त्वतिकृच्छ्रोनिपातने ॥ कृच्छ्रातिकृच्छ्रौप्रकपाते कृच्छ्रोभ्यंतरशोणिते ॥ विप्रजिघांसया दंडोद्यमे ॥ बृहस्पतिः ॥ काष्ठादिना ताडयित्वा त्वग्भेदे कृच्छ्रमाचरेत् ॥ अस्थिभेदेतिकृच्छ्रः स्यात् पराकस्त्वंगकर्तने ॥ यमः ॥ पादेन ब्राह्मणं स्पृष्ट्वा प्रायश्चित्तं विधित्सया ॥ दिवसोपोषितः स्नात्वा प्रणिपत्य प्रसादयेत् ॥ एतच्च कामकृते ॥ अकामकृते प्रसादनमात्रमेव ॥

## प्रकीर्णप्रायश्चित्ताचा निर्णय.

गाढव अथवा उंट, हे ज्यास जोडिले आहेत अशी गाडी वगैरे यांत बसून मार्गामध्यें गमन करणारा,

नग्न होऊन स्नान करणारा, नग्न होऊन अन्न भक्षण करणारा, दिवसा स्वस्त्रिसीं गमन करणारा या प्रत्येकानें सचैलस्नान करून प्राणायाम केला असतां त्या त्या पापाचा नाश होतो. याज्ञवल्क्यस्मृतीचा अर्थ असाच आहे. हीं पूर्वोक्त कृत्यें चार वेळांपेक्षा अधिक वेळ घडलीं असता सचेलस्नान, प्राणायाम व एक उपवास करण्यास सांगितलें आहे. अत्यंत अभ्यास असेल तर त्रिरात्र उपोषण करावें. प्रत्यक्ष गाढव अथवा उंट यांच्यावर बसलें असता पूर्वोक्तद्विगुणप्रायश्चित्त आचरण करावें.

विद्यादेणारा गुरु अथवा पिता यास एकवचनानें "तूं असें बोललास" "तूंच असें केलें" असें एकवचनानें निर्भत्सना करून, तसेंच ब्राह्मणाप्रत तिरस्कार करून त्यास वितंडवादानें जिंकून, मृदु वस्त्रानें देखील गळ्यामध्यें बांधिलें असतां गुरू ब्राह्मण इत्यादिकांच्या पायाचे ठायीं पडून नमस्कार करून त्याचा तो क्रोध घालवून त्यास प्रसन्न करून एकरात्र उपोषण करावें. बरेंच वेळा असें आपल्या हातून घडलें असता त्यास पूर्वोक्तरीतिनें प्रसन्न व क्रोधरहित करून तिन दिवस उपोषण करावें. ब्राह्मणास मारण्याच्या हेतूनें काठी उगारिली असता एक कृच्छ्र प्रायश्चित्त, काठीनें प्रहार केला असता अतिकृच्छ्र प्रायश्चित्त, दंडप्रहारानें रक्त निघालें असता कृच्छ्रातिकृच्छ्र अंग रक्ताळे असता कृच्छ्र प्रायश्चित्त, ब्राह्मणास मारण्याच्या हेतूनें दंड उगारलें असता बृहस्पतीचें वचन—काष्ठादिकानें ताडन करून त्वचेचा भेद झाला असता कृच्छ्र प्रायश्चित्त, अस्थिभेद झाला असतां अतिकृच्छ्र प्रायश्चित्त, अंगकर्तन झालें असता पराकप्रायश्चित्त. ब्राम्हणास हेतुपूर्वक पादप्रहार केला असतां त्यास नमस्कार करून प्रसन्न करून एक उपोषण करावें. न समजून पाद प्रहार झाला असता नमस्कार करून प्रार्थनेनें त्याचा क्रोध दूर करावा.

## मुत्रपुरीषोत्सर्गप्रायश्चित्तनिर्णयः ॥

असंन्निहितास्वप्सूदके वा कामतः मूत्रपुरीषाद्युत्सर्गे मनुः ॥ विनाद्भिरप्सुवाप्यंतः शारीरं संन्निवेश्य तु ॥ सचैलोबहिराप्लुत्य गामालभ्य विशुद्ध्यति ॥ गामालभ्य स्पृष्ट्वा कामतस्तु यमोक्तम् ॥ आपद्गतोविना तोयं शारीरं योनिषेवते ॥ एकाहःक्षपणं कृत्वा सचैलं स्नानमाचरेत् ॥ आपद्यभ्यासे सुमंतूक्तम् ॥ अप्स्वग्नौ वा मेहतस्तप्तकृच्छ्रमिति ॥ मूत्रादिवेगधारणे अष्टोत्तरशत गायत्रीजपः ॥

## मूत्रपुरीषोत्सर्गास प्रायश्चित्त.

पाण्यावाचूनमूत्र अथवा पुरीषोत्सर्ग केलें असता, अथवा पाण्यामध्यें मलोत्सर्ग अथवा मूत्रोत्सर्ग केलें असता अन्यजलानें स्नान करून गायीस स्पर्श केल्यानें शुद्धता होते. यमाचें वचन. सचैलस्नान आणि एक उपोषण करण्यास सांगितलें आहे. पाण्यामध्यें अथवा अग्निमध्यें पुरीषोत्सर्ग केले

असतां तप्तकृच्छ्रप्रायश्चित्त सुमंतूनें सांगितलें आहे. मूत्रादिकांचा अवरोध केला असतां एकशें आठ गायत्रीमंत्र जप करावा.

## नित्यकर्मलोपे प्रायश्चित्तनिर्णयः ॥

मनुः वेदोदितानां नित्यानां कर्मणां समतिक्रमे ॥ स्नातकव्रतलोपे च प्रायश्चित्तमभोजनम् ॥ यत्र श्रौतेषु स्मार्तेषु वा नित्यहोमादिलोपे सति प्रायश्चित्तविशेषोनाम्नातस्तत्रोपवासः प्रायश्चित्तम् ॥ आम्नातश्चेत्तेनसहाभोजनंसमुच्चीयते ॥ स्नातकव्रताधिकारे क्रतुः ॥ एतेषामाचाराणामेकैकव्यतिक्रमे गायत्र्याष्टशतं जपं कृत्वापूतोभवतीति ॥ स्नानं विना भोजने एकउपवासोदिनं व्याप्यजपः ॥ बृहस्पतिः ॥ अनिर्वर्त्य महायज्ञान् योभुंक्ते प्रत्यहं गृही ॥ अनातुरः सति धने कृच्छ्रार्धेन सशुद्ध्यति ॥ महायज्ञाः पंचमहायज्ञाः एतच्च सकृत्करणे अभ्यासे तु कृच्छ्रम् ॥

अहिताग्निरुपस्थानं न कुर्यादस्तु पर्वणि ॥ ऋतौ न गच्छेत् भार्यां वा सोपि कृच्छ्रार्धमर्हति ॥ इदं चापर्वणि सन्निहितस्यारोगिणएव ॥ पोडश्यां रात्रौ तु पर्वण्यपि गच्छेत् ॥ एतदेव प्रायश्चित्तं स्त्रियाअपि ऋतौ भर्तुरनुपसर्पणे भवति ॥ तस्याअपि नारदीये दोषदर्शनात् ॥ आहूताया तु वै भर्त्रा नोपयाति त्वरान्विता ॥ साध्वांक्षी जायतेपुत्री दशवर्षाणि पंचचेति ॥ स्वभार्यां क्रोधादपगम्येतिवदतां वर्णानां क्रमेण कृच्छ्रः ॥ नवरात्रइति षड्रात्रत्रिरात्राणि सर्वेषां प्राजापत्यमिति गौडाः ॥ त्यागानंतरं संग्रहेच्छायां ऋषिचांद्रायणं कृत्वा सकार्यः ॥ देवलः ॥ स्वभार्यां तु यदा क्रोधादगम्येति नरोवदेत् ॥ प्राजापत्यं चरेद्विप्रः क्षत्रियो दिवसान्नव ॥ षड्रात्रं तु चरेद्वैश्यः त्रिरात्रं शूद्रआचरेत् ॥ हारीतः ॥ वहन् कमंडलुं रिक्तमस्नातश्चाश्नन् हि भोजनम् ॥ अहोरात्रेण शुद्धिः स्याद्दिनजप्येन चैव हीति ॥ उपवासदिनजपयोः समुच्चयः ॥ एकपंक्त्युपविष्टानां स्नेहादिना विषमदाने दापने च प्राजापत्यम् ॥ न पंक्तौ विषमं दद्यान्न याचेत न दापयेत् ॥ प्राजापत्येन कृच्छ्रेण मुच्यते कर्मणस्ततः ॥ नदीसंक्रमहंतुश्च कन्याविघ्नकरस्य च ॥ समे विषमकर्तुश्च निष्कृतिर्नोपपद्यते ॥ त्रयाणामपि चैतेषां प्रायश्चित्तं तु मार्गतां ॥ भैक्षलब्धेन चान्नेन द्विजश्चांद्रायणं चरेत् ॥ संक्रमउदकावतरणवर्त्म ॥ समेविषमकर्ता पूजादौद्विजस्य चांद्रायणंक्षत्रियादीनां तु पादपादहान्याकल्पनीयम् ॥

## नित्यकर्मलोपप्रायश्चित्ताचा विचार.

वेदानें सांगितलेलीं नित्यकर्मे यांचें अतिक्रमण झालें असतां किंवा स्नातकाचें व्रतांचा लोप झाला असतां एक उपोषण करण्यास सांगितलें आहे. जेथें श्रौतस्मार्तकर्मे अथवा नित्य होमादिकांचा लोप झाला असतां प्रायश्चित्त सांगितलें नसेल तेथें एक उपोषण प्रायश्चित्त सांगि-

तलें आहे. आणि जेथें प्रायश्चित्त सांगितलें असेल तेथें तें प्रायश्चित्त आणि उपोषण करावें. स्नातक ( सोडमुंज झालेला ) यास जीं व्रतें सांगितलीं आहेत त्याविषयी क्रतुचें वचन–हे जे आचार सांगितले त्यांतील एक एक आचाराचें उल्लंघन झालें असतां एकशें आठ गायत्रीमंत्र जप केल्यानें शुद्ध होतो. स्नान केल्यावाचून भोजन केलें असतां एक उपोषण आणि गायत्री जप दिवसभर केल्यानें शुद्धता होते. आपत्ति नसतांही वैश्वदेवादि पंचमहायज्ञ केल्यावाचून भोजन केलें असतां कृच्छ्रार्द्ध प्रायश्चित्त सांगितलें आहे. पंचमहायज्ञ केल्यावाचून भोजन करणें ह्या नित्याचा पाठ असेल तर एककृच्छ्र प्रायश्चित्त करावें. तसेंच जो अग्निहोत्री पर्वदिवसाचें ठायीं अग्नीचें उपस्थान करीत नाहीं त्यास अर्धकृच्छ्रप्रायश्चित्त जाणावें. ऋतुकाळीं भार्येशी गमन न केलें असता अर्धकृच्छ्र सांगितलें आहे. परंतु पर्वदिवस असेल तर अथवा शरीरात आजार असल्यास गमन करूं नये. ऋतुकालाच्या सोळावे रात्रीं पर्वदिवस जरी असेल तरी गमन करावें. आपल्या स्त्रियेस रागानें "गमन करण्यास अयोग्य आहे" असें जर ब्राह्मण ह्मणेल तर त्यानें प्राजापत्य प्रायश्चित्त आचरण करावें. क्षत्रियानें पादोन प्राजापत्य, वैश्यानें अर्धे प्राजापत्य, व शूद्रानें पादप्राजापत्य करावें. स्त्रियेचा त्याग केल्यानंतर पुनः तिचें ग्रहण करणें असल्यास, कपीचांद्रायण प्रायश्चित्त करून तिचा संग्रह करावा.

ऋतुकालीं स्त्री पतीनें बोलाविलें असता ती जर पतिसंनिध गमन न करील तर तिजलाही हेंच प्रायश्चित्त सांगितलें आहे नारदस्मृतींतील वचन. जी स्त्री पतीनें बोलाविलें असता गमन करीत नाहीं, तिला मरणानंतर १५ वर्षेपर्यंत कावळ्याचा जन्म प्राप्त होतो सबब पतीस सांगितलेलें प्रायश्चित्त त्याचें अर्धे प्रायश्चित्त आचरण करावें.

हारीतानें असें सांगितलें आहे कीं, रिकामा कमंडलु वाहिले असता तसेंच स्नान केल्यावाचून भोजन केलें असता अहोरात्र उपोषण करून अहोरात्रभर गायत्रीजप केल्यानें शुद्धता होते. एकापंक्तीस भोजनास बसलें असता सर्वांस एकच अन्न द्यावें, विषम देऊं नये व मागणारानें ही मागूं नये. विषमान्न मागणारास व वाढणारास कृच्छ्रप्राजापत्यानें शुद्धता होते. नदीचें पाणी उतरण्याच्या मार्गाचा ( पाणवठ्याचा रस्ता, घाट, ) नाश करणाऱ्यास, कन्येस विघ्न करणाऱ्यास, सारख्या पूज्य मनुष्यास विषम पूजा करणाऱ्यास, भिक्षा मागून अन्न मिळवून चांद्रायण प्रायश्चित्त करावें. क्षत्रियादिकांस पादपाद हानी प्रायश्चित्त सांगितलें आहे.

ऋष्यशृंगः ॥ इंद्रचापं पलाशाग्निं यद्यन्यस्य प्रदर्शयेत् ॥ प्रायश्चित्तमहोरात्रं धनुर्दंडश्चदक्षिणा ॥ बौधायनीयधर्मसूत्रे ॥ सूर्यमुदयास्तमये न निरीक्षेत नेंद्रधनुरिति परस्मै प्रब्रूयाद्यदि प्रब्रूयान्मणिधनुरित्येव ब्रूयादिति ॥ न म्लेच्छाशुच्यधार्मिकैः सह संभाषयेत् ॥ संभाष्य पुण्यकृतोमनसा ध्यायेत् ॥ ब्राह्मणेन वा सह संभाषेत् ॥ तल्पान्न धनलाभवधे पृथक् वर्षाणीति तल्पभार्या ॥ तल्पादीनां लाभस्य वधे विघ्नकरणे प्रत्येकं

संवत्सरव्रतम् ॥ व्रतंब्रह्मचर्यमित्यर्थः॥हारीतः ॥ चांडालश्वपचानां च संकरे समुपस्थिते॥ अहोरात्रं त्रिरात्रं स्यात्त्रिरात्रे षडहःस्मृतम् ॥ अविज्ञातस्तु चांडालःसप्ताहं निवसे यदि ॥ तस्याज्ञात्वोपासनस्य विप्राः कुर्युरनुग्रहम् ॥ दधिक्षीरघृतैर्युक्तं कृच्छ्रं गोमूत्रयावकम् ॥ प्राशयेत्तद्गृहस्थैस्तु मासमेकं निरंतरम् ॥ तथा ॥ यद्युच्छिष्टत्यनाचांतो भुक्त्वावै नासनात्ततः ॥ सद्यः स्नानं प्रकुर्वीत सोन्यथा मयतोभवेत् ॥ वशिष्टः ॥ दंडचोत्सर्गे राजैकरात्रमुपवसेत्त्रिरात्रं च पुरोहितः ॥ कृच्छ्रमदंड्यदंडने पुरोहितस्त्रिरात्रं॥ राजा कुनखिश्यावदंतकपोः कृच्छ्रंद्वादशरात्रं चरित्वोद्धरेयाताभिति ॥ दंतान्नखांश्च दुष्टानुत्पाट्येदित्यर्थः ॥ शंखः ॥ अघ्यस्य शयनं यानमासनं पादुके तथा ॥ द्विजः पालाश वृक्षस्य त्रिरात्रं तु व्रती भवेत् ॥ क्षत्रियस्तु रणे पृष्ठं दत्वा पापपरायणः ॥ संवत्सरं व्रतं कुर्याच्छित्वा वृक्षं फलप्रदम् ॥ द्वौ विप्रौ ब्राह्मणाग्नी वा दंपती गौ द्विजोत्तमौ ॥ अंतरेण यदा गच्छेत्कृच्छ्रं सांतपनं चरेत् ॥ होमकाले तथा दोहे स्वाध्याये दारसंग्रहे॥ अंतरेण यदा गच्छेद्द्विजश्चांद्रायणं चरेत् ॥ दोहे यागांगभूतदोहे ॥ एतच्चाभ्यासे अनभ्यासे त्वर्द्धम् ॥ सच्छिद्रादित्यादयरिष्टदर्शनादावपि दुःस्वप्नारिष्टदर्शनादौ घृतं हिरण्यं दद्यादिति ॥ तथा ॥ पादप्रतापनं कृत्वा ज्ञात्वा वह्निमधस्तथा ॥ कुशैः प्रमृज्य पादौ तु दिनमेकं व्रती भवेत् ॥

ऋष्यशृंगानें असें सांगितलें आहे की, इंद्राचें धनुष्य आणि पळसाचा अग्नि दुसऱ्यास दाखवूं नये, दाखविलें असतां अहोरात्र उपोषण करून धनुर्दंड दक्षिणा द्यावी. बौधायनाच्या धर्मसूत्रामध्यें असें सांगितलें आहे की, सूर्यास उदयाचे वेळीं व अस्तमानाचे वेळीं अवलोकन करूं नये, आणि इंद्रधनुष्य असें दुसऱ्यास सांगूं नये. मणिधनुष्य असें म्हणावें, यवनादिक अधर्मी मनुष्यें यांच्याशीं भाषण करूं नये, संभाषण केलें असतां पुण्यवान मनुष्याचें ध्यान मनानें करावें, अथवा तें पाप जाण्याकरितां ब्राम्हणासीं संभाषण करावें, स्त्रियेचें धन अथवा अन्न यांच्या लाभाचा नाश केला असतां प्रत्येकाबद्दल संवत्सर संवत्सर ब्रम्हचर्य आचरण करावें, हारीताचें वचन. चांडालादिकांची आपली एकत्र स्थिती एक दिवस होऊन संकर उत्पन्न झाला असतां त्रिरात्र उपोषण करावें, त्रिरात्र मीळून संमीलन झालें असतां सहा दिवस उपोषण करावें. न समजतां चांडाळ सात दिवस पर्यंत घरांत राहीला तर दही, दूध, तूप यांनी युक्त असें गोमूत्र यावक कृच्छ्र. घरांत वास करणारे सर्व मंडळी तसेंच चाकर वगैरे यांच्यासीं सहित प्राशन करावें. जेवण करून आचमन केल्यावांचून आसनापासून तसेंच गेलें असतां तात्काळ स्नान केल्यानें शुद्धता होते.

वशिष्ठानें असें सांगितलें आहे की, दंड करण्यास योग्य असा मनुष्यास दंड न करितां सोडलें असतां राजानें एकरात्र उपोषण करावें, आणि उपाध्यायानें त्रिरात्र उपोषण करावें. दंडकरण्या-

स अयोग्य अशा मनुष्यासही दंड केल्यास राजास व पुरोहितास तीच उपोषणें सांगितलीं आहेत. ज्यांचीं नखें वाईट आहेत व ज्यांचे दांत जन्मतः काळे आहेत त्या मनुष्याकडून राजानें द्वादश कृच्छ्र प्रायश्चित्तें करवून त्याचे ते दांत आणि नखें काढून टाकवावींत. शंखस्मृतींतील वचन. पळसाच्या वृक्षाचे शयन, तसेंच आसन, पादुका याच्यावर आरोहण केलें असता त्रिरात्र उपोषण प्रायश्चित्त सांगितलें आहेत. क्षत्रियानें युद्धांत शत्रूस पाठ दाखवून पळालें असता त्यास संवत्सर व्रत प्रायश्चित्त सांगितलें आहे. तसेंच ज्या वृक्षास फळ येतात असें झाड तोडलें असतां हेंच प्रायश्चित्त सांगितलें आहे. दोन ब्राह्मण तसेंच ब्राह्मण आणि अग्नि, नवराबायको, गाय आणि ब्राह्मण, यांच्या मधून जाऊं नये, गेलें असता कृच्छ्रसांतपन प्रायश्चित्त सांगितलें आहे. होमाचे वेळीं तसेंच यज्ञ करितां धार काढित असतां, गुरुशिष्याचें अध्ययन चाललें असतां, तसेंच स्त्री स्वीकाराचे समयीं दोघांच्या मधून गेलें असता चांद्रायण प्रायश्चित्त सांगितलें आहे. सूर्यास छिद्र-युक्त इत्यादि अरिष्टाचें दर्शन झालें असतां तसेंच दुःस्वप्नाचें दर्शन झालें असता ब्राह्मणास तूप आणि सोनें द्यावें. पाय विस्तवार शेकिले असतां तसेंच जाणून अग्नीवर पाय दिला असतां दर्भो-दकानें पाय धुवून एक उपोषण करावें.

देवलः ॥ तीर्थयात्रां विना सिंधुसौवीरसौराष्ट्रांस्तथा प्रत्यंतवासिनः ॥ अंगवंगकलिंगांध्रान् गत्वा संस्कारमर्हति ॥ एतच्च तीर्थयात्राव्यतिरेकेण ॥ एवं मगधदेशेपि कर्मनाशाजलस्पर्शात्पुनःसंस्कारमर्हति ॥ करतोयाविलंघनात् गंडकीबाहुतरणात् ॥ यमः प्रत्यादित्यं न मेहेत न पश्येदात्मनः शकृत् ॥ दृष्ट्वा सूर्यं निरीक्षेत ब्राह्मणान् गामथापि वा ॥ हारीतः ॥ क्षत्रियाभिवादने अहोरात्रमुपवसेत् ॥ वैश्यस्यापि शूद्रस्याभिवादने त्रिरात्रमुपवासः॥ शय्यारूढपादुकोपानदारोपितपादोच्छिष्टांधकारस्थश्राद्धकृज्जपदेवपूजाभिरताभिवादने त्रिरात्रमुपवासः स्यात् ॥ आपस्तंबः ॥ समित्पुष्पकुशाज्यांबुमृदन्नाक्षतपाणिकं ॥ जपं होमं च कुर्वाणं नाभिवादयेतवै द्विजः ॥ अत्रापि जपहोमसाहचर्याद्धारीतोक्तं त्रिरात्रमेव ॥ शंखः ॥ नोदकुंभहस्तोभिवादयेन्न भैक्षहस्तोन पुष्पाज्यहस्तोनाशुचिर्न जपन्नदेवपितृकार्यं कुर्वन् न शयानइति ॥ अत्रापि त्रिरात्रमेव ॥ याज्ञवल्क्यः ॥ देशं कालं वयः शक्तिं पापं चावेक्ष्य यत्नतः ॥ प्रायश्चित्तं प्रकल्प्यं स्याद्यत्र चोक्ता न निष्कृतिः ॥ स्मृत्यंतरे ॥ नीलवस्त्रादिधारणे केशनिर्मितधारणे चोपवासः पंचगव्यपानं ॥ तथा च आपस्तंबः ॥ नीलीरक्तं यदा वस्त्रं ब्राह्मणोंगेषु धारयेत् ॥ अहोरात्रोपोषितोभूत्वा पंचगव्येन शुध्यति ॥ रोमकूपैर्यदागच्छेद्रसोनील्यास्तु कस्यचित् ॥ त्रिषु वर्णेषु सामान्यं तप्तकृच्छ्रं विशोधनम् ॥ पालनं विक्रयश्चैव तद्वृत्त्या तूपजीवनम् ॥ पतनं तु भवेद्विप्रे त्रिभिः कृच्छ्रैर्व्यपोहति ॥ नीलीदारु यदा भिंद्याद्ब्राह्मणस्य शरीरतः ॥ शोणितं दृश्यते यत्र द्विजश्चांद्रायणं चरेत् ॥ विधवया नीलीधारणे

तद्गर्तुनेरक ॥ नीलीधारणपूर्वकमन्नदाने दातुर्भोक्तुश्चसांतपनम् ॥ स्त्रीधृता शयने नीली ब्राह्मणस्य न दुष्यति ॥ कवले पट्टसूत्रे च नीलीसगोन दुष्यति ॥

देवलाचें वचन. तीर्थयात्रे वाचून सिंधुदेश तसेंच सौवीर, सौराष्ट्र, पर्वताच्या जवळील भाग, अंगदेश, वंगदेश, कलिंगदेश यास गेलें असता पुनरुपनयन करण्यास सांगितलें आहे. याप्रमाणें मगधदेशाचे ठायीं गेलें असताही प्रायश्चित्त सांगितलें आहे. कर्मनाशानदीचे जलाचा स्पर्श केला असता, तसेंच करतोयानदीचें उल्लंघन केलें असता, गंडकीनदी बाहूनें तरली असता पुनरुपनयन करण्यास सांगितलें आहे यमाचें वचन. सूर्याकडे मुखकरून शौच करूं नये. आपला मल पाहूं नये. दृष्टी पडला असता सूर्य, ब्राह्मण, गाय यांचें दर्शन घ्यावें. हारीतानें असें सांगितलें आहे कीं, ब्राह्मणानें क्षत्रियास नमस्कार केला असता अहोरात्र उपोषण करणारास सांगितलें आहे. तसेंच वैश्यास अथवा शूद्रास नमस्कार केला असता त्रिरात्र उपवासानें शुद्धता होते. शय्येवर बसलें असतां तसेंच खडाव अथवा जोडा ज्याचे पायांत आहे त्यास व ज्याचे हात उष्टे आहेत तसेंच आधारांत बसणारास, श्राद्ध करणारास, जप, देवपूजा करीत असता नमस्कार करूं नये. केला असता त्रिरात्र उपोषण सांगितलें आहे आपस्तंबानें ज्याचे हातात समिधा, फुलें, दर्भ, तूप, पाणी, मृत्तिका, शिजलेलें अन्न, हे आहे त्यासही नमस्कार करूंनये शंखस्मृतींत असें सांगितलें आहे कीं, पाण्यानें भरलेला कुंभ ज्याचे हातांत आहे, तसेंच भिक्षान्न ज्याचे हातात आहे त्यास नमस्कार करूं नये. नीलवस्त्र धारण केलें असतां, तसेंच केशानें निर्माण केलेलें वस्त्र धारण केलें असता एक उपोषण व पंचगव्यप्राशन सांगितलें आहे. यांस आपस्तंबाचें वचन. नीळीच्या रंगानें रंगविलेलें वस्त्र ब्राह्मणानें धारण केलें असता उपोषण व पंचगव्य प्राशनानें शुद्धता होते. नीळीचा रस अंगावरील केसाच्या छिद्रामध्यें गेला असता तिन्हीं वर्णांस तप्तकृच्छ्र प्रायश्चित्त सांगितलें आहे नीळीस समाळणें, विकणें, नीळीचें काम करून उपजीविका करणें हे ब्राह्मणांनीं केलें असता ब्राह्मण भ्रष्ट होतो. नीळीचें लाकूड लागून ब्राह्मणाचें रक्त निघालें असता ब्राह्मणास चांद्रायण प्रायश्चित्त सांगितलें आहे. विधवा स्त्रीनें ज्या वस्त्रास नीळीचा रंग आहे असें वस्त्र नेसूं नये, नेसलें असतां पतीस नरक प्राप्ती होते. काळें वस्त्र धारण करून अन्न वाढूं नये कारण अन्न देणारास व जेवणारास सांतपन प्रायश्चित्त सांगितलें आहे. शयनाचे ठायीं ब्राह्मणाच्या स्त्रियेनें नीळें वस्त्र धारण केलें असतां दोष नाहीं तसेंच घोंगडें अथवा रेशमी मोठें वस्त्र त्यामध्यें नीळ रंगाचासंबंध असताही दोष नाहीं.

मनु ॥ शरणागत परित्यज्य वेद विप्लाव्य च द्विज ॥ संवत्सर यवाहारस्तत्पाप मपमेयतीति ॥ वेदविप्लावन चांडालादिश्रुतिपथे अनध्यायेपुच पाठ ॥ वशिष्ठः पतितचां डालशवश्रावणे त्रिरात्र वाग्यताअनश्नतआसीरन्सहस्रपरमवातदभ्यस्यत मृतामर्क्ती तिविज्ञापते ॥ शवश्रावणशवसन्निधावध्ययन सहस्रपरममिति यावान् भागश्चांडालादि

भिः श्रुतस्तावंत भागं सहस्रकृत्वोजपेदित्यर्थः ॥ अंगिराः ॥ अनापदि चरेद्यस्तु सिद्धां भिक्षां गृहे वसन् ॥ दशरात्रं पिबेद्वज्रमापत्काले त्र्यहं द्विजः ॥ देवादीनामाभिमुख्येन ष्ठीवनादौ सुमंतुः देवर्षिगोब्राह्मणाचार्यमातापितृनरेंद्राणां प्रतिष्ठीवने आक्रोशने जिह्वां दहेद्धिरण्यं दद्यादिति ॥ प्रतिष्ठीवनमाभिमुख्येन निष्ठीवनं ॥ अथ प्रपापोद्याना दिद्वेववागारादिभेदने ॥ वापीकूपारामसेतुतलतडागवप्रदेवतायतनभेदने कात्यायनः ॥ हरेच्छिंद्याद्दहेद्वापि देवतां प्रतिमां यदि ॥ तद्गृहं चैव योभिंद्यात्सप्नुयात्पूर्वसाहसं ॥ विष्णुरपि ॥ अभक्ष्यस्याविक्रयस्य विक्रयी प्रतिमाभेदकश्च उत्तमसाहसं दंडनीयः ॥ पर्वणिमैथुने विष्णुपुराणेनिंदाश्रवणं ॥ चतुर्दश्यष्टमी चैव अमावास्याथ पूर्णिमा ॥ पर्वाण्येतानि राजेंद्र रविसंक्रांतिरेव च ॥ स्त्रीतैलमांससंभोगी पर्वस्वेतेषु योनरः ॥ विण्मूत्रभोजनं नाम प्रयाति नरकं मृतः ॥ मिताक्षरायांस्मृत्यंतरे ॥ अष्टम्यां च चतुर्दश्यां दिवा पर्वणि मैथुनं ॥ कृत्वा सचैलं स्नात्वा च वारुणीभिश्च मार्जयेदिति ॥ श्राद्धदिनेमैथुने वा स्नातकव्रतलोपे वेत्यनेनोपवासएव ॥ वमने शातातपः ॥ विदर्छदने द्विजातीनां भिक्षान्ने च भोजने ॥ पंचगव्येन शुद्धिः स्यादिति शातातपोब्रवीत् ॥

मनूचें वचन. शरण आलेल्या मनुष्याचें रक्षण न करितां टाकिलें असता, तसेंच भेद बुद्धि ठेवली असता मरणपर्यंत फक्त सातू सिजवून खाऊन राहिल्यानें तें पाप नाहीसें होतें. वेद बुद्धिविणें ह्मणजे वेदश्रवणास अयोग्य असे जे चांडाळादि यांस श्रवण होईल असें अध्ययन करणें, अथवा अनाध्यायाचे दिवशीं वेदाचा पाठ करणें. वसिष्ठानें असें सांगितलें आहे कीं, पतित, चांडाळ, प्रेत हें जवळ असतां जर वेदपाठ केला तर त्रिरात्र उपोषण करून मौन धारण करून राहावें, अथवा जेवढा वेदभाग चांडाळदिकानीं ऐकिला असेल तेवढ्याचा हजार वेळां पाठ केल्यानें शुद्धता होते. अंगिराचें वचन. गृहस्थाश्रमीमनुष्यानें आपत्ती नसतां सिद्धान्नाची भिक्षा केली असता दहा दिवसपर्यंत वज्रकृच्छ्रचें प्राशन सांगितलें आहे. आपत्काळीं सिद्धान्नभिक्षेस त्रिरात्र वज्रकृच्छ्र प्रायश्चित्त सांगितलें आहे. सुमंतुचें वचन. देव, ऋषी, ब्राह्मण, गुरु, माता, पिता आणि राजा यांच्या समोर थुंकलें असता, अथवा ओरडलें असता जिव्हेस डाग द्यावा. व सुवर्ण दान करणें हें प्रायश्चित्त सांगितलें आहे. कात्यायनाचें वचन. विहीर, आड, बाग, पूल, चेल, तळें, गावकोस देवाचें देऊळ, याचा भेद केला असता, अथवा देवाची मूर्ति चोरिली असतां, तसेंच जाळिली असता, फोडिली असतां, देवाचें घर पाडलें असतां महत्पाप आहे. यास्तव राजानें त्यांस अत्यंत दंड करावा. विष्णूनेंही आपल्या स्मृतींत खाण्यास अयोग्य व विकण्यास अयोग्य अशा पदार्थांचा विक्रय करणारा व प्रतिमेचा भेद करणें हें महत्साहस आहे. तरत्यास राजानें दंड करावा. चतुर्दशी, अष्टमी, अमावास्या पूर्णिमा, रविसंक्रमण, यांचे ठायीं स्त्रीसमोग केला असतां, अथवा तेल अंगास लाविलें असता नरकप्राप्ती होते. मिताक्षरांत. यास सचैलस्नान, वरुणमंत्रानें मार्जन सांगितलें आहे. श्राद्धाचे दिवशीं मैथुन केलें असता, अथवा स्नातकाचें

व्रताचा लोप झाला असतां एक उपोषण करावे, शातापाचें वचन. वांति झाली असतां, अथवा फुटक्या भांड्यामध्यें भोजन केलें असतां स्नान करावें. आणि पंचगव्य प्राशन करावें. ह्मणजे शुद्धता होते.

यमः ॥ सूर्योदये तु यः शेते सस्रूर्योदितउच्यते ॥ अस्तंगते तु यः शेते सूर्ये निर्मुक्तएव सः ॥ अकामतोभ्युदिते प्रायश्चित्तमाह यमः ॥ अजीर्णेभ्युदिते वांते स्मश्रुकर्मणि मैथुने ॥ दुःस्वप्ने दुर्जनस्पर्शे स्नानमात्रं विधीयते ॥ अत्रैवाकामतोगौतमः ॥ सूर्याभ्युदितोब्रह्मचारी तिष्ठेदहरभुंजानोस्तमितां रात्रौ सावित्रीं जपेत् ॥ अभ्यासे त्वावृत्तिरूह्या ॥ गर्भाधानादिसंस्कारलोपेगर्भाधानादिचूडांतसंस्कारेष्वेकैकलोपे पादकृच्छ्रं ॥ चूडायामर्धकृच्छ्रं ॥ अनापदि द्विगुणं प्रायश्चित्तोत्तरं तत्तत्संस्कारकरणं गर्भाधानमात्राकरणे गोदानपूर्वकं पुंसवनं कार्यं ॥ गर्भाधानस्याकरणे तस्यां जातस्तु दुष्यति ॥ अकृत्वा गां ततोदत्वा कुर्यात्पुंसवनं पतिः ॥ तथाच आश्वलायनः ॥ आरभ्याधानमाचौलात्कालेतीते तु कर्मणां ॥ व्याहृत्याज्यं सुसंस्कृत्य हुत्वा कपथाक्रमं ॥ एतेष्वेकैकलोपेपि पादकृच्छ्रं समाचरेत् ॥ चूडाया अर्द्धकृच्छ्रं स्यादापदि त्वेवमीरितं ॥ अनापदि तु सर्वत्र द्विगुणं द्विगुणं चरेत् ॥ कात्यायनोपि ॥ लुप्ते कर्मणि सर्वत्र प्रायश्चित्तं विधीयते ॥ प्रायश्चित्ते कृते पश्चाल्लुप्तं कर्म समाचरेत् ॥ स्त्रीणामप्येवमेव स्याज्जाताद्यामंत्रकाःक्रियेत ॥

सूर्योदय झाला असता जो शयन करतो त्यास अभ्युदित असें ह्मणावें. सूर्यअस्ताचे वेळीं जोशयन करितो त्यास निर्मुक्त म्हणावें. यास प्रायश्चित्त, यमाचें वचन. अजीर्ण झालें असतां, सूर्योदयानंतर शयन केलें असता, वांति झाली असता स्मश्रुकर्म केलें असतां, मैथुनाचे ठायीं, दुस्वप्न पडलें असता, दुर्जनाचा स्पर्श झाला असता, स्नान करावें. बुद्धिपूर्वक सूर्योदयाचे पुढें शयन केलें असतां ब्रह्मचारी यानें उपोषण करून सायंकाळपर्यंत गायत्रीजप करावा. असें गौतमानें सांगितलें आहे. सदोदित असें शयन करण्याचा अभ्यास असेल तर प्रायश्चित्त द्विगुणित अगर त्रिगुणित करावें.

## गर्भाधानादि संस्कारांचा लोप झाला असतां प्रायश्चित्ताचा विचार.

गर्भाधानापासून चूडाकर्मांत संस्काराचा लोप झाला असतां प्रत्येक संस्कार लोपाबद्दल पादकृच्छ्र प्रायश्चित्त, चौललोपाबद्दल अर्धकृच्छ्र प्रायश्चित्त करावें. आपत्ति असेल तर द्विगुणित प्रायश्चित्त करावें. प्रायश्चित्तानंतर लुप्त झालेला संस्कार करावा. गर्भाधान न करितां स्त्रीजर गर्भिणी होईल तर एक गोप्रदान करून पुंसवन संस्कार करावा. त्यास आश्वलायनाचें वचन गर्भाधानापासून चौलकर्मापर्यंत जे संस्कार यांचा लोप झाला असतां व्याहृतीनें आज्यसंस्कार

करून यथाक्रम होम करावा. कात्यायनानें असें सांगितलें आहे कीं, प्रथम प्रायश्चित्त करून नंतर लुप्त झालेलें कर्म करावें. स्त्रियांचेंही जातकर्मादिसंस्कार अमंत्रिक करावे.

संवत्सरं क्रियाहानिर्यस्य पुंसः प्रजायते ॥ तस्यावलोकनात्सूर्योनिरीक्ष्यः साधुभिः सदा ॥ स्पृष्टे स्नानं सचैलं तु शुद्धिहेतु महामते ॥ पुंसोभवति तस्योक्त्या उपवासो-विधीयते ॥ निमंत्रणं गृहीत्वा त्यागे तु यमः ॥ निमंत्रणं कारयित्वा तु योतिपात-यति द्विजः ॥ ब्रह्महत्यामवाप्नोति शूद्रयोनौ च जायते ॥ एतस्मिन्नेनसि प्राप्ते ब्राह्मणोनियतव्रतः ॥ यतिचांद्रायणं चीर्त्वा ततः पापात्प्रमुच्यते ॥ निमंत्रितस्या नाव्हानेप्येतदेव ॥ एतच्च कामाभ्यासे ॥ अन्यत्र भोजने तु हारीतः ॥ अन्यत्र नि-मंत्रितेनान्यत्रभोजनेपि त्रिरात्रमिति दिवामैथुनादौतु प्रायश्चित्तमाह शंखः ॥ दिवा तु मैथुनं कृत्वा नग्नः स्नात्वा तथांभसि ॥ नग्नां परस्त्रियं दृष्ट्वा दिनमेकमभोजनम् ॥ निषिध्धकाष्ठेन दंतधावने वृद्धपाराशरः ॥ शिंशपाकाष्ठदंतधावनकृन्नरोदिवाकीर्ति समस्तावद्यावद्गां नैव पश्यति ॥ एतच्च निषिद्धकाष्ठांतराणामप्युपलक्षणं ॥

संवत्सरपर्यंत जो मनुष्य स्नानसंध्यादिकर्म करित नाहीं. त्याचें दर्शन झालें असतां सूर्या-वलोकन करावें. त्याचा स्पर्श झाला असता स्नान करावें. त्याच्याशीं भाषण केलें असतां उपोषण करावें. आमंत्रण घेऊन टाकिलें असतां प्रायश्चित्त. यमाचें वचन. जो ब्राह्मण आ-मंत्रण घेऊन त्याचें अतिक्रमण करितो त्यास ब्रह्महत्येचें पातक लागतें. आणि शूद्रयोनीचें ठायीं जन्म प्राप्त होतो. तें पाप जाण्याकरितां ब्राह्मणानें नियमयुक्त होऊन यतिचांद्रायण करावें. ह्मणजे त्या पापापासून मुक्त होईल. आमंत्रण सांगून भोजनास न बोलाविलें असता हेंच पाप आहे. व त्यास हेंच प्रायश्चित्त आचरणानें शुद्धी होते. हा निरंतर अभ्यास असतांचें वचन आहे. आमंत्रण घेऊन दुसरीकडे भोजनास गेलें असता त्रिरात्र उपोषण करावें. असें हारीतानें सांगितलें आहे. दिवसा मैथुन केलें असतां, नग्न होऊन पाण्यांत स्नान केलें असतां, नग्न पर-स्त्रीचें दर्शन झालें असता, एक उपोषण प्रायश्चित्त आहे. निषिद्धकाष्ठानें दंतधावन केलें असतां पाराशराचें वचन. शिसव्याच्या काष्ठानें दात घासणारा मनुष्य नापितासारखा जाणावा. गायीचें दर्शन घेतल्यानें तो शुद्ध होतो.

ब्रम्हचारिधर्मलोपे बौधायनः॥शौचाचमनसंध्यावंदनदर्भभिक्ष्याग्निकार्यरहित्यशूद्रा-दिस्पर्शनकौपीनकटिसूत्रयज्ञोपवीतमेखलादंडाजिनत्यागदिवास्वापछत्रधारणपादुका-ध्यारोहणमालाधारणोद्वर्तनांजनलेपनजलक्रीडाद्यूतनृत्यगीतवाद्याद्यभिरतिपाखंडादिसं भाषणपर्युषितभोजनादिब्रह्मचारिव्रतलोपजसकलदोषनिर्हारार्थं ब्रह्मचारी कृच्छ्रत्रयं च-रेत् । महाव्याहृतीहोमं च कुर्यात्॥ गृहीतव्रतभंगे वायुपुराणे॥ लोभान्मोहात्प्रमादाद्वा व्रत भंगोयदा भवेत् ॥ उपवासत्रयं कुर्यात्कुर्याद्वाकेशमुंडनं ॥ प्रायश्चित्तमिदं कृत्वा पुनरे-

व्रती भवेत् ॥ एतदल्पधर्मलोपे बाहुल्ये प्रायश्चित्तविशेषमाह ॥ ऋग्विधाने शौनकः ॥ तद्बोधियाजपेन्मंत्रं लक्षंचेतिशिवालये ॥ वायुपुराणे प्रमादादिना स्वीकृतव्रतभंगे त्रिदिनमुपोष्य व्रतग्रहणं कुर्यादथवा केशमुंडनं कृत्वा गृण्हीयादिति ॥

## ॥ ब्रह्मचर्यधर्मलोपासप्रायश्चित्त ॥

बौधायनस्मृतींतील वचनें शौच, आचमन, संध्यावदन, दर्भयुक्त भिक्षा आणि अग्निकार्य करणें हीं न केलीं असतां, तसेंच शूद्रादिकांस स्पर्श केला असतां, कौपीन, कटिसूत्र, यज्ञोपवीत, मेखला, दंड, कृष्णाजिन, याचा त्याग करणें, दिवसा झोंप घेणें, छत्री धरणें, खडावा घालणें, पुष्पमालाधारण करणें, अंगास उटी लावणें, डोळ्यांत काजळ घालणें, जलक्रीडा करणें, द्यूत खेळणें, नाचणें, गाणें, वाद्य वाजविणें, इत्यादिकाविषयीं अभिरुचि धरणें, पाखंडी मनुष्यांशीं समागण करणें, शिळें अन्न खाणें, इत्यादि ब्रह्मचारी व्रतांचा लोप करणारीं कामें यापासून झालेले जे दोष, त्यांचा नाश होण्याकरितां ब्रह्मचाऱ्यानें तीन कृच्छ्र प्रायश्चित्त करावें. आणि महा व्याहृतीनें होम करावा. विशेषधर्माचा लोप झाला असतां महादेवाच्या देवळामध्यें ॥ तद्बोधिया ॥ या मंत्राचा लक्ष जप करावा. स्वीकृत केलेल्या व्रताचा भंग झाला असतां, वायुपुराणांत सांगितलें आहे. प्रमादानें, लोभानें किंवा मोहानें स्वीकारलेल्या व्रताचा जर भंग होईल तर तीन उपोषणें करून पुनः व्रत ग्रहण करावें. अथवा केश मुंडन करून पुनः व्रत स्वीकार करावा.

विप्रस्याष्टवर्षपर्यंतं क्षत्रवृत्त्या धनार्जने चांद्रायणं ॥ वैश्यवृत्तौ पण्मासान् ॥ शूद्रवृत्तौ तु सकृदेव पुनरुपनयनपूर्वकं कृच्छ्रं ॥ शूद्रस्य द्विजकर्मकरणेप्येतत् ॥ तद्धनत्यागोत्तरमिदं प्रायश्चित्तं ॥ तथा च मनुः ॥ न कथंचन कुर्वीत ब्राह्मणः कर्मवार्षलं ॥ वृषलः कर्म वा ब्राह्मं पतनीये हिते तयोः ॥ वार्षलं कर्मसेवा ॥ एवमुपक्रम्य पुनरुपनयनसहितकृच्छ्रत्रयानुवृत्तौ सएव ॥ प्रायश्चित्तं न कुर्वंति विकर्मस्थास्तु ये द्विजाः ॥ ब्राह्मण्येन परित्यक्तास्तेषामप्येतदादिशेत् ॥ एवं शूद्रस्यापि द्विजकर्मकरणेप्येतदेव ॥ तस्यापि वह्निकर्मत्वात् ॥ अर्जितधनत्यागपूर्वकं चैवत् यद्गर्हितेनार्जयतीतिमनूक्तेः ॥ स्त्रीधनोपजीवने स्त्रियैतद्धनं दत्त्वा ततोचांद्रायणं कार्यम् ॥ देवागारशिलादिना स्वगृहकरणे विचारः ॥ इष्टिकाकाष्ठाश्मलोहान् देवालयसमन्वितान् ॥ गृहीत्वात्मगृहे ये तु लोभाद्वै योजयंति च ॥ एकाकिनस्तथोद्विग्नाः क्षुत्पिपासापरिपीडिताः ॥ बंधने ते तु तिष्ठंति यावत्पापस्य संक्षयः ॥ अत्र प्राजापत्यचांद्रायणादि कल्प्यम् ॥

ब्राह्मणानें आठ वर्षेपर्यंत क्षत्रियवृत्तीनें द्रव्य मिळवून उपजीविका केली असतां चांद्रायण प्रायश्चित्त करावें. वैश्यवृत्तीनें उपजीविका केली असतां पण्मासपर्यंत चांद्रायण आचरण करावें.

शूद्रवृत्तीनें उपजीविका केली असतां तात्काळ पुनरुपनयन करून कृच्छ्र प्रायश्चित्त आचरण करावें. शूद्रानें ब्राह्मणाच्या वृत्तीनें उपजीविका केली असता हेंच प्रायश्चित्त सांगितलें आहे. शूद्रादिवृत्तीनें मिळविलेलें द्रव्य टाकून नंतर प्रायश्चित्त ग्रहण करावें. त्यास मनूचें वचन ब्राह्मणानें शूद्राचें कर्म कधींही करूं नये, आणि शूद्रानें ब्राह्मणाचें कर्म करूं नये. हीं एकमेकांचीं कर्में परस्परांस पातित्य करणारीं आहेत. शूद्राचें कर्म म्हणजे सेवा. जे ब्राह्मण वाईट कर्में आचरण करून प्रायश्चित्त करीत नाहींत, ते पतित असे जाणावे. स्त्रियेच्या द्रव्यानें उपजीविका केली असता, तें द्रव्य स्त्रियेस देऊन चांद्रायण प्रायश्चित्त करावें. देवालयाच्या पाषाणादिकानें आपलें घर बांधिलें असताचा विचार देवालयाचे ठायीं असलेलें विटा, लांकडें, दगड, लोखंड हे घेऊन लोभानें आपलें घर बांधितात, ते मनुष्य एकाकी म्हणजे त्याचे सर्व कुटुंबाचा नाश होऊन उद्विग्न, क्षुधा, तृषा यांनीं पीडित होऊन बंधनाचे ठायीं पडतात. आपल्या पापाचा नाश होईपर्यंत. येथें प्राजापत्य आणि चांद्रायण प्रायश्चित्तानें दोषहानी सांगितली आहे.

छागलेयः ॥ व्रतानि यानि भिक्षूणां तथैवोपव्रतानि च ॥ एकैकातिक्रमे तेषां प्रायश्चित्तं विधीयते ॥ अहोरात्रोपोषितोभूत्वा कृच्छ्रं चांद्रायणं चरेत् ॥ कृच्छ्रपदं चांद्रायणविशेषणम् ॥ व्रतोपव्रतान्याह बौधायनः ॥ अहिंसासत्यमस्तैन्यं मैथुनस्य च वर्जनम् ॥ अथोपव्रतानि ॥ अक्रोधोगुरुशुश्रूषा प्रसादः शौचमाहारशुद्धिश्चेति ॥ जले प्रतिबिंबदर्शनादौ ॥ याज्ञवल्क्यः ॥ प्रयितेजइत्यृच्छायां स्वदृष्टांबुनि वै जपेत् ॥ सावित्रीमशुचौ दृष्टे चापले वानृतेपि च ॥ प्रयितेजइतिमंत्रोवाजसनीये प्रसिद्धः ॥ अशुचौ मूत्रपुरीषादौ चापले वृथाचेष्टायां ॥ प्रविश्रुत्यानृतोक्तौ हारीतः ॥ प्रतिश्रुत्यानृतं ब्रूयान्मिथ्यासत्यमथापि वा ॥ सप्तकृच्छ्रसहितं चरेच्चांद्रायणं व्रतमिति ॥ गुरुवस्तुविषयकप्रतिश्रुताकरणपरमेतत् ॥ प्रायश्चित्तस्य गुरुत्वात् ॥ भोजनकाली-नमौनत्यागे पाराशरः ॥ मौनव्रतं समासाद्य आसीनो न वदेद्द्विजः ॥ भुंजानोहि वदेद्यस्तु तदन्नं परिवर्जयेदिति ॥ अर्के मुक्त्वान्नपात्रेण जलपानेउपवासःप्रायश्चित ॥ विद्यमानेषु हस्तेषु ब्राह्मणोज्ञानदुर्बलः ॥ तोयं पिबति वक्त्रेण श्वयोनौ जायते ध्रुवमिति ॥ अत्रोपवासः प्रायश्चित्तम् ॥

छागलेयाचें वचन. संन्याशास जीं व्रतें आणि उपव्रतें सांगितलीं आहेत, त्यांपैकीं एके-काचा लोप झाला असतां संन्याशानें अहोरात्र उपोषित राहून कृच्छ्रचांद्रायण आचरण करावें. संन्याशाचीं व्रतें बौधायनानें सांगितलीं आहेत. तीं अशीं हिंसा न करणें, सत्यतेनें राहणें, चौर्य आणि मैथुन वर्ज्य करणें, हीं व्रतें क्रोध न करणें, गुरूची सेवा करणें, नेहेमीं प्रसन्न अंतःकरणानें राहणें, शुद्धता असणें, हीं उपव्रतें जाणावीत. पाण्यामध्यें आपलें प्रतिबिंब पाहिलें असतां प्रायश्चित्त.

याज्ञवल्क्याचें वचन. पाण्यांत आपलें प्रतिबिंब पाहिलें असतां, अशुचिपदार्थ ह्मणजे मलमूत्रादि यांचें दर्शन झालें असतां, चापल ह्मणजे वृथा चेष्टा केली असतां, अनृतभाषण घडलें असतां, "मयितेज" या मंत्राचा छायादर्शनाचे ठायीं जप करावा. अनृतादिकाचे ठायीं गायत्रीमंत्राचा जप करावा. प्रथम मी देतों असें कबूल करून नंतर खोटें भाषण केलें असतां प्रायश्चित. हारीताचें वचन. आपल्या गुरुविषयीं प्रथम कोणतीही वस्तु देण्याची कबूल करून नंतर नाहीं असें ह्मणालें असतां, किंवा व्यर्थ असत्य भाषण केलें असतां तप्तकृच्छ्रसहित चांद्रायणप्रायश्चित्त करावें. भोजनकाळीं मौनव्रताचा स्वीकार करून टाकिलें असतां प्रायश्चित. पाराशराचें वचन. मौनव्रताचा स्वीकार करून भोजनास बसलें असतां मध्यंतरीं भाषण केल्यास नंतर अन्नभक्षण करूं नये. अर्धभोजन करून राहिलेलें जें अन्नपात्र त्यानें पाणि देखिल पिऊं नये. पात्र नसेल तर पाणी हातानें प्यावें, पशू प्रमाणें तोंडानेंच पिऊं नये. प्यालें असतां श्वानयोनी प्राप्त होते. हा दोष जाण्यास एक उपोषण प्रायश्चित्त सांगितलें आहे.

असपिंडैः सह रोदने ॥ पारस्करः ॥ मृतस्य बांधवैः सार्द्धं कृत्वा तु परिदेवनम् ॥ वर्जयेत्तदहोरात्रं दानं श्राद्धादिकर्म च ॥ एतच्च कामतः ॥ अकामतस्तु स्नानमेव ॥ प्रेतालंकरणे शंखः ॥ कृच्छ्रपादोऽसपिंडस्य प्रेतालंकरणे कृते ॥ अज्ञानादुपवासः स्यादशक्तौ स्नानमिष्यते ॥ कामतो द्विगुणं ॥ यत्तु तप्तकृच्छ्रव्रतमांगिरसः ॥ अनुगच्छेच्छया प्रेतं ज्ञातिमज्ञातिमेव च ॥ स्नात्वा सचैलं स्पृष्ट्वाग्निं घृतं प्राश्य विशुध्यति ॥ अत्रेच्छयेतिग्रहणादेतत्कामतः ॥ अकामतस्तु स्नानमेव न समानविषयमिदं ॥ ब्राह्मणे नासपिंडेनं द्विजो विप्रादिः ॥ अस्य च घृतप्राशनस्य वशिष्ठेन मानुषास्थिस्निग्धं स्पृष्ट्वा त्रिरात्रमस्निग्धत्वेऽहोरात्रं शवानुगमने चैवमित्यनुगमने एकाहस्योक्तत्वात् ॥ क्षत्रिय वैश्यानुगमने त्वधिकं कल्प्यं ॥ ब्राह्मणस्य शूद्रानुगमने पराशरः ॥ प्रेतीभूतं तु यः शूद्रं ब्राह्मणोऽज्ञानदुर्बलः ॥ अनुगच्छेन्नीयमानं स त्रिरात्रेण शुध्यति ॥ त्रिरात्रे तु ततश्चीर्णे नदीं गत्वा समुद्रगां ॥ प्राणायामशतं कृत्वा घृतं प्राश्य विशुध्यतीति ॥ अत्र घृतप्राशनस्य शुध्यर्थत्वाभिधानाच्च भोजननिवृत्तिः ॥ एतच्च कामतः ॥ अकामतस्त्वर्धं ॥ एवं क्षत्रियस्य वैश्यशूद्रानुगमने वैश्यस्य च शूद्रानुगमने कल्प्यम् ॥

आपल्या सपिंडांतील नव्हे अशा मनुष्या बरोबर रोदन केलें असतां प्रायश्चित्त. पारस्कराचें वचन. मृताच्या बांधवांशी सहवर्तमान असपिंडांतील मनुष्यानें रोदनादि कार्य करावें. कार्य केलें नसतां एक दिवस उपोषण करावें. अज्ञानानें झालें असतां स्नानानें शुद्धता होते. असपिंड प्रेतास भूषित केलें असतां कृच्छ्रपादप्रायश्चित्त करावें. अज्ञानानें झालें असतां एक उपोषण करावें. असामर्थ्य असेल तर स्नानानेंही शुद्धता होते. प्रेतास अनुगमन केलें असतां प्रायश्चित्त. आपल्या इच्छेनें प्रेतास अनुगमन केलें असतां सचेल स्नान करून अग्नीमध्यें घालून घृतप्राशन केल्यानें

शुद्धता होते. ब्राह्मणानें शुद्रप्रेताशीं अनुगमन केलें असतां प्रायश्चित्त. जो ब्राह्मण शूद्रप्रेतास अनुगमन करितो तो त्रिरात्रिनें शुद्ध होतो. त्रिरात्र गेल्या नंतर समुद्रास मिळणाऱ्या अशा नदीस जाऊन स्नान केल्यानें व शंभर प्राणायाम करून शुद्धता होते. हें ज्ञानपूर्वक अनुगमन केलें असतां प्रायश्चित्त. अज्ञानानें घडलें असता अर्ध प्रायश्चित्त करावें.

कन्यायाविवाहात्पूर्वं रजोदर्शने प्रायश्चित्तमाह प्रयोगपारिजाते आचार्यः ॥ कन्यामृतुमतीं शुद्धां कृत्वा निष्कृतिमात्मवान्॥ तथा च कारयित्वा तामुद्वहेतानृशंसधीः॥ पिता ऋतून् च पुत्र्यास्तु गणयेदादितः सुधीः ॥ दानावधि गृहे यत्नात्पालयेच्च रजोवतीं ॥ दद्यात्तदनुसंख्यागाः शक्तः कन्यापिता यदि॥ दातव्यैकापि निःस्वेन दाने तस्यायथाविधि ॥ दद्याद्वा ब्राह्मणेष्वेनामतिनिःस्वः सदक्षिणां ॥ तस्यातीतर्तुसंख्येषु वराय प्रतिपादयेत् ॥ उपोष्य त्रिदिनंकन्यारात्रौपीत्वा गवां पयः ॥ अदृष्टरजसे दद्यात्कन्यायै रत्नभूषणं ॥ तामुद्वहन्वरश्चापि कूष्मांडैर्जुहुयात् घृतमिति ॥ कन्यायाविवाहात्पूर्वं रजोदर्शने तत्पितातदृतून् गणयित्वा तत्संख्यया गोदानं कृत्वाअशक्तावेकां गां सुवर्णशृंगादिगोदानविधिना दत्वात्राप्यशक्तौ सदक्षिणमन्नं विप्रेषु दत्वा त्रिदिनमुपोषितां चतुर्थरात्रौ गव्यपयोमात्राहारां कन्यां निवृत्तरजस्कां भूषितां दद्यात् ॥ तामुद्वहन् वरस्तच्छुद्धौ कूष्मांडमंत्रैर्घृतं जुहुयात् ॥ विवाहहोमकाले उपस्थिते आरब्धे विवाहे वा रजोदर्शने तु स्नापयित्वा तां युंजानेतितैत्तिरीयमंत्रेण हुत्वा विवाहं प्रवर्तयेत् ॥

विवाहाचे पूर्वी कन्या रजस्वला झाली असतां प्रायश्चित्त. विवाहाचे पूर्वी कन्येस रजोदर्शन झालें असतां कन्येच्या पित्यानें मुलीच्या ऋतूची गणना करून जितके वेळ ऋतु प्राप्त झाला असेल त्याच्या संख्येचीं गोप्रदानें ब्राह्मणास देऊन,तितकी शक्ती नसेल तर एक गोप्रदान करावें. अत्यन्त अशक्त असता दक्षिणासहित ब्राह्मणास भोजन घालून, चौथे दिवशीं फक्त गायीचें दूध प्राशनास देऊन रजोनिवृत्ति झाल्यानंतर त्या मुलीचा विवाह करावा. त्या मुलीशीं विवाह करणाऱ्या वरानेंही कूष्मांडमंत्रानें घृतानें होम करावा. विवाहहोमाचा आरंभ झाला असतां रजोदर्शन झालें असतां तिला स्नान घालून "युंजायन" तैत्तिरीयमंत्रानें होम करून विवाह करावा.

याप्रमाणें प्रकीर्णप्रायश्चित्तनिर्णय जाणावा.

## अथ सर्वप्रायश्चित्तविचारः ॥

तत्र पूर्वं प्रायश्चित्तोपयोगिसर्वसामग्रीसंपादनं ॥ तत्र. फलतांबूलगंधपुष्पधूपदीपाः पंचगव्यानि मृद्भस्मगोमयदूर्वातिलाः समिदर्भाः होमार्थं घृतं परिषद्दक्षिणानिश्चयानुवाद कपूजार्थं दक्षिणा पूर्वोत्तरांगगोप्रदानविष्णुश्राद्धद्रव्यं तथा कृच्छ्रप्रत्याम्नायद्रव्यं ॥१॥ कृच्छ्रं प्राजापत्यमुच्यते तत्र त्रिंशत्कृच्छ्रमब्दम् ॥ पंचचत्वारिंशत्कृच्छ्रं सार्द्धाब्दम् ॥

नवतिकृच्छ्रं त्र्यब्दम् ॥ २ ॥ कृच्छ्रं प्राजापत्यमिति पर्यायौ ॥ कृच्छ्रे गवादीनांच निष्क्रयरजतनिष्कतदर्धतत्पादादयः प्रत्याम्नायाः ॥ ३ ॥ अत्रविशेषस्तु प्राजापत्य कृच्छ्रप्रकरणेद्रष्टव्यः

## सर्वप्रायश्चित्ताचा विचार.

प्रथम सर्वप्रायश्चित्तास लागणारी जी सामुग्री ती संपादन करावी फळें, तांबूल, गंध, फुलें, धूप, दीप, दही, दूध, तूप, गोमूत्र, गाईचें शेण, भस्म, दूर्वा, तीळ, समिधा, दर्भ, होमाकरितां तूप, सभे करितां दक्षिणा, धर्मशास्त्राचा ग्रंथ व अनुवादक, ग्याच्या पूजेकरितां दक्षिणा, पूर्वांग उत्तरांग प्रायश्चित्ताचीं द्रव्यें, गोप्रदान, विष्णुश्राद्धास द्रव्य, कृच्छ्राच्या प्रत्याम्नायार्थ द्यावयाचें द्रव्य याप्रमाणें सर्व जमवावें. ॥ १ ॥ कृच्छ्रासच प्राजापत्य असें ह्मणतात. तीस कृच्छ्रें झालीं ह्मणजे एक अब्द होतो. ४५ कृच्छ्रें झालीं ह्मणजे सार्द्धाब्दसंज्ञा आहे. ९० कृच्छ्राचें त्र्यब्द होतें ॥ २ ॥ कृच्छ्राचे ठायीं गाई इत्यादिक द्याव्या तें देण्यास सामर्थ्य नसेल तर त्याच्या किंमती बदल निष्क ह्मणजे चार रुपये व त्याचे अर्धे ह्मणजे दोन रुपये व त्याचा अर्धा ह्मणजे एक रुपया प्रत्याम्नय द्यावा. अत्यंत दरिद्री असेल तर शक्ति पाहून योजना करावी परंतु चार आण्यां पेक्षां कमी करूं नये. ॥ ३ ॥ यासंबंधाचा विशेष विचार पा. १७ येथें पहावा.

## ॥ अथ प्रयोगः ॥

त्र्यधिकान् एकं द्वौ वा वेदशास्त्रसंपन्नान् विप्रान् परिषत्त्वेन उपवेश्य ॥ कृतस्नानः शक्तश्चेदार्द्रवासाः कर्ताविप्रान् प्रदक्षिणीकृत्य साष्टांगं प्रणमेत् ॥ ४ ॥ विप्रैः किं ते कार्यं मिथ्या माऽवादीः सत्यमेववदेति पृष्टः गोद्वयोर्निष्क्रयीभूतं निष्कतदर्धतत्पादान्यतमप्रमाणं रजतद्रव्यं सभ्येभ्यः संप्रददे न ममेति संकल्पपूर्वकं सभ्याग्रे निधाय अमुकनामकस्य मम जन्मप्रभृति अद्ययावत् ॥ ज्ञानाज्ञानकामाकामसकृदसकृत्कृतकायिकवाचिकमानसिकसांसर्गिकस्पृष्टास्पृष्टभुक्ताभुक्तपीतापीतसकलपातकातिपातकोपपातकलघुपातकसंकरीकरणमलिनीकरणापात्रीकरणजातिभ्रंशकरणप्रकीर्णकपातकानां मध्ये संभावितपापानां निरासार्थं प्रायश्चित्तमुपदिशंतु भवंतइति ब्रवेत् ॥ ५ ॥ पुत्रादिप्रतिनिधिश्चेन्मम पितुर्जन्मप्रभृतीत्यादिवदेत् ॥ ६ ॥

## सर्वप्रायश्चित्ताचा विचार.

तीन पेक्षां ज्यास्त अथवा तीन नसल्यास एक दोन असे वेदशास्त्रसंपन्न विद्वान् ब्राह्मण सभेपरत्व बसवावे नंतर स्नान ज्यानें केलें आहे असा जो पातकी यानें शक्ति असल्यास ओलें वस्त्र तसेंच धरण करून बसलेल्या ब्राह्मणास प्रदक्षिणा करून साष्टांगनमस्कार घालावा. ॥ ४ ॥ नंतर ब्राह्मणांनी तुझें पाप काय आहे, खरें सांग, खोटें सांगू नकोस नंतर पापी मनुष्यानें गाईच्याऐवजी किंमतीबद्दलचें द्रव्य मुख्य अथवा द्रव्य हें सभ्यब्राह्मणांच्या पुढें ठेऊन हें माझें नव्हे असें ह्मणून ठेवावें. नंतर अमुक नामक जो मी त्या माझे जन्मापासून आजपर्यंत

जाणोन अथवा न जाणोन जीं पातकें झालीं असतील त्याचा नाश होणेकरितां आपण प्रायश्चित्त सांगा. याप्रमाणें बोलावें. ॥ ५ ॥ मुलगा वगैरे जर प्रतिनिधी असेल तर माझ्या पित्याचे जन्मापासून आजपर्यंत असें त्यानें ह्मणावें. ॥ ६ ॥

तत्तदेकपापे तु किं ते कार्यमितिप्रश्ने मयामुकवधः कृतः अमुकभक्षणं वामुकअगम्यागमनं कृतमित्यादि प्राकृतमेव पापमुच्चार्य तत्प्रायश्चित्तमुपदिशंतु भवंतइतिवदेत् ॥ ७ ॥ ततः सर्वे धर्मविवेक्तारोगोप्तारः सकलाद्विजाः ॥ मम देहस्य संशुद्धिं कुर्वंतु द्विजसत्तमाः ॥ ८ ॥ मया कृतं महाघोरं ज्ञातमज्ञातकिल्बिषम् ॥ प्रसादं क्रियतां मह्यं शुभाज्ञां प्रयच्छथ ॥ ९ ॥ इति प्रार्थयित्वा मामनुगृह्णंतु भवंतइति नमेत् ॥ ततः सभ्यैः शक्त्यादि विचार्य प्रायश्चित्ते निश्चिते कर्त्ता चंदनपुष्पादिभिः पुस्तकपूजामनुवादकपूजां च कृत्वा निबंधपूजात्वेन किंचिद्द्रव्यं निधायानुवादकाय भृतिरूपां दक्षिणां पापानुसारेण दद्यात् ॥ १० ॥ ततः सभ्याः पुस्तकवाचनपूर्वकमनुवादकस्याग्रे कथयेयुः ॥ अनुवादकश्च कर्त्तारं वदेत् ॥ ११ ॥ तद्यथासभ्यैरुपदिष्टोनुवादकः ॥ अमुकस्य ते जन्मप्रभृति अद्य यावत् ज्ञानाज्ञानकामाकामसकृदसकृत्कृतकायिकवाचिकमानसिकसांसर्गिकस्पृष्टास्पृष्टभुक्ताभुक्तपीतापीतसकलपातकातिपातकोपपातकलघुपातकसंकलीकरणमलिनीकरणापात्रीकरणजातिभ्रंशकरप्रकीर्णकपातकानां मध्ये संभावितपापानां निरासार्थं पर्षदुपदिष्टं सार्धाब्दं प्रायश्चित्तं अमुकप्रत्याम्नायद्वारा प्राच्योदीच्यांगसहितं त्वया आचरितव्यं तेन तवशुद्धिर्भविष्यति ॥ त्वं कृतार्थोभविष्यसीति त्रिरुपदिशेत् ॥ १२ ॥

एकच पातक असेल तर तुझें काय कार्य आहे असें सभेनें प्रश्न केल्यानंतर पातक्यानें मी अमुक पातक केलें आहे त्याला प्रायश्चित्त सांगा असें ह्मणावें. ॥ ७ ॥ नंतर आपण सर्व धर्म निवेचन करणारे व धर्मसंरक्षण करणारे असे आपण श्रेष्ठ ब्राह्मण आहांत माझ्या देहाची शुद्धी करा. ॥ ८ ॥ म्या मोठें भयंकर पातक केलें आहे. सबव मजवर दया करून मला चांगली आज्ञा द्या. पूज्यांनीं मला पवित्र केलें ह्मणजे मी पवित्र होईन. ॥ ९ ॥ याप्रमाणें प्रार्थना करून आपण मजवर अनुग्रह करा असें ह्मणून नमस्कार करावा. नंतर सभ्य ब्राह्मणांनीं शक्त्यादिकांचा विचार करून प्रायश्चित्ताचा निश्चय करावा. पातकीमनुष्यांनीं चंदन, पुष्प इत्यादिकांनें पुस्तक व अनुवादक यांची पूजा करून पुस्तकास किंचित् दक्षिणा ठेवून अनुवादकास पातकाच्या अनुमानानें दक्षिणा द्यावी. ॥ १० ॥ नंतर सभ्यानें पुस्तक वाचनपूर्वक अनुवादकास प्रायश्चित्त सांगावें. अनुवादकानें तें कर्त्यास सांगावें. ॥ ११ ॥ जन्मापासून आजपर्यंत सकलांमध्ये वर्णन केलेलीं पातकें त्याचा निरास होण्या करितां सभेनें सांगितलेलें सार्द्धाब्द प्रायश्चित्त अमुक प्रत्याम्नायानें प्राच्योदिच्यांग सहित असें प्रायश्चित्त तूं आचरण कर. तेणें करून तुझी शुद्धी होऊन कृतार्थ होशील असा तीनवेळां उपदेश करावा. ॥ १२ ॥

कर्त्ता ओमित्यंगीकृत्य प्रणम्य पर्षदं विसृजेत् एतच्च ग्रामाद्बहिर्नद्यादेस्तीरे नक्षत्रदर्शने कार्यम् व्रतं निशामुखेग्राह्यं बहिस्तारकदर्शनइति स्मृतेः मुमूर्षोस्तु गृहादावेव॥ ततोरिक्तायां सायाह्ने देशकालौ संकीर्त्य अमुकशर्मणोमम जन्मप्रभृति अद्ययावत् ज्ञाताज्ञातमध्ये संभावितपापानां निरासार्थं पर्षदुपदिष्टं सार्द्धाब्दप्रायश्चित्तं प्राच्योदीच्यांगसहितं अमुकप्रत्याम्नायेनाहमाचरिष्ये इति संकल्पः ॥ ततः यानि कानि च पापानि ब्रह्महत्त्यासमानि च ॥ केशानाश्रित्य तिष्ठंति तस्मात्केशान् वपाम्यहम् ॥१॥ इतिमंत्रेण क्षौरं कार्यं॥क्षौराभावे सार्द्धाब्दादिव्रतं द्विगुणितंकार्यंपर्षद्दक्षिणापि द्विगुणा देया ॥ यत्र तु सभर्तृकस्त्रिया जीवत्पितृकादेश्च क्षौरं निषिद्धं तत्र नद्विगुणव्रतं ॥ क्षौरांते गंडूषान् कृत्वा यथोक्तदंडकाष्ठेन ॥ आयुर्बलं यशोवर्चः प्रजाः पशुवसूनि च ॥ १ ॥ ब्रह्मप्रज्ञां च मेधां च त्वन्नोदेहि वनस्पते ॥ इति मंत्रेण दंतधावनं कृत्वा काष्ठांतरेण जिह्वामुल्लिख्य स्नात्वा भस्मादिदशस्नानानि कुर्यात् ॥ २ ॥ तत्रजलमिति स्थलमितिभस्मइतिमंत्रेण अथवाईशानादिमंत्रैर्भस्मस्नानं कुर्यात्॥गंधद्वाराइतिमंत्रेण गोमयस्नानं अश्वक्रांतेइतिमंत्रेण मृत्तिकास्नानं ॥ तत्सवितुरिति गोमूत्रस्नानं ॥ आप्यायस्वेति पयःस्नानं ॥ दधिक्राव्णइति दधिस्नानं ॥ घृतंमिमिक्षे ॥ अथवा ॥ तेजोसिइतिमंत्रेणघृतस्नानं ॥ देवस्यत्वासवितुरितिमंत्रेणकुशोदकस्नानं ॥ आपोहिष्ठेतिमंत्रेण शुद्धोदकस्नानं ॥ एतानि दश स्नानानिकार्याणि ॥ ततो स्नानानंतरीयंतर्पणादिकृत्यं संपाद्य वासःपरिधानांतेतिलकं कृत्वा आचम्य देशकालौ संकीर्त्य विष्णुप्रीत्यर्थं प्रायश्चित्तांगविष्णुश्राद्धसंपत्तये श्रीविष्णूद्देशेन त्र्यधिकयुग्मब्राह्मणभोजनपर्याप्तनिष्क्रयीभूतं द्रव्यं दातुमहमुत्सृजे ॥ तच्चतुर्भ्योब्राह्मणेभ्यः पूजनपूर्वकं दद्यात् ॥ तेन पापापहामहाविष्णुः प्रीयतां ॥ प्रायश्चित्तपूर्वांगगोदानं कृत्वा होमं कुर्यात् ॥ पंचगव्यं च पिबेत् अस्मिन्दिने उपवासः ॥ अशक्तौ हविष्याशनं कार्यम् ॥ पूर्ववदेवविष्णुश्राद्धं गोदानं उत्तरांगहोमं च कुर्यात् ॥ गोनिष्क्रयरजतादिदानपक्षे पंचगव्यप्राशनांते इदंसार्द्धाब्दपंचचत्वारिंशत्कृच्छ्रप्रत्याम्नायगोनिष्क्रयीभूतं प्रतिकृच्छ्रं निष्कतदर्धतदर्धान्यतमप्रमाणं रजतद्रव्यं नानानामगोत्रेभ्योब्राह्मणेभ्यो दातुमहमुत्सृजे ॥ इति द्रव्यदानसंकल्पं कृत्वा तदेव द्रव्यं विभज्य नानानामगोत्रेभ्योब्राह्मणेभ्योदत्वा चोत्तरांगानि कुर्यात् ॥ अत्रविशेषादिकं तु तथा तत्तन्मंत्राश्च प्रयोगग्रंथेषु द्रष्टव्याः ॥ इति सर्वप्रायश्चित्तनिर्णयः ॥

नंतर त्यानी म्हणावें सभेनें आज्ञा केल्याप्रमाणें मला सर्व [illegible] आहे ती सर्व करितो. म्हणजे [illegible] नमस्कार करून [illegible] विसर्जन करावी. गांवाचे बाहेर अथवा नदीचे तीरी हे प्रायश्चित्त करावें. [illegible]

गांवाचे बाहेर करावें अशी स्मृति आहे. अत्यंत अजारी मनुष्य असेल तर अगर अशक्त असेल तर त्यानें घरीं केलें असतां चालेल. रिक्तातिथीचे ठायीं देशकाळ याचा उच्चार करून अमुक नामक जो मी त्या माझ्या हातून जन्मल्या पासून आजपर्यंत जाणून अथवा न जाणून जीं पातकें झालीं असतील त्या पातकाचें निराकरण होण्या करितां सभेनें सांगितलेलें पूर्वांग उत्तरांगसहित साद्वाब्द प्रायश्चित्त अमुक प्रत्याम्नायद्वारानें मी आचरण करितों असा संकल्प करून ब्रह्महत्येसमान जीं पातकें आहेत तीं सर्व केशाचा आश्रय करून राहतात ह्मणून केशवपन करावें. सबब मी केशवपन करितों. क्षौर करण्याची इच्छा नसल्यास जें प्रायश्चित्त असेल त्याचें द्विगुणित प्रायश्चित्त करावें. व द्विगुणित दक्षिणा द्यावी.सभर्तृक स्त्रिया वर्जावित् पितृकादि यांस क्षौर करण्याचा निषेध सांगितला आहे तेथें द्विगुणित दक्षिणा देण्याचें कारण नाहीं. क्षौर केल्या नंतर शास्त्रांत दांत घासण्यास जीं दंतकाष्ठें सांगितली त्यांनीं "आयुर्बलंयशोवर्चः प्रजाः पशुवसूनिच ॥ ब्रह्म प्रज्ञांच मेधांच त्वन्नोदेहिवनस्पते " या मंत्रानें दंतधावन करून दुसऱ्या लांकडानें जीभ स्वच्छ करून भस्मादिक दशविध स्नानें करावीं. जळमिति भस्म या मंत्रानें अथवा ईशानादि या मंत्रानें भस्मस्नान करावें. ॥ १ ॥ गंधद्वारा या मंत्रानें गोमय स्नान करावें. ॥ २ ॥ अश्वक्रांते या मंत्रानें मृत्तिका स्नान करावें. ॥ ३ ॥ तत्सवितु या मंत्रानें गोमूत्र स्नान करावें. ॥ ४ ॥ गंधद्वाराया मंत्रानें गोमय स्नान करावें. ॥ ५ ॥ आप्यायस्वा या मंत्रानें पयस्नान करावें. ॥ ६ ॥ दधिक्राव्ण या मंत्रानें दधिस्नान करावें ॥ ७ ॥ घृतंमिमिक्षे अथवा तेजोसि या मंत्रानें घृतस्नान करावें ॥ ८ ॥ देवस्यत्वा या मंत्रानें दर्भोदक स्नान करावें. ॥ ९ ॥ आपोहिष्ठाया मंत्रानें शुद्धोदक स्नान करावें. ॥ १० ॥ अशीं स्नानें केल्यानंतर कर्त्यानें तर्पणादि सर्व स्नानांगकृत्य करून वस्त्र परिधान करावें. नंतर तिलक लावून आचमन करून देशकाळ इत्यादिकांचें उच्चारण करून विष्णुप्रीती करितां प्रायश्चित्तांग भूत विष्णुश्राद्धसंपत्ती करितां विष्णूच्या उद्देशानें तीन पेक्षां अधिक किंवा दोन ब्राम्हण भोजनास पुरें होईल इतकें द्रव्य सोडावें. नंतर चार ब्राम्हणांची पूजा करून तें त्यास द्यावें या दानानें पापनाश करणारा असा महाविष्णु संतुष्ट होवो अशी प्रार्थना करून प्रायश्चित्त पूर्वांग एक गोप्रदान करावें व पूर्वांग होमही करावा. नंतर पंचगव्य प्राशन करावें. यादिवशीं उपोषण करावें व अशक्तता असेल तर हविष्यान्न भक्षण करावें. व पूर्वप्रमाणेंच विष्णुश्राद्ध, गोदान, उत्तरांगहोम करावा.

गायीच्या किंमतीबद्दल रजतादिकाचें दान करावें. यापक्षाचा जेव्हां स्वीकार केला आहे त्या वेळीं पंचगव्य प्राशन केल्यानंतर साद्वाब्द प्रायश्चित्ताचे ठायीं ४५ कृच्छ्र प्रायश्चित्त त्याच्या प्रत्याम्नाय गायीचे किंमतीबद्दल निष्क ह्मणजे चार रुपये त्याचे अर्धे रुपये २ त्याचें अर्धे म्हणजे एक रुपया या प्रमाणें रुप्याचें द्रव्य वेगळे वेगळे, ज्याचीं गोत्रें व नामाभिधानें आहेत अशा ब्राम्हणा कारणें संकल्प करून तें द्रव्य वाटून द्यावें. नंतर उत्तरांग प्रायश्चित्त करावें. या संबंधानें विशेष विचार व ते ते मंत्र प्रयोगग्रंथांचे ठायीं पहावेत. या प्रमाणें सर्वप्रायश्चित्ताचा निर्णय जाणावा.

## ॥ अथ विप्रस्त्रियाः प्रायश्चित्तप्रयोगः ॥

स्त्रीणां होमः कृताकृतः ॥ करणपक्षे विधवायाः क्षौरांतं पूर्ववत् कृत्वा अमंत्रकाणि दशस्नानानि ॥ सधवायास्तु संकल्पांते दंतधावनं कृत्वा तूष्णींदशस्नानानि ॥ वस्त्रपरिधानांते विष्णुश्राद्धगोदाने कृत्वा प्रायश्चित्तांगहोमार्थमाचार्यं त्वावृणे ॥ इति विप्रं वृत्वा पूर्ववत् विप्रद्वारा सर्वं पूर्वांगं कारयित्वा स्वयंपंचगव्यं तूष्णीं प्राश्य मुख्यप्रत्याम्नायद्रव्यं विसृज्योत्तरांगानि कारयेत् ॥ होमाभावपक्षे दशविधस्नानांते विष्णुश्राद्धगोदाने कृत्वाविप्रेण पंचगव्यं कारयित्वा तूष्णीं प्राश्य प्रायश्चित्तद्रव्यं संकल्प्य दत्वोत्तरांगविष्णुश्राद्धगोप्रदानदशस्नानानि कुर्यात् ॥ १ ॥

## ब्राह्मणस्त्रियेच्या प्रायश्चित्ताचा विचार.

स्त्रियांस होम एकापक्षीं करण्यास सांगितला व एकापक्षीं करूं नये म्हणून सांगितलें आहे अर्थात् कृताकृत आहे. करावा या पक्षीं विधवेनें क्षौर केल्यानंतर पूर्वी प्रमाणें मंत्ररहित दशस्नानें करावीत. वस्त्रपरिधान केल्यानंतर प्रायश्चित्तांग होम करण्याकरितां ब्राह्मणास वर्णी द्यावी नंतर पूर्वी सांगितल्या प्रमाणें सर्व ब्राह्मणद्वारा पूर्वांग प्रायश्चित्त करून आपण पंचगव्य प्राशन करून मुख्य प्रत्याम्नाय द्रव्य ब्राह्मणास द्यावें. नंतर उत्तरांग प्रायश्चित्त करावें. होमन करणें यापक्षीं दशविध स्नानें करून विष्णुश्राद्ध गोप्रदान करावें. ब्राम्हणाचे हातानें पंचगव्य तयार करवून आपण मंत्ररहित प्राशन करून प्रायश्चित्त द्रव्याचा संकल्प करून तें ब्राम्हणास देऊन उत्तरांगविष्णुश्राद्ध गोप्रदान दशस्नानें करावीत.

## ॥ अथ शूद्रस्य संकल्पांतमविकृतं प्राग्वत् ॥

॥ ततः क्षौरांते अमंत्रकदशस्नानानि वस्त्रतिलकधारणांते विष्णुश्राद्धगोदाने कृत्वा विप्रद्वारा पंचगव्यं कारयित्वा स्वयं तूष्णीं पिबेत् ॥ शूद्रेण कपिलायाः पंचगव्यानि न पेयानि ॥ नास्य विप्रद्वारापि होमः प्रायश्चित्तद्रव्यं संकल्प्य दत्वोत्तरांगविष्णुश्राद्धगोदानानि दशदानानि कुर्यात् ॥ इतिस्त्रीशूद्रप्रयोगः ॥

शूद्रास संकल्पा पर्यंत पूर्ववत् सर्व कर्म करावीत. नंतर क्षौर केल्यावर अमंत्रक दशस्नानें करावीत. वस्त्रतिलकधारण केल्यावर विष्णुश्राद्ध गोप्रदान करावें. ब्राम्हणाकडून पंचगव्य करवून शूद्रानें तें मंत्ररहित प्राशन करावें. शूद्रानें कपिलागायीचें पंचगव्य प्राशन करूं नये. शूद्रास ब्राम्हणद्वाराही होम करण्याचा अधिकार नाहीं. प्रायश्चित्त द्रव्याचा संकल्पकरून तें ब्राम्हणास देऊन नंतर उत्तरांग विष्णुश्राद्ध गोदान दशदानें करावीत. या प्रमाणें स्त्री शूद्राचा प्रायश्चित्तप्रयोग जाणावा.

## ॥ अथ गोवधाद्येकैकपापे प्रायश्चित्तप्रयोगः ॥

पर्षदं प्रदक्षिणीकृत्य साष्टांगं प्रणमेत् ॥ विप्रैः किं ते कार्यं इत्यादिपृष्टे गोवृषनिष्क्रयं संकल्प्य निधाय मयाऽमुकगोवधः कृतोथवा पलांडुगृंजनादिभक्षणं कृतं यद्वा अमुकस्त्रीगमनं कृतं तत्प्रायश्चित्तमुपदिशंतु भवंतः ॥ इति यथापापं उच्चार्य स्पष्टं वदेत् ॥ १ ॥ ततः सर्वे धर्मविवेक्तारइत्यादि० कर्त्रा निबंधपूजानुवादकपूजने कृते सभ्या अनुवादकमुखेन प्रायश्चित्तं कथयेयुः त्वयामुकगोवधः कृतस्तत्प्रायश्चित्तं त्रैमासिकव्रतं सप्तदशप्राजापत्याम्नायद्वारा वा सप्तदशगोदानतन्मूल्यदानेन वा पूर्वोत्तरांगसहितं त्वयाचरितव्यं तेन तवशुद्धिर्भविष्यतीत्यादि ॥ २ ॥ यद्वा त्वया मत्याभ्यासेन पलांडुगृंजनं कुक्कुटमांसं वा भक्षितं तत्प्रायश्चित्तं यतिचांद्रायणं पुनःसंस्कारसहितं प्राच्योदीच्यांगसहितं आचरणीयं तेन तव शुद्धिर्भविष्यति इत्यादि एवमगम्यागमनादावूह्यं ॥ ३ ॥ ततः कर्तापर्षदुपदिष्टप्रायश्चित्तं प्रत्याम्नायद्वारा दशविधस्नानपूर्वांगविष्णुश्राद्धगोप्रदानादिभिः सह कुर्यात् ॥ ३ ॥

गोवधादिक भिन्न भिन्न प्रायश्चित्तांचा प्रयोग. सभेस प्रदक्षिणा करून साष्टांगनमस्कार करावा ब्राह्मणांनी, तुझें काय कार्य आहे, इत्यादि विचारिलें असतां धेनु आणि वृषभ यांच्या किंमतीच्या द्रव्याचा संकल्प करून सभेपुढें ठेवावें. नंतर मी गायीचा वध केला अथवा कांदा, गाजर, भक्षण केलें अथवा अमुक स्त्रियेशी गमन केलें यास जें प्रायश्चित्त असेल तें सांगा याप्रमाणें पापाचा उच्चार करून स्पष्ट सांगावें. नंतर सर्वधर्मांचा विचार करणारे इत्यादिक प्रार्थना करून नंतर निबंध आणि अनुवादक यांची पूजा करावी व सभ्यांनीं अनुवादकांच्या मुखानें प्रायश्चित्त सांगावें.-त्वां गोवध केल्यास त्यास त्रैमासिक व्रत प्रायश्चित्त करावें अथवा सतरा प्राजापत्य प्रत्याम्नायद्वारा प्रायश्चित्तें करावींत. अथवा सतरा गोप्रदानें किंवा त्यांची किंमत देवून पूर्वांग उत्तरांग प्रायश्चित्त करावें. तेणेंकरून तुझी शुद्धी होईल अथवा त्वां बुद्धिपूर्वक पलांडु गृंजन ( कांदा, गाजर ) कोंबड्याचें मांस भक्षण केलेस, त्यास प्रायश्चित्त यतिचांद्रायण, पूर्वांग उत्तरांग सहित प्रायश्चित्त करावें. नंतर पुनः संस्कार करावा, ह्मणजे तुझी शुद्धी होईल याप्रमाणें अगम्यगमनाचे ठिकाणींही अशीच योजना करावी. याप्रमाणें सर्वप्रायश्चित्त निर्णय जाणावा.

इति श्रीधारूरकरेत्युपनामकमौद्गलिककुलावतंससोमाध्वरयाजिदुर्गादासद्युतविद्वन्मुकुटहीरकांकुरान्नसत्रप्रपादानार्जितसुकृतप्रावदीनानाथसुतपौंडरीकक्षेत्रनिवासिश्रीपांडुरंगचरणारविंदनिविष्टचेतोवृत्तिदाजीबापरपर्यायकाशीनाथसुतविठ्ठलेन विरचिते प्रायश्चित्तव्यवहारप्रकाशाख्यग्रंथेप्रकीर्णादिप्रायश्चित्तनिर्णयः प्रथम भागः समाप्तः ॥ सकलप्रायश्चित्तनिर्णयश्च समाप्तः ॥

श्रीरुक्मिणीपांडुरंगचरणारविंदार्पणमस्तु ॥

॥ शुभंभवतु ॥

॥ श्री ॥

श्रीगणेशायनमः

# द्वितीयभागारंभः ।

## अथ द्रव्यशुद्धिनिर्णयारंभः ॥

॥ श्रीविठ्ठलं दयासिंधुं पुंडरीकवरप्रदम् ॥ प्रणम्य कथ्यते द्रव्यशुद्धिश्चैव शुभप्रदा ॥१॥ तत्रादौ सर्वद्रव्याणां भूम्यधिकरणत्वाद्भूशुद्धिरुच्यते ॥ तत्रोपहतभूशुद्धिः सप्तधा भवति ॥ तदाह यमः ॥ खननात्पूरणाद्दाहाद्वर्षेणलेपनात् ॥ गोभिराक्रमणात्कालाद्भूमिः शुध्यतिसप्तभिः ॥ कालादिति यावता कालेनामेध्यगंधलेपादिक्षयोभवति सकालउच्यते ॥ याज्ञवल्क्योपि ॥ भूशुद्धिर्मार्जनाद्दाहात्कालाद्गोक्रमणात्तथा ॥ सेकादुल्लेखनाल्लेपाद्गृहं मार्जनलेपनात् ॥ मार्जनं संमार्जन्यातृणादीनामपसारणं ॥ दाहस्तृणकाष्ठादिभिः कालः गंधलेपादिक्षयोयावता भवति सः ॥ सेकः प्रवर्षणेन क्षीरगोमूत्रपयोदकै र्वा ॥ उल्लेखनं खननं त्वक्षणं वा ॥ लेपनं गोमयादिभिः ॥ अत्र भूग्रहणेनैवप्राप्तेपि पुनर्गृहग्रहणं प्रतिदिनं तस्य मार्जनलेपनादिप्राप्त्यर्थं ॥ इदं समस्तमपि मार्जनादिकं दुष्टत्वहेतुभिः समस्तैः पुनःपुनरुपहतभूविषये शुध्यापादकम् ॥ अन्यथोपहत्यनुसारेण मार्जनादिषु सप्तसु मध्ये द्वित्र्यादिक यथायोग्यं योजनीयं ॥ दुष्टत्वनिमित्तानि तु देवलेनोक्तानि ॥ यत्रप्रसूयते नारी म्रियते दह्यतेथवा ॥ चाडालाध्यासिता यत्र यत्र विण्मूत्रादिसंगतिः ॥ एव कश्मलभूयिष्ठा भूरमेध्या प्रकीर्तिता ॥ श्वसूकरखरोष्ट्राद्यैः संस्पृष्टा दुष्टता व्रजेत् ॥ अंगारतुषकेशास्थिभस्माद्यैर्मलिना भवेदिति ॥ अस्यार्थः ॥ नारीप्रसवादिर्मूत्रादिसंगतिपर्यंतैर्निमित्तैर्भूमिरमेध्या भवति ॥ श्वसूकरादिस्पृष्टा दुष्टा भवति ॥ अंगारादिसंपृक्ता मलिना ॥ इति त्रिविधापि शोध्याभूमिः ॥

## आतां द्रव्यशुद्धीचा निर्णय सांगतो.

दयेचा समुद्र, पुंडरीकास वर देणारा, अशा श्रीविठ्ठलास नमस्कार करून पदार्थांच्या शुद्धिचा निर्णय सांगतो. सर्वद्रव्यें भूमिच्या आश्रयानें राहतात ह्मणून प्रथम भूमिशुद्धि सांगतो. ॥१॥ दूषित झालेल्या भूमीची शुद्धि सातप्रकारांनीं सांगितली आहे. याविषयीं यमाचें वचन. ह्मणणें, दूषित झालेली माती काढून दुसरी माती घालून पूर्णकरणें, जाळणें, पाणि शिंपडणें, सारवणें, गायी बांधुन तुडविणें, कांहीं काळपर्यंत न राहतां रिकामी टाकणें, या सात कारणांनीं भूमि शुद्ध होते येथें काळशब्दानें भूमीचा दुर्गंधादिकांचा नाश होईल, इतका काळ घ्यावयाची अपेक्षा आहे. याज्ञवल्क्याचें वचन. भूमीची शुद्धि मार्जनादिक यमस्मृतींत सांगितलेल्या सातकारणांनीं होते. घराची शुद्धि झाडून पाणी शिंपडणें आणि सारवणें याच्या योगानें होते. येथें भूमिशब्दानें घराचें ग्रहण झालें असतां पुनः याज्ञवल्क्यानें आपलें वचनांत गृहाचें ग्रहण केलें, तें प्रतिदिवशी

मार्जन, लेपन इत्यादिका करितां आहे. हीं मार्जनादिक सात कारणें सांगितलीं, तीं भूमीस दूषित करण्यास जीं कारणें सांगितलीं आहेत, त्या सर्वकारणांनीं वारंवार भूमि दूषित झाली असता खननादिक जीं सात कारणें तीं सर्वें योजावीत. सर्वकारणांनीं भूमि दूषित न होतां, काहीं कारणानीं दूषित झाली असता मार्जनादिक शुद्धिसंपादनकरणारीं जीं सात कारणें यातलि दोन तीन कारणानीं ही भूमि शुद्ध होते. भूमीस दूषित करणारी कारणें देवलानें सांगितलीं आहेत. तीं अशीं, ज्याभूमिचे ठायीं स्त्री प्रसूत झाली असेल, अथवा कोणा मृत झाला असता, किंवा मृतास दहन केलें असतां, चांडालादिक फार दिवस राहिल्यानें, मूत्रविष्ठादिक पडल्यानें, भूमि अपवित्र होते. कुत्रें, डुक्कर, गाढव, ऊंट, इत्यादिकानें स्पर्श केलेली भूमि दुष्ट होते. राख, कोंडा, केश, हाडें, भस्म इत्यादिकानें भूमि मलिन होते. वरीलें श्लोकाचें तात्पर्य असें आहे कीं, स्त्री प्रसूत होणें, मरणें, प्रेत जाळणें, चांडालादिक असणें, मूत्रादिकाचो संगती होणें, इत्यादिक निमित्तानें भूमि अपवित्र होते. कुत्रे इत्यादिकानें स्पर्शित झालेली भूमि दुष्ट होते. अंगरादिकांनीं युक्त झालेली भूमि मलिन होते. अशीही तिन प्रकारची अशुद्ध झालेली जी भूमि ती शुद्धि करण्यास योग्य जाणावी.

तत्रामेध्यायाः शुद्धिस्तेनैवोक्ता ॥ पंचधा वा चतुर्धा वा वा भूरमेध्या विशुध्यतीति ॥ यत्र मनुष्यदाहः ॥ तथा चांडालानां चिरस्थितिः ॥ एवंविधामेध्यायाभुवः ॥ पंचभिर्गंधलेपाद्यपनयनक्षमैर्दहनकालगोक्रमणसेकोल्लेखनैः शुद्धिः ॥ यत्र मनुष्याजायंते म्रियते वात्यंतमूत्रविष्ठादिसंगत्तिर्वा ॥ एवंविधामेध्यायाभूमेर्दाहविवर्जितैः कालादिभिः पूर्वोक्तैरेव चतुर्भिःशुद्धिः ॥ दुष्टादिविषये च सएवाह ॥ दुष्टा भूमिर्द्विधा त्रेधा शुध्यते मलिनैकधेति ॥ दुष्टायाभुवस्त्रिभिर्गोक्रमणसेकोल्लेखनैर्द्वाभ्यां सेकोल्लेखनाभ्यां वा शुद्धिः ॥ मलिनायाभुवउल्लेखनेनैकेनैव शुद्धिरित्यर्थः ॥ तथा चान्यत्रविशेषउक्तः ॥ गोचर्ममात्रमब्बिंदुर्गोःशोधयति पातितः ॥ समूढमसमूढं वा यत्र मेध्यं नलक्ष्यतइति ॥ समूढं कृतसंमार्जनं असमूढमकृतसंमार्जनं वा ॥ गोःपृथिव्या मलिनं गोचर्ममात्रं प्रदेशं पातितो बिंदुरुदकबिंदुःशोधयतीत्येकोर्थः ॥ अथवा गोरब्बिंदुर्गोपुच्छस्पृष्टोदकसेके कृते एकेन बिंदुना गोचर्ममात्रभूभागः शुद्धोभवतीत्यर्थः ॥ यत्रैकादश गावउपविशंति तावद्भूभागोगोचर्म ॥ गृहशुद्धिस्तु सवर्त्तेनोक्ता ॥ गृहशुद्धिं प्रवक्ष्यामिअंतस्थशवदूषणे ॥ प्रोत्सृज्य मृन्मयं भांडं सिद्धमन्नं तथैवच ॥ गृहादपास्य तत्सर्वं गोमयेनोपलेपयेत् ॥ गोमयेनोपलिप्याथ छागेनाघ्रापयेद्बुधः ॥ ब्राह्मणैर्मंत्रपूतैश्च हिरण्यकुशवारिणा ॥ सर्वमभ्युक्षयेद्वेश्म ततः शुध्येदसंशयमिति ॥ अनुपहतायाअपि गृहस्य भूमेः प्रतिदिनं संमार्जनोपलेपने कार्ये तेन शुद्धिः ॥ चिरकालं चांडालादिसंसर्गादिना अत्यंतोपहतस्य दहनाच्छुद्धिरित्यन्यत्र विस्तरः ॥ ॥

इति भूशुद्धिनिर्णयः ॥

प्रथम अपवित्र भूमि वरील याज्ञवल्क्यस्मृतींतील सिंचनादि चार पांच कारणानीं शुद्ध होते. जेथें मनुष्याचें दहन केलें असेल, अथवा चांडाळादिक चिरकाल राहिले असतील अशा अपवित्र भूमीची शुद्धि दुर्गंधाच्या लेपास दूर करण्याविषयीं समर्थ अशीं दहन, ( चाळणें ) कांहीं काल तसींच टाकणें, गाईबांधणें, सिंपडणें, उकरून काढणें इत्यादि करणानीं शुद्ध होते. ज्या भूमीचे ठायीं मनुष्यांचे जन्म झाले असेल, अथवा मनुष्यें मेलीं असेल किंवा अत्यंत मूत्रविष्ठादिकांची संगती झाली असेल, अशा भूमीची शुद्धि दहनानें रहित पूर्वोक्त चार कारणें यांच्या योगानें शुद्धि होते. दुष्टभूमि दोन अथवा तीन कारणानीं शुद्ध होते मलिनभूमि एका कारणानें शुद्ध होते. दुष्टभूमि, तिन कारणें ह्मणजे गायी बांधून त्यांच्या पायांनीं तुडविणें, गोमूत्र अथवा पाणी सिंपडणें, अथवा वरील कांहीं माती खणून काढणें, हीं तीन कारणें समजावीत. दोन कारणें म्हणजे खणून जळादिक सिंपडणें मलिन भूमिकेवळ उल्लेखनानें शुद्ध होते याविषयीं दुसरा प्रकार सांगितला आहे. तो असा, जमिनीवर पडलेला पाण्याचा एकबिंदु गोचर्ममात्र जो भूमीचा भाग त्याला शुद्ध करितो तो भाग संमार्जन केलेला असो अथवा नसो गायीच्या शेंपुटाचे ठायीं पाणी ओतून तें सिंपडलें असतां, त्यांतील एक जलबिंदु भूमीवर पडला असतां, तो गोचर्मप्रमाण जो जमीनीचा भाग त्याला शुद्ध करितो. तो भाग विशेष अपवित्र नसावा. ज्या भागांमध्यें अकरा गायी बसतात, तेवढा जो भूमीचा भाग त्यास गोचर्मभाग असें म्हणतात. संवर्तानें घराची शुद्धि सांगितली आहे. ती अशी, घरामध्यें मनुष्यमृत झालें असतां, मृण्मय सर्वपात्रें व सिजलेलें अन्न सर्व घराबाहेर टाकावें, व सर्वघर शेणानें सारवावें. भिंती किंचित् तासून काढून ब्राम्हणाकडून सोनें आणि दर्भ ज्यांत टाकिलें आहे असें पाणि मंत्रानें शिद्ध केलेलें सर्व घरामध्यें सिंपडावें म्हणजे घर पवित्र होतें. कोणत्याही वाईटपदार्थानें दूषित न झालेली अशी घराची भूमी झाडणें, सारवणें इत्यादिकानें शुद्ध होते. गृहभूमीस चिरकाल चांडाळादिकांचा संसर्ग झाला असतां ती भूमि तृण काष्ठ इत्यादिक घालून जाळावी. याप्रमाणें गृहशुद्धीचा निर्णय जाणावा.

## ॥ अथ पात्रशुद्धिविचारः ॥

तत्र सर्वेषामुपहतानां पात्राणामद्भिः प्रक्षालनं नित्यं॥ विशेषस्तूच्यते ॥ तत्र ताम्रमयाणां पात्राणां उपहतौ आम्ललवणाभ्यां शुद्धिः ॥ तत्राम्ललवणघर्षणोत्तरमद्भिः प्रक्षालनं ॥ एवमुत्तरत्रापि ज्ञेयं ॥ कांस्यमयानां भस्मना शाणतैलसिकताघर्षणैः कार्ष्णायसानां तैजसानामश्ममयानां च शकृद्भस्मभ्यां ॥ बिल्वकपित्थालाबुमयानां वेणुपत्रकुशादिनिर्मितानां च गोमयेन ॥ राजतकांचनयोरद्भिः शंखशुक्तीनामपि तथैव ॥ वैणवानां गोमयोदकाभ्यामुपलेपनं ॥ इदमल्पोपहतौ ॥ उच्छिष्टस्नेहेनोपलेपे सदपनयपर्यंतं यवादिधान्यचूर्णेन गोमयेन वा घर्षणम् ॥ मूत्राद्युपहतानामग्नौतापनमधिकमुक्तम् ॥ अत्र याज्ञवल्क्यः ॥ सौवर्णराजताब्जानामूर्ध्वपात्रग्रहाश्मनाम् ॥

शाकरज्जुमूलफलवासोविदलचर्मणाम् ॥ पात्राणां चमसानां च वारिणा शुद्धिरिष्यते सौवर्णं सुवर्णपात्रं ॥ तथा राजतं अब्जं जलजं मुक्ताफलं शंखादि ॥ ऊर्ध्वं पात्रं यज्ञोपयोगि मुसलोलूखलादि ॥ ग्रहाः षोडशिप्रभृतयः अश्म शिलादि शाकं वास्तुकादि ॥ रज्जुर्मुंजादिरचिता ॥ मूलमार्द्रकादि ॥ फलमाम्रपनसादि ॥ विदलं वंशजपात्रम् ॥ चर्म आजमेषादि ॥ एतद्विकारजानि छत्रादीनि ॥ एतेषां तथा पात्राणां प्रोक्षण्यादीनां ॥ चमसानां होतृचमसादयः ॥ एतेषां वारिणा प्रक्षालनात् शुद्धिरिति ॥

## आतां पात्रशुद्धीचा विचार.

सर्व तऱ्हेचीं पात्रें दूषित झालीं असता पाण्यानें धुवून काढावींत ह्मणजे तीं शुद्ध होतात तांब्याचीं भांडीं दूषित झालीं असतां आंबटपदार्थ आणि मीठ यानें घासलीं असतां शुद्ध होतात. आंबटपदार्थानें घासल्यानंतर पाण्यानें प्रक्षालन करावें. याप्रमाणें जलप्रक्षालन पुढें ही जाणावें. कास्याचीं भांडीं दूषित झालीं असता भस्मानें घासून प्रक्षालन करावींत. लोखंडाचीं पात्रें ताग, तेल आणि वाळु यानीं घासून प्रक्षालन करावींत. सुवर्णादिकाचीं, तसेंच पाषाणाचीं पात्रें गायीचें शेण आणि भस्म यानें घासून प्रक्षालन करावींत. वेल, कवठ, भोपळा, वेळूचीं पात्रें, दर्भ, इत्यादिकांनीं निर्माण केलेलीं पात्रें गोमयानें शुद्ध होतात. सोनें रुपें शंख मौक्तीक याचीं पात्रें पाण्यानें क्षालन केलीं असता शुद्ध होतात. वेळूचीं पात्रें शेण घालून पाण्यानें धुतलीं असता शुद्ध होतात. हें थोडें दूषित झालें असताचें आहे. उच्छिष्ट पदार्थ अथवा तेल याचा लेप होऊन दूषित झालीं असता उच्छिष्टादिक नाहींसे होईपर्यंत यवादिकधान्याच्या चूर्णानें अथवा गोमयानें घासावींत. मूत्रादिकपदार्थानें दूषित झालीं असता अग्नीचें ठायीं टाकून जाळावीं. याविषयीं याज्ञवल्क्यस्मृतींतीलवचन. सोन्याचीं पात्रें, रुप्याची पात्रें, मोत्याचीं पात्रें, शखाचीं पात्रें, यज्ञाचे उपयोगास लागणारीं अशीं मुसळ, उखळ, इत्यादिक पात्रें, सोमरस ज्यामध्यें ठेवितात, अशीं पात्रें, पाटा, वरवटा, भाज्या, मोळादिकानीं तयार केलेली दोरी, आलें वगैरे अंबा, फणस इत्यादिक फलें, विदल ह्मणजे वेळुचीं पात्रें, मेषादिकांचीं कातडीं तसेंच त्याच्या विकारा पासून झालेले छत्री वगैरे, प्रोक्षिण्यादिक पात्रें, तशींच चमसादिक पात्रें, हीं पाण्याच्यायोगानें प्रक्षालन केलीं असता शुद्ध होतात-

तथाच मनुः ॥ निर्लेपं कांचनभांडमद्भिरेव विशुध्यति ॥ अब्जमश्ममयं चैव राजतं चानुपस्कृतमिति ॥ अनुपस्कृतमनुकीर्णरेखादि खातेषूच्छिष्टावस्थानरहितमित्यर्थः ॥ तत्र स्नेहपात्रेषु विशेषोयाज्ञवल्क्येनोक्तः ॥ चरुसुक्स्रुवासस्नेहपात्राण्युष्णेन वारिणेति ॥ चरुर्मृन्मयी चरुस्थाली ॥ एतान्यपि लेपरहितान्येवोष्णेन वारिणा शुध्यंति ॥ शुद्धेन वारिणेत्यनुवर्त्य तेनैवोक्तम् ॥ स्फ्यशूर्पाजिनधान्यानां मुसलोलूख

लानसंमिति ॥ स्फ्या पज्ञांगभूतकाष्ठच्छुरिका ॥ अनः शकटं ॥ स्नेहलेपाद्युपहतौ तु हारीतः ॥ अद्भिः कांचनरजतशंखशुक्तीनां तद्गुणवर्जनम् ॥ स्नेहवैवर्ण्योपहतानां यवगोधूमकलायमाषमसूरमुद्गांगारगोमयचूर्णैर्धावनम् ॥ स्नेहवैवर्ण्योपहतानामिति उच्छिष्टादिस्नेहेन विवर्णत्वं यथा भवति तथाप्रहतानामित्यर्थः ॥ यवादिचूर्णानि विकल्पितानि सर्वेषां स्नेहवैवर्ण्यापकर्षणार्थत्वादेव ॥ उदकस्य तु सर्वत्र शोधनद्रव्यैर्योगोपेक्षितः ॥ आपस्तंबोपि ॥ गवाघ्रातानि कांस्यानि शूद्रोच्छिष्टानियानि च ॥ शुध्यंति दशभिः क्षारैः श्वकाकोपहतानि चेति ॥ क्षारोभस्म ॥ दशवारान् भस्मना मार्जितानि शुध्यंतीत्यर्थः ॥

व्यास मुनूचें वचन. जीं विशेषें करून छिद्र न झालेली अशी सुवर्ण, मौक्तिक, पाषाण यांचीं पात्रें, व्यास रेखा नाहिंत अशीं रुप्याचीं पात्रें पाण्यानें प्रक्षालन केलीं असतां शुद्ध होतात. याज्ञवल्क्यानें असें सांगितलें आहे कीं, मृण्मय चरुस्थाली स्रुक्, स्रुवा, इत्यादिक पात्रें स्नेहानें दूषित झालीं असतां उष्णोदकानें धुतलीं असतां शुद्ध होतात. यज्ञांगभूत लांकडाची सुरी, सूप; हरणाचें कातडें, धान्य, उखळ, मुसळ, गाडा हे पाण्यानें धुतले असता शुद्ध होतात. तेलाच्या लेपानें सुवर्ण रुप्यादिकांचीं पात्रें दूषित झालीं असतां सातू, गहू, वाटाणे, उडीद, मसूर, मुग यांच्या पिठानें, तसेंच राख, शेण इत्यादिकानें घासून पाण्यानें क्षालन करावीत. स्नेहादिकानें आलेला दूषितपणा नाहींसा होईपर्यंत घर्षण करावें. यवादिकांचीं जीं चूर्णें सांगितलीं, हीं नसलीं तरी चालेल. कारण स्नेहादिकानें जो पात्रास दुषितपणा आला असेल, तेवढें नाहींसें होणें एवढेंच येथें त्याचें प्रयोजन आहे. पाण्याचा मात्र सर्वशोधन द्रव्याशीं योग अवश्य आहे. आपस्तंबाचें वचन. गायीनें हुंगलेलीं तसेंच कुत्रा, काक इत्यादिकानें उपहत केलेलीं, तशींच शूद्रानें उच्छिष्ट युक्तकेलेलीं कांस्याचीं पात्रें दहावेळ भस्मानें घासून धुतलीं असतां शुद्ध होतात.

स्मृत्यंतरे ॥ भस्मना शुध्यते कांस्यं क्षुरया पत्र लिप्यते ॥ सुरामुत्रपुरीषैस्तु शुध्यते तापलेखनैरिति ॥ तत्र निर्लेखनं नाम शस्त्रैरुपरितनावयवापकर्षणं त्वक्षणमिति यावत् ॥ सुरादिग्रहणं शुक्रशोणितादीनामप्युपलक्षणार्थम् ॥ तथाच ॥ ताम्रमम्लेन शुध्येत्तुं न चेदामिषलेपनम् ॥ आमिषेण तु यल्लिप्तं पुनर्दाहेन शुध्यति ॥ शंखोपि ॥ सूतिकोच्छिष्टभांडस्य सुरामद्यहतस्यच ॥ त्रिसप्तमार्जनाच्छुद्धिर्नतुकांस्यस्य तापनमिति ॥ अस्यार्थः ॥ सूतिकोच्छिष्टाद्युपहतानां तैजसानां सप्तभिर्यवगोधूमादिचूर्णैः प्रत्येकं त्रिमार्जनाच्छुद्धिः ॥ कांस्यस्य तु तापनाच्छुद्धिर्मार्जनाच्च ॥ प्रतिमार्जनमुदकप्रक्षालनमप्यावर्त्तते ॥ अधिकोपहतौ तु विशेषः स्मृत्यंतरे प्रोक्तः ॥ सूतिकाशवविण्मूत्ररजस्वलाहतानिच ॥ प्रक्षेप्यानि तान्यग्नौ पचयावत्सहेदपीति ॥ यद्द्रव्यं यावदग्निप्रक्षेपं सहते यावताग्निप्रक्षेपेण न नश्यति ॥ तावत्प्रक्षेप्यमित्यर्थः ॥

अन्यस्मृतीचें वचन. राखेनें कांस्याचें भांडें घासलें असतां शुद्ध होतें खरें, परंतु तें भांडें दारू-में लिप्त झालें नसेल तर. दारू, मूत्र, पुरीष इत्यादिकानें लिप्त झालें असतां, जाळल्यानें अथवा घा-सून काढल्यानें शुद्ध होतें. याप्रमाणेंच शुक्र रक्त इत्यादिकानें दूषित झालें असतां ही जाणावें. अन्यस्मृतींतीलवचन. ताम्याचें भांडें दूषित झालें असतां आंबटपदार्थानें घासलें असतां शुद्ध होतें. खरें. परंतु तें मांसानें लिप्त झालें नसेल तर. मांसानें लिप्त झालें असतां अग्नीमध्यें जाळून शुद्ध करावें. शंखाचें वचन. बाळंतिणीनें (दहादिवसांचेआंत) उच्छिष्ट केलेलें किंवा मद्यादिकानें दू-षित झालेलें असें भांडें एकवीस वेळां भस्मानें घासलें असतां शुद्ध होतें, परंतु कांस्याचें भांडें तप्त केल्यावांचून शुद्ध होत नाहीं. याचा अर्थ असा आहे कीं, सूतिकादिकांच्या उच्छिष्टानें अपवि-त्र झालेलीं सोनें, रुपें, तांबें इत्यादिकाचीं भांडीं पूर्वीं सांगितलेलीं गहूं, सातु इत्यादिकांचीं चूर्णें यांतील प्रत्येक चूर्णानें तीन तीन वेळा घासल्यानें शुद्ध होतें. कांस्याचें भांडें तर जाळून धुतल्या-नें शुद्ध होतें. प्रत्येक वेळां चूर्णानें घासलें असतां पाण्यानें धुतलें पाहिजे. अत्यंत दूषित झालें असतां अन्यस्मृतींतील वचन. अत्यंतोग्र, प्रेत, विष्ठा, मूत्र इत्यादिकानें अपवित्र केलेलीं पात्रें अग्नींत टाकावींत. जें पात्र अग्नीचे ठायीं टाकिलें असतां जितका वेळ पर्यंत तापत नाहीं, तो काळ पर्यंत टाकावें.

बोधायनोपि ॥ तैजसानां मूत्राद्युपघाते पुनःकरणं गोमूत्रे वा सप्तरात्रं परिवासन-मिति ॥ लेपनिर्हरणाशक्तौ पुनःकरणम् ॥ अन्यथा गोमूत्रे वा इति व्यवस्था ॥ आ-दित्यपुराणे तु ॥ सौवर्णरौप्ययुक्तानि शंखशुक्तिमयानि च ॥ कांस्यायस्ताम्ररैत्यानि त्रपुसीसमयानि च ॥ निर्लेपानि च शुध्यंति केवलेन जलेन तु ॥ शूद्रोच्छिष्टानि शोध्यानि त्रिधा क्षाराम्लवारिभिरिति ॥ अत्रापि क्षाराम्लवारिभिर्दशदशकृत्वोमा-र्जनं कार्यम् ॥ शातातपेन ॥ शुध्यंति दशभिः क्षारैरित्युक्तत्वात् ॥ स्मृत्यंतरेपि ॥ ति-लमुष्ककशिग्रूणां कोकिलाक्षपलाशयोः ॥ काकजंघा तथा वज्रचिंचाश्वत्थवटास्तथा ॥ एषां भस्म दशक्षारं संप्रोक्तं धर्मदर्शिभिः ॥ गवाघ्रातानि कांस्यानि शूद्रोच्छिष्टानि यानि च ॥ दशक्षारेण शुध्यंति श्वकाकोपहतानि च ॥ क्षाराभावे दशावृत्त्या भस्म-ना मार्जयेद्बुध इत्युक्तत्वात् ॥ द्विजातिभुक्तोच्छिष्टसंस्पर्शे तु शंखेन विशेष उक्तः ॥ ब्रह्मक्षत्रविशां चैव सकृत्संमार्जनाच्छुचिः ॥ चतुर्थेन तु यद्भुक्तं चतुर्भिस्तत्र मार्जनम् ॥ अग्नौ प्रक्षिप्य गृह्णीयाद्धस्तौ प्रक्षाल्य यत्नतः ॥ गोशृंगेण तु संस्पृष्टे तत्पात्रं शुचि-तामियादिति ॥ कांस्यपात्रविषयेत्वंगिरसा विशेष उक्तः गंडूषं पादशौचं च यः कुर्या-त्कांस्यभाजने ॥ षण्मासं भुवि निःक्षिप्य पुनराकारमादिशेत् ॥ अत्र षण्मासं भुवि-निःक्षिप्येत्युक्तत्वात् खननमपि कांस्यशुद्धिहेतुः ॥ अतश्चोपहतं कांस्यं दोषानुसारेण सप्ताहादिकालं भुवि खात्वोद्धृत्य भस्मना मार्जितं शुद्धं भवति ॥ तथाच ॥ लोहानां

दहनाच्छुद्धिर्भस्मना गोमयेन च ॥ काष्ठानां तक्षणाच्छुद्धिर्मृद्गोमयजलैरपीति ॥ याज्ञवल्क्योपि ॥ तक्षणं दारुशृंगाणामिति ॥ संहतपात्रविषये तु हारीतशातातपौ ॥ संहतानां तु पात्राणां यद्येकमुपहन्यते ॥ तस्यैव शोधनं प्रोक्तं न तु तत्स्पृष्टिनामपि ॥ शंखः ॥ मलसंयोगजं तज्जं यस्य येनोपहन्यते ॥ तस्य तच्छोधनं प्रोक्तं सामान्यं द्रव्यशुद्धिकृत् ॥ यस्य शोध्यद्रव्यस्योच्छिष्टसंयोगजं तज्जं स्वभावजं च मलं येन भस्मादिनोदसहितेनोपहन्यते ॥ तस्य तच्छोधकं भवतीत्यर्थः ॥ मृद्भांडानामलोपहतौ याज्ञवल्क्यः ॥ पुनःपाकान्महीमयमिति ॥ मद्याद्युपहतौ तु परित्यागएव तदाहमनुः ॥मद्यैर्मूत्रपुरीषैर्वाष्ठीवनैः पूयशोणितैः ॥ संस्पृष्टं नैव शुध्येत पुनःपाकेनमृण्मयमिति ॥ इति पात्रशुद्धिः ॥.

बौधायनाचें वचन. तैजसपात्रें मूत्रादिकानें उपहत झालीं असतां पुनः करावींत. अथवा सात दिवसपर्यंत गोमूत्रांत बुडवून ठेवावींत. घर्षणादिकानें अपवित्रपणा जाण्यासारखा नसेल तर पुनः करावींत. तसें नसेल तर सातदिवस गोमूत्रांत ठेवावींत. आदित्यपुराणांतील वचन. सोनें, रुपें, शंख, सिंपा, कांसें, लोखंड, तांबें, कथिल, शिसें, यांचीं पात्रें निर्लेप असतील तर पाण्यानें शुद्ध होतात. शूद्रानें उच्छिष्ट केलें असतां क्षार.आम्लपदार्थ यांच्या योगानें व पाण्यानें दहा दहा वेळां धुतल्यानें शुद्ध होतात. असें शातातपानें सांगितलें आहे. अन्यस्मृतीमध्यें. तीळ, मोखा, शेवगा, कुळित्ता, पळस, काकजंघा, निवडुंग, चिंच, पिंपळ, वड यांचें भस्म यास दशक्षार, म्हणतात. गायीनें हुंगलेलीं, शूद्रानें उच्छिष्ट केलेलीं, कुत्रा, कावळा याणीं दूषित केलेलीं अशीं कांस्याचीं पात्रें हें जें सांगितलेलें दहाक्षार यानें घासून पाण्यानें धुतल्यानें शुद्ध होतात. हें क्षार नसतील तर दहावेळां राखेनें घांसून प्रत्येकवेळां पाण्यानें धुतलें असतां शुद्ध होतात. शंखस्मृतींतील वचन. ब्राह्मण, क्षत्रीय व वैश्य यांच्या उच्छिष्टाचा संस्पर्श झाला असतां मात्र एकवेळां घासून धुतल्यानें शुद्ध होतें. शूद्रानें भोजन केलें असतां अग्नीचें ठायीं टाकून चार वेळां राखेनें घासून पाण्यानें धुवावें आणि हात स्वच्छ धुवावेत. गायीच्या शिंगानें स्पृष्ट झालेलें पात्र पवित्र होतें. कांस्याच्या पात्राविषयीं अंगिरानें विशेष सांगितलें आहे. तें असें. कांस्याच्या पात्रामध्यें चूळभरली असतां अथवा पाय धुतले असता, तें अपवित्र होतें. सबब तें जमिनीमध्यें सहा महिनेपर्यंत पुरून ठेवून नंतर पुनः तयार करावें. जमीनींत पुरून ठेवणें हें कांस्याच्या पात्रास शुद्धि होण्यास कारण आहे. सबब कांस्याचें पात्र दूषित झालें असतां सात दिवस पर्यंत जमीनींत पुरून ठेवून नंतर भस्मानें घासून धुतल्यानें शुद्ध होतें. लोखंडाचीं पात्रें जाळून भस्म व शेण यानें घासल्यानें शुद्ध होतात. काष्ठांचीं पात्रें तासून काढल्यानें शुद्ध होतात. शेण माती लावून पाण्यानें धुतल्यानेंही शुद्ध होतात. याज्ञवल्क्यानेंही काष्ठ, शिंगे यांचीं पात्रें तासल्यानें शुद्ध होतात असें सांगितलें आहे एके ठिकाणीं पुष्कळ असलेल्या पात्रांपैकीं एखादें पात्र जर दूषित होईल तर तेवढेंच पात्र शुद्ध करावें. बाकीच्या पात्रांची शुद्धि करण्याची

जरूर नाहीं. शुद्ध करण्यास योग्य असा जो पदार्थ त्यास उच्छिष्टादिसंयोगादिकानें अथवा स्वभावानें झालेला जो मल ज्याच्या योगानें नाहींसा होतो; तें त्याचें शोधक होय. याप्रमाणें सामान्येंकरून द्रव्यशुद्धिविषयीं जाणावें. मातीचीं भांडीं दूषित झालीं असतां टाकून द्यावीत. मद्यादिकानें दूषित झालें असतां त्यागच करावा. याविषयीं मनूचें वचन. मद्य, मूत्र, विष्ठा, थुंकणें, पू, रक्त इत्यादिकानें संस्पृष्ट झालेलें मातीचें पात्र शुद्ध होत नाहीं. सबब मातीचीं भांडीं दूषित झालीं असतां टाकून द्यावीत. याप्रमाणें पात्रशुद्धीचा निर्णय जाणावा.

## अथ धान्यशुद्धिनिर्णयः

तत्र व्रीह्यादीनां सतुषाणां चांडालादिस्पर्शोपहतानां द्रोणन्यूनपरिमाणानां प्रक्षालनशोषणाभ्यां शुद्धिः ॥ द्रोणाधिकानां प्रोक्षणात् ॥ तंडुलानां रजस्वलादिस्पृष्टानां द्रोणन्यूनानामुत्सर्गः ॥ द्रोणादधिकानां स्पृष्टदेशस्थपरित्यागात्प्रोक्षणाच्छुद्धिः ॥ तानपि यज्ञीयचरुपुरोडाशादौ नोपयुंज्यात् ॥ तथा च विष्णुः ॥ असिद्धस्यान्नस्य यन्मात्रमुपहन्यते तन्मात्रमुत्सृज्यते ॥ सतुषस्य कंडनप्रक्षालने कुर्यादिति विशेषः ॥ बोधायनोपि ॥ व्रीहयः प्रोक्षणादद्भिः शाकमूलफलानि च ॥ तन्मात्रस्यापहाराद्वा निस्तुषीकरणेन चेति ॥ इदमल्पद्रव्यविषयम् ॥

## ॥ धान्यशुद्धीचा निर्णय. ॥

कोंड्यानें युक्त असें जे तांदुळ ह्मणजे साळीइत्यदिक धान्यें हीं चांडालादिकाच्या स्पर्शानें दूषित झालीं असतां आणि हीं धान्यें द्रोणप्रमाणाहून न्यूनअसतां प्रक्षलन करून वाळविल्यानें शुद्ध होतात. द्रोणापेक्षां जास्त असतील तर पाणि शिंपडल्यानें शुद्ध होतात तांदूळ द्रोणाहून न्यून प्रमाणाचे असोन त्यास रजस्वलादिकानीं स्पर्श केला असतां ते टाकून द्यावेत. आधिकप्रमाणाच्या तांदुळास स्पर्शझाला असतां जेवढ्याभागास स्पर्श झाला असेल तेवढे तांदूळ काढून टाकून बाकीच्या तांदुळास पाणि शिंपडल्यानें शुद्धता होते, परंतु तेही तांदूळ यज्ञसंबंधी चरु पुरोडाशादिकर्मीचे ठायीं योजूंनयेत त्यास विष्णुस्मृतींतील वचन. शिजलेलें नव्हे असें जें अन्न म्हणजे धान्य याचा जेवढाभाग दूषित झाला असेल तेवढाच काढून टाकावा. तें धान्य कोंड्यानें युक्त असेल तर काडूनप्रक्षालन करावें. बौधायानाचें वचन. साळी, भाज्या, आलें इत्यादिक मूलपदार्थ, आंब्रादिक फलें हीं दूषित झालीं असता पाणि शिंपडल्यानें अथवा त्यांतील स्पर्श केलेला भाग काढून टाकिल्यानें, किंवा कोंडा काढल्यानें शुद्ध होतात. हें तें द्रव्य थोडें असल्या बदलचें आहे.

बहुद्रव्यविषये तु काश्यपेन विशेषउक्तः ॥ प्रोक्षणपर्यग्निकरणावगाहनैः ॥ व्रीहियवगोधूमानां विमर्शनप्रोक्षणैः फलीकृतानां निघर्षणदलने श्यामधान्यानां ॥ अ-

स्यार्थः ॥ अनेकपुरुषोद्धार्याणां व्रीहियवगोधूमानां प्रोक्षणादिभिः शुद्धिः ॥ पर्यग्निकरणमग्न्यभिमर्शनम् ॥ अवगाहनं प्रक्षालनम् ॥ प्रोक्षणादीनि सर्वाणि सर्वत्रदोषाल्पत्त्वमहत्वापेक्षया योज्यानि न यथासंख्यम् ॥ कंडनेन शुक्लीकृतानिरस्ततुद्रकणाश्च तंडुलाः फलीकृताउच्यते ॥ तेषामल्पानाविमर्शनम् पाणिभ्यांनिर्मलीकरणम् ॥ बहूनां प्रोक्षणम् ॥ शमीधान्यानि मुद्गादीनि ॥ तेषामेकपुरुषोद्धार्याणां निघर्षणं विमर्दनं ततोल्पानां क्षालनमनेकपुरुषोद्धार्याणां प्रोक्षणं शुद्धिहेतुरिति ॥ यत्तु तंडुलास्तु परित्यजेदिति तदत्यंताल्पपरिमाणविषयम् ॥

पुष्कळ असता काश्यपानें विशेष सांगितला आहे. तो असा, पाणि सिंपडणें, ज्वलित अग्नि काष्ठाचे सर्व भागाचे ठायीं स्पर्श करणें, धुणें, यांच्या योगानें दूषित झालेलीं धान्यें शुद्ध होतात. एका पुरुषापेक्षां ज्यास्त मनुष्यांनीं उचलण्यास योग्य असे साळी, सातू, गहूं इत्यादिक धान्यें हीं दूषित झालीं असतां प्रोक्षणादिकानें शुद्ध होतात. पाणि सिंपडणें, अग्निस्पर्श करणें, धुणें, हीं जशीं धान्यें कमि जास्त प्रमाणानें दूषित झालीं असतील, तशा रीतिनें योजना करावी. सर्व शुद्धीचीं कारणें घेतलींच पाहिजेत असें नाहीं काडून पांढरें सफेत केलेले जें तांदूळ त्यास फलकित असें ह्मणावें. तें दूषित झालें असता थोडें असल्यास हातानें स्वच्छ करावेत. पुष्कळ असल्यास पाणि सिंपडावें. शेंगेपासून उत्पन्न होणारी जीं धान्यें मूग, तुरी इत्यादिक हीं एकामनुष्यानें वाहण्यास योग्य असल्यास त्यास निघर्षण आणि विमर्दन केल्यानें शुद्ध होतात. त्यापेक्षां थोडीं असल्यास तें धुतल्यानें शुद्ध होतात. एका मनुष्यापेक्षां ज्यास्त मनुष्यांनीं वाहण्यास योग्य असल्यास तें पाणि सिंपडल्यानें शुद्ध होतात. आता जें दूषित झालेले तांदूळ टाकून द्यावे असें जें वचन आहे. तें अत्यंत अल्पप्रमाण विषयक आहे.

आदित्यपुराणे विशेषउक्तः ॥ गृहदाहे समुत्पन्ने दग्धे च पशुमानुषे ॥ अभोज्यस्तद्गतोव्रीहिर्धातुद्रव्यस्य संग्रहः ॥ मृन्मयेणावबद्धानामधोभुवि विचेष्टिताम् ॥ यवमाषतिलादीनां न दोषोमनुरब्रवीत् ॥ ततः संक्रममानेग्नौ स्थानस्थाने च दह्यते ॥ न च प्राणिवधोपत्रेकेवलं गृहदीपनं ॥ तत्र द्रव्याणि सर्वाणि गृह्णीयादविचारयन् इति धान्यशुद्धिनिर्णयः ॥

आदित्यपुराणांत विशेष सांगितलें आहे. तें असें, घर जळालें असतां आणि त्यामध्यें पशू मनुष्यें दग्ध झालीं असतां त्यांतील धान्य भक्षण करण्यास अयोग्य आहे. सबब टाकून द्यावें. सुवर्णादि धातु, द्रव्य हे न टाकिता तें घ्यावें. मातीचें पात्रांत ठेविलेलीं आणि भूमीच्या अधोभागीं राहिलेलीं सातू, उडीद, तीळ इत्यादिक धान्यें घेण्यास दोष नाहीं. अग्नीच्या योगानें घर मात्र पेटलें असोन त्या त्या ठिकाणच्या वस्तु जळाल्या नसतील, आणि प्राण्याचा वधही झाला नसेल तर तेथील सर्वद्रव्यें घेण्यास दोष नाहीं. याप्रमाणें धान्यशुद्धीचा निर्णय जाणावा.

अथ सिद्धान्नविषये तु मनुना विशेषउक्तः ॥ पक्षिजग्धं गवाघ्रातमवधूतमवक्षुतम् ॥ दूषितं केशकीटैश्च मृत्प्रक्षेपेण शुद्ध्यति ॥ पक्षिजग्धं पक्षिभक्षितम् ॥ अवधूतं यस्योपरि वासोवधूननं कृतं पक्षिभिरुत्क्षिप्य त्यक्तं च ॥ अवक्षुतं यस्योपरिक्षुतम् ॥ मृत्ग्रहणमुदकभस्मनोरपि प्रदर्शनार्थम् ॥ तथा च याज्ञवल्क्यः ॥ सलिलं भस्म मृद्वापि प्रक्षेप्तव्यं विशुद्ध्यति ॥ पाकानंतरमेव केशकीटादिदूषितं मृदादिभिः शुध्यति ॥ तैः सह पक्वं तु परित्याज्यमेव ॥ अतश्च नित्यमभोज्यं केशकीटादिविपन्नमिति गौतमवाक्यस्यायमेवाभिप्रायः ॥ शंखः ॥ क्षीराणि यान्यभक्ष्याणि तद्विकाराशने बुधः ॥ सप्तरात्रं व्रतं कुर्यात्प्रयत्नेन समाहितः ॥ अत्रिः ॥ अजागोमहिषी वापि ह्यमेध्यं भक्षयेद्यदि ॥ दुग्धं हव्ये न कव्ये न गोमयादि न योजयेत् ॥ ऊनस्तनी व्याधिता च याचान्याभक्ष्यभक्षिणी ॥ तासां दुग्धं न होतव्य हुतं चैवाहुतं भवेत् ॥ देवद्रोण्यां विवाहेषु यज्ञेषु प्रकृतेषु च ॥ काकैः श्वभिश्च संस्पृष्टमन्नंतन्न विवर्जयेत् ॥ तन्मात्रमन्नमुद्धृत्य शेषं संस्कारमर्हतीति ॥ देवद्रोणी देवयात्रा ॥ प्रकृतेष्ववश्यं भाविषु सर्वोत्सवेषु ॥ अत्र देवयात्रादीनां बह्वन्ननिष्पाद्यत्वाद्बह्वन्नकार्येष्वपि शुद्धिर्वेदितव्या ॥ तदाह पराशरः ॥ पक्वं द्रोणाधिकं त्वन्नं काकश्वाद्युपघातितम् ॥ ग्रासमुद्धृत्य तन्मात्रं यत्तु लालाकृतं भवेत् ॥ हेमोदकेन चाभ्युक्षेद्राजतेनांबुनाथवा ॥ अग्निज्वालोपसंस्पर्शात्सुवर्णमधुसर्पिषा ॥ विप्राणां ब्रह्मघोषेण पूतं भोज्य च तद्भवेदिति ॥ द्रोणः षट्पचाशदधिकं पलशतद्वयम् ॥

सिजलेलें अन्नाविषयीं तर मनुनें विशेष सांगितलें आहे. तें असें, पाखरानीं खाल्लेलें, गाईनें हुंगलेलें, ज्याच्यावरून वस्त्र फिरविलें आहे तें, त्याच्यावर सिंकलें आहे तें, केश किडे इत्यादिकांनीं दूषित झालेलें अन्न, माती, भस्म, पाणि टाकल्यानें शुद्ध होतें. याज्ञवल्क्यस्मृतीचा अर्थ असाच आहे. स्वयंपाकानंतर अन्न केश किडे इत्यादिकानें दूषित झालें असतां मृत्तिकादिकानें शुद्ध होतें. कीटकादिकानीं युक्त असें सिजविलें असतां तें टाकून द्यावें. ह्मणूनच गौतमानें केशकीटकादिकानीं युक्त असें अन्न भक्षण करूं नये ह्मणून सांगितलें आहे, शंखस्मृतींतील वचन. जें दूध खावूं नये ह्मणून सांगितलें आहे, त्या दुधाच्या विकाराचें पदार्थ भक्षण करूं नयेत, खाल्लें असतां सात दिवस उपोषण करावें. अत्रिऋषीचें वचन. सेळी, गाय, हैस, ह्या जर अपवित्र पदार्थ भक्षण करतील तर त्याचें दूध व शेण मूत्र इत्यादिक देव पितर यांच्या कार्याच्या ठायीं योजूं नये. जीस स्तन कमी आहे, किंवा जी रोगग्रस्त झाली आहे, किंवा अभक्ष्यभक्षण करणारी असी जी शेळी, गाय, हैस याचें दूध हव्यकव्यादि कर्माचे ठायीं योजना करूं नये. देवयात्रा, लग्न, यज्ञ, याचे ठायीं सिजविलेलें अन्नांस कावळे, कुत्रे इत्यादिकांनीं स्पर्श केला असता तें टाकूं नये. जेवढया भागास स्पर्श केला असेल तेवढेंच काढून टाकावें. बाकीचें अन्न भोजन करण्यास योग्य आहे असें जाणावें. देवयात्रे प्रमाणें जेथें पुष्कळ अन्न लागत आहे, तेथें बहुत अन्न सिजवलें असतां तें दूषित झालें असतां, असीच शुद्धि जाणावी.

त्यास पाराशराचें वचन. द्रोणप्रमाणाहून अधिक अन्न सिजविलें असोन तें कावळे, कुत्रे इत्यादिकांनीं दूषित केलें असतां त्या अन्नातील ज्यावर त्यांची लाळ वगैरे पडली असेल, तेवढें अन्न काढून टाकून बाकीचें अन्नावर सुवर्ण अथवा दर्भ यानीं युक्त असें पाणि सिंपडावें. अथवा अग्नीच्या ज्वालेच्या स्पर्शानें, सुवर्णानें युक्त केलेलें असें मध, तूप सिंपडल्यानें व ब्राह्मणाच्या वेदघोषानें तें पवित्र होऊन भोजनास योग्य होतें. ९५६ तोळ्याचा द्रोण होतो.

द्रवद्रव्ये कीटाद्युपहते तूत्प्लवनं कार्यम् ॥ द्रवाणां चैव सर्वेषां शुद्धिरुत्प्लवनं स्मृतम् ॥ प्रोक्षणं संहतानां च दारवाणां च तक्षणम् ॥ वशिष्ठः ॥ द्रवाणां प्लवनेनैव घनानां प्रोक्षणेन च ॥ घनाः पर्पटवटिकोदयः ॥ द्रवाः गोरसादयः ॥ श्रपणं घृततैलानां प्लावनं गोरसस्य च ॥ श्रपणं अग्निनातापनं ॥ मिताक्षरायां ॥द्रवद्रव्यस्य घृतादेः प्रस्थप्रमाणाधिकस्य श्वकाकाद्युपहतस्य अमेध्येसंस्पृष्टस्य च प्लावः प्लावनं समानजातीयद्रवद्रव्येण भांडस्यातिपूरणं यावन्निःसरणं शुद्धिरित्यनुवर्तते ॥ तनोल्पस्य त्यागः ॥ बव्हल्पत्वं च देशाद्यपेक्षया कालाद्यपेक्षया वेदितव्यम् ॥ यथाह बौधायन देशं कालं तथात्मानं द्रव्यं द्रव्यप्रयोजनम् ॥ उपपत्तिमवस्थां च ज्ञात्वा शौचं प्रकल्पयेदिति ॥ कीटाद्युपहतस्य तूत्प्लवनं उत्प्लवनं चात्र वस्त्रांतरितें पात्रे प्रक्षेपः ॥ अन्यथा कीटाद्यपगमस्यासंभवात् ॥

पातळ पदार्थ कीटकादिकांनीं दूषित झाले असतां त्याचें उत्प्लवन करावें. पातळ पदार्थाची उत्प्लवनानें आणि एके ठिकाणीं असलेलें जें बहुत पदार्थ त्यास प्रोक्षणकेल्यानें, लाकडास तासल्यानें शुद्ध होतें. वशिष्ठाचें वचन. पातळपदार्थ उत्प्लवन केल्यानें आणि घन पदार्थ प्रोक्षणानें शुद्ध होतात. घन ह्मणजे पापड, वडे इत्यादिक द्रव ह्मणजे गोरसादिक तूप तेल दूषित असतां तापविल्यानें शुद्ध होतें. मिताक्षरामध्यें असें सांगितलें आहे कीं. पातळ पदार्थ तूप वगैरे ते शेरापेक्षां जास्त प्रमाणाचे असोन कावळे कुत्रे इत्यादिकानीं दूषित केलें अथवा अपवित्र वस्तूनें दूषित झालें असता त्याचें प्लावन करावें. प्लावन ह्मणजे पातळ पदार्थ असेल त्या जातीचा घेऊन भांड्यामध्यें वाळावा आणि तें भांडें भरून किंचित् वरून वाहून जाऊं देणें याचें नाव प्लावन. याच्या योगानें अशुद्धद्रव्य शुद्ध होतें थोडें असल्यास टाकून द्यावे. थोडें व बहुत हें देशकालादिकाच्या विचारानें जाणणें. त्यास बौधायनाचें वचन, देश, काळ आपण द्रव्याचें कारण, उपपत्ती, अवस्था, हें सर्व जाणून शुद्धतेची योजना करावी. कीटकादिकांनीं पातळ पदार्थ दूषित झाले असतां त्याचें उत्प्लवन करावें. उत्प्लवन ह्मणजे पात्रावर वस्त्र ठेवून तें गाळून घेणें त्यावांचून किडे वगैरे दूर होणार नाहींत.

आधारभांडस्थितस्य गोरसादेर्न दोषः ॥ तदुक्तम् ॥ आधारदोषे तु नयेत्पात्रात्पात्रांतरे द्रवम् ॥ घृतं च पायसं क्षीरं तथैवेक्षुरसोगुडः ॥ शूद्रभांडस्थितं तक्रं तथा मधु

न दुष्यतीति ॥ पायसं पयोनिर्वृतम् ॥ शातातपोपि ॥ गोकुले कुंडशालायां तिलयंत्रेक्षुयंत्रयोः ॥ अभिमांस्यानि शौचानि स्त्रीषु बालातुरेषु चेति ॥ कुंडशाला यज्ञशाला ॥ शंखोपि ॥ निर्यासानां गुडानां च लवणानां तथैवच ॥ कुसुंभकुंकुमानां च ऊर्णाकार्पासयोस्तथा ॥ प्रोक्षणात्कथिता शुद्धिरित्याह भगवान् यम इति ॥ निर्यासाहिंगुप्रभृतयः ॥ इयं स्वल्पपरिमाणविषया ॥ अत्याल्पत्वे त्यागः ॥ बहुपरिमाणेषु बौधायनेन मारुतेन शुद्धिरुक्ता ॥ मृत्पर्णादिषु विष्णुना विशेषउक्तः ॥ मृत्पर्णतृणकाष्ठानां श्वास्थिचांडालवायसैः ॥ स्पर्शेन विहितं शौचं सोमसूर्याग्निमारुतैः ॥ तथा प्रोक्षणेन पुष्पफलमपि च ॥ एवं पुस्तकमपि प्रोक्षणेन शुध्यति ॥ बौधायनोपि ॥ असंस्कृतायां भूमौ न्यस्तानां पुष्पफलमूलादीनां प्रक्षालनम् ॥ पराक्षालनमित्येके ॥ पराक्षालनमभ्युक्षणम् ॥ व्यासोपि ॥ रथ्याकर्दमतोयानि नावः पंथास्तृणानि च ॥ मारुतेनैव शुध्यंति पक्वेष्टकचितानि चेति ॥ मनुना तु द्रव्यहस्तयोच्छिष्टादिस्पर्शे विशेषउक्तः ॥ तथा ॥ उच्छिष्टेन तु संस्पृष्टोद्रव्यहस्तः कथंचन ॥ अनिधायैव तद्द्रव्यमाचांतः शुचितामियादिति ॥ इति धान्यशुद्धिः ॥

भांडे दूषित झालें असता त्यांतील गोरसादिक दूषित होत नाहींत भांड्यांत असलेलें तूप, दूध ऊसाचा रस, दुधाचे विकार गुळ हे असोन भांडे दूषित झाले असतां त्या भांड्यातून काढून दुसरें भांड्यात घालावें. म्हणजे शुद्ध होतें.दुधाचे विकार ताक, मध हें शूद्राच्या भांड्यात असतांही तें दूषित होत नाहींत शातातपाचें वचन. गायींचा समुदाय, यज्ञशाळा, तीळाचा घाणा, ऊंसाचा घाणा ( चरक ) स्त्रिया, मूलें, अत्यतआजारी मनुष्यें याचें ठायीं शुद्धतेचा विशेष विचार करू नये. शंखाचें वचन. हिंग इत्यादिक चीकाचे पदार्थ, गूळ, मीठ, कुसुंबा, केशर, लोकर, कापूस यांस चांडालादिकाचा स्पर्श झाला असता,प्रोक्षण केल्यानें शुद्ध होतात.हें थोडें प्रमाण विषया बद्दलची शुद्धि आहे. फारच थोडें असल्यास तें पदार्थ टाकून द्यावें. हेच पदार्थ जास्त प्रमाणाचे असल्यास वायानें शुद्ध होतात. माती, पाने, गवत, लाकडें यास कुत्रा, चांडाल, कावळा, हाडें यांचा स्पर्श झाला असता चंद्र, सूर्य, अग्नि, वायु यांच्या योगानें शुद्ध होतात. पुष्पें, फलें, हें प्रोक्षणानें शुद्ध होतात. वाईट भूमीचेंठायीं फळे पुष्पें पडलीं असतां त्याचे प्रक्षाळन करावें. असे कित्येक म्हणतात. गल्ली, चिखल, पाणि, नाव, मार्ग, गवत पक्क्यावीटा हे अशुद्ध झालें असतांही वायुच्या योगानें शुद्ध होतात मनूचें वचन. एखाद्या मनुष्याच्या हातात इतर पदार्थ असोन त्यास उच्छिष्टाचा स्पर्श झाला असतां, तो पदार्थ न ठेवतां त्यानें तसेंच आचमन केल्यानें शुद्ध होतो. या प्रमाणें धान्यादिशुद्धिचा निर्णय जाणावा.

## ॥ अथ जलशुद्धिनिर्णयः ॥

तत्र देवलः ॥ अविगंधारसोपेतानिर्मलाः पृथिवीगताः ॥ अक्षीणाश्चैव गोः पानादपः

शुद्धिकराः स्मृताः ॥ अत्र गोपानादिति गोपानयोग्यपरिमाणाः ॥ तदाहतुर्व्यासबृहस्पती ॥ भूमिष्ठमुदकं मेध्यं वैतृष्ण्यं यत्र गोर्भवेत् ॥ अव्याप्तं चेदमेध्येन तद्वदेव शिलागतमिति ॥ अल्पजलाशयादुद्धृतोदकविषये देवलएववाक्यांतरमाह ॥ उद्धृतावामेशस्ताः स्युः शुद्धैः पात्रैर्यथाविधि ॥ एकरात्रोषितास्तास्तु त्यजेदपःसमुद्धृता इति ॥ अतएवं बहूदकात्तडागादेरुद्धृतानां रात्र्युषितानामपर्युषितोदकांतराभावे न दोषः ॥ अपर्युषितसद्भावे रात्र्युषितानां कर्मयोग्यत्वं नास्ति ॥ गंगाजले तु उत्धृते बहुकालोषितेऽपि न दोषः ॥ तदुक्तंनारदेन ॥ त्यजेत्पर्युषितं पुष्पं त्यजेत्पर्युषितं जलं ॥ न त्यजेज्जान्हवीतोयं तुलशीपद्मविल्वकमिति ॥ जान्हवीत्युपलक्षणं ॥ तेन गौतमीचंद्रभागाजलेषु पर्युषितत्वदोषोनास्ति ॥ महाजलाशयविषये सएवाह ॥ अक्षोभ्यानि तडागानि नदी वापीसरांसि च ॥ चांडालाद्यशुचिस्पर्शे तीर्थतः परिवर्जयेदिति ॥ तीर्थमुदकावतरणमार्गः ॥ यस्मिंस्तीर्थे चांडालादिस्पर्शस्तद्वर्जयित्वान्यतोजलं गृण्हीयादित्यर्थः

## पाण्याच्या शुद्धीचा निर्णय.

याविषयीं देवलाचें वचन. दुर्गंधानें रहित रसयुक्त, स्वच्छ, पृथिवीचें ठायीं वाहणारें, गायींनीं पिण्यास योग्य असें जें पाणि तें शुद्ध असें जाणावें. बृहस्पतीचें वचन. भूमीचें ठायीं असणारें स्वच्छ, अपवित्र पदार्थ ज्यामध्यें नाहींत, गायीची तृषादूर करणारें असें जें पाणि तें शुद्ध जाणावें. तसेंच पाषाणामध्यें असणारें पाणि शुद्ध जाणावें. लहान जें जलस्थान, त्यापासून वर काढिलेलें जें पाणि त्याविषयीं देवलाचें वचन. शुद्धपात्रानेंवर काढलेलें पाणि एकरात्र पर्यंत ठेविलें असतां तें पर्युषित होतें. सबब तें टाकून द्यावें. पुष्कळ ज्यामध्यें पाणि आहे अशा तळ्यादिकापासून काढलेलें, एकरात्र राहिलेलें असें पाणि, दुसरें पाणि नसेल तर घ्यावें. पारुसें नव्हें असें दुसरें पाणि मिळत असतां, रात्रीं ठेविलेलें असें पाणि कर्म करण्यास योग्य होत नाहीं. गंगेचें पाणि तर पुष्कळ दिवस राहिलें तरी त्यास दोषनाहीं त्याविषयीं नारदाचें वचन. पारुसें पुष्पें तसेंच पर्युषितपाणि हें टाकून द्यावें परंतु भागीरथीचें पाणि, तुळशी, कमळ, विल्वपत्रें हें पर्युषित असले तरी त्यास दोष नाहीं. भागीरथी हें उपलक्षण आहे-सबब गौतमी ( गोदावरी ) चंद्रभागा पंढरपूर येथें भांडल्यतीर्था पासून विष्णुपदापर्यंत जो भीमानदीचा भाग त्यास चंद्राचा दोष गेल्यामुळें चद्रभागा ही संज्ञा आहे- याच्यापाण्यास दोष नाहीं. तळें, नदी, विहीरी, सरोवरें यांच्या पाण्यस चांढाळादिकांनीं स्पर्श केला असतां, पाणि भरण्याचा जो मार्ग तो दूर करून दुसऱ्या भागाचे ठायीं पाणि भरावें.

वापीकूपादिविषये हारीतः ॥ वापीकूपतडागेषु मानुषं शीर्यते यदि ॥ अस्थिचर्मविनिर्मुक्तैर्दूषितं च खरादिभिः ॥ उद्धृत्य तज्जलं सर्वं शोषणं परिमार्जनमिति ॥ च-

र्मुनिमुक्तैश्चिरकालवासाद्विशीर्णैरित्यर्थः ॥ बृहस्पतिना तु विशेषउक्तः ॥ मृतपंचनखा-त्कूपादत्यंतोपहतात्तथा ॥ अपः समुद्धरेत्सर्वाः शेषवस्त्रेण शोधयेत् ॥ वन्हिभज्वालनं-कृत्वा कूपे पक्वेष्टकाचिते ॥ पचगव्यं न्यसेत्पश्चान्नवतोयं समुद्भवेदिति ॥ अत्र सर्वज-लोद्धारभकारोजलोद्धारकयंत्रविशेषेण वा तावन्मृदापूर्यपश्चात्सर्वमृद्धुद्धरणेन भवतीति यौक्तिकोर्थः ॥ अल्पोपतौ तु हरीतः ॥ घटानां शतमुद्धृत्य पंचगव्यं क्षिपेत्ततः ॥ श्व-भिः श्वपाकचांडालैर्दूपितेषु विशोधनमिति ॥ आपस्तंबस्तु विशेषमाह ॥ उपानदस्थि-विण्मूत्रस्त्रीरजोमद्यमेवच ॥ एभिश्च दूपिते कूपे कुंभानां षष्ठिमुद्धरेदिति ॥ स्वल्पजला शये तु कूपवदेव शुद्धिः ॥ तदाहविष्णुः ॥ जलाशयेषु स्वल्पेषु स्थावरेषु महीतले ॥ कूपवत्कथिता शुद्धिर्महत्सु न च दूपणमिति ॥ देवलोपि ॥ अक्षुद्राणामपां नास्ति-प्रस्रुतानां च दूपणम् ॥ स्तोकानामुद्धृतानां च कश्मले दूपणं भवेदिति ॥ अल्पोदके-ष्वपि पूर्वोदाहृतादोषादल्पे दोषे विष्णुरा ॥ अभ्यासं चेदमध्येन तद्वदेवशिलागतम् ॥ सोमसूर्यांशुवातेन मारुतस्पर्शनेन च ॥ गवां मूत्रपुरीषेण शुध्यंत्याप इति स्मृताइति ॥

विहिरी, आड इत्यादिकाविषयीं हरीताचें वचन. विहिरी, आड, तळें यामध्यें मनुष्याचें प्रेत पडून कुजेल तसेंच गदेमादि प्राण्याचीं प्रेतें कुजतील तर, त्यांतील सर्व पाणि काढून त्याकूपादि-काचें परिमार्जन करावें. बृहस्पतीचें वचन. पचनखाचें प्राणी ह्मणजे कुत्रे इत्यादिक आडातपडून तें पाणि फारच बिघडलें असेल तर तें सर्व पाणि काढून आड प्रस्रात्रें पुसून काढावा, आणि आडामध्यें अग्नि प्रज्वलित करावा. नतर त्यात पचगव्य टाकावें. येथें जें सर्वपाणी काढावयास सांगितलें, तें यंत्रानें अथवा आत मातीनें पूर्ण भरून नतर काढावें. पाणि थोडें दूषित झालें असता शभर घागरी पाणि काढून नतर पचगव्य टाकल्यानें शुद्ध होतें, कुत्रे, चांडाल इत्यादिकानीं दूषित केलें असता अशीच शुद्धि जाणावी. आपस्तबाचें वचन. जोडा, हाडें, विष्ठा, मूत्र, स्त्रीरज, मद्य इत्यादिकानीं दूषित झालें असता साठ घागरी पाणि आतील काढून टाकावें. थोडें पाणी ज्यामध्यें आहे अशीं जीं जलस्थानें त्यांचीं शुद्धि आडाच्या शुद्धि प्रमाणें जाणावी. याविषयीं विष्णूचें वचनाचा अर्थ असाच आहे. देवलाचें वचन. वाहणारें मोठें पाणि त्यास दोष नाहीं. ल्हान अशीं जीं पाण्याचीं स्थानें, व त्यांतून बाहेर काढलेलें पाणि हीं वाईट पदार्थानें दूषित होतात. अल्पपाणि ज्यामध्यें आहे असें जलस्थान तें व शिलेतील पाणि वाईट पदार्थानें थोडें दूषित झालें असता, रात्रीं चद्राचें किरण आणि दिवसा सूर्याचें किरण व वारा गोमूत्र व गायीचें मूत्र शेण याच्यायोगानें शुद्ध होतात.

तत्र स्नानादिविपये यमः ॥ चांडालभांडसंस्पृष्टं पीत्वा कूपगतं जलं ॥ गोमूत्रया-वकाहारस्त्रिरात्रेण विशुध्यतीति ॥ कूपादावुत्पन्नं नवोदकं दशरात्रोत्तरं शुध्यति ॥ त-दुक्तं निर्णयामृते ॥ अजागावोमहिष्यश्च ब्राह्मण्यश्च प्रसूतिकाः ॥ दशरात्रेण शुध्यंति

भूमिस्थं च नवोदकम् ॥ जलपात्रं च स्वस्य स्वकीयमेव शुद्धं ॥ तदाह बौधायनः ॥ आत्मशयासनं वस्त्रं जायापत्यं कमंडलुः ॥ शुचीन्यात्मनएतानि परेषामशुचीनि चेति॥ स्वीयशय्यालाभे तु परकीया शुद्धेन कंबलादिनांतर्धायोपयोक्तव्येति निर्णयामृतः ॥ इत्युदकशुद्धिनिर्णयः ॥

यमाचें वचन. चांडालादिकांच्या भाड्यानें व्यास स्पर्श झाला आहे असें भांड्याचें पाणि प्राशन केलें असतां, गोमूत्रात सिजविलेलें सातूत्रिरात्र भक्षण करून राहावें. ह्मणजे शुद्धता येते. भूपादिकामध्यें नवीन उत्पन्न झालेलें पाणि दहा दिवस गेल्या नंतर शुद्ध होतें. शेळ्या, गायी, हंसी, ब्राह्मणस्त्रिया, या प्रसूत झाल्या पासून दहारात्रि गेल्यानंतर शुद्ध होतात. तसेंच नवीन पाणि दशरात्रिनीं शुद्ध होतें. पाणि पिण्याचें पात्र ज्याचें त्यासच शुद्ध जाणावें. बौधायनाचें वचन. आपलीशय्या, आसन, वस्त्र, स्त्री, मुलगा, मुलगी, पाणिपिण्याचें भांडें, पात्र, आपलें आपल्यासच शुद्ध, दुसऱ्याचें आपणास अशुद्ध जाणावें. स्वकीय शय्या नसेल तर, आणि दुसऱ्याच्याशय्येवर निजणें असेल तर शुद्धघोंगडी त्यावर आथरून ती उपयोगात घ्यावी. असें निर्णयामृतात सांगितलें आहे. या प्रमाणें उदकशुद्धीचा निर्णय जाणावा.

## ॥ अथ वस्त्रादिशुद्धिनिर्णयः ॥

तत्र मूत्रपुरीषरुधिरादिभिरुपहतवस्त्रस्य मृज्जलाभ्यां प्रक्षालनाच्छुद्धिः ॥ अत्यंतोपहतस्य त्यागः ॥ अत्यंतदुर्लभोत्तमवस्त्रस्य तु अत्यंतोपहतौ उपहतप्रदेशस्य छेदनं दाहोवा ॥ दरिद्रस्यानुत्तमेप्वपि छेददाहादिना शुद्धिः ॥ चांडालादिस्पर्शे तु प्रक्षालनम् ॥ तत्र व्यासः ॥ वस्त्रं मृदंभसा शुद्धेद्रज्जुवैदलमेव च ॥ रज्ज्वादिकं चातिदुष्टं त्याज्यं तन्मात्रमेवचेति ॥ वैदलं शूर्पादि ॥ यमोपि ॥ यदि मूत्रपुरीषाभ्यां रेतसा रुधिरेण वा ॥ चैलं समुपहन्येदद्भिः प्रक्षालयेत्तु तत् ॥ मृदंभसा न शुध्येत्तु वस्त्रं चोपहतं दृढम् ॥ छेदनं तस्य दाहोवा तन्मात्रमुपहन्यतइति ॥ अत्र छिन्नदग्धयोरपि परित्यागाच्छेददाहाभ्यां शुद्धयाभिधानमत्यंतदुर्लभविषयम् ॥ दरिद्रस्यानुत्तमेप्वपि छेदादिना शुद्धिः ॥

## वस्त्रादिकांच्याशुद्धिचानिर्णय.

रक्त इत्यादिकानें दूषित झालेलें वस्त्र मातीलावून पाण्यानें धुतलें असतां शुद्ध होतें.
असतां टाकून द्यावें. अत्यंत दुर्लभ असें उत्तम वस्त्र तें फारच दूषित
दूषित झालेला भाग असेल तेवढा फाडून अथवा जाळून टाकावा.
वस्त्रादिकांही अशीच शुद्धि जाणावी. चांडालादिकांचा स्पर्श झाला
व्यासाचें वचन. वस्त्र, दोरी, सूप, इत्यादिक दूषित झालें

असतां, मृत्तिका पाणि इत्यादिकांनें त्यांची शुद्धि जाणावी. अत्यंत दूषित झालें असतां जेवढा भाग दूषित झाला असेल तेवढा भाग काढून टाकावा. यमस्मृतींतील वचन. मूत्र, विष्ठा, रेत, रक्त, इत्यादिकानें वस्त्र दूषित झालें असता मृत्तिका आणि पाणियानें प्रक्षालन करून शुद्ध करावें. तुटलेलें अथवा जळलेलें असें वस्त्र टाकून देण्यास सांगितलें असोन, येथें त्याची जी शुद्धि सांगितली. ती अत्यत दुर्लभ जें वस्त्र त्याविषयींचें आहे. दरिद्रि यास साधारणवस्त्राविषयीं ही छेदादिकाच्या योगानें शुद्धि जाणावी.

राशीकृतानां बहूनां मध्ये यावंति वस्त्राणिचांडालादिभिः स्पृष्टानि तान्यस्पृष्टापेक्षया स्वल्पानि चेत् ॥ तदातान्युद्धृत्य प्रक्षालयेत् ॥ शेषाणि बहूनि च प्रोक्षयेत् ॥ अनेनैवाभिप्रायेण याज्ञवल्क्यः ॥ प्रोक्षणं संहतानां च बहूनां धान्यवाससामिति ॥ स्मृत्यंतरेपि ॥ वस्त्रधान्यादिराशीनामेकदेशस्य दूषणे तावन्मात्रं समुद्धृत्य शेषं प्रोक्षण महंतीति ॥ अत्र शेषस्य प्रोक्षणविधानादुद्धृतस्योपहतस्य प्रक्षालनादिभिः शुद्धिरिति गम्यते ॥ यदा राशीकृतानि सर्वाणि स्पृष्टानि तदा प्रोक्षणादेव शुद्धिः ॥ यदा च स्वल्पानि तदा सर्वेषां प्रक्षालनादेव शुद्धिः ॥ तदाह मनुः ॥ अद्भिस्तु प्रोक्षणं शौचं बहूनां धान्यवाससाम् ॥ प्रक्षालनेन त्वल्पानामद्भिः शौचं विधीयत इति ॥ राशेर्बहुत्वं च पुरुषग्राह्यभाराधिकत्वं बौधायने ॥ अनेकोद्धार्ये दारुशिले भूमिसमे इत्यनेकोद्धार्ययोदारुशिलयोः स्वल्पशौचत्वमुक्तम् ॥ तेनैव न्यायेन द्रव्यांतरेष्वपि ज्ञातव्यम् ॥

वस्त्रसमूहाची शुद्धि. जेथें वस्त्राचा ढीग पडला असोन त्यातील काहीं वस्त्रास चांडालादिकांनीं स्पर्श केला असतां, तीं वस्त्रें ज्यास स्पर्श झाला नाहीं अशा वस्त्रापेक्षा थोडीं असल्यास तीं काढून धुवावींत. बाकीचीं राहिलेलीं वस्त्रें याजवर पाणि सिंपडावें म्हणजे तीं शुद्ध होतात. याविषयीं याज्ञवल्क्याचें वचन. एकेच ठिकाणीं असलेलें पुष्कळ धान्य अथवा वस्त्रें यास चांडालादिकांचा स्पर्श झाला असता त्याजवर पाणि सिंपडावें म्हणजे तीं शुद्ध होतात. अन्यस्मृतींतील वचन. वस्त्र, धान्यें याच्या ढिगास विटाळ झाला असतां त्याचा दूषित झालेला भाग तेवढा काढून टाकून बाकीच्यास प्रोक्षण केल्यानें शुद्धता होते. वस्त्रें थोडीं असोन विटाळ झाला असतां सर्व धुवून टाकावींत. मनूच्याही वचनाचा अर्थ असाच आहे. राशीचें जें बहुत्व जाणावयाचें तें एकापुरुषाच्या ओझ्यापेक्षां अधिक असावें. असें बौधायनाचें मत आहे. एकापेक्षा जास्त मनुष्यानें उचलण्यास योग्य असें जें लाकूड, शिला इत्यादिक याचे ठायीं भूमिसमत्व आहे, ह्मणून याविषयीं अल्पकारणानीं शुद्धि होते. याच न्यायानें अन्यवस्तुविषयीं ही जाणावें.

याज्ञवल्क्येन विशेषउक्तः ॥ सोपरोदकगोमूत्रैः शुद्ध्यत्याविककौशिकम् ॥ सश्रीफलैरंशुपट्टं सारिष्टैः कुतपं तथा ॥ सगौरसर्षपैः क्षौमं पुनः पाकान्महीमयम् ॥ उषरं क्षारमृत्तिकावत्सहितेन उदकेन वा गोमूत्रेण वा आविकं शुद्ध्यति ॥ कौशिकं तसरी-

पट्टादि ॥ अंशुपट्टं वल्कलतंतुकृतं कुतपः पर्वतच्छागलोमकृतः ॥ इयं शुद्धिरधिकोपघाते ॥ अल्पे तु प्रोक्षणमेव ॥ एषां क्षालनेन विनाश एव स्यात् ॥ शुद्धेश्च द्रव्याविनाशेनैवेष्टत्वात् ॥ अत एव देवलः ॥ ऊर्णाकौशेयकुतपपट्टक्षौमदुकूलजाः ॥ अल्पशौचा भवंत्येते शोषणप्रोक्षणादिभिः ॥ तान्येवामेध्ययुक्तानि क्षालयेच्छोधनैः स्वकैः ॥ तूलिकाद्युपधानं तु पुष्परक्तांवरे तथा ॥ शोषयित्वातपेकिंचित्करैः संमार्जयेन्मुहुः ॥ पश्चाच्च वारिणा प्रोक्ष्य विनियुंजीत कर्मणि ॥ तान्यप्यात्युपक्लिष्टानि यथावत्परिशोधयेदिति ॥ पुष्परक्तमिति प्रक्षालनासहं रागरक्तोपलक्षणम् ॥ अतश्च यत्प्रक्षालनेन विनष्टरागं भवति तदातपशोषणादिना शोध्यम् ॥ यन्मंजिष्ठादिकं क्षालनेन न विनश्यति तत्क्षालयेत् ॥

याज्ञवल्क्याचें वचन. पाणी, गोमूत्र आणि क्षारमृत्तिकायांच्या योगानें, मेंढराच्या लोहकरीपासून झालेलीं वस्त्रें, ( कंबळ घोंगडी इत्यादि ) रेशमीवस्त्रें यांची शुद्धि जाणावी. पट्टवस्त्राची शुद्धि बेलफळाच्या योगानें जाणावी. नेपाळदेशात उत्पन्न झालेल्या वस्त्राची शुद्धि रिठ्यानें जाणावी. जवसाच्या सुतापासून झालेलीं जीं वस्त्रें त्यांची शुद्धि पांढऱ्यासिरसायोगानें जाणावी. ही जी सांगितलेली शुद्धि, ती वस्त्र अत्यंत दूषित झालें असताची आहे. थोडा दोष असता प्रोक्षण करावें जीं वस्त्रें धुतलीं असता नाश पावतील, त्यास प्रोक्षणच करावें. याविषयीं देवलाचें वचन लोहकरीचीं वस्त्रें, रेशमीवस्त्रें, पर्वतांत असणारे जे बोकड त्यांच्या केशापासून केलेलीं वस्त्रें, झाडाच्या तंतूपासून केलेलीं वस्त्रें, जवसाच्या सुतानें केलेलीं वस्त्रें, पाटवस्त्रें, यास विटाळ झाला पाणी सिंपडून उन्हांत वाळवावींत. अपवित्र पदार्थानें युक्त झालें असता प्रक्षालन करावें. ऐशा रंगविलेलीं वस्त्रें, यास विटाळ झाला असता, उन्हांत वाळवून पाणी सिंपडून, हातानें फरून नंतर घ्यावींत, धुतल्यानें जो रंग जाईल तेथें असीच शुद्धि जाणावी. मंजिष्ठादिक धुतला असतां रंग नाश पावत नाहीं ते धुणे न नाशपावणाऱ्या अशा रंगाचें वस्त्र धुवावें.

आपस्तंबोपि ॥ श्वनोपहतं चैलमवगाहेत प्रक्षाल्य वा तद्देशमग्निना संस्पृश्य प्रक्षाल्य पादौ चाचम्य प्रयतोभवति ॥ अत्रायं विवेकः ॥ वस्त्रसहितस्यैव नाभेरूर्ध्वस्पर्शेऽवगाहः ॥ अधस्ताच्चैलप्रक्षालनमिति ॥ शंखलिखितौ ॥ अहतानां प्रोक्षणमिति अहतानि यंत्राद्युचीर्णानि ॥ प्रचेताश्च ॥ चैलानामुपहतानामुच्छेदनं तन्मात्रोच्छेदनं वा नवानां वाससामभ्युक्षणं चेति ॥ उच्छेदनं क्षायनं ॥ शंखः ॥ शयनासनयानानां संहतवच्छौचमिति ॥ शयनादीनां संहतशब्दवाच्यत्वात्संहतद्रव्यराशीभूतद्रव्यवत्प्रोक्षणेन शुद्धिरित्युक्तं भवति ॥ तदाहांगिराः ॥ शयनासनयानानि रोमबंधानि यानि च ॥ वस्त्राणि तानि सर्वाणि संहतानि प्रचक्षतइति ॥ मनुः ॥ चैलवच्चर्मणां शुद्धिर्वैदलानां तथैव च ॥ शाकमूलफलानां तु धान्यवच्छुद्धिरिष्यतइति ॥ स्मृत्यंतरेपि पक्षपवित्रवच्चर्मचामरतृणवेत्रवल्कलानां च चैलवच्छुद्धिरिति ॥ अत्र पवित्र

भैस्तन्मयं तृणमिति ॥ तृणराजस्तालोभिधीयते ॥ अतस्तत्पत्रादीनां ॥ रजकधौतानांवा-सांचमोक्षणाच्छुद्धिः सा च स्पर्शमात्रविषयिका न तु कर्माहंता ॥ इति वस्त्रादिशुद्धिः ॥

आपस्तंबाचें वचन. वस्त्र नेसलें असोन कुत्र्यादिकानीं नाभीच्या वरच्या भागास स्पर्श केला असता, वस्त्रासहित स्नान करावें. खालच्या भागास स्पर्श केला असता वस्त्र धुवून टाकावें. किंवा पाणीनें त्या भागास स्पर्श करून तो भाग धुवून पादप्रक्षालन करून आचमन केल्यानें शुद्धता होते. नवीं वस्त्रें पाणि सिंपडल्याने शुद्ध होतात. प्रचेताचें वचन. उपहत झालेलीं जीं जुनीं वस्त्रें त्यांचा गंध जाईपर्यंत पाण्यात घालून उकडून काढावींत नवीं वस्त्रें प्रोक्षणानीं शुद्ध होतात.

शय्या, आसन, वाहन, राशीभूतवस्त्रें, यांची प्रोक्षणानें शुद्धि होते. अंगिराचें वचनाचाही अर्थ असाच आहे. मनूचें वचन. ज्या प्राण्यास सिवले असता विटाळ नाहीं, त्याच्या कातड्यांची शुद्धि तशीच वेळूच्या पात्राची शुद्धि, वस्त्राप्रमाणे जाणावी. भाजी, आले इत्यादिक मूळ पदार्थ, फलें यांची शुद्धि धान्याप्रमाणे जाणावी. अन्यस्मृतींतील वचन. पक्ष, दर्भ, चर्म, चामरे, वल्कल, तालपत्र, वेत, वलकलें, यांची शुद्धि वस्त्राप्रमाणें जाणावी. ताडाचीं पानें, पाटिनें धुतलेलीं जीं वस्त्रें ती पाणी सिंपडल्यानें शुद्ध होतात. ह्मणजे त्यास स्पर्श करण्यास योग्यता येते, परंतु तीं वस्त्रें नेसून कर्मकरण्यास मनुष्य योग्य होत नाहीं. याप्रमाणें वस्त्रशुद्धीचा निर्णय जाणावा.

## अथ देहशुद्धिनिर्णयः

तत्र मनुः ॥ ज्ञानं तपोग्निराहारो मृण्मनोवार्युपाजेनम् ॥ वायुः कर्मार्ककालौ च शुद्धेः कर्तॄणि देहिनाम् ॥ सर्वेषामेव शौचानामर्थशौचं परं स्मृतम् ॥ योर्थे शुचिर्हि स शुचिर्नमृद्वारिशुचिः शुचिः ॥ क्षांत्या शुध्यति विद्वांसोदानेनाकार्यकारिणः ॥ प्रच्छन्नपापाजाप्येन तपसा वेदवित्तमाः ॥ मृत्तोयैः शुध्यते शोध्यं नदीवेगेन शुध्यति ॥ रजसा स्त्री मनोदुष्टा संन्यासेन द्विजोत्तमः ॥ अद्भिर्गात्राणि शुध्यंति मनः सत्येन शुध्यति ॥

## देह शुद्धीचा निर्णय.

त्या विषयीं मनूचें वचन. ज्ञान, तपश्चर्या, अग्नि, परिमिताहार, मृत्तिका, मन, पाणि, न्यायानें द्रव्य मिळविणें, वायु, स्नानसंध्यादिसत्कर्म, सूर्याचें दर्शनघेणें, हीं सर्व शरीरास शुद्ध करणारीं आहेत. सर्वशुद्धि मध्यें न्यायानें द्रव्य मिळविणें हीच श्रेष्ठ शुद्धि सांगितली आहे. जो शुद्धरीतीनें द्रव्य संपादन करून आपलें शरीर निर्वाह करितो, तो शुद्ध ह्मणावा. मृत्तिका, पाणि, इत्यादिकानें शरीर कितिही स्वच्छ केलें तरी तें शुद्ध होत नाहीं. विद्वानमनुष्य कोणि आपला अपराध केला असतां ही त्या विषयींची सहन शीलता धारण करून तिच्यायोगानें शुद्ध होतो. करण्यास अयोग्य असें जें काम, तें काम करणारे दानकेल्यानें शुद्ध होतात गुप्त ज्याचें पाप आहे ते जप केल्यानें

वगैरे पदार्थ त्यास अनेकलोकाचें हात लागले असताही तें शुद्ध जाणावें. तसेंच ब्रह्मचारीयाचें भिक्षान्न तें रस्त्यातून आणिलें असोन, तसेंच ज्यानीं आचमन केलें नाहीं अशा स्त्रियानें वाढिलें असता हीं तें शुद्ध जाणावें. शंखाचें वचन. स्त्रिया, वासरें, पक्षि, कुत्रे, यांचें मुख शुद्ध जाणावें. स्त्रियाचें मुख रतिकालाचें ठायीं, वत्साचें मुख दोहन करतेवेळीं, पाखराचें मुख वृक्षाचे ठायीं, कुत्र्याचें मुख शिकारीचे ठायीं शुद्ध जाणावें. सोनें, गायी, स्त्रियाचें मुख, मृगरोमापासून झालेलें वस्त्र, वसतरा, विद्वानमनुष्य, यज्ञाचे ठायीं चमसपात्र, हे शुद्ध जाणावें.

मुखतोगौरमेध्या तु मेध्योजामुखतस्तथा ॥ पृष्ठतोगौर्गजस्कंधे सर्वतोश्वः शुचिस्तथेति ॥ तथाच ॥ मक्षिकाविप्रुषश्छाया गोरसः सूर्यरश्मयः ॥ रजोभूर्वायुरग्निश्च स्पर्शे मेध्यानि निर्दिशेत् ॥ अत्र मक्षिकाग्रहणमवर्जनीयस्पर्शानां दंशादीनामुपलक्षणार्थम् ॥ विप्रुषोविज्ञातजलकणाः ॥ छायारजश्च निषिद्धव्यतिरिक्ते ॥ तथाचस्मृत्यंतरे ॥ श्वकाकोष्ट्रखरोलूकसूकरग्राम्यपक्षिणाम् ॥ अजाविरेणुसंस्पर्शादायुर्लक्ष्मीश्च हीयतइति ॥ षट्त्रिंशन्मते ॥ तांबुले च फले चैव भुक्तस्नेहावशिष्टके ॥ दंतलग्नस्य संस्पर्शे नोच्छिष्टः स्यात् कदाचनेति ॥ तथाचमनुः॥ सुप्त्वा क्षुत्वा च भुक्त्वा च ष्ठीवित्वोक्त्वानृतं वचः ॥ पीत्वापोभोक्ष्यमाणश्च आचामेत्प्रयतोपि सन्निति ॥ भोक्ष्यमाणस्तु प्रयतोपिद्विराचामेत् ॥ वामनपुराणे ॥ क्षुते निष्ठीवने चैव दंतोच्छिष्टे तथानृते ॥ पतितानां च संभाषे दक्षिणं श्रवणं स्पृशेत् ॥ अग्निरापश्च वेदाश्च सोमसूर्यानिलास्तथा ॥ एते सर्वेपि विप्राणां श्रोत्रे तिष्ठंति दक्षिणे ॥ दंतोच्छिष्टे दंतसक्तान्नादेरुत्कर्षणेन वहिरुत्क्षेपेणोच्छिष्टे सतीत्यर्थः ॥ अग्निरिति अग्न्यादिदेवतानां विप्रस्य दक्षिणे कर्णे सान्निध्य भावनीयमिति भावः ॥ स्वरूपतस्तत्सान्निध्यस्याभावादिति ॥

गाय मुखाचे ठायीं अपवित्र जाणावी. शेळी मुखाचें ठायीं पवित्र जाणावी. गाय पृष्ठभागाचे ठायीं पवित्र जाणावी. हत्ती स्कंदाचे ठायीं, अश्व सर्वशरीराचें ठायीं, पवित्र जाणावा. माशा, वाऱ्यानें उडालेलें बारिक पाण्याचेकण, छाया, गोरस, ( दूध दहि तूप ) सूर्याचें किरण, धुळ, पृथ्वी, वारा, अग्नि, हे स्पर्शाविषयीं शुद्ध जाणावे. येथें माशाह्मणजे ज्याचा स्पर्श निवारण केला जात नाहीं, असें नवमक्षिका, चिलटें, वगैरे जाणावें छाया आणिधूळी शास्त्रात ज्याचा निषेध केला नाही, त्या घ्यावयाच्या आहेत, अन्यस्मृतींतील वचन. कुत्रा, कावळा, उंट, गाढव, डुकर, घुवड, गावातील पक्षी, शेळ्या, यांच्या धूळीचा स्पर्श झाला असतां आयुष्य आणि लक्ष्मी याचा नाश होतो. षट्त्रिंशन्मतातील वचन. तांबूल, फळ, तूपांत अथवा तेलात तळलेला पदार्थ, हे भक्षणकेल्यानतर दातांमध्यें राहिले असोन त्याचा स्पर्श झाला असता त्या योगानें मनुष्य उच्छिष्ट होत नाहीं. मनूचें वचन. शयनकेल्यानतर, शिंक आली असतां, भोजन केलें असतां थुंकलें असतां, व्यवहारादिककारणामुळें एखादेवेळीं खोटेंभाषण केलें असतां, जलपान केलें

शुद्ध होतात. वेद जाणणारे मनुष्य तपश्चर्येनें करून शुद्ध होतात. शुद्ध करण्यास योग्य अशा ज्या वस्तु त्या माती पाणि इत्यादिकानें शुद्ध होतात. नदी आपल्यावेगानें शुद्ध होते ज्यास्त्रियेनें मनानें दूषित कर्म केलें आहे असी ती स्त्री रजस्वला झाल्यानें शुद्ध होते. ब्राह्मणसंन्यास ग्रहणानें शुद्ध होतात. गात्रें पाण्यानें शुद्ध होतात. मन सत्यतेनें शुद्ध होतें.

## अथ शुद्धपदार्थविचारः

तत्र बृहस्पतिः ॥ पादौ शुची ब्राह्मणानामजाश्वस्य मुखं शुचि ॥ गवां पृष्ठानि मेध्यानि सर्वगात्राणि योषितामिति ॥ अनुपहतब्राह्मणचरणस्पृष्टं शुद्धमित्यर्थः ॥ अतएव ब्राह्मणव्यतिरिक्तचरणस्पर्शो दोषउक्तोभवति ॥ स्पृष्टमप्याहरेत्भोज्य दुःस्पृष्टं च यथाफलं ॥ फलं यथार्महितं न भवति ॥ तथा स्मृतिचंद्रिकायां गौतमेनोक्तम् ॥ अदुष्टा संततधारा वातोद्भूताश्चरेणवः ॥ स्त्रियोवृद्धाश्च बालाश्च न दुष्यंति कदाचनेति ॥ संततधाराजलपानार्थपात्रमुत्थाप्यमुखे या धारा पात्यते सा धारा अदुष्टा पात्रस्थं जलं मुखं च नोच्छिष्टं करोतीत्यर्थः ॥ नित्यं शुद्धः कारुहस्तः पण्यं यच्च प्रसादितम् ॥ ब्रह्मचारिगतं भैक्ष्यंनित्यं मेध्यमिति स्थितिः ॥ कारुहस्तः शुचिः पण्यं भैक्ष्यं योषिन्मुखं तथा ॥ कारवः रजकचेलपावकसूपकाराद्याः ॥ तेषां हस्तः शुचिः ॥ शुचित्वं च तत्तत्साध्ये कर्मणि वस्त्रधावनादौ ॥ पण्यम् आपणस्थद्रव्यं विक्रेयं व्रीह्यादि ॥ अनेकक्रेतृजनहस्तपरिग्रहीतमप्यप्रयतम् न भवति ॥ भिक्षाणांसमूहोभैक्षम् ॥ तद्ब्रह्मचर्योदिगतम् ॥ अनाचांतस्त्रीप्रदानाशुचिरथ्याक्रमणादिनापि न दुष्यति ॥ शंखोपि ॥ नारीणां चैव वत्सानां शकुनीनां शुनां मुखम् ॥ रतौ प्रस्रवणे वृक्षे मृगयायां सदा शुचीति ॥ अदूष्यं कांचनं गावः स्त्रीमुखं घृतपं क्षुरम् ॥ न दूष्यंति विद्वांसोपरेषु चमर्म तथा ॥

## स्वभावतःशुद्धपदार्थांचा विचार.

त्याविषयी बृहस्पतीचें वचन. ब्राह्मणाचे चरण, [illegible], अश्व, यांचें मुख, गाईचा पृष्ठभाग, स्त्रियांचें सर्वशरीर, शुद्ध जाणावें. ब्राह्मणाचे दूषित न झालेले चरण शुद्ध मानिलेले आहेत. असे आहे म्हणून ब्राह्मणव्यतिरिक्तांचे चरणाला स्पर्श करूं नये. स्पर्श केला असतां दोष आहे. दुःस्पर्शानें स्पृष्ट झालेले [illegible] फलें. स्मृतिचंद्रिकेंत गौतमाचें वचन. [illegible] आणि पाण्याची धार, वाऱ्यानें उडालेले रजःकण, स्त्रिया, वृद्ध, बालक, हे कधीही दूषित होत नाहीत. [illegible] पाण्याची धार [illegible] धरून ती मुखामध्ये [illegible], ती व स्त्रिया दोघांनी [illegible], मुख हे उच्छिष्ट होत नाहीं. [illegible], [illegible], [illegible] शुद्ध [illegible]. [illegible]

वगैरे पदार्थ त्यास अनेकलोकाचें हात लागले असताही तें शुद्ध जाणावें. तसेंच ब्रह्मचारीयाचें भिक्षान्न तें रस्त्यातून आणिलें असोन, तसेंच ज्यानीं आचमन केलें नाहीं अशा स्त्रियानें वाढिलें असता हीं तें शुद्ध जाणावें. शास्त्राचें वचन. स्त्रिया, वासरें, पक्षी, कुत्रे, यांचें मुख शुद्ध जाणावें. स्त्रियाचें मुख रतिकाळाचें ठायीं, वत्साचे मुख दोहन करतेवेळीं, पाखराचें मुख वृक्षाचे ठायीं, कुत्र्याचें मुख शिकारीचे ठायीं शुद्ध जाणावें. सोनें, गायी, स्त्रियाचें मुख, मृगरोमापासून झालेलें वस्त्र, वसतरा, विद्वानमनुष्य, यज्ञाचे ठायीं चमसपात्र, हे शुद्ध जाणावें.

मुखतोगौरमेध्या तु मेध्याजामुखतस्तथा ॥ पृष्ठतोगौर्गजस्कंधे सर्वतोश्वः शुचिस्तथेति ॥ तथाच ॥ मक्षिकाविप्रुषश्छाया गोरसः सूर्यरश्मयः ॥ रजोभूर्वायुरग्निश्च स्पर्शे मेध्यानि निर्दिशेत् ॥ अत्र मक्षिकाग्रहणमवर्जनीयस्पर्शानां दंशादीनामुपलक्षणार्थम् ॥ विप्रुषोविज्ञातजलकणाः ॥ छायारजश्च निषिद्धव्यतिरिक्ते ॥ तथाचस्मृत्यंतरे ॥ श्वकाकोष्ट्रखरोलूकसूकरग्राम्यपक्षिणाम् ॥ अजाविरेणुसंस्पर्शादायुर्लक्ष्मीश्च हीयतइति ॥ षट्त्रिंशन्मते ॥ तांबुले च फले चैव भुक्तस्नेहावशिष्टके ॥ दंतलग्नस्य संस्पर्शे नोच्छिष्टः स्यात् कदाचनेति ॥ तथाचमनुः ॥ सुप्त्वा क्षुत्वा च भुक्त्वा च ष्ठीवित्वोक्त्वानृतं वचः ॥ पीत्वापोभोक्ष्यमाणश्च आचामेत्प्रयतोपि सन्निति ॥ भोक्ष्यमाणस्तु प्रयतोपिद्विराचामेत् ॥ वामनपुराणे ॥ क्षुते निष्ठीवने चैव दंतोच्छिष्टे तथानृते ॥ पतितानां च संभाषे दक्षिणं श्रवणं स्पृशेत् ॥ अग्निरापश्च वेदाश्च सोमसूर्यानिलास्तथा ॥ एते सर्वेपि विप्राणां श्रोत्रे तिष्ठंति दक्षिणे ॥ दंतोच्छिष्टे दंतसक्तान्नादेरुत्कर्षणेन बहिरुत्क्षेपेणोच्छिष्टे सतीत्यर्थः ॥ अग्निरिति अग्न्यादिदेवतानां विप्रस्य दक्षिणे कर्णे सान्निध्यं भावनीयमिति भावः ॥ स्वरूपतस्तत्सान्निध्यस्याभावादिति ॥

गाय मुखाचे ठायीं अपवित्र जाणावी. शेळी मुखाचें ठायीं पवित्र जाणावी. गाय पृष्ठभागाचे ठायीं पवित्र जाणावी. हत्ती स्कंदाचे ठायीं, अश्व सर्वशरीराचें ठायीं, पवित्र जाणावा. माशा, वाऱ्यानें उडालेलें बारिक पाण्याचेकण, छाया, गोरस, ( दूध दहि तूप ) सूर्याचें किरण, धुळ, पृथ्वी, वारा, अग्नि, हे स्पर्शाविषयीं शुद्ध जाणावे. येथें माशाह्मणजे ज्याचा स्पर्श निवारण केला जात नाहीं, असें नवमक्षिका, चिलटें, वगैरे जाणावें छाया आणिधूळी शास्त्रांत ज्याचा निषेध केला नाहीं, त्या ध्यावयाच्या आहेत, अन्यस्मृतींतील वचन. कुत्रा, कावळा, ऊंट, गाढव, डुकर, घुबड, गावातील पक्षी, शेळ्या, याच्या धूळीचा स्पर्श झाला असतां आयुष्य आणि लक्ष्मी याचा नाश होतो. षट्त्रिंशन्मतातील वचन. तांबूल, फळ, तूपांत अथवा तेलांत तळलेला पदार्थ, हे भक्षणकेल्यानंतर दातामध्यें राहिलें असोन त्याचा स्पर्श झाला असता त्या योगानें मनुष्य उच्छिष्ट होत नाहीं. मनूचें वचन. शयनकेल्यानंतर, शिंक आली असता, भोजन केलें असतां थुंकलें असतां, व्यवहारादिककारणामुळें एखादेवेळीं खोटेंभाषण केलें असता, जलपान केलें

असतां, आचमन करावें. वामनपुराणांतील वचन. सिंकर्णे इत्यादिक मनूचे वचनांतील कारणें, पतितासीं संभाषण केलें असतां उजव्या कर्णास स्पर्श करावा, कारण ब्राह्मणाच्या उजव्या कर्णाचे ठायीं अग्न्यादिदेवता राहतात.

अमेध्येषु च ये वृक्षाउक्ताः पुष्पफलप्रदाः॥तेषामपि न दुष्यंति पुष्पाणिच फलानि च ॥ खलक्षेत्रेषु यत्धान्यं कूपवापीषु यज्जलं ॥ अभोज्यादपितद्भोज्यं यच्च गोष्टगतं पयः ॥ याज्ञवल्क्यः ॥ वाक्छस्तमंबुनिर्णिक्तमज्ञातं च सदा शुचि ॥ यथोक्तशौचेपि मनसःअपरितोषाच्छुद्धिसंदेहे शुद्धमेतत्स्वीकुर्वीति ब्राह्मणवचनेन शुच्छं वाक्छस्तम् ॥ अंबुनिर्णिक्तं यत्रप्रतिपदोक्तशुद्धिर्नास्ति तस्य प्रक्षालनेन शुद्धिः ॥ प्रक्षालनासहस्य प्रोक्षणेन ॥-अज्ञातं च सदा शुचि यत्तुकाकाद्युपहतमुपभुक्तं न कदाचिदपि ज्ञायते तदुपयोगे दोषोनास्तीत्यर्थः। विध्यातपोग्न्यंभूतात्माबुद्धिर्ज्ञानेनशुध्यति ॥ मनः सत्येन शुध्येत संन्यासेनद्विजोत्तमाः ॥ तथाच ॥ अपवित्रःपवित्रो वासर्वावस्थांगतोपिवा ॥ यः स्मरेत्पुंडरीकाक्षंसबाह्याभ्यंतरः शुचिरितिसर्वं शिवं ॥

अपवित्रस्थानाचे ठायीं असणारे, पुष्पे, फळें यांना देणारे जे वृक्ष त्यांचीं पुष्पें फळें शुद्ध जाणावींत. शेताच्या खळ्यांतील धान्य, आडविहीर यांतील पाणी, गोठ्यांत असलेलें गायींचें दूध शुद्ध जाणावें ॥ २ ॥ याज्ञवल्क्याचें वचन. एखादि वस्तु शुद्ध असोन मनांत शुद्धाशुद्धाविषयीं संशय आला असतां, ब्राह्मणानें शुद्ध आहे असें सांगितलें असतां तें शुद्ध असें जाणावें. ज्या वस्तु विषयीं शुद्धी सांगितली नाहीं ती वस्तु जलप्रोक्षणानें शुद्ध होती. एखादी वस्तु काकादिकांनीं उच्छिष्ट केल्यामुळें दूषित झाली असोन आपणास माहित नसेल तर ती घेण्याविषयीं दोष नाहीं. जीव, ब्रह्मविद्या, तपश्चर्या, येणे करून शुद्ध होतो. मन सत्यानें, ब्राह्मण संन्यासानें, कोणी मनुष्य कसाही अपवित्र अथवा पवित्र असो अथवा कोणत्याहीं स्थितींत गेला असो तो अनन्यभावानें रमापति जो श्रीविष्णु याचें जर स्मरण करील तर तो अंतरबाह्य शुद्ध होईल. याप्रमाणें द्रव्यशुद्धिनिर्णय जाणावा.

इति श्रीधारूरकरेत्युपनामकमौद्गलिकुलावतंससोमाध्वरयाजिदुर्गादासमुतविद्वन्मुकुटहीरार्काकुरान्नसत्रप्रसादार्जितपुरुषार्थतदीनानाथसुतपौंडरीकक्षेत्रनिवासिश्रीपांडुरंगचरणारविंदनिविष्टचेतोवृत्तिदाजीत्र्यापरपर्यायकाशीनाथसुतविठ्ठलेन विरचिते प्रायश्चित्तव्यवहारप्रकाशाख्यग्रंथेद्रव्यशुद्धिनिर्णयो नाम द्वितीयभागः समाप्तः श्रीरुक्मिणीपांडुरंगचरणारविंदार्पणमस्तु ॥

॥ शुभंभवतु ॥




॥ श्री ॥

॥ श्री पांडुरंगः प्रसन्नोस्तु ॥

# ॥ प्रायश्चित्तव्यवहारप्रकाशतृतीयभागारंभः ॥

## अथ कर्मविपाकारंभः

नत्वा श्रीपंढरीनाथ मनाथभरणोद्यतं ॥ उच्यते कर्मणां पाकः शुभाशुभफलप्रदः ॥ १ ॥ तत्रादौ कर्मविपाकशब्दार्थः ॥ कर्मणां शुभाशुभानां विपाकः फलदानकालः ॥ तथापि ॥ प्रकृतत्वात्पापिजनमनोऽनुतापापादकत्वाच्च दुष्कर्मजनितएव कर्मविपाकः प्रस्तूयंते ॥ २ ॥ हारीतः ॥ यस्यां यस्यामवस्थायां यत्करोति शुभाशुभं ॥ तस्यां तस्यामवस्थायां तत्तत्फलमवाप्नुयात् ॥ ३ ॥ शरीरेणैव शारीरं वाङ्मयेन तु वाचिकं ॥ मानसं मनसैवायमुपभुंक्ते शुभाशुभं ॥ ४ ॥ याज्ञवल्क्यः ॥ विपाकः कर्मणां प्रेत्य केषांचिदिह जायते ॥ इह वामुत्रवा केषां भावस्तत्र प्रयोजनम् ॥ ५ ॥ वामन पुराणे ॥ वेदोक्तं यः परित्यज्य धर्ममन्यं समाचरेत् ॥ दशवर्षसहस्राणि श्वयोनौ जायते ध्रुवम् ॥ ६ ॥ वेदार्थनिंदकायेच येच ब्राह्मणनिंदकाः ॥ इह जन्मनि शूद्रास्ते मृताः श्वानोभवंति हि ॥ ७ ॥ ब्रह्मपुराणे ॥ पितरं मातरं चैव यस्तु पुत्रोऽवमन्यते ॥ सोपि विप्रोमृतोजंतुः पूर्वं जायेत गर्दभः ॥ ८ ॥ ज्येष्ठं पितृसमं वापि भ्रातरं योऽवमन्यते ॥ सोपि मृत्युवशं प्राप्य क्रौंचयोनौ प्रजायते ॥ ९ ॥ उपस्थिते विवाहे तु यज्ञे दाने महोत्सवे ॥ मोहात्करोति यो विघ्नं समृतोजायते कृमिः ॥ १० ॥

श्रीपांडुरंग प्रसन्न.

## तृतीय भाग.

### कर्मविपाकाचा निर्णय.

दीनजनांच्या रक्षणाविषयीं तत्पर, पंढरपूरक्षेत्राधिपति असाजो श्रीविठ्ठल यास नमस्कार करून शुभाशुभफल देणारा असा कर्मविपाक सांगतो. ॥ १ ॥ त्या मध्यें प्रथम कर्मविपाक शब्दाचा अर्थ. चांगलीं, वाईट असीं जीं कर्में त्यांचा फळ देण्याचा जो समय त्यास कर्मविपाक असी संज्ञा आहे, प्रस्तुत पापीजनाच्या मनाला पश्चात्ताप उत्पन्नकरणार, असल्यामुळें दुष्टकर्मापासून झालेला असा कर्माचा फलदानकाल सांगतो. ॥ २ ॥ हारीताचें वचन. मनुष्य ज्या ज्या अवस्थेचे ठायीं जें जें शुभाशुभ कर्म करितो, त्या त्या अवस्थेचें ठायीं

तें तें फल प्राप्त होतें. ह्मणजे तारुण्यावस्थेमध्यें जर एखादें वाईट किंवा चांगलें जें कर्म केलें असेल त्याचें फल दुसरेजन्मीं तारुण्यावस्थेमध्येंच प्राप्त होईल. ॥ ३ ॥ शरीरानें जें कर्म केलें असेल त्याचें फल शरीरावरच, वाणीनें केलें असेल तरतें फल वाणीस, मनानें जर केलें असेल तर त्याचें शुभाशुभ फल मनासच उपभोगावें लागतें. ॥ ४ ॥ याज्ञवल्क्याचें वचन. कांहीं कर्मीचीं फळें कर्मकरणाऱ्याच्यामरणानंतर त्यास मिळतात. जसें ज्योतिष्टोमयज्ञाचें फल मरणानंतर मिळतें. कांहींचें फळयालोकींच कर्मकरणारास मिळतें. जसें पर्जन्या करितां कारीर्येष्टी केली असतां जसा पाऊस पडतो, तसेंच रक्षोघ्नेष्टी केली असता ब्रह्मराक्षसाची पीडायाजन्मींच नाहींसी होते इत्यादि. कांही कर्मीचीं फळें या लोकीं आणि परलोकीं असें उभय ठिकाणीं मिळतात. या सर्वे परिणामास कारण प्राण्याच्या कर्माचा प्रकार आहे. ॥ ५ ॥ वामनपुराण. जो मनुष्य वेदोक्त धर्म टाकून अन्यधर्माचें आचरण करितो, त्यास दहा हजार वर्षे पर्यंत कुत्र्याचें जन्म प्राप्त होतो॥ ६ ॥ जें मनुष्यें वेदाची व ब्राह्मणाची निंदा करितात ते या जन्मीं शूद्र, व मरणपावल्या नंतर कुत्र्याचें जन्मास जातात. ॥ ७ ॥ ब्रह्मपुराण. जो मुलगा आई बाप याचा अपमान करितो तो ब्राह्मण जरी असेल तरी त्यास मरणानंतर गर्दभ योनी प्राप्त होते. ॥ ८ ॥ जो मनुष्य आपल्या पित्यासमान असा जो वडीलबंधु याचा अपमान करितो त्यास मरणानंतर क्रौंच योनीचे ठायीं जन्म प्राप्त होतो. ॥ ९ ॥ विवाह, यज्ञ, दान, उत्सव यामध्यें जो मनुष्य मोहानें विघ्न करितो त्यास कीड्याचा जन्म प्राप्त होतो. ॥ १० ॥

गरुडपुराणे ॥ कूटसाक्ष्यप्रदाः पापा अमेध्यकृमयश्चिरं ॥ भूत्वा भवंति सर्पास्ते पिशाचास्तदनंतरम् ॥ ११ ॥ ये तु कुर्वंति दंपत्योर्विवादं सानुरागयोः ॥ विरूपाभ्रममाणाश्च सर्वलोकविवर्जिताः ॥ १२ ॥ दरिद्राजायया भ्रष्टा भवंति विगतायुषः ॥ कन्यादाने च विघ्नं ये विक्रयं यः करोति वा ॥ १३ ॥ यैनेदत्तं नरैः किंचित्तेषां चिन्हं दरिद्रता ॥ जायंते रोगिणोरौद्रा हिंस्राः कुब्जाश्च वामनाः ॥ १४ ॥ मात्सर्यादपि जात्यंधोद्वेषात्तु बधिरोभवेत् ॥ अदत्त्वा भक्ष्यमश्नाति ध्वनपत्योभवेच्च सः ॥ १५ ॥ यद्यत्परस्याचरति तत्तदस्योपजायते ॥ प्राप्नोति तादृशीं बाधां कर्मणा स्वकृतेन सः ॥ १६ ॥ तस्यापि तादृशी बाधा ज्ञेया जन्मनि जन्मनि ॥ तस्मात्सर्वप्रयत्नेन पर बाधां विवर्जयेदिति ॥ १७ ॥ महाभारते ॥ मृतपुत्रोथवांधः स्यात् योद्वेष्टि परसंततिम् ॥ परस्य तु विनाशं यः करोति सविसर्पवान् ॥ १८ ॥ याज्ञवल्क्यः ॥ महापातकजान् घोरान्नरकान् प्राप्य दारुणान् ॥ कर्मक्षयात्प्रजायंते महापातकिनस्त्विह ॥ ॥ १९ ॥ मृगश्वसूकरोष्ट्राणां ब्रह्महा योनिमृच्छति ॥ खरपुल्कसवेनानां सुरापो नात्र संशयः ॥ २० ॥ कृमिकीटपतंगत्वं स्वर्णहारी समाप्नुयात् ॥ तृणगुल्मलतात्वं च क्रमशोगुरुतल्पगः ॥ २१ ॥

जी मनुष्यें खोटी साक्ष देतात त्या पापीमनुष्यास प्रथम अपवित्र किड्याच्या जन्मास जाऊ-

न नंतर सर्प, त्यानंतर पिशाचयोनी प्राप्त होते. ॥ ११ ॥ जे मनुष्य प्रीतियुक्त अशा दंपती मध्ये विवाद उत्पन्न करितात, ते मनुष्य कुरूपी, चोहोकडे फिरणारे सर्वलोकानें रहित असे होतात. ॥ १२ ॥ जे मनुष्य कन्यादानास विघ्न करितात, अथवा कन्येचा विक्रय करितात, ते दरिद्री, स्त्रियेनें रहित, अल्पायुषी असे होतात. ॥ १३ ॥ ज्या मनुष्यानें पूर्वी कांहीं दानधर्म केला नाहीं, तें ओळखण्याची खूण. ते मनुष्य दरिद्री, रोगी, क्रूर, हिंसाकरणारे, कुबडे, वामन (खुर्टे). असें होतात ॥ १४॥ मत्सरस्वभानें वागणारा मनुष्य जन्मांध होतो. द्वेषानें वागणारा मनुष्य बहिरा होतो. खाण्यास योग्य असा पदार्थ लोकांस न देता जो भक्षण करितो, तो अपत्य रहित असा होतो. ॥१५॥ जो मनुष्य दुसऱ्या मनुष्यास जे जे करितो, ते ते त्या मनुष्यास प्राप्त होतें. दुसऱ्यास ज्या प्रकारची पीडा करितो, त्या कर्माच्या योगानें त्यास ती पीडा प्राप्त होईल. ॥१६॥ सबब सर्वप्रयत्नानें दुसऱ्यास पीडा करूं नये. ॥ १७ ॥ महाभारत. जो मनुष्य दुसऱ्याच्या संततीचा द्वेष करितो, त्याचीं मुलें मृत होतील, अथवा तो अंधळा होईल. जो मनुष्य दुसऱ्या चा नाश करितो, त्यास विसर्परोग होतो. ॥ १८ ॥ याज्ञवल्क्याचें वचन. जे महापातक करणारे मनुष्य, महापातकामुळें भयंकर नरकदुःख भोगून कर्मक्षयझाल्यानंतर त्यास या लोकीं जन्म प्राप्त होतो. ॥ १९ ॥ ब्रह्महत्याकरणारास कुत्रा, डुक्कर, उंट यांचें जन्म प्राप्त होते. मद्यप्राशनकरणारास गाढव, अंत्यज, वेन ( अंत्यज विशेष ) याचा जन्म प्राप्त होतो. ॥ २० ॥ सुवर्णचोरी करणारास कृमी, कीट, पतंग यांची योनी प्राप्त होते. गुरु स्त्रीसीं गमन करणारास गवत, झुडुप, वेल यांचें जन्म प्राप्त होतें. ॥ २१ ॥

महापातकजचिन्हमाह याज्ञवल्क्यः ॥ ब्रम्हहा क्षयरोगी स्यात्सुरापः श्यावदंतकः ॥ हेमहारी तु कुनखी दुश्चर्मा गुरुतल्पगः ॥ २२ ॥ योयेन संवसत्येषां सतल्लिंगोभिजायते ॥ अन्नहर्तामयावी स्यान्मूकोवागपहारकः ॥ २३ ॥ धान्यमिश्रोतिरिक्तांगः पिशुनः पूतिनासिकः ॥ तैलहृत्तैलपायीस्यात्पूतिवक्रस्तु सूचकः ॥ २४ ॥ मनुः ॥ एवं कर्मविशेषेण जायंते सद्भिर्गर्हिताः ॥ जडमूकांधबधिरा विकृताकृतयस्तथा ॥२५ ॥ शातातपः ॥ पूर्वजन्मकृतं पापं नरकस्य परिक्षये ॥ बाधते व्याधिरूपेण तस्य जाप्यादिभिः शमः ॥ २६ ॥ महाभारते दानधर्मेषु ॥ पातकानि नराः कृत्वा निरस्यंति न ये व्रतैः ॥ सदा दुःखसमायुक्ता व्याधितास्ते भवंतिच ॥ २७ ॥ तत्र व्याधयस्त्रिविधाः ॥ कर्मजादोषजाउभयजाश्चतथात्वायुर्वेदः ॥ कर्मप्रकोपेण कदाचिदेते दोषप्रकोपेण भवंति चान्ये ॥ तथापरे प्राणिषु कर्मदोषप्रकोपजाः कायमनोविकारात् ॥ २८ ॥ तत्रैव ॥ यथाशास्त्रं तु निर्णितो यथाव्याधिचिकित्सितः ॥ न शमं याति योव्याधिः सज्ञेयः कर्मजोबुधैः ॥ २९ ॥ स्वहेतुकुपितैर्दोषैर्वातादै दोषजं विदुः ॥ निष्कृत्याकर्मजन्मातु दोषजस्त्वौषधेनहि ॥ उभयाज्जायमानस्तु निष्कृत्यौषधसेवया ॥३०॥

**तत्र कर्मजव्याधीनां दोषकर्मसमुद्भवव्याधीनां च प्रतीकाराय कर्मविपाकज्ञानस्यावश्यकत्वात्तत्र सर्वरोगेभ्यो ज्वरस्यात्यंतबलीयस्त्वात्तत्कर्मविपाक आदावुच्यते ॥ ३१ ॥**

पूर्वजन्मीं ज्यानें महापातक केलें आहे. त्याचें चिन्ह याज्ञवल्क्य सांगतात. ज्यानें ब्रह्महत्या केली आहे तो क्षयरोगी होईल. मद्यप्राशन करणाराचे दांत काळे असतात. सुवर्णचोरी करणाराचीं नखें वाईट असतात गुरुस्त्रीसीं गमन करणराचे अंगावरची त्वचा वाईट ( खरबरीत, भेगापडलेली वगैरे ) असते. ॥ २२ ॥ जो मनुष्य ज्या पातकीमनुष्याचा सहवास करितो, त्या पातकी मनुष्यास जन्मांतरीं जें चिन्ह ( क्षयरोगादि ) व्हावयाचें तें सहवास करणारास होतें. अन्नचोरणारास अग्निमांद्यरोग होतो. पुस्तकचोरणारा मुका होतो. ॥ २३ ॥ धान्यांत दुसरा पदार्थ मिश्रित करून विकणारास जन्मांतरीं अधिकअंगयुक्त ह्मणजे साहा बोटें वगैरे होतात. चाहाडीकरणाऱ्या मनुष्याच्या नाकाचा दुर्गंध येतो. तेलचोरणारा तेल पीणारा कीडा असा होतो. असणारें जें दोष याला सुचविणारा मनुष्याच्या मुखाची दुर्गंधी येते. ॥ २४ ॥ मनूचें वचन. या प्रमाणें कर्मविशेषानें सज्जनानें निंदित असें जड, मूढ, मूक अंध, बधिर इत्यादीविकारयुक्त देह प्राप्त होतात. ॥ २५ ॥ शातातपाचें वचन. पूर्वजन्माचे ठायीं केलेलें जें पाप त्यानें नरक प्राप्ती होते. नरकाचा भोग घेतल्यानंतर भूलोकीं जन्म प्राप्त होतो. त्या जन्माचे ठायीं तें पूर्वपातकरोगस्वरूपानें पीडा देतें. त्या पातकाची जपहोमइत्यादिकानें शांती करावी. ॥ २६ ॥ महाभारत दानधर्मांतील श्लोक. जे मनुष्य पातकें करून, त्या पातकाचा व्रतादिकें करून नाश करीत नाहींत; ते सर्वकाळ दुःखी आणि व्याधिग्रस्त असे होतात. ॥२७॥ त्यांत व्याधि ह्मणजे रोग तीन प्रकारचे सांगितले आहेत. कांहीं रोग पूर्वकर्मापासून होणारे, कांहीं वातपित्तकफ या पासून होणारे, कांहीं पूर्वकर्म आणि वातादि या उभयांपासून होणारे. त्यास वैद्यशास्त्राचें वचन. कित्येक रोग कर्मप्रकोपानें होतात. तसेंच प्राण्याचे ठायीं कर्म आणि दोष यांच्या प्रकोपानें देह आणि मन यांच्या विकारानें होतात. ॥ २८ ॥ जो व्याधि यथा शास्त्र निदान करून शास्त्रांत लिहिल्या प्रमाणें औषधोपचार केले असतां ही शांत होत नाहीं तो कर्मज असा जाणावा. ॥ २९ ॥ आपापल्या कारणांनीं कुपित झालेल्या वातादिदोषानें जो रोग होतो त्यास दोषज असें ह्मणतात. कर्मापासून झालेला जो रोग तो रोग शास्त्रांत सांगितलेल्या उपायानें बरा होतो. दोषापासून झालेला रोग औषधापासून नीट होतो. कर्म आणि दोष यापासून झालेला रोग शास्त्रांत सांगितलेलें उपाय आणि औषधें यांच्या सेवनानें बरा होतो ॥ ३० ॥ त्यामध्यें कर्मापासून होणारे रोग, तसेंच कर्मदोषापासून होणारे रोग याचें निराकरण करण्यास कर्मविपाकाचें ज्ञान असणें हें आवश्यक आहे. यास्तव तसेंच सर्वरोगापेक्षां ज्वराला श्रेष्ठ र आहे, या करितां प्रथमतः ज्वराचा कर्मविपाक सांगतो ॥ ३१ ॥

## अथ सर्वज्वरकर्मविपाकनिर्णयः

तत्र कर्मविपाकसंग्रहे ॥ मांगल्येषु च कार्येषु सततं कोपनो नरः ॥ उष्णज्वराभिभूः

तः स्यात् दारहीनश्च जायते ॥ ३२॥ शातातपः ॥ रजस्वलां वा चांडालीं योगच्छे-त्तं नरं ज्वरः ॥ गृण्हाति तेन संतापी ज्वरी भवति मानवः ॥ ३३ ॥ तस्करोयोवृ-था प्राणिहिंसकोनिर्दयश्च यः ॥ आचाररहितोपश्चपरधर्मस्य निंदकः ॥ ३४ ॥ अध-र्मनिरतोयश्च तानेतान्नु ज्वरसंज्ञकः ॥ ग्रहोगृण्हाति तान्मात्रादेकरात्रज्वरी भवेत् ॥ ३५ ॥ द्विरात्रेण त्रिरात्रेण चतुरात्रज्वरेण च ॥ शीतज्वरेण सतत ज्वरेणोष्णज्व रेण च ॥ ३६ ॥ युतोभवति ॥ अशुचिर्यः स्पृशेद्देवं ब्राह्मण बुद्धिपूर्वक ॥ त गृण्हा-ति भयंकराख्यो ज्वरस्तत् ग्रहणात्ततः ॥३७॥ गार्ग्यः ॥ ये पुनः क्रूरकर्माण. पापाः पि-शुनचेतसः ॥ तेभवेयुः सदा शीतज्वरवंतस्तदेनसा ॥ ३८ ॥ शातातप. ॥ देवस्वहर-णाच्चैव जायते विविधोज्वरः ॥ ज्वरोमहाज्वरश्चैव रौद्रोवैष्णवएवच ॥ ३९ ॥ ये पुनः पूर्वजन्मनि क्रूराः पिशुना स्तथा ॥ ततस्तेऽन्यजन्मनि सततं ज्वरिणोनराः ॥ ४० ॥ ज्वरे रुद्रजपं कुर्यान्महारुद्रं महाज्वरे ॥ महारुद्र जपेद्रौद्रे वैष्णवे तत्द्वयं जपेत् ॥ ॥ ४१ ॥ कर्मविपाकसंग्रहे गार्ग्ये ॥ शांतयेयुतसंख्यार्क प्रकुर्यात्प्रयतोजप ॥ जातवे-दसमंत्रेण ब्राह्मणान् भोजयेत्ततः ॥ ४२ ॥ सुरामांसोपहाराद्यै र्बलिः सर्वत्र शस्यते ॥ सहस्रकलशस्नानं शतभोजनमेवच ॥ शीतज्वरे पुनः कुर्यादभिषेकं हरेर्बुधः ॥ ४३ ॥ ज्वराल्पत्वे जपभोजनयोरल्पता ज्ञेया ॥ सुरामांसादिबलिरधिकारिभेदेन कार्यः ॥ उष्णज्वराभिभूतस्य तत्पापापनुत्तये ॥ सहस्रकलशस्नान रुद्रेणेशस्य कारयेत् ॥४४॥ ब्राह्मणान् भोजयेत् शक्त्या जपेद्वै जातवेदसम् ॥

## सर्वज्वराच्या कर्मविपाकाचा निर्णय.

कर्मविपाकसंग्रहांतील वचन. जो मनुष्य मगळ कार्याचे ठायीं निरतर कोपयुक्त असा हो-तो. तो मनुष्य उष्णज्वर ( दाहपूर्वक ज्वर ) यानें युक्त, तसेंच स्त्रियेनें रहित असा होतो. ॥ ३२ ॥ शातातपाचें वचन. रजस्वलास्त्री अथवा चांडाळस्त्री इच्यासीं जो समागम करितो, तो मनुष्य सतापज्वरानें युक्त असा होतो. ॥ ३३ ॥ चोरी करणारा, यज्ञादिकावाचून प्रा-ण्याची व्यर्थ हिंसा करणारा, दयारहित, सदाचाररहित, दुसऱ्याच्या धर्माची निंदा करणारा, अधर्मयुक्त, अशा मनुष्यास ज्वररूपग्रह पीडा देतो. ॥ ३४ ॥ ३५ ॥ एकाहिक ज्वर, द्याहि-क, त्र्याहिक, चातुर्थिक, शीतज्वर, सततज्वर, उष्णज्वर याज्वरानें पूर्वोक्तकर्म करणारे युक्त हो तात. ॥ ३६ ॥ जो मनुष्य अशुचि असता देव ब्राह्मण यास बुद्धिपूर्वक स्पर्श करील, त्यास भयकर ज्वर उत्पन्न होईल. ॥ ३७ ॥ गार्ग्याचें वचन. जे मनुष्य क्रूरकर्म करितात, तसेंच पा-तकि, दुसऱ्याचे दोष सागतात, ते त्या पातकानें शीतज्वरयुक्त असे होतात. ॥ ३८ ॥ शा-तातपाचें वचन. देवाचें द्रव्य हरण केल्यानें नानाप्रकारचे ज्वर उत्पन्न होतात. ह्मणजे महाज्वर, रुद्रदेवताक, व विष्णुदेवताक असे ज्वर होतात. ॥ ३९ ॥ जे मनुष्य पूर्वजन्मीं क्रूर व चा-

ज्या करणारे ते जन्मांतरीं संततज्वर युक्त होतील. ॥ ४० ॥ ज्वरशांति होण्या करितां रुद्र जप करावा. महाज्वर नाश होण्याकरितां महारुद्रजप करावा. रुद्रज्वराला महारुद्रजप, वैष्णवज्वराला दोन महारुद्र करावेत. ॥ ४१ ॥ ज्वरशांति होण्याकरितां अग्निदेवतात्मक मंत्राचा दहा हजार जप करावा. आणि ब्राह्मणास भोजन द्यावें. ह्मणजे ज्वरपीडा दूर होती. ॥ ४२ ॥ सर्वज्वराचे ठायीं दारू, मांस इत्यादिक बळी द्यावेत. देवतेस हजार घागरी पाण्यानें स्नान घालावें. शंभर ब्राह्मण भोजन घालावें. शीतज्वराचे ठायीं विष्णूस अभिषेक करावा. ॥ ४३ ॥ ज्वर जर अल्प असेल तर ब्राह्मणभोजन आणि जप हे अल्प करावे. दारू मांस याचा जो बळी सांगितला, तो ज्यास अधिकार असेल असे जे शूद्रादिक त्यांनीं करावा. उष्णज्वरानें जो पीडित झाला असेल, त्याची ती पीडा नाहींसी होण्याकरितां श्रीशंकरास रुद्रमंत्रानें हजार घागरीं पाण्यानें स्नान घालावें. ॥ ४४ ॥ आपल्या शक्तीप्रमाणें ब्राह्मणभोजन करावें. आणि जातवेदस मंत्राचा जपही करावा.

## ॥ अथ सर्वज्वरहरकुंभदाननिर्णयः ॥

पाद्मे ॥-अगारदाही ज्वरवान् जायते तत्र निष्कृतिः ॥ नवकुंभं समानीय मृण्मयं घाव्रणं दृढं ॥ १ ॥ लोहितं कोष्टरहितं स्थापयेत्तंदुलोपरि ॥ परिमाणं तंदुलानां द्रोणपंचकमिष्यते ॥ २ ॥ विशुद्धास्तंदुलाग्राह्या श्वेतवस्त्रेण वेष्टयेत् ॥ मधुनाप्यथवाज्येन खंडेनाथ गुडेनवा ॥ ३ ॥ तैलेनाप्यंभसावा तं पूरयेच्छक्तितोनरः ॥ श्वेतपुष्पैरर्चयेत्तं गंधपुष्पैस्तथापरैः ॥ ४ ॥ होमश्च पूर्ववत्कार्यः समिदाज्यचरूत्कटः ॥ सुवर्णेन यथा शक्त्या ब्राम्हणाय निवेदयेत् ॥ ५ ॥ मंत्रेणानेन विधिवत्पूजयित्वा ज्वरी नरः ॥ महेश देवदेवेश वासुदेव परात्पर ॥ कुंभेनानेन दत्तेन ज्वरः क्षिप्रं प्रशाम्यतु ॥ ६ ॥ एकाहिकं संनिपातं तृतीयकचतुर्थकौ ॥ पाक्षिकं वापि सांवत्सरिकमेव वा ॥ प्रवत्पसर्वेमंगंचशीतमुष्णज्वराणिच ॥ ७ ॥ द्वितीये भूतगणेभ्यश्च तथाशेषज्वराणिच ॥ नाशयेतां ममक्षिप्रं वासुदेवमहेश्वरौ ॥ ८ ॥

## सर्वज्वरास नाशक अशा कुंभदानाचा निर्णय.

पद्मपुराणांतील वचन. दुसऱ्याचे घरास आग लावणारा मनुष्य दाहज्वरानें पीडित असा होतो. त्याचें तें पातक नाहींसें होण्यास उपाय. मातीचा ज्यास छिद्र नाहीं, दृढ असा नूतन कुंभ आणोन ॥ १ ॥ त्यास तांबडा रंग लावावा. आणि पांच द्रोण (वीस पायली) परिमित तांदुळाच्या राशीवर तो स्थापन करावा. नंतर पांढऱ्या वस्त्रानें त्या कुंभास वेष्टन करावें. कुंभामध्यें मध, तूप, खडीसाखर, गुळ, तेल, पाणी यांपैकीं कोणत्याही एका पदार्थानें पूरित करावा, ह्मणजे यांतील एका पदार्थानें तो कुंभ भरावा. पांढरीं फुलें तसेंच गंध व इतर फुलें, अक्षता, यांच्या योगानें कुंभाची पूजा करावी. ॥ २ ॥ ३ ॥ ४ ॥ समिधा, तूप, यांच्यायोगानें पूर्वीं सांगितल्याप्रमाणें होम

करावा. आणि ब्राह्मणास आपल्या शक्तिप्रमाणें सुवर्णदक्षिणायुक्त कुंभदान करावें. त्यास मंत्र; महेशदेवदेवेशवासुदेवपरात्पर ॥ कुंभेनानेनदत्तेन ज्वर.क्षिप्रप्रशाम्यतु ॥ ५ ॥ ६ ॥ हा मंत्र ह्मणोन एकाहिक, सन्निपात, तृतीयक, चातुर्थिक, पाक्षिक, सांवत्सरिक, उष्णज्वर, शीतज्वर, हे माझे सर्वज्वर विष्णु आणि शंकर शीघ्र नाश करोत. अशी प्रार्थना करावी. ॥ ७ ॥ ८ ॥

## अथ ज्वरतर्पणम् ॥

अनघोनर्मदातीरे अपुत्रस्तापसोमृतः ॥ रात्रौ ज्वरविनाशाय तस्मै दद्यात्तिलोदकम् ॥ ९ ॥ ज्वरतर्पणमंत्रः ॥ त्रिपाद्भस्मप्रहरण त्रिशिरारक्तलोचनः ॥ समे प्रीतः सुखं दद्यात्सर्वामयपतिर्ज्वरः ॥ १० ॥ ज्वरतर्पणे अष्टोत्तरशतायुतांतसंख्याअक्षताःपुष्पाणि च रक्तानीति महार्णवः ॥ ११ ॥ कर्मविपाकसारे ॥ ज्वरप्रतिमादानमुक्तं ॥ त्रिपाद्भस्मप्रहरणोरक्ताक्षस्त्रिशिराज्वरः ॥ भस्मायुधइत्यर्थः ॥ १२ ॥

## ज्वरतर्पणाचा निर्णय.

नर्मदातीराचे ठायीं निष्पाप, निपुत्रिक असा एक तपस्वी मनुष्य मरण पावला, त्याच्या उद्देशानें तिलोदक सहित तर्पण करावें. ह्मणजे ज्वरनाश होतो. ॥ ९ ॥ तर्पणाचा मंत्र. त्रिपाद्भस्मप्रहरणस्त्रिशिरारक्तलोचनः ॥ समेप्रीतःसुखं दद्यात्सर्वामयपतिर्ज्वरः ॥ १० ॥ हा मंत्र ह्मणोन ज्वराच्या मानानें एकशेंआठ, अथवा हजार असें तर्पण करावें. तर्पणास अक्षता आणि पुष्पें असावींत. महार्णवग्रंथात ज्वरतर्पणास फुलें व अक्षता तांबड्या असाव्यात असें सांगितलें आहे. ॥ ११ ॥ कर्मविपाकसारामध्यें ज्वराची प्रतिमा देण्यास सांगितली आहे. ती तीनमस्तकें, तीन पाय, रक्तनेत्र, भस्मायुध असी सुवर्णादिकाची प्रतिमा तयार करून ब्राह्मणास द्यावी. ॥ १२ ॥

## ॥ अथ ज्वरग्रहहरं ॥

कर्मविपाकसंग्रहे ॥ रजस्वलां वा चांडालीं,योगच्छेत्तं ज्वरग्रहः ॥ गृण्हाति तेन संतापज्वरी भवति मानवः ॥ १३ ॥ चांद्रायणं सांतपनं कुर्याच्च मधुमिश्रितैः ॥ रसालपल्लवैर्हेमाजातवेदसमंत्रतः ॥ १४ ॥ नाम्नां सहस्रं तु जपेदयुतं जातवेदसं ॥ शक्त्या हिरण्यदानं च ब्राह्मणान् भोजयेद्दश ॥ १५ ॥ होमोष्टसहस्रं ॥ विष्णुसहस्रनामजातवेदसयोः प्रत्येकमयुजपस्तदुत्तरे च होमइति महार्णवः ॥ १६ ॥ बलिदानप्रकारमाह ॥ पायसं कांस्यपात्रे च ध्वजैः श्वेतैः परिष्कृतम् ॥ १७ ॥ निक्षिप्य गंधपुष्पाद्यैर्ग्रहपूजां विधाय च ॥ देवालये निक्षिपेद्वा निक्षिपेच्च चतुष्पथे ॥ १८ ॥ मंत्रमाह ॥ प्रगृण्हीष्व बलिं चेमं दाहरूप महाज्वर ॥ आतुरस्य सुखं सिद्धिं प्रयच्छ त्वं महाग्रह ॥ १९ ॥

कर्मविपाकसंग्रहांतील वचन. जो मनुष्य रजस्वलास्त्री अथवा चांडालस्त्री इच्यासीं गमन

करील त्यास संतापज्वर होईल. ॥ १३ ॥ तो नाश होण्याकरितां चांद्रायण अथवा सांतपन प्रायश्चित्त करावें. अथवा मधानें मिश्रित केलेलें असें अंब्याच्या पल्लवानीं जातवेदसमंत्रानें होम करावा. ॥ १४ ॥ जातवेदसमंत्राचा आणि विष्णुसहस्रनामाचे हजार अथवा दहा हजार पाठ करावे. शक्तिप्रमाणें सुवर्णदान करावें. व दाहा ब्राह्मणास भोजन घालावें. ॥ १५ ॥ महार्णव ग्रंथांत प्रथम होमकरून नंतर हे पाठ करण्यास सांगितले आहेत. ॥ १६ ॥ ज्वराच्या उद्देशानें बली देण्यास सांगितला आहे. त्याचा प्रकार. दुधांत तांदूळ घालून त्याची क्षीर तयार करून कांस्याच्या पात्रांत घालून त्याच्या सभोंवतानें पांढरे ध्वज लावून भूषित करावें. ॥ १७ ॥ नंतर गंधपुष्प इत्यादिकानें त्या पात्राची पूजा करावी. तसेंच ज्वराची पूजा करावी. आणि तो बली एखादें देवालयांत अथवा चव्हाट्यावर नेऊन ठेवावा. ॥ १८ ॥ त्यास मंत्र. प्रगृण्हीष्वबलिंचेमं-दाहरूपमहाज्वर ॥ आतुरस्यसुखंसिद्धिंप्रयच्छस्वमहाग्रह ॥ हा मंत्र ह्मणावा. याचा अर्थ असा आहे कीं, हे दाहरूप महाज्वर मी हा दिलेला बली घे आणि आजारी मनुष्यास लवकर अरोग्य युक्तकर असी प्रार्थना करावी. ॥ १९ ॥

**तथा श्रीमन्महाभागवतदशमस्कंधोत्तरार्धेत्रिषष्टितमाध्यायोक्तज्वरस्तोत्रेपाठश्च कार्यः ॥ २० ॥ तथान्यत्र ॥ वेदानां श्रवणं हितस्य चरणं विप्रस्य संतर्पणं ॥ कृष्णस्य स्मरणं शुभस्य करणं द्रव्यस्य संतर्पणं ॥ अश्वत्थभ्रमणं सुरत्नधरणं दीनस्य संरक्षणं ॥ हन्यादष्टविधं ज्वरं कुमुदिनीनाथोयथोग्रं तमः ॥ २१ ॥ सहस्रनेत्रस्य सहस्रबाहोः सहस्रवक्त्रस्य सहस्रमूर्ध्नः ॥ सहस्रपादस्य सहस्रनाम्नः सहस्रनाम्नां पठनं ज्वरघ्नं ॥ २२ ॥ गणेश्वरोवा गरुडेश्वरोवा गौरीश्वरोवा दिवसेश्वरोवा ॥ महेश्वरोवा कुलदैवतं वा तत्पूजनं तज्ज्वरीणां प्रशस्तम् ॥ २३ ॥**

तसेंच श्रीमद्भागवत दशमस्कंध उत्तरार्ध अध्याय ६३ यांत सांगितलेल्या ज्वरस्तोत्राचा[१] पाठकरावा. ॥ २० ॥ अन्यग्रंथांत असे सांगितले आहे कीं, ज्वरितानें ज्वरनाश होण्याकरितां वेदमंत्र श्रवण करावेत गरीबलोकांचें कल्याण होईल असें दान धर्म करावें. ब्राह्मणसंतर्पण करावें. विष्णुसहस्रनामाचे पाठ श्रवण करावे. शुभ कर्में करावीत. द्रव्य दान करावें. पिंपळाच्या झाडास प्रदक्षिणा कराव्या. उत्तमत तऱ्हेचीं रत्नें धारण करावींत. दीनजनांचें पोषण करावें. हे उपचार जसा चंद्र मोठ्या अंधकाराचा नाश करितो, तसा हे उपचार आठ प्रकारच्या ज्वरांचा नाश करितात. ॥ २१ ॥ असंख्यात ज्यास नेत्र, बाहु, मुखें, मस्तकें, पाद, नामें,

---

१ ज्वरउवाच ॥ नमामि त्वानतशक्ति परेशं सर्वात्मानं केवल ज्ञप्तिमात्रं ॥ विश्वोत्पत्तिस्थानसंरोधहेतुं यत्तद्ब्रह्म ब्रह्मलिंगं प्रशांतम् ॥ १ ॥ कालोदैवं कर्मजीवः स्वभावो द्रव्यं क्षेत्र प्राणआत्माविकारः ॥ तत्सघातोबीजरोहप्रवाहस्त्वन्मायैषा तन्निषेधंप्रपद्ये ॥ २ ॥ नानाभावैर्लीलयैवोपपन्नैर्देवान् साधूंल्लोकसेतून् बिभर्षि ॥ हंस्युन्मार्गान् हिंसया वर्तमानो जन्मैतत्ते भारहाराय भूमेः ॥ ३ ॥ तप्तोहं ते तेजसा दुःसहेन शांतोग्रेणात्युल्बणेन ज्वरेण ॥ तावत्तापोदेहिनां तेंऽघ्रिमूलनो सेवेरन्यावदाशानुबद्धाः ॥ ४ ॥ श्रीभगवानुवाच ॥ त्रिशिरस्ते प्रसन्नोस्मि व्येतु ते मज्ज्वराद्भयम् ॥ योनौस्मरति संवादं तस्य त्वन्नभवेद्भयम् ॥ ५ ॥

हीं आहेत, असा जो विष्णु त्याचे जीं सहस्रनामे यांचें पठन केलें असतां तें ज्वरनाशक होतें. ॥ २२ ॥ गणपति, विष्णु, शंकर, सूर्य जो जगन्नियंता परमेश्वर व आपली कुळ देवतायांचें पूजन केलें असतां तें आठ प्रकारच्या ज्वरांस नाश करून ज्वरित मनुष्यास आरोग्य युक्त करितें ॥ २३ ॥

## अथातिसारकर्मविपाकनिर्णयः

पद्मपुराणे ॥ अतिसारी च भवति यस्त्रेताग्निविनाशकः ॥ शातातपः ॥ स्त्रीहंता चातिसारी स्याद्दारनाशयुतोपिवा ॥ दावाग्निदायकश्चैव रक्तातिसारवान्भवेत् ॥ १ ॥ कर्मविपाकसमुच्चये ॥ स्मार्तोग्निं शमयेद्यस्तु सोतिसारयुतोभवेत् ॥ अग्निरश्मीत्यृचं जप्त्वा. दशांशं जुहुयात्तिलान् ॥ २ ॥ सर्पिषा चाक्षतान् दद्याद्धिरण्यं ब्राह्मणाय वै ॥ अग्निरश्मीतिऋचम् तारतम्ये न वा जपेत् ॥ ३ ॥

## अतिसाराच्या कर्मविपाकाचा निर्णय.

पद्मपुराणांतील वचन. जो मनुष्य अग्नित्रयांचा त्याग करितो, तो अतिसार रोगमुक्त होतो. शातातपाचें वचन. स्त्रीचा नाशकरणारा मनुष्य अतिसारयुक्त, तसेंच स्त्रीयेनें रहित असा होतो. अरण्यास आग्नि लावून देणारा मनुष्य त्यास रक्तातिसार रोग होतो. ॥ १ ॥ कर्मविपाकसमुच्चयांतील वचन. जो मनुष्य स्मार्ताग्नीचा नाश करितो त्यास अतिसार रोग उत्पन्न होईल. त्या मनुष्यानें अतिसारनाश होण्याकरितां अग्निरश्मी या ऋचेचा अतिसार रोगाच्या तारतम्यानें कमी ज्यास्ती जप करावा. जपाचे दशांश तूपानें युक्त असें जेतीळ. त्यां तीळानीं होम करावा. ब्राह्मणास सुवर्णदान करावें. ॥ २ ॥ ३ ॥

## अथातिसारे वन्हिमूर्तिदाननिर्णयः

पाद्मे ॥ अतिसारी सभवति यस्त्रेताग्निविनाशकः ॥ सुवर्णेनाथताम्रेण कुर्यात्प्रतिकृतिं बुधः ॥ ४ ॥ वन्हेः शक्त्यनुसारेण पलेनार्धेन वा पुनः ॥ तथाज्वालाकुलांरक्तचंदनेनविलेपितां ॥ ५ ॥ रक्तवस्त्रेण संवीतां मेषस्योपरिसंस्थितां ॥ रक्तमाल्यैश्च संछन्नां मुक्तादामपरिष्कृतां ॥ ६ ॥ कनकाचलवर्णाभां द्वादशार्कनिभां शुभां ॥ ब्रह्मचर्यान्विते विप्रे कनिष्ठेचाग्निहोत्रिणि ॥ ७ ॥ अंगुलीयकवस्त्राद्यैर्भूषिते तांनिवेदयेत् ॥ मंत्रेणानेनविधिवदग्निप्रीत्यर्थमादृतः ॥ ८ ॥ दानमंत्रः ॥ त्रेतारूपोग्निरीड्यस्त्वमंततश्चासि वै नृणां ॥ त्वं वेत्थमात्कृतं पापमतिसारं विनाशय ॥ ९ ॥ एवं कृत्वा नरः सम्यगतिसारं व्यपोहति ॥ निरुजः ससुखी नित्यं दीर्घमायुश्च विंदति ॥ १० ॥ शातातपः ॥ स्त्रीहंता चातिसारी स्यादश्वत्थान् रोपयेद्दश ॥ दद्याच्च शर्कराधेनुं भोजयेच्च शतं द्विजान् ॥ ११ ॥ रक्तातिसारे शातातपः ॥ दावाग्निदायकश्चैव रक्तातिसारवान् भवेत् ॥ तेनोदकदानं कर्तव्यं रोपणीयस्तथावटः ॥ १२ ॥

## अतिसारास अग्नीमूर्तींचे दानाचा विचार.

पद्मपुराणांतील वचन. च्यार अथवा दोन तोळें जसी आपली शक्ति असेल त्या शक्तिअनुरूप सुवर्णाची अथवा ताब्याची अग्नीची प्रतिमा करावी. ॥ ४ ॥ त्या प्रतिमेस रक्तचदन लावावें रक्तवस्त्रानें वेष्टित, मेंढ्यावर बसवलेली, जिच्या गळ्यात मोत्याची माळ घातली आहे. तांबडे फुलें जीला वाहिलें आहेत. सुवर्णपर्वत आणि सूर्य या प्रमाणें तेंजस्वी अशी ती प्रतिमा ब्रह्मचारी अथवा अग्निहोत्री यास अग्निप्रीतिकरिता मोठ्या आदरानें पुढील मत्र ह्मणून दान करावी. ॥ ५ ॥ ६ ॥ ७ ॥ ८ ॥ दानाचा मत्र, त्रैतारूपोग्निरीड्यस्त्वमततश्चासियैनृणा ॥ त्वनेत्य प्राक्तनपापमतिसाराविनाशय ॥ ९ ॥ या प्रमाणें जो मनुष्य कारितो त्याचा अतिसार रोग नाहींसा होतो. व तो निरोगी असा होऊन शभर वर्षेपर्यंत वाचतो. ॥ १० ॥ शातातपाचें वचन. जो स्त्रीयाचा नाश करितो त्यास अतिसार रोग होतो. त्यानें दहा पिंपळाचे वृक्ष लावावेत. अथवा शर्करा धेनु ( या संबंधानें क्षयरोग प्रकरणात लिहू. ) द्यावी. अथवा शभर ब्राह्मण भोजन घालावें. ॥ ११ ॥ रक्तातिसाराविषयी शातातपाचें वचन. जो अरण्यास अग्नि लावून देतो, तो रक्तातिसार युक्त होईल. तो रोग दूर होण्याकरिता पानपोयी स्थापन करावी. अथवा एक वडाचा वृक्ष लावावा. ॥ १२ ॥

## अथ संग्रहणीकर्मविपाकनिर्णयः

कर्मविपाकसंग्रहे ॥ अनन्यगतिकां भार्यामदुष्टां कारणं विना ॥ परित्यजति यः सोपि ग्रहणीरोगवान् भवेत् ॥ १ ॥ शिवसंकल्पसूक्तस्य जपः स्यात्तत्र शांतये ॥ अष्टोत्तरसहस्रं हि हिरण्यं च तथा मधु ॥ २ ॥ दद्याद्वित्तानुसारेण सौरमंत्रजपस्तथा ॥ धेनुं सलक्षणां दद्याद्वस्त्राभरणसंयुतां ॥ ३ ॥ पयस्विनीं गुणोपेतां ब्राम्हणाय कुटुंबिने ॥ वत्साभरणसंयुक्तां वस्त्रेणाभरणेन च ॥ ४ ॥

## आतां संग्रहणीच्या कर्म विपाकाचा निर्णय.

कर्मविपाकसंग्रहातील वचन. जो मनुष्य उत्तम आचरणानें युक्त असी आपली स्त्री तिचा कारणावाचून त्याग करितो. त्यास संग्रहणीरोग उत्पन्न होतो. ॥ १ ॥ त्या पातकाची शांतिहोण्याकरितां शिवसूक्तसंकल्पाचा एक हजार आठ जपकरावा. व ब्राह्मणास सुवर्ण मध हे शक्ति अनुसार द्यावें. ॥ २ ॥ तसेच सौरमंत्राचाही जपकरावा. त्या प्रमाणेंच वस्त्रालंकार युक्त असी धेनु कुटुंबवत्सल ब्राह्मणास द्यावी. तेणें करून संग्रहणीरोगाचा नाश होईल. ॥ ३ ॥४॥

## अथार्शोरोगकर्मविपाकनिर्णयः

कर्मविपाकसुधानिधौ ॥ निदानाष्टकमत्रैव मर्शोरोगस्य भेदिदं ॥ परहृत्क्लेशकरणं गुरुद्वेषश्च गोवधः ॥ देवद्विजस्वहरणं ग्रहणे स्त्रीसमागमः ॥ निषिद्धाचारकरणमन्ना-

पहरणं तथा ॥ १ ॥ कर्मविपाकसमुच्चये ॥ दत्वाथ वेतनं योध्येत्यादायापिच वेतनं ॥ अध्यापयेचजुहुयाज्जपेद्वाशैशुतोभवेत् ॥ २ ॥ तन्निष्कृत्यै प्रकुर्वीत कृच्छ्रं चैवातिकृच्छ्रकं ॥ चांद्रायणं तथाकुर्याज्जपेत्सूक्तं च पौरुषं ॥ ३ ॥ अशोरोगप्रसुवर्णदानं ॥ हेमाद्रौ महार्णवे च बौधायनः ॥ सुवर्णधेनुं प्रकुर्वीत पलेनार्द्धेन वा पुनः ॥ वित्तशाठ्यं न कुर्वीत चतुर्थांशेन तर्णकं ॥ तर्णकोवत्सः ॥ ४ ॥ रत्नशृंगीं रौप्यखुरीं नानावस्त्रैरलंकृतां ॥ ग्रहाणामुपरि स्थापयेत् ॥ ग्रहस्थापनदेशादुपरि इत्यर्थः ॥ तेन ग्रहयज्ञोपि कर्तव्यइत्युक्तम् ॥ ५ ॥ होमोग्रहहोमः ॥ कर्मविपाकसारे ॥ अर्शोरोगप्रतिमादानं ॥ अर्शोरोगः कृशोवक्रः खड्गचर्मभृदूर्ध्वदृक् ॥ एवं सुवर्णप्रतिमां कृत्वा श्रोत्रियाय विप्राय सदक्षिणां दद्यात् ॥ तेनार्शोरोगनिवृत्तिः ॥ ६ ॥

## मूळव्याधीच्या कर्मविपाकाचा निर्णय.

कर्मविपाकसुधानिधींतील वचन. अर्शरोग उत्पन्न होण्यास आठ कारणें आहेत. दुसऱ्याच्या अंतःकरणास क्लेश उत्पन्न करणें, गुरूचा द्वेष करणें, गायीचा वध करणें, देव आणि ब्राह्मण यांचें द्रव्य हरण करणें, ग्रहणामध्यें शौच करणें, निषिद्ध आचरण करणें, दुसऱ्याचें अन्न चोरणें, हीं आठ कारणें सांगितलीं आहेत. ॥ १ ॥ कर्मसमुच्चयांतील वचन. दुसऱ्यास वेतन देऊन जो अध्ययन शिकतो, किंवा पगार घेऊन अध्ययन सांगतो. तसेंच वेतन घेऊन जो होम अथवा जप करितो, त्यास मूळव्याध रोग होतो. ॥ २ ॥ हा रोग दूर होण्याकरितां कृच्छ्र, अतिकृच्छ्र आणि चांद्रायण हीं आचरण करावीं, तसेंच पुरुषसूक्ताचा जप करावा. ॥ ३ ॥ बौधायनाचें वचन. चार अथवा दोन तोळे सुवर्णाची गाय करावी, गायीच्या चतुर्थांश सोन्याचें वांसरूं करावें या कामीं द्रव्याविषयीं कृपणपणा करूं नये. ॥४॥ त्या गायीस रत्नाचीं शिंगें व रुप्याचे खूर करावेत. आणि नानाप्रकारच्या वस्त्रांनीं भूषित ती गाय करावी. आणि त्या गायीची स्थापना नवग्रहांच्या वरच्या भागीं करावी. अर्थात् ग्रहयज्ञ करून ती सवत्स गाय ब्राह्मणास द्यावी. ॥ ५ ॥ कर्मविपाकसारांत असें सांगितलें आहे कीं, अर्शरोगाची प्रतिमा कृश, वांकडी, ज्याचे हातांत ढाल, तलवार आहे, व ज्याची दृष्टी वर आहे, अशी सोन्याची प्रतिमा करून विद्वान् ब्राम्हणास दक्षिणासहित द्यावी तेणें करून अर्शरोगाचा परिहार होतो. ॥ ६ ॥

## अथ गुदरोगकर्मविपाकनिर्णयः

शातातपः ॥ सुरालये जले चापि सकृद्विष्टां करोति यः ॥ गुदरोगोभवेत्तस्य पापरूपः सुदारुणः ॥ १ ॥ मासं सुरार्चनेनैव गोदानद्वितयेन च ॥ प्राजापत्येन चैकेन शाम्यंति गुदजारुजः ॥ आरोग्यं भास्करादिच्छेदितिस्मृतेः ॥ अत्र सूर्यपूजा कार्या ॥ तेनारोग्यावाप्तिर्भवेत् ॥ २ ॥

## गुदरोगाच्या कर्मविपाकाचा निर्णय.

शातातपाचें वचन. देवालयामध्यें अगर पाण्यामध्यें जो विष्टा करितो त्यास भयंकर गुद-रोग उत्पन्न होईल. ॥ १ ॥ त्या मनुष्यानें महिनाभर पर्यंत देवपूजा केल्यानें किंवा दोन गो-प्रदानें दिल्यानें अथवा प्राजापत्य आचरणेंकरून गुदरोग नाहींसे होतात. येथें देवशब्दानें सूर्य ध्यावा व त्याची पूजा करावी. कारण आरोग्यप्राप्ती सूर्यापासून होते अशी स्मृती आहे. यास्तव महिनाभर सूर्याची पूजा केल्यानें रोग नाश होतो. ॥ २ ॥

## अथ मंदाग्निकर्मविपाकनिर्णयः

शातातपः ॥ नरो भवति मंदाग्निः सति द्रव्ये कदन्नदः ॥ प्राजापत्यत्रयं कृत्वा भोजयेत्सशतं द्विजान् ॥ १ ॥ वृद्धपाराशरः ॥ गोमांसखादकोमंदजठराग्निर्भवेन्नरः ॥ प्राजापत्यं चरेत्कृच्छ्रमतिकृच्छ्रं तथैवच ॥ अग्निमंत्रं जपेन्नित्यं श्रीसूक्तं च विचक्षणः ॥ २ ॥ कर्मविपाकसंग्रहे ॥ अकारणं गरं दत्वा प्रमारयति यः पुनः ॥ समंदाग्निर्भवे-देवमृतकल्पश्च जायते ॥ ३ ॥ याते रुद्रेण सूक्तेन चरुं च जुहुयात् घृतं ॥ अष्टोत्तरयु-तं सम्यक् तत्पापस्यापनुत्तये ॥ ४ ॥ तामग्निवर्णामिति च जपेत्सूक्तं सहस्रकं ॥ भोजयेत् ब्राह्मणान् सम्यक् चत्वारिंशत्सुखी भवेत् ॥ ५ ॥

## अग्निमांद्या ( अजीर्णा ) च्या कर्मविपाकाचा निर्णय.

शातातपाचें वचन. जो मनुष्य श्रीमत असोन दुसऱ्यास कदन्न घालितो त्यास अजीर्ण रोग होतो. त्यानें तो रोग नाशाकरितां तीन प्राजापत्यें आचरण करून शंभर ब्राह्मणास भोजन घालावें. ॥ १ ॥ वृद्धपाराशराचें वचन. जो मनुष्य गोमांस भक्षण करितो त्यास अग्निमांद्य रोग होतो. त्यानें प्राजापत्य, कृच्छ्र, अतिकृच्छ्र हीं आचरणें करावींत. अग्निमंत्राचा व श्री-सूक्ताचा प्रतिदिवशीं जप करावा. ॥ २ ॥ जो मनुष्य दुसऱ्यास विष घालून मारितो, त्यास अग्निमांद्याचा रोग होतो. आणि तो मृतासारखा होतो. ॥ ३ ॥ त्यानें रुद्रसूक्तानें तूप आणि चरु याच्या योगानें दहाहजार आठ हवन करावें. म्हणजे तें पाप नाहींसें होईल. ॥ ४ ॥ ताम-ग्नि या सूक्ताचा हजार जप करावा. आणि च्याळीस ब्राम्हणास भोजन घालावें. ॥ ५ ॥

## अथ मंदाग्निहरमेपदाननिर्णयः

बौधायनः ॥ अग्निमांद्यं भवेत्तस्य पद्येवाग्निविनाशकः ॥ वक्ष्यामि तत्प्रतीकारं य-थोक्तं ब्रह्मणा पुरा ॥ ६ ॥ पलार्द्धेन तदर्धेन तदर्धेनाथवा पुनः ॥ राजतं कारयेत्सो-म्यमग्निंवाहनमुत्तमं ॥ ७ ॥ सुवर्णस्य सुराः कार्याः श्वेतवस्त्रेण वेष्टयेत् ॥ श्वेतमाल्यैः

श्वेतगंधैर्धूपं दद्यान्मधूत्कटं ॥ ८ ॥ तंडुलोपरि संस्थाप्य वाहनं पूजयेत्सुधीः ॥ तंडुलानां प्रमाणं च द्रोणद्वयमुदाहृतं ॥ ९ ॥ आग्नेयां दिशि होमश्च समिदाज्यतिलैरपि ॥ एवं होमं कृत्वा ॥ विप्राय योदद्यादग्नेर्वाहनमुत्तमं ॥ बलवानग्निमान्मर्त्योजीवेद्वर्षशतं पुनः ॥ १० ॥ अत्र मंत्रहोमदिप्रकारस्तु कर्मविपाकसंग्रहे द्रष्टव्यः ॥

## अग्निमांद्यनाशक मेषदानाचा निर्णय.

बौधायनाचें वचन. जो मनुष्य दक्षिणाग्नि, गार्हपत्य, आहवनीय या तीन अग्नींचा नाश करितो त्यास अग्निमांद्य रोग होतो. हा रोगनाश होण्याकरितां उपाय पूर्वी ब्रह्मदेवानें सांगितला आहे. ॥ ६ ॥ चार, दोन अथवा एक तोळा सोनें घेऊन त्याचा एक मेंढा करावा. त्यास सोन्याचे चार खूर करावेत, नंतर त्या मेंढयास पांढरे वस्त्रानें वेष्टित करावें. पांढरें चंदन व पांढरीं फुलें त्यास वाहावींत. दोन द्रोण ह्मणजे आठ पायली परिमित तांदुळाच्या राशीवर त्या मेंढयाची स्थापना करावी. ॥ ८ ॥ ९ ॥ आग्नेयदिशेचे ठायीं समिधा, तूप, तीळ, यांच्या योगानें होम करावा. नंतर अग्नीचें वाहन असा तो मेंढा दक्षिणा सहित ब्राह्मणास दान द्यावा. या प्रमाणें केलें असतां अग्निमांद्य रोग दूर होऊन मनुष्य प्रखराग्नि व बलवान् असा होऊन शंभर वर्षें वांचेल. ॥ १० ॥ येथें मंत्रादिक आणि होमाचा प्रकार कर्मविपाकसंग्रहांत पहावा.

## अथ विषूचिकाकर्मविपाकनिर्णयः

तथा च जैमिनेयाश्वमेधे ॥ इयं च ते प्रिया देवी पातनी तत्क्षणान्नृणां ॥ विषूचिका नरं येन पातकेन प्रगच्छति ॥ देवतार्थे दीयमान वित्तं हरति मंदधीः ॥ १ ॥ ब्राह्मणान् भोजनस्थान्हि वियोजयति पातकी ॥ अन्नमेकः स्वयं भुंक्ते वंचयित्वा सुतान् द्विजान् ॥ २ ॥ तं प्रिया ते महाभाग बाधते सा विषूचिका ॥ अन्नदानं सुरसेवां हि कुर्वंतं नतु पीडयेत् ॥ ३ ॥

## विषूचिका ( महामारी ) चा कर्मविपाकाचा निर्णय.

जैमिनिअश्वमेधांतील वचन. क्षयरोगाची बायको, मनुष्यास क्षणमात्रें करून पाडणारी अशी जी विषूचिका ह्मणजे महामारी ज्यापातकानें मनुष्यास होते, तें पातक सांगतों. जो मदबुद्धी मनुष्य देवाकरितां दिलेलें द्रव्य हरण करितो. ॥ १ ॥ तसेंच जो पातकी मनुष्य भोजनास बसलेले ब्राह्मण उठवितो. तसेंच ब्राह्मण व मुलें यांस ठकवून आपण एकटाच अन्न खातो. ॥ २॥ त्यास तुझी प्रिया ( क्षयरोगाची बायको ) जी महामारी ही पीडा करिते. अन्नदान करणारा, देवाची सेवा करणारा यास ती पीडा करित नाहीं ॥ ३ ॥

## अथ क्रुमिरोगकर्मविपाकनिर्णयः

शातातपः॥उदक्या वेक्षितं भुक्त्वा जायते कृमिलोदरः ॥ गोमूत्रयावकहारः सप्तरात्रेण शुध्यति ॥ १ ॥ अथ कृमिकुक्षित्वहरं कर्मविपाकसमुच्चये ॥ गजे विनिहिते वाश्वे कृमिकुक्षिस्तु जायते ॥ तथा मृते भर्तरि या नारी नीलवस्त्रं प्रधारयेत् ॥ सा मृता नरकं याति कृमिकुक्षिस्ततः परं ॥ २ ॥ नीलवृषभं गां च दद्याचांद्रायणं व्रतं ॥ कुर्यात्त्रिंशत्द्विजाभोज्यादद्याच्छक्त्या स्वयौषध ॥ ३ ॥

## क्रुमिरोगनाशक कर्मविपाकाचा निर्णय.

शातातपाचें वचन. विटाळसी असलेल्या स्त्रियेनें पाहिलेलें अन्न जो मनुष्य भक्षण करितो त्या मनुष्याचे पोटात कृमि उत्पन्न होतात. त्याचा नाश होण्याकरिता गोमूत्रांत शिजविलेले सातू सात दिवस भक्षण करून राहावें. तेणेंकरून कृमींचा नाश होईल. ॥ १ ॥ कर्मविपाकसमुच्चयात असें सांगितलें आहे की, हत्ती किंवा घोडा मारिला असतां कृमिरोग होतो. जी स्त्री पतिमरणानंतर नीलवस्त्र धारण करिते, ती मरण पावल्यानंतर नरकात जाते. आणि पुढें ती जन्मास आल्यानंतर तिच्या पोटात कृमि होतात. ॥ २ ॥ हा रोग नाश होण्याकरितां एक काळ्या वर्णाचा बैल व गाय दान करावा. व चांद्रायण व्रत करावें. तीस ब्राह्मणास भोजन घालावें. आपल्या शक्तिप्रमाणें आजारी मनुष्यास औषध द्यावें. असें केल्यानें कृमिरोग नाहींसा होतो. ॥ ३ ॥

## अथ पांडुरोगकर्मविपाकनिर्णयः

कर्मविपाकसुधानिधौ ॥ देवद्रव्यापहरणं विप्रद्रव्यहृतिस्तथा ॥ तयोः कार्येवियातौच तथाभक्ष्यस्य भक्षणात् ॥ १ ॥ कर्मविपाकसमुच्चये॥ देवद्विजद्रव्यहारी पांडुरोगी भवेन्नरः ॥ कृच्छ्रातिकृच्छ्रे कुर्याचांद्रायणमतंद्रितः ॥ २ ॥ कुर्यात्कूष्मांडहोमं च स्वर्णचंद्रेण वाससी ॥ ब्राह्मणेभ्यो यथाशक्ति पांडुरोगस्य शांतये ॥ ३ ॥ कर्मविपाकसंग्रहे ॥ अग्निष्टोमादिकर्माणि प्रक्राम्य नसमापयेत् ॥ पांडुरोगी स भवति शिरोवेदनयांस्तथा ॥ ४ ॥ कृच्छ्रातिकृच्छ्रे कुर्याचांद्रायणमतंद्रितः ॥ शतं च भोजयेत् विप्रान्मिष्टान्नं च पयोन्वितम् ॥ ५ ॥ हेमाद्रौ महार्णवे शौनकः ॥ अंत्यजागमने मर्त्यः पांडुरोगी प्रकीर्तितः ॥ वक्ष्यामि तत्प्रतीकारं दानहोमादिकर्मणा ॥ ६ ॥ पलत्रयेण कुर्वीत रजतेन वसुंधरां ॥ तदर्धेनाथवा कुर्याद्वित्तशाठ्यं न कारयेत् ॥ ७ ॥ सपर्वततरुनां कृत्स्नां समुद्रपरिवेष्टिताम् ॥ नररत्नानि निक्षिप्य श्वेतवस्त्रेण वेष्टयेत ॥ ८ ॥ कांस्यपात्रेविनिक्षि

प्पलाष्टकविनिर्मिते ॥ देवीमावाहयेत्तत्र सर्वाधारां हरिप्रियां ॥ ९ ॥ एहि देवि धात्रि त्वं रूपेऽस्मिन् सम्यगाविश ॥ सहिता पर्वतैर्द्वीपैः समुद्रैः सुमनोहरैः ॥ १० ॥ एवमावाहितां देवीं गंधमाल्यैः समर्चयेत् ॥ उपचारैः षोडशभिराचार्यः सर्वशास्त्रवित् ॥ ११ ॥ होमं चापि प्रकुर्वीत समिदाज्यतिलैरपि ॥ भूमिर्भूम्नेतिमंत्रेण समिद्धोमः प्रकीर्तितः ॥ १२ ॥ आचार्याय तु तां पृथ्वीं दद्याद्रोगी समाहितः ॥ मंत्रेणानेन विधिवत्प्राङ्मुखाय उदङ्मुखः ॥ १३ ॥ धात्री धरित्री भूतानां वराहेणोद्धृता पुरा ॥ रत्नगर्भा समुद्रैकवसना सर्वशोभना ॥ १४ ॥ दानेनानेनसुप्रीता पांडुरोगं व्यपोहतु ॥ अत्रहोमादिप्रकारस्तु कर्मविपाकसंग्रहे द्रष्टव्यः ॥ १५ ॥ शातातपः उरगे निहिते चैव पांडुरोगः प्रजायते ॥ कस्तूरीकापलं दद्यात् ब्राह्मणाय कुटुंबिने ॥ १६ ॥

## आतां पांडुरोगकर्मविपाकाचा निर्णय.

कर्मविपाकसुधानिधीतील वचन. देव, ब्राह्मणाचें द्रव्याचें हरण करणें. देव ब्राम्हणाच्या कामाचा नाश करणे. असें करणाऱ्या मनुष्यास पांडुरोग होईल. ॥ १ ॥ त्या मनुष्यानें आळस रहित असें होऊन कृच्छ्र, अतिकृच्छ्र, चांद्रायण हीं व्रतें करावींत. अथवा कूष्मांड होम करावा. किंवा सुवर्णाचा चंद्र, वस्त्रें ब्राम्हणास द्यावीं. यथाशक्ति दान करावें. म्हणजे पांडुरोगाचा नाश होतो. ॥ २ ॥ ३ ॥ कर्मविपाकसंग्रहातील वचन. जो अग्निष्टोमादियज्ञकर्मास आरंभ करून समाप्ती करित नाहीं. त्या मनुष्यास मस्तकशूळ युक्त पांडुरोग होतो. ॥ ४ ॥ त्यानें कृच्छ्र, अतिकृच्छ्र, चांद्रायण हीं प्रायश्चित्तें करावींत. आणि शंभर ब्राम्हणास मिष्टान्न सहित इच्छा भोजन घालावें. ॥ ५ ॥ शौनकाचें वचन. जो मनुष्य अंत्यजस्त्रीयेसीं गमन करितो त्यास पांडुरोग होतो. त्यास निराकरण करणारा असा उपाय सांगतो. ॥ ६ ॥ बारा तोळे अथवा सहा तोळे रुप्याची पृथ्वीची प्रतिमा करावी. या सत्रानें द्रव्यविषयीं कृपणपणा करू नये. ॥ ७ ॥ पर्वत, अरण्य यानीं सहित व समुद्रानें परिवेष्टित अशी पृथिवीची प्रतिमा तिचे ठायीं नूतन रत्नें स्थापन करावींत. त्या प्रतिमेस वस्त्रानें वेष्टित करावें. ॥ ८ ॥ आठ पलानें निर्माण केलेलें म्हणजे ३२ तोळ्याचें कास्याचें एक पात्र करावें. त्यामध्यें ती पृथिवीची प्रतिमा ठेवून तिचें आवाहन करावें. आणि हे देवि पृथ्वि पर्वत समुद्र याच्याशी सहित या प्रतिमेचे ठायीं तूं प्रविष्ट हो. या प्रमाणें आवाहन करून गंधपुष्पादिक षोडशोपचारानें पूजा करावी. नंतर वेद शास्त्र जाणणारा अशा आचार्याकडून समिधा, आज्य, तीळ इत्यादिक द्रव्यानीं भूमिर्भूम्ना या मंत्रानें समिधाचा होम करावा. नंतर रोग्यानें उत्तरेस तोंड करून बसून पूर्वेकडे तोंड करून बसणारा जो आचार्य त्यास पृथ्वीचें दान करावें. नंतर प्रार्थना करावी. या पृथ्वीदानाच्या योगानें माझा पांडुरोग दूर होवो. येथें होमादिकाचा प्रकार तर कर्मविपाकसंग्रहांत पाहावा. ॥ ९ ॥ १० ॥

॥ ११ ॥ १२ ॥ १३ ॥ १४ ॥ १५ ॥ शातातपाचें वचन. सर्प मारला असतां पांडुरोग होतो. तो दूर होण्याकरितां कुटुंबवत्सल विद्वान ब्राह्मणा कारणें चार तोळें कस्तुरी द्यावी. ॥१६॥

## अथ कामलारोगकर्मविपाकनिर्णयः

महार्णवे वृद्धगौतमः ॥ कामली भक्तचोरः स्यात्तस्य वक्ष्यामि निष्कृतिं ॥ कुर्याच्च पक्षिराजानं विष्णोर्वाहनमुत्तमम् ॥ १ ॥ सुवर्णेन यथाशक्त्या पक्षयोर्मौक्तिकद्वयं ॥ नासिकायां तथा वज्रमुत्तरीयं च राजतं ॥ २ ॥ एवं कृत्वा गरुत्मंत घृतद्रोणोपरि न्यसेत् ॥ श्वेतवस्त्रेण संवेष्टय श्वेतमाल्यैः समर्चयेत् ॥ ३ ॥ सर्वशास्त्रार्थतत्वज्ञो वैष्णवो धर्मपाठकः ॥ ब्राह्मणस्त्वर्चितोभक्त्या यजमानेन शक्तित ॥४ ॥ उपचारैः षोडशभिर्द्विजमभ्यर्चयेत्तथा ॥ आग्नेयां दिशि होमश्च कर्तव्यः स्थंडिले शुभे ॥ ५ ॥ समिदाज्यतिलैस्तत्र पालाशसमिधः स्मृताः ॥ मंत्रोगरुडगायत्र्याः समिदाज्य हुती भवेत् ॥ तिलहोमो व्याहृतिभिः स्ततस्विष्टकृतं यजेत् ॥ ६ ॥ एवं गरुडदानं च कृत्वा मर्त्यः सुखी भवेत् ॥ आचार्यं भोजयित्वा तु प्रणिपत्य विसर्जयेत् ॥ ७ ॥ अत्र विशेषप्रकारस्तु कर्मविपाकसंग्रहे द्रष्टव्यः ॥ अथ प्रतिमादानं कर्मविपाकसारे पीतांगः कामलारोगः कपाली मुसलान्वितः ॥ पूजाविधानं त्वतकदेवताकमुदाहृतम् ॥ ८ ॥ एवं प्रतिमादानं कृत्वा मर्त्यः सुखी भवेत् ॥

## कामलारोगकर्मविपाकाचा निर्णय ॥

महार्णवांतील वृद्धगौतमाचें वचन. शिजलेल्या भाताची चोरी करणारा मनुष्य यास कामला रोग होतो. तो दूर होण्यास उपाय. सुवर्णाचा गरुड करावा त्याच्या दोन्ही पक्षास दोन मोतीं लावावे. व नाकावर हिरा लावावा. रुप्याचें वस्त्र करून त्यास वाहावें. नंतर त्या गरुडाच्या प्रतिमेस एक द्रोण म्हणजे १०२४ तोळे तुपावर स्थापना करावी. पांढऱ्या वस्त्रानें ती वेष्टित करावी. नंतर पांढरें गंध पांढरीं फुलें यांनीं त्याची पूजा करावी. ॥ १ ॥ २ ॥ ३ ॥ नंतर सर्वशास्त्रांचें तत्व जाणणारा असा वैष्णवब्राह्मण याची भक्तीनें पूजा करून आग्नेयदिशेचे ठायीं स्थंडीलावर होम करावा. ॥ ४ ॥ ५ ॥ पळसाच्या समिधा, तूप यानें गरुडगायत्रीमंत्रानें हवन करावें. व्याहृतीनें तीळांचा होम करावा. नंतर स्विष्टकृत् होम करून ती गरुडाची प्रतिमा ब्राह्मणास द्यावी. आचार्यास भोजन घालून नमस्कार करून विसर्जन करावें. ॥ ६ ॥ ॥ ७ ॥ यानिषयीं विशेषप्रकारकर्मविपाकसंग्रहांत पाहावा. कर्मविपाकसारांत प्रतिमादान सांगितलें आहे. तें असें, पिवळें ज्याचें सर्वअंग आहे व हातांत मुसळ असून प्रशस्त ज्याचें कपाळ आहे. अशी कामलारोगाची प्रतिमा करावी. तिची पूजा करून ब्राह्मणास द्यावी. ॥ ८॥ याप्रमाणें प्रतिमादान केल्यानें मनुष्य कामलारोगापासून मुक्त होऊन सुखी होईल.

## अथ रक्तपित्तरोगकर्मविपाकनिर्णयः ॥

कर्मविपाकसंग्रहे ॥ वैद्यशास्त्रमदाद्यस्तु कृत्वौषधमयान्यथा ॥ प्रयोजयन्नरः सोयं रक्तपित्तयुतोभवेत् ॥ १ ॥ मद्यपोरक्तपित्तीस्यात्सदद्यात्सर्पिषोघटं ॥ मधुनोर्धघटंचैव सहिरण्यं विशुद्धये ॥ २ ॥

## रक्तपित्तरोगाच्या कर्मविपाकाचा निर्णय.

कर्मविपाकसंग्रहांतील वचन. जो मनुष्य वैद्यशास्त्राच्या मदानें शास्त्राच्या विरुद्ध रीतीनें औषध तयार करून दुसऱ्यास देईल त्यास रक्तपित्तरोग होईल. ॥ १ ॥ दुसरीकडे असें सांगितलें आहे की, जो मनुष्य मद्यप्राशन करितो तो रक्तपित्त रोगानें युक्त होतो. त्यानें तुपानें भरलेला एक कुंभ व अर्धा कुंभ मध हे सुवर्णदक्षिणेनें सहित ब्राह्मणास द्यावे. म्हणजे रक्तपित्त रोगाचा नाश होईल. ॥ २ ॥

## अथ क्षयरोगकर्मविपाकनिर्णयः

कर्मविपाकसुधानिधौ ॥ ब्रह्महत्या गुरुद्वेषो गुरुतल्पाभिभाषणं ॥ आत्मार्थं जीवहननं परदोषप्रकाशनं ॥ १ ॥ परपीडाकरत्वंच निषिद्धपिशिताशिता ॥ ग्रहणे संगतिर्नार्या परहृत्क्लेशकारिता ॥२॥ परभोगासहिष्णुत्वं परार्थापहृतिः सदा ॥ एतैर्व्यस्तैः समस्तैर्वा रोगराजस्य संभवः ॥ ३ ॥ ब्रह्मांडपुराणे ॥ धर्मशास्त्राण्यविज्ञाय प्रायश्चित्तं ददाति यः ॥ राजयक्ष्मा भवेत्तस्य रोगपीडातिदारुणा ॥ ४ ॥

## क्षयरोगाच्या कर्मविपाकाचा निर्णय.

कर्मविपाकसुधानिधींतील वचन. ब्रह्महत्या करणें, गुरूचा द्वेष करणें, गुरुस्त्रीयेशीं कामेच्छेनें भाषण करणें, आपले जीवासाठीं इतर प्राण्यांचा नाश करणें, दुसऱ्याचे दोष प्रसिद्ध करणें. ॥ १ ॥ दुसऱ्यास पीडा करणें, यज्ञादिकावाचून मांसभक्षण करणें, ग्रहणामध्यें स्त्रीसी संभोग करणें. दुसऱ्याच्या हृदयास क्लेश उत्पन्न होईल असें काम करणें. ॥२ ॥ दुसऱ्याचें ऐश्वर्य सहन न होणें, दुसऱ्याचें द्रव्य हरण करणें, या सर्व कारणांनीं अथवा वेगळ्या वेगळ्या कारणेंकरून क्षयरोग उत्पन्न होतो. ॥ ३ ॥ ब्रह्मांडपुराणांतील वचन. जो मनुष्य धर्मशास्त्राचें ज्ञान नसोन प्रायश्चित्त सांगेल, त्यास क्षयरोग उत्पन्न होईल आणि त्या रोगानें तो अत्यंत पीडित होईल ॥ ४ ॥

## अथ कदलीदाननिर्णयः

तत्र हेमाद्रौ बौधायनः ॥ कारयेत्कदलीं दिव्यां पत्रैः सर्वत्र संयुतां॥फलपूगेन संयुक्तां सुवर्णस्य पलेन तु ॥ ५ ॥ यथाविभवतः कुर्याद्वस्त्रेणावेष्ट्य सूत्रकैः ॥ ब्राह्मणा-

न् भोजयेच्चापि भक्ष्यैर्नानाविधैः शुभैः ॥ ६ ॥ होमं च कारयेत्तत्र पूर्ववत् ब्राह्मणेन च ॥ तस्मै तां कदलीं दद्याद्वस्त्रालंकारभूषितां ॥ ७ ॥ पूजिताय दरिद्राय व्रतस्था-यात्मवेदिने ॥ धर्मज्ञायातिदांताय मंत्रेणानेन तां क्षयी ॥ ८ ॥ हिरण्यगर्भपुरुष परा-त्पर जगन्मय ॥ रंभादानेन देवेश क्षयं क्षपय मे प्रभो ॥ ९ ॥ पुण्याहवाचनं कार्यं ब्राह्मणैर्वेदपारगैः ॥ शिष्टैरिष्टैर्बंधुभिश्च सहभोजनमाचरेत् ॥ १० ॥

## कदलीदानाचा निर्णय.

हेमाद्रितील बौधायनाचें वचन. क्षयरोग्यानें द्रव्यानुसार सुवर्णाची फळपत्रांनीं युक्त अशी कदली करून तिला वस्त्र गुंडाळून, सूत्रानें वेष्टित करावी. व नानाप्रकारचीं पक्वान्नें करून ब्राह्मणास भोजन घालावें. होमकरावा, नंतर अलंकार युक्त तें केळीचें झाड दरिद्री, व्रतस्थ धर्मशास्त्रज्ञ, अशा ब्राह्मणास हिरण्यगर्भपुरुष परात्पर जगन्मय ॥ रंभादानेन देवेश क्षयं क्षपयमे प्रभो ॥ या मं-त्रानें पूजा करून दान करावें. नंतर वेदपारंगत अशा ब्राह्मणाकडून पुण्याहवाचन करून ते ब्राह्मण व आपले इष्ट मित्र यांचे सहवर्तमान भोजन करावें. ॥ ५ ॥ ६ ॥ ७ ॥ ८॥९॥१०॥

## अथ सौवर्णपद्मदाननिर्णयः

हेमाद्रौ बौधायनः ॥ सौवर्णं कारयेत्पद्मं पलेनार्द्धपलेन च ॥ द्रोणे तिलाढके वापि ताम्रपात्रं जलावृतम् ॥ तस्य मध्ये तु तत्पद्मं निदध्यात्कुंकुमान्वितं ॥ १२ ॥ विप्रं सं पूज्य तत्पद्मं दद्यान्मंत्रेण संयुतं ॥ खगः पूषापतंगोसौ द्वादशात्मा दिवाकरः ॥ १३ ॥ पद्मेनानेन दानेन प्रीतस्तरणिरस्तु मे ॥ राजतपद्मदानमपि तत्रैवोक्तं ॥ १४ ॥ प्रति-मादानं कर्मविपाकसारे ॥ पूर्वोक्तेन विधानेन मद्यात्प्रतिरूपकं ॥ राजयक्ष्मा कृशत-नुः शंखोपासिततर्जनिः ॥ दधत्रिनेत्रोदंष्ट्राभ्यां दृष्टोहंतुमुद्यतः ॥ १५ ॥ कालिकापु-राणे चंद्रक्षयकथाश्रवणं क्षयरोगनाशकमुक्तं ॥ तथाच ॥ इदं पुण्यतमाख्यानं यःशृणो-ति सकृन्नरः ॥ राजयक्ष्मभयं तस्य न कदाचिद्भविष्यति ॥ १६ ॥ अन्यत्रच ॥ ब्रह्म-चर्येण दानेन तपसा देवतार्चनैः ॥ सत्येनाचारयोगेन रविमंडलसेवया ॥ १७ ॥ वैद्य-विप्रार्चनाच्चैव रोगराजो निवर्तते ॥ इति क्षयरोगनिर्णयः ॥

## सुवर्णपद्मदानाचा निर्णय.

हेमाद्रीतील बौधायनाचें वचन. चार अथवा दोन तोळे सोन्याचें कमळ करावें. ॥ ११ ॥ चार पायल्या अथवा दोन पायल्या तिळांचा ढीग करून त्यावर पाण्यानें भरलेलें असें ताम्रपात्र स्थापन करावें. त्या पात्रांत केशराचें गंध ज्यास लावलें आहे असें तें सुवर्ण कमळ स्थापन क-रावें. ॥ १२ ॥ नंतर त्याची पूजा करून ब्राह्मणाचीही पूजा करावी. आणि खगः पूषा पतं-

गोसौ द्वादशात्मा दिवाकरः ॥ पद्मेनानेन दत्तेन प्रीतस्तरणिरस्तु मे ॥ १४ ॥ हा मंत्र ह्मणून ब्राह्मणास तें कमळ दान करावें ह्मणजे क्षयरोगाचा नाश होतो. कर्मविपाकसारामध्यें क्षयरोगाची प्रतिमा दान करण्यास सांगितली आहे. पूर्वी सांगितलेल्या विधानानें क्षयरोगाची कृश, तर्जनीनें शंख धरणारी, त्रिनेत्र, दाढांनीं चावणारी व मारण्याकरिता येणारी अशी मूर्ति करून दान करावी. कालिकापुराणामध्यें चंद्राची क्षयरोगाची कथा श्रवण करण्यास सांगितलें आहे. तें असें–हें पुण्यकारक चंद्राच्या क्षयरोगाचें आख्यान जो मनुष्य एक वेळ श्रवण करील, त्यास क्षयरोगापासून कधींही पीडा होणार नाहीं. ॥ १६ ॥ ब्रह्मचर्य, दान, तपश्चर्या, देवतेचें पूजन, सत्यपणा आणि सदाचार यांनीं युक्त असणें, सूर्याची पूजा करणें, वैद्य व ब्राह्मण यांची पूजा करणें या कारणांनीं क्षयरोगाचा नाश होतो. याप्रमाणें क्षयरोगाचा निर्णय जाणावा.

## अथ श्वासकासरोगकर्मविपाकनिर्णयः

उमामहेश्वरसंवादे ॥ कृतघ्नो जायते मर्त्यः कफवात् श्वासकासवान् ॥ कफज्वरी च नित्यं हि पित्तरोगसमन्वितः ॥ १ ॥ कर्मविपाकसमुच्चये ॥ चान्द्रायणत्रयं कुर्यात्पंचाशद्विप्रभोजनं ॥ अभिदूताख्यसूक्तेन वरुणा तर्पिताऽसुरं ॥ २ ॥ अष्टाधिकं तु जुहुयाद्रुकरोगस्य शान्तये ॥ सूक्तेन प्रत्यृचं वा होम इति भार्गवः ॥ ३ ॥ अच्युतमित्युभयत्र संबध्यते ॥ यमः ॥ नित्यानुष्ठानविन्मुखः कफरोगी भवेन्नरः ॥ सहस्रनामपाठश्च होमश्चाष्टोत्तरायुतं ॥ ४ ॥ नामत्रयेण कुर्वीत चर्वाज्यं च हविर्भवेत् ॥ अथापरं ॥ कर्मविपाकसंग्रहे ॥ कुरुक्षेत्रादिदेशेषु कालेषु ग्रहणादिषु ॥ महादानानि षड्वीपान्निषिद्धान्यथ च स्वयं ॥ ५ ॥ अपात्रभूतो दातृभ्यो निषिद्धेभ्यश्च मानवः ॥ स पापात्मा श्वासकासैः कुक्षिस्थकृमिभिस्तथा ॥ ६ ॥ कंडूत्या चैव पीड्येत तद्रोगस्य प्रशांतये ॥ महिषीं यमदैवत्यां दद्याद्वित्तानुसारतः ॥ ७ ॥ काम्यं यद्दीयते दानं तत्समग्रं सुखावहं ॥ असमग्रं तु दोषाय भवतीह परत्र च ॥ ८ ॥ जपेच्च पौरुषं सूक्तं नाम्नां चैव सहस्रकं ॥ उद्वयमेतिवर्गोऽजपहोमश्चाष्टोत्तरायुत ॥ ९ ॥ हिरण्यरक्तवासांसि पंचाशद्विप्रभोजनं ॥ शातातपः ॥ पिशुनो नरकस्यांते जायते श्वासकासवान् ॥ घृतं तेन प्रदातव्यं सहस्रपलसंख्यया ॥ उदुत्यजपः कार्यो होमश्चवाज्ययोरपि ॥ १० ॥ एवं कृत्वा श्वासकासी नीरोगस्तु क्षणाद्भवेत् ॥

## श्वासकास रोगाचा कर्मविपाकनिर्णय.

उमामहेश्वरसंवादांतील वचन. जो मनुष्य केलेले उपकार जाणत नाहीं, त्या मनुष्यास श्वास आणि खोकला असा कफरोगाचा आजार, तसाच उष्णज्वर आणि पित्तरोग हे होतात. ॥ १ ॥ कर्मविपाकसमुच्चयांतील वचन. हा रोग परिहार होण्याकरितां तीन चांद्रायण प्रायश्चित्तें करून

पन्नास ब्राह्मणास भोजन घालावें. 'अग्निदूत' या सूक्तानें तूप आणि चरु याच्या योगानें एक हजार आठ होम करावा. ॥ ३ ॥ यमाचें वचन. जो मनुष्य स्नानसंध्यादि नित्यकर्म करीत नाहीं, त्यास कफरोग होतो. त्यानें विष्णुसहस्रनामाचे दहा हजार पाठ करावे. अथवा शक्ति असेल तर दहा हजार हवन करावें. हवनाचेठायीं द्रव्य चरु आणि तूप हे घ्यावे ॥ ४ ॥ कर्मविपाकसंग्रहांतील वचन. कुरुक्षेत्रादिक महाक्षेत्राचेठायीं ग्रहणादि पर्वकालामध्यें निषिद्ध अशीं महादानें आपण घेण्यास पात्र नसोन जो घेतो, त्यास श्वासकास, व पोटांत कृमि होतात. तसेंच कुष्ठरोग उत्पन्न होतो. या रोगाची शांति होण्याकरितां ब्राह्मणास आपल्या शक्तीप्रमाणें एक हंस दान करावी. ॥ ५ ॥ ६ ॥ ७ ॥ जेथें कामनेनें दान दिलें जातें तेथें शास्त्रांत लिहिल्याप्रमाणें समग्र दिल्यानें तें सुखावह होतें. तसें न केलें असतां या लोकीं आणि परलोकीं दुःख उत्पन्न करणारें असे होतें ॥ ८ ॥ येथें पुरुषसूक्तमंत्रानें जप करावा. विष्णुसहस्रनामाचा पाठ करावा. 'उद्वत्य' या ऋचा ह्मणून तूप आणि चरु याच्या योगानें एकशें आठ हवन करावें. सोनें आणि तांबडीं वस्त्रें ब्राह्मणास द्यावीं. पन्नास ब्राह्मणास भोजन घालावें. ॥ ९ ॥ शातातपाचें वचन. चाड्या सांगणाऱ्या मनुष्यास नरकभोगानंतर खोकला आणि श्वास याचा आजार होतो, त्यानें चार हजार तोळे तूप ब्राह्मणास दान करावें. 'उद्वत्य' या ऋचेनें चरु आणि आज्य याच्या योगानें होम करावा. याप्रमाणें केलें असतां श्वासकास रोगानें पीडित झालेला मनुष्य क्षणमात्रें करून निरोगी असा होईल. ॥ १० ॥

# अथ हिक्कारोगकर्मविपाकनिर्णयः

कर्मविपाकसंग्रहे ॥ योऽकृत्वा ब्राह्मणो भुंक्ते स्नानसंध्याजपादिकं ॥ स हिक्कारोगसंयुक्तस्तत्पापस्यापनुत्तये ॥१॥ स वै चान्द्रायणं कुर्यात्रीन् कृच्छ्रांश्च समाचरेत् ॥ ताममिवर्णामितिजातवेदसइति सप्तर्चसूक्तम् ॥ २ ॥ जपसंख्यासहस्राद्ययुतांता ॥ जैमिनीयेऽश्वमेधे ॥ हिक्काप्रिया तु यस्त्वेन सहते न परोदयम् ॥ लक्षहोमप्रकर्त्तारं मानवेदनघ जनम् ॥ ३ ॥

# उचकीच्या कर्मविपाकाचा निर्णय.

कर्मविपाकसंग्रहांतील वचन. जो ब्राह्मण स्नान संध्या जप इत्यादिक न करतां भोजन करितो, त्यास उचकीरोग होतो. ॥ १ ॥ त्यानें तें पाप जाण्याकरितां चांद्रायण, व तीन कृच्छ्र प्रायश्चित्त आचरण करावीत. तसेंच 'तामग्निवर्णा' या सात ऋचांचे सूक्ताचा जप करावा. ॥ २ ॥ जपाची संख्या एक हजारापासून दहा हजारापर्यंत सांगितली आहे. जैमिनीचें वचन. जो मनुष्य परोत्कर्ष सहन करीत नाहीं, त्यास उचकी उत्पन्न होते. तो नाश होण्याकरितां लक्ष होम करावा. ॥ ३ ॥

## अथ स्वरभेदकर्मविपाकनिर्णयः

शातातपः ॥ उष्ट्रे विनिहते चैव जायते विकलस्वरः ॥ स तत्पापविशुद्ध्यर्थं कृच्छ्रमेकं चरेन्नरः ॥ १ ॥ कर्पूरस्य पलं दद्यात्क्षारद्रव्याणि शक्तितः ॥ कर्पूरदानमन्त्रस्तु ॥ कर्पूरं रुचिरं विप्र गृहाणेमं सुपूजितम् ॥ पुष्पगंधस्थिता सा मे कमला प्रीयतामिति ॥ २ ॥

## स्वरभेदकर्मविपाकाचा निर्णय.

शातातपाचें वचन. उंट मारला असता स्वरामध्यें बदल होतो. तें पाप जाण्याकरिता मनुष्यानें एक कृच्छ्र प्रायश्चित्त आचरण करावें. ॥ १ ॥ तसच चार तोळे कापूर आणि आपल्या शक्त्यनुसार क्षार द्रव्ये दान करावी. त्यास मंत्र. कर्पूर रुचिरं विप्र गृहाणेम सुपूजितम् ॥ पुष्प गंधस्थिता सा मे कमला प्रीयतामिति ॥ या मंत्राने दान करावें. ॥ २ ॥

## अथारोचककर्मविपाकनिर्णयः

शातातपः ॥ श्रद्धाहीनो धनी ह्यदाता दानरतिर्वा तामसगुणान्वितो यः ॥ सो रुचिमान् शूली वा जायते तत्रैप निस्तरः ॥ १॥ कृच्छ्रमतिकृच्छ्रं चांद्रायण व्यस्त समस्तं वा व्याधितारतम्येन कुर्यात् ॥ अत्राशक्तो धनी च नित्यं पंचाशद्ब्राह्मणभोजनं प्रतिदिनं मिष्टान्नेन कारयेत् ॥ २ ॥ कर्मविपाकसंग्रहे ॥ साक्षात् हता गवादीनां यः पुनर्जननांतरे ॥ शिरोरोगी श्रोत्ररोगी शूली चारुचिमान् भवेत् ॥ ३ ॥ एतन्निवृत्तये वर्षं त्रिवर्षं वा चरेद्व्रतम् ॥ तदंते च गोहिरण्यादिकं दिशेत् ॥ ४ ॥ अश्वमेधे ॥ भुंजतो ब्राह्मणान् द्वेष्टि तमरोचकमाव्रजेत् ॥ भोजयेद्विधिनेन त च जह्यादरोचकः ५

## अरोचिकर्मविपाकाचा निर्णय.

शातातपाचें वचन. जो मनुष्य श्रीमंत असोन श्रद्धारहित, दान न करणारा, कदाचित् दान केलें तरी तमोगुणयुक्त दान करितो. अशा मनुष्यास अरुचि, व शूळ हे रोग उत्पन्न होतात. ॥ १ ॥ ते दूर होण्याकरिता कृच्छ्र, अतिकृच्छ्र, चांद्रायण, हीं प्रायश्चित्तें करावीं. व्याधिगारतम्यानें हीं सर्व अथवा यांतील एखादें प्रायश्चित्त आचरण करावें. कृच्छ्रादि करण्यास शक्ति नसोन मनुष्य श्रीमंत असेल तर प्रतिदिवशीं पन्नास ब्राह्मण भोजन मिष्टान्नें करावें. ॥ २ ॥ कर्मविपाकसंग्रहांतील वचन. जो प्रत्यक्ष गाई इत्यादिकांचा नाश करितो, त्यास अन्य जन्माचे ठायीं मस्तकरोग, कर्णशूल, अरुचि हे रोग होतात. ॥ ३ ॥ हे जाण्याकरिता त्यानें अब्द प्रायश्चित्त अथवा त्र्यब्दप्रायश्चित्त करावें. आणि त्याच्या अंतीं गोप्रदान, सुवर्णदान इत्यादि

करावें. ॥ ४ ॥ जैमिनीचें वचन. जो मनुष्य ब्राह्मण भोजन करित असतां त्याचा द्वेष करितो, त्यास अरुचिरोग उत्पन्न होईल. तो दूर होण्याकरिता नानाप्रकारच्या पक्वान्नांनीं ब्राह्मणास भोजन घालावें. तेणेंकरून अरुचिरोगाचा परिहार होईल. ॥ ५ ॥

## अथ छर्दिरोगकर्मविपाकनिर्णयः

शातातपः ॥ विश्वासघातकी छर्दियुक्तो भवति मानवः ॥ अन्नदानं यथाशक्त्या आज्ययुक्तं च कारयेत् ॥ १ ॥ अन्यत्र ॥ जानन्नपि नरो यस्तु केशकीटादिभिर्युतम् ॥ अन्नं द्विजेभ्यो दद्याद्वै च्छर्दिमान् स भवेद्भृशम् ॥ पंचाशद्ब्राह्मणांश्चैव दद्याद्भोजनमुत्तमम् ॥ २ ॥

## छर्दि (ओकारी) रोगाच्या कर्मविपाकाचा निर्णय.

शातातपाचें वचन. जो मनुष्य दुसऱ्याचा विश्वासघात करितो त्यास ओकारीचा रोग उत्पन्न होईल. तें पाप जाण्याकरिता ब्राह्मणास आपल्या शक्तिप्रमाणें पक्वान्नाचें भोजन घालावें. ॥ १ ॥ जो मनुष्य जाणूनही केश, किडे इत्यादिकांनीं युक्त अन्न ब्राह्मणास देतो, तो ओकारीनें अत्यंत पीडित असा होईल. त्यानें पन्नास ब्राह्मणास उत्तम भोजन घालावें. ॥ २ ॥

## अथ तृष्णाकर्मविपाकनिर्णयः

पथि चाध्वपरिश्रांतं ब्राह्मणं गामथापिवा ॥ न पाययेज्जलं यस्तु स तृष्णामूर्छितो भवेत् ॥ १ ॥ पानीयं पायसं दिव्यं शर्करा घृतसंयुता ॥ इदमावश्यकं देयं तृष्णामूर्छोपशांतये ॥ २ ॥

## तृष्णा (तहान) रोगाच्या कर्मविपाकाचा निर्णय.

जो मनुष्य वाट चालून अत्यंत थकलेल्या ब्राह्मणास अथवा गाईस पाणी पिण्यास देत नाहीं, तो तहानेच्या मूर्छेनें युक्त होईल. ॥ १ ॥ त्यानें पाणी, दूध, साखर, व तुपानें युक्त शर्करा ब्राह्मणास द्यावी. त्या पासून तहानेची मूर्छा शांत होईल. ॥ २ ॥

## अथ दाहरोगकर्मविपाकनिर्णयः

कर्मविपाकसुधानिधौ ॥ अप्रक्षालितपात्रे च अप्रक्षालितपद्युगः ॥ भुंक्ते पराह्णे तं कालग्रहो गृह्णाति मानवम् ॥ अंतर्दाही पीतनेत्रः पीतविण्मूत्रको भवेत् ॥ निघंटौ ॥ पुनरमी दीपति तं कपिलोनाम ग्रहो गृह्णाति ॥ तत्क्षणाज्ज्वरशूलसर्वांगदाहपीतनयनश्च भवति ॥ ३ ॥ पलिं च निशि चतुष्पथे पिष्टलाजापिण्याकरुधिरतिलाश्मगंधचूर्णैर्मिश्रितं

दद्यात् ॥ ३ ॥ गृह्णीष्व च बलिं चेमं कपिलाख्य महाग्रह ॥ आतुरस्य सुखं सिद्धिं प्रयच्छ त्वं महाबल ॥ ४ ॥ कर्मविपाकसुधानिधौ ॥ गुरुतल्पगमद्वेषौ परक्लेशकारिता ॥ त्रीणि दाहनिदानानि तेषां निष्कृतिरीरिता ॥ ५ ॥ जलदानं विशेषेण कुर्यादाहोपशांतये ॥ हेमाद्रौ पाद्मे ॥ अनुलेपनगंधानां प्रदानेन हि मानवः ॥ न कदाचिन्मनोदाहं देहे वा दाहमाप्नुयात् ॥ ६ ॥

# दाहरोगाच्या कर्मविपाकाचा निर्णय.

कर्मविपाकसुधानिधींतील वचन. जो मनुष्य पात्र प्रक्षालन न करितां, तसेंच पाय न धुतां, सायंकाळचे वेळीं भोजन करितो, त्या मनुष्यास कालग्रह धरितो. ॥ १ ॥ कालग्रहानें पीडित झाल्याचें चिन्ह. त्यास अंतरभागीं अत्यंत तलखी होते, डोळे पिंवळे होतात; तसेंच विष्ठामूत्र ही पिंवळीं होतात. निघटांतील वचन. जो मनुष्य अग्नीमध्यें थुंकतो त्यास कपिलानामक ग्रह धरितो. तो तत्क्षणीं ज्वर, शूल, सर्वांगदाह यानें युक्त होतो. तसेंच त्याचे डोळे पिंवळे होतात. ॥२॥ त्यानें संध्याकाळच्या वेळीं चव्हाट्यावर पीठ, लाह्या, पेंड, रक्त, ( हें शूद्रादिकासंबंधाचें आहे. ) तीळ, अश्वगंध, आणि फुलें यांनीं युक्त करून ॥ गृण्हीष्वच बलिंचेमं ॥ या मंत्रानें बळी द्यावा. ॥ ३॥ ॥ ४ ॥ कर्मविपाकसुधानिधींतील वचन. जो गुरुस्त्रियेशीं गमन करितो अथवा द्वेष करितो. आणि दुसऱ्याचे हृदयास क्लेश उत्पन्न करितो. या तीन कारणांनीं दाह उत्पन्न होतो ॥ ५ ॥ दाहाची शांती होण्यास पाणपोई स्थापन करून पाणी पिण्यास द्यावें. पद्मपुराणांतील वचन. जो मनुष्य ब्राह्मणास सुगंधीचंदनाच्या उटया लावितो त्याचे शरीरास अथवा मनास दाह कधींही होणार नाहीं ॥ ६ ॥

# अथोन्मादकर्मविपाकनिर्णयः

कर्मविपाकसमुच्चये ॥ मोहयित्वा परान्यस्तु भुंक्ते वस्तु विगर्हितं ॥ सोन्मादवातयुक्तः स्यात्कृच्छ्रं चांद्रायणं तथा ॥ १ ॥ कुर्यात्सारस्वतं मंत्रं जपेद्ब्राह्मणतर्पणं ॥ सारस्वतों मंत्रो यद्वागिति वचः ॥ २ ॥

# उन्मादरोगाच्या कर्मविपाकाचा निर्णय.

कर्मविपाकसमुच्चयांतील वचन. जो मनुष्य दुसऱ्यास मोहित करून निंदित वस्तु भक्षण करितो तो उन्मादवात रोगानें युक्त होईल. त्यानें कृच्छ्र चांद्रायण प्रायश्चित्त आचरण करावें. ॥ १ ॥ तसेंच ' यद्वाक्० ' हा सारस्वती देवतेचा मंत्र त्याचा जप करावा, आणि ब्राह्मण संतर्पण करावें. ॥ २ ॥

## अथापस्मारकर्मविपाकनिर्णयः

शातातपः ॥ धूर्तोपस्माररोगी स्यात्स तदोपस्य शांतये ॥ ब्रह्मकूर्चत्रयं कुर्याद्देनुं दद्यात्सदक्षिणाम् ॥ १ ॥ कर्मविपाकसंग्रहे ॥ गुरौ स्वामिनि वा यस्तु प्रतिकूलं समाचरेत् ॥ सोपस्मारी भवेत्तत्र कुर्याच्चांद्रायणं नरः ॥ २ ॥ सदसस्पतिमंत्रेण चरुमाज्यं जुहुयात्ततः ॥ कयान इति सूक्तं तु जपेद्ब्राह्मणतर्पणम् ॥३॥ कुर्यात् हिरण्यदानं च शक्त्या रोगस्य शांतये ॥ अष्टोत्तरशतं सहस्रमयुतं वा जपे संख्येति महार्णवः॥४॥ कर्मविपाकसमुच्चये ॥ उत्सर्गं कुरुते यस्तु वह्नौ मूत्रपुरीषयोः ॥ ग्रहः संक्रमते तं वै स्कंदोपस्मारसंज्ञकः ॥५॥ ततो दशेत्स्वजिह्वां तु फेनिलास्योपि जायते ॥ अपस्मारी भवेत्तत्र पूर्ववद्बलिमाहरेत् ॥ ६ ॥ हेमाद्रौ महार्णवे बौधायनः ॥ ब्राह्मणश्वासरोधेन ह्यपस्मारी भवेन्नरः ॥ वक्ष्ये तस्य प्रतीकारं दानहोमक्रियादिभिः ॥ ७॥ पलेन वा तदर्धेन तदर्धार्धेन वा पुनः ॥ विनायकप्रतिकृतिं कुर्यात्स्वर्णेन शोभनां ॥ ८ ॥ राजतं च तथा नागमुपवीतं प्रकल्पयेत् ॥ पुष्करं पद्मरागेण हस्तं रत्नैः प्रकल्पयेत् ॥ ९॥ विनायकस्यार्धमानेन आखुं देवस्य कल्पयेत् ॥ तस्याप्यंगे प्रदेयानि रत्नानि विविधानि च ॥ १० ॥ माणिक्येन प्रकुर्वीत चक्षुषी तस्य शोभने ॥ पूर्वेद्युर्मंडपं कुर्यात्स्तंभैः षोडशभिर्दृढं॥ ११ ॥ पद्मा द्वादशभिः कुर्यादष्टभिर्वा प्रयत्नतः ॥ मंडपे च चतुर्भागां वेदिकामपि कल्पयेत् ॥ विनायकस्यदेवस्य ह्यधिवासनमिष्यते ॥ १२ ॥ तत्र जागरणबलिदानहोमश्रीगणपतिदानप्रकारस्तु कर्मविपाकसंग्रहे द्रष्टव्यः । एवं कृते अवश्य रोगपरिहारो भवेत् ॥ इति अपस्मारकर्मविपाकनिर्णयः ॥

## अपस्मार ( फेफरें ) रोगाच्या कर्मविपाकाचा निर्णय.

शातातपाचें वचन. लुच्चेगिरी करणाऱ्या मनुष्यास अपस्मार रोग होतो. तो दोष जाण्याकरितां तीन ब्रह्मकूर्चे ( हें प्रायश्चित्तप्रकरणात पहावें. ) प्रायश्चित्त आचरण करावें. आणि ब्राह्मणास दक्षिणासहित गोप्रदान द्यावें. ॥ १ ॥ कर्मविपाकसंग्रहातील वचन. जो मनुष्य आपला गुरु अथवा मालक याविषयीं प्रतिकूलतेनें वागतो, त्यास अपस्मार रोग होईल. त्यानें चांद्रायण प्रायश्चित्ताचरण करावें. ॥ २॥ नंतर सदसस्पतिमंत्रानें चरु, आज्य याचा होम करावा. नंतर " कयान"या सूक्ताचा जप करावा. आणि ब्राह्मणसंतर्पण करावें. ॥ ३ ॥ आपल्या शक्तीप्रमाणें सुवर्णदानही करावें. येथें हवन एकशें आठ, एक हजार किंवा दहा हजार रोगातरत्यानें करावें. जपाविषयींही हीच संख्या जाणावी. असें महार्णवग्रंथांत सांगितलें आहे. ॥ ४ ॥ कर्मविपाकसमुच्चयातील वचन. जो मनुष्य अग्नीचे ठायीं मूत्र किंवा पुरीष टाकितो, त्या मनुष्यास अपस्मारसंज्ञक स्कंदग्रह त्याचे शरीरामध्यें शिरतो. ॥ ५ ॥ नंतर तो मनुष्य आपली जिव्हा

चावूं लागेल, व त्याचे तोंडास फेंस येऊं लागेल, व अपस्माराचीं सर्व चिन्हें होतील. तें नाश होण्याकरितां पूर्वी सांगितल्याप्रमाणें बलिदान करावें. ॥ ६ ॥ बौधायनाचें वचन. ब्राह्मणाच्या श्वासास अवरोध करणाऱ्या मनुष्यास अपस्मार रोग होतो. दान, होम इत्यादिकानें त्या रोगाचा प्रतिकार सांगतो. ॥ ७ ॥ चार, दोन अथवा एक तोळा सोनें घेऊन त्याची उत्तम गणपतीची प्रतिमा करावी. ॥ ८ ॥ रुप्याचा नाग व यज्ञोपवीत करावें. पद्मरागमण्यांनीं कमळ करावें. रत्नानें हात सुशोभित करावे. ॥ ९ ॥ गणपतीच्या प्रतिमेस जें सोनें लागलें असेल, त्याच्या अर्धप्रमाण सोन्यानें उंदीर करावा. त्याच्या अंगावरही नानाप्रकारचीं रत्नें घालावीत. ॥ १० ॥ उंदराचे डोळे माणिकाचे करावेत. पूर्वदिवशींच मंडप सोळा, बारा, आठ यांतील एक संख्येच्या खांबानें युक्त करावा. मंडपाच्या मध्यभागीं चौकानी सुंदर ओटा करावा. त्यावर गणपतीची स्थापना करावी. ॥ ११ ॥ १२ ॥ तेथें रात्रीं जागरण करावें. रात्रीं बलिदान करावें. दुसरे दिवसीं होम करून श्रीगणपतीची प्रतिमा ब्राह्मणास दान द्यावी. हा सर्व प्रकार कर्मविपाकसंग्रहामध्यें पहावा. याप्रमाणें अपस्माररोगाचा निर्णय जाणावा.

# अथ वातरोगकर्मविपाकनिर्णयः

कर्मविपाकसंग्रहे ॥ देवानां ब्राह्मणानां वा धनापहरणात्तथा ॥ स्वामिद्रोहाद्वातरोगी भवेदस्यापि निष्कृतिः ॥ १ ॥ कृच्छ्रातिकृच्छ्रौ कुर्वीत चांद्रायणमथापरम् ॥ वाते वातमंत्रं हि जपेदयुतसंख्यया ॥ २ ॥ अग्निरस्मित्र्यृचं वापि जपेच्च जुहुयादपि ॥ मत्यर्चमयुतं जपो होमश्च यथाशक्ति हेमदानमिति महार्णवः ॥३॥ अथापरं ॥ गुरुमभ्यर्थितो यातो वातरोगी भवेन्नरः ॥ नाममंत्रेण कुर्वीत जपं होमं च शांतये ॥४॥ अच्युतानंत गोविंदेति नमोंतेन नामत्रयं होमसंख्या सहस्रादिलक्षांता निमित्तानुसारेण ॥ लैंगे तु प्रभुः शंभुरुमापतिरिति नामत्रयमुक्तम् ॥ ५ ॥ कर्मविपाकसुधानिधौ ॥ सप्ताहुर्वातरोगस्य निदानानि विपश्चितः ॥ मातापितृगुरुद्वेषस्तथासंन्यासिगर्हणम् ॥ ६ ॥ परहिंसामर्मभेदः स्वर्णापहरणं तथा ॥ वातरोगे मृगदानमुक्तम् ॥ तत्प्रकारस्तु कर्मविपाकसंग्रहे द्रष्टव्यः ॥

# वातरोगाच्या कर्मविपाकाचा निर्णय.

कर्मविपाकसंग्रहांतील वचन. देवाचें अथवा ब्राह्मणाचें द्रव्य हरण केल्यापासोन; तसेंच मालकाशीं द्रोह केल्या पासून वातरोग होतो. तो दूर होण्याचा उपाय–॥ १ ॥ कृच्छ्र, अतिकृच्छ्र, चांद्रायण व्रताचरण करावें. अथवा वातरोगास वातमंत्राचा दहा हजार जप करावा. ॥ २ ॥ 'अग्निरस्मि' या तीन ऋचांचा जप करावा, आणि हवन करावें. येथें प्रतिऋचेचा जप व होम दहा हजार सांगितला आहे. यथाशक्ति सुवर्णदानही करावें; असें महार्णवग्रंथांत सांगितलें

आहे. ॥ ३ ॥ जो मनुष्य आपल्या गुरुशीं शत्रुपणानें वागतो, त्यास वातरोग होतो. तो शांत होण्याकरितां अच्युतानंतगोविंद या तीन नामांचा जप आणि होम करावा. होमाची संख्या एक हजारापासोन लक्षपर्यंत जसें कारण असेल त्या कारणाच्या अनुरोधानें करावें. लिंगपुराणांत तर 'प्रभुः शंभुरुमापतिः' या तीन नामानें हवन आणि जप करण्यास सांगितलें आहे. ॥ ४ ॥ ५ ॥ कर्मविपाकसुधानिधींतील वचन. वातरोगास सात कारणें सांगितलीं आहेत. आई, बाप, गुरु, यांचा द्वेष करणें संन्याशाची निंदा करणें, दुसऱ्याची हिंसा करणें, मर्मभेद करणें, दहा माशांच्या आंतील सोन्याची चोरी करणें, यापासून वातरोग होतो. तो दूर होण्यास हरिणाचें दान करावें. त्याचा सर्वप्रकार कर्मविपाकसंग्रहांत पहावा. ॥ ६ ॥

## अथ धनुर्वातरोगकर्मविपाकनिर्णयः

कर्मविपाकसमुच्चये ॥ अनिच्छंतीमक्षतां यस्तूपभुंक्ते परस्त्रियं ॥ बलादाक्रम्य स नरः सर्वसंधिषु वेदनाम् ॥ १ ॥ तीव्रामानोत्यरुचिमान्धनुर्वातयुतो भवेत् ॥ ज्वरी तदुपशांत्यर्थं महिषीदानमाचरेत् ॥ २ ॥ कृच्छ्रातिकृच्छ्रौ कुर्वीत चांद्रायणमथापरं ॥ सूर्यनामजपं चैव शक्त्या ब्राह्मणतर्पणम् ॥ ३ ॥ नामत्रयं जपेन्मर्त्यो रोगशांत्यर्थमात्मनः ॥ सहस्रनामकं चापि स्तोत्रं सम्यग्विधानतः ॥ ४ ॥ अच्युतानंत गोविंदेत्येतन्नामत्रयं द्विजः ॥ अयुतत्रितयावृत्त्या जपेद्रोगस्य शांतये ॥५॥ पुरुषसूक्तं जपेद्विद्वान् ततो रोगात्प्रमुच्यते ॥ महिषीं सवत्सां दद्यात् ॥ महिषीं कृष्णां सवत्सां पूजयेत्ततः॥ इति ब्रह्मांडपुराणात् ॥ ६ ॥

## धनुर्वातरोगाच्या कर्मविपाकाचा निर्णय.

जो मनुष्य ( अक्षतयोनी ) जिच्याशीं संभोग झाला नाहीं, तशीच इच्छा न करणारी अशा परस्त्रियेप्रत बलात्कारानें उपभोगितो, त्या मनुष्याच्या सर्व सांध्याचे ठायीं तीव्र वेदना होतील. तसेंच अरुचि, धनुर्वात, ज्वर हे होतील. हे जाण्याकरितां एक म्हैस ब्राह्मणास द्यावी. ॥ १॥२॥ तसेंच कृच्छ्र, अतिकृच्छ्र, चांद्रायण हीं प्रायश्चित्तें करावीं. सूर्यनामाचा जप, तसेंच यथाशक्ति ब्राह्मणसंतर्पण करावें. ॥ ३ ॥ तसेंच आपला रोग शांत होण्याकरितां 'अच्युतानंत गोविंद' या तीन नामांचा जप करावा. विष्णुसहस्र नामाचे पाठ करावेत. अच्युतानंत गोविंद या नामांचा तीस हजार जप करावा. ॥ ४ ॥ ५ ॥ पुरुषसूक्ताचा जप करावा. व सवत्स म्हैस द्यावी. कारण ब्रह्मांडपुराणामध्यें काळी सवत्स अशा म्हशीची पूजा करण्यास सांगितली आहे. ॥ ६ ॥

## अथ पक्षवातरोगकर्मविपाकनिर्णयः

शातातपः ॥ सभायां पक्षपाती च जायते पक्षघातवान् ॥ निष्कृतिरपि यं ज्ञेयं स

दद्याच्च द्विजातये ॥ ॥ श्राद्धं च वैष्णवं कुर्यादात्मनोहितमिच्छता ॥ सप्तधान्यानि दद्याच्च गोदानं तत्र कारयेत् ॥ २ ॥ श्राद्धं च भोजनमात्रं नतु श्राद्धस्यविधिरिति महार्णवः ॥

## पक्षवात ( अर्धांगवायु ) रोगाच्या कर्मविपाकाचा निर्णय.

शातातपाचें वचन. जो मनुष्य सभेमध्यें दोघाचा वाद चालला असतां, आपण मध्यस्थ होऊन पक्षपात करील, त्यास पक्षघात अर्धांगवायु उत्पन्न होईल ॥ १ ॥ तो नाश होण्याकरितां ब्राह्मणास तीन निष्क सोनें द्यावें. तसेंच विष्णुश्राद्ध करावें. ब्राह्मणास सप्तधान्यें व गोप्रदानही द्यावें. तेथें श्राद्ध म्हणजे भोजन घालावें, श्राद्धाप्रमाणें सर्व प्रकार करूं नये. असें महार्णवग्रथांत सागितलें आहे. ॥ २ ॥

## अथ वातरक्तरोगकर्मविपाकनिर्णयः

हेमाद्रौ महार्णवे च वृद्धबौधायनः ॥ सवर्णागमने वातरक्तवान् जायते नरः ॥ सवर्णागमने वातपित्तवानपि जायते ॥ ॥ लक्ष्म्या नारायणं युक्तं सुवर्णेन प्रकल्पयेत् ॥ पलेन वा तदर्धेन तदर्धेनाथ वा पुनः ॥ २ ॥ लक्ष्मीनारायणरूपं सर्वदा सर्वकामिकम् ॥ पद्मासनगतं कुर्याद्देवदेवं चतुर्भुजम् ॥ ३ ॥ वामोत्संगगता लक्ष्मी रत्नपात्रकरा भवेत् ॥ गरुडं राजतं कुर्यात् देवदेवस्य वाहनम् ॥ ४ ॥ अर्चयेत्कुसुमैर्युग्मं लक्ष्मीनारायणात्मकं ॥ प्रसन्नं रमणीयं च गरुडस्योपरि संस्थितम् ॥ ५ ॥ ततो विप्रं समाहूय सुशीलं लक्षणान्वितं ॥ स्वयं भक्त्या समानीय पूजयेद्वस्त्रकुंडलैः ॥ पूर्वोक्तेन विधानेन होमं तत्र तु कारयेत् ॥ ६ ॥ दाने मंत्रः ॥ लक्ष्मीपते देवकिनंदनेश क्षीराब्धिशायिन् वचसामगोचर ॥ गोविंद दामोदर वातरक्तं विनाशयाशु क्षपितारिवर्ग ॥ ७ ॥ लक्ष्मीनारायणस्यैवं प्रतिं दद्याच्च भक्तितः ॥ आरोग्यं च सुखी नित्यं जायते नात्र संशयः ॥ ८ ॥

## रक्तपित्तीरोगाच्या कर्मविपाकाचा निर्णय.

हेमाद्रींतील वृद्धबोधायनाचें वचन. सवर्णस्त्रीशीं गमन केलें असतां रक्तपित्ती अथवा वातपित्त रोग होतो. ॥ ॥ तो दूर होण्याकरिता चार, दोन अथवा एक तोळा सोन्याची लक्ष्मीनारायणाची पद्मासनावर बसलेली चतुर्भुज, ज्याच्या मांडीवर लक्ष्मी आहे. व लक्ष्मीच्या हातांत रत्नाचें पात्र आहे अशी प्रतिमा करावी. नंतर रुप्याचा गरुड करावा. ॥ २ ॥ ३ ॥४॥ गरुडावर बसलेली लक्ष्मीनारायण मूर्ति आणि गरुड याची पूजा करून उत्तमलक्षणांनीं युक्त अशा विद्वान् ब्राह्मणास बोलावून वस्त्रें, कुण्डलें इत्यादिकेंकरून त्याचीही पूजा करावी. नंतर पूर्वी सा-

गितल्या प्रकारानें होम करावा. 'नतर लक्ष्मीपते देवकिनंदनेश' हा मंत्र म्हणून ब्राम्हणास द्यावी. तेणें करून रोग नाश होऊन मनुष्य सुखी असा होईल. ॥ ५ ॥ ६ ॥ ७ ॥ ८ ॥

## अथ शूलरोगकर्मविपाकनिर्णयः

जैमिनिः ॥ धिक्शब्दैः सुहृदो यश्च प्रहारं कुरुते जनः ॥ संपीडयंति ये लोकान् पथि भल्लैः प्रहस्य तु ॥ १ ॥ आशाभंगं विदधते यांतु शूलगणाश्च तान् ॥ काराग्रहनिबद्धान्नृन् पंजरस्थांश्च पक्षिणः ॥ २ ॥ पथि चोरैर्हन्यमानान्मोचयंति महाभयात् ॥ सदाशिवे तु ये भक्ता न तान् शूलशतत्रयम् ॥ ३ ॥ हेमाद्रौ बौधायनः ॥ शूलेन शूली भवति मनुष्याणां च हिंसकः ॥ पलेनाथ तदर्धेन तदर्धेनाथ वा पुनः ॥ ४ ॥ सौवर्णं राजतं वापि शूलं कुर्यात्प्रयत्नतः ॥ ताम्रेण वायसा वापि खादिरेणाथवा पुनः ॥५॥ रक्तवस्त्रेण संवेष्ट्य तिलानामुपरि न्यसेत् ॥ ततस्तत्पूजां कृत्वा होमं च कारयेत् ॥६॥ ततो वेदविदे ब्राह्मणाय दद्यात् ॥ तत्र मंत्रः ॥ त्वं शूल ब्रह्मणा सृष्टः त्रिपुराणां विनाशने ॥ दैत्यानां दानवानां च शंकरस्यायुधं तथा ॥ ७ ॥ कुक्षिस्थमपि पार्श्वस्थमथवा पृष्ठसंगतं ॥ शूलं विनाशय त्वं मे महादेवेन धारित ॥ ८ ॥ ततः स्नात्वा तु भुंजीत ब्राह्मणैः सह बंधुभिः ॥ शूलहिंसासमुत्पन्नां वेदनामाशु नाशयेत् ॥ ९ ॥

## शूलरोगाच्या कर्मविपाकाचा निर्णय.

जैमिनीचें वचन. जो मनुष्य आपल्या मित्रमंडळीस धिक्कार करितो, तसेंच मार्गामध्यें जे लोकांस हासून भल्लशस्त्राच्या योगानें पीडित करितात, ॥ १ ॥ जे लोकांच्या आशेचा भंग करितात त्या मनुष्यास शूळ रोगाचे ( तीनशें प्रकारचे शूळ रोग आहेत. ) समुदाय पीडित करतील. त्याचा परिहार होण्याकरितां बंदिशाळेंत पडलेले लोक त्या पासून सोडवावेत, तसेंच पिंजऱ्यांत असलेले पक्षी, मार्गामध्यें चोर ज्यास मारतात अशा लोकास जे सोडवितात, तसेंच जे शंकराची सर्वकाळ भक्ति करितात, त्याचे तीनशें प्रकारचे शूळ नाहींसे होतील. ॥ २ ॥ ३ ॥ हेमाद्रींतील बौधायनाचें वचन. जो मनुष्य त्रिशूळाच्यायोगानें दुसऱ्याची हिंसा करितो, त्या मनुष्यास शूळरोग उत्पन्न होतो. त्यानें चार, दोन, एक तोळा सोनें आपल्या शक्तिप्रमाणें घेऊन अथवा रुपें, तांबें, लोखंड, खैर यांच्या योगानें त्रिशूळ तयार करावा. ॥ ४ ॥ ५ ॥ तो त्रिशूळ रक्तवस्त्रानें वेष्टित करून तिळांच्या राशीवर स्थापन करावा. आणि त्याची पूजा करून होमही करावा. नंतर वेदवेत्त्या ब्राह्मणास त्वंशूळ ब्रह्मणा सृष्ट हा मंत्र म्हणून दान करावा.॥६॥७॥ असें केल्यानें पोट, पार्श्वभाग, पाठ, पृष्ठभाग यांचे ठायीं असलेला जो माझा शूळ त्याचा नाशकर. या प्रमाणें शूळरोगाची प्रार्थना करावी. ॥ ८ ॥ नंतर स्नान करून ब्राह्मण व बंधुजन यांच्या सहवर्तमान भोजन करावें. या प्रमाणें केल्यानें शूळहिंसेपासून आपणास झालेली जी शूळरोगाची पीडा ती नाहींशी होईल ॥ ९ ॥

## अथारुचिशूलरोगकर्मविपाकनिर्णयः

श्रद्धाहीनोधनवान् दानेष्वरतिस्तामसदानी वा ॥ यः सोरुचिमान् शूली जायेतात्रैपनिस्तारः ॥ १ ॥ चांद्रायणं चातिकृच्छ्रं प्राजापत्यमथापरं ॥ होमाद्यपि च कुर्वीत व्याध्यादेरनुरूपतः ॥ २ ॥ कर्मविपाकसंग्रहे ॥ साक्षाद्धंता गवादीनां यः पुनर्जननांतरे ॥ शिरोरोगी श्रोत्ररोगी शूली वारुचिमान् भवेत् ॥ ३ ॥ एतन्निवृत्तये वर्षं त्रिवर्षकं चरेद्व्रतं ब्राह्मणाय ॥ तदंते च गोहिरण्यादिकं दिशेत् ॥४॥ कर्मविपाकसमुच्चये शातातपः॥ शूद्रस्यैव तु भुक्त्वान्नमव्रतस्य द्विजस्य च ॥ शूलव्याधिर्भवेन्नित्यमजीर्णांचातिपीडनं ॥ ५ ॥ अत्रेमां निष्कृतिं कुर्यादुपवासत्रयं तथा ॥ दद्यात्पलत्रयं रूप्यं ब्राह्मणाय सकांचनम् ॥ ६ ॥ रूप्यदानं तन्मंत्रेण इति अजीर्णशूलहरम् ॥ कर्मविपाकसमुच्चये ॥ श्रुताध्ययनसंपन्नं याचितारमकिंचनम् ॥ ब्राह्मणं दातुमाहूय दानार्थं न ददाति यः ॥ ७ ॥ स भवेज्जठरे शूली तथाध्मानी च कर्हिचित् ॥ कृच्छ्रातिकृच्छ्रचांद्राणि कुर्याद्रोगापनुत्तये ॥ ८ ॥

## अरुचि शूल रोगाच्या कर्मविपाकाचा निर्णय.

जो मनुष्य धनवान् असोन दान करित नाहीं, किंवा दान केल्यास तमोगुणात्मक दान करितो. त्यास अरुचि शूळरोग होईल. ॥ १ ॥ तो दूर होण्यास चांद्रायण, अतिकृच्छ्र, प्राजापत्य यातील एखादें प्रायश्चित्त, तसेंच होमादिक व्याधितारतम्यानें करावें. ॥ २ ॥ कर्मविपाकसंग्रहांतील वचन. जो मनुष्य गायी, ब्राह्मण इत्यादिकास स्वतः मारितो, त्यास अन्यजन्माचे ठायीं मस्तकशूळ, कर्णशूळ, अरुचि शूळ हे होतील. ते नाश होण्याकरिता अब्द अथवा त्र्यब्द प्रायश्चित्त आचरण करून त्याच्या समाप्तिनंतर ब्राह्मणास गोप्रदान व सुवर्णदान करावें. ॥३॥४॥ शातातपाचें वचन. जो ब्राह्मण शूद्राचें अथवा दुर्वृत्त ब्राह्मणाचें अन्न भक्षण करील, त्यास प्रतिदिवशीं शूळ, अजीर्ण यांची पीडा होईल. ॥ ५ ॥ ते दूर होण्यास त्यानें तीन उपोषणें करावींत. आणि ब्राह्मणास सोनें आणि बारा तोळे रुपें द्यावें. ॥ ६ ॥ कर्मविपाकसमुच्चयातील वचन. जो मनुष्य वेदशास्त्रसंपन्न, याचना करणारा, दरिद्री, अशा ब्राह्मणास दान देण्याकरितां बोलावून जो दान देत नाहीं. त्यास पोटांत शूळरोग तसेंच पोट फुगणें हे होतील. ते दूर होण्याकरितां कृच्छ्र, अतिकृच्छ्र, चांद्रायण हीं व्रतें आचरण करावींत. ॥ ७ ॥ ८ ॥ याप्रमाणें शूळरोगाचा निर्णय जाणावा.

## अथ गुल्मरोगकर्मविपाकनिर्णयः

कर्मविपाकसुधानिधौ ॥ चत्वारि गुल्मरोगस्य निदानानि विदुर्बुधाः ॥ गुरुवृद्धाति

निर्बंधोगुरुप्रत्यर्थिता तथा ॥ १ ॥ तदस्वपान्नहरणं तेषां दोषविनिष्कृतिः ॥ शातातपः ॥ इक्षोर्विकारहारी च भवेदुदरगुल्मवान् ॥ २ ॥ गुडधेनुः प्रदातव्या तेन तद्दोषशांतये ॥ कर्मविपाकसंग्रहे ॥ गुरुप्रत्यर्थितो यातो जायते गुल्मवान्नरः ॥ ३ ॥ आचरेत्तन्निवृत्यर्थं मासमेकं पयोव्रतम् ॥ मुंचामित्वेतिसूक्तेन प्रत्यचं चरुसर्पिषा ॥ ४ ॥ जुहुयादयुतं सम्यक् वातगुल्मातुरो नरः ॥

## गुल्मरोगाच्या कर्मविपाकाचा निर्णय.

कर्मविपाकसुधानिधींतील वचन. गुल्मरोग उत्पन्न होण्यास चार कारणें सांगितलीं आहेत. गुरु आणि वृद्धजन यांच्या वचनाविरुद्ध आग्रह धरणें, गुरूजवळ याचना करणें, गुरूशीं स्पर्धा करणें, गुरूचें अन्न हरण करणें, गुरु, वृद्ध यांचे दोष प्रगट करणें, हीं कारणें गुल्मरोगाचीं आहेत. शातातपाचें वचन उंसाचे जे विकार गुळ, साखर इत्यादिक यांस जो चोरितो त्याचे पोटांत गुल्म होतो. ॥ १ ॥ २ ॥ तो दोष जाण्या करीतां गुडधेनु ब्राह्मणास द्यावी. कर्मविपाकसंग्रहांतील वचन. जो गुरूशीं शत्रुपणानें वागतो त्या मनुष्यास गुल्मरोग होतो. ॥ ३ ॥ तो दूर होण्याकरितां महिनाभर पर्यंत दूध पिऊन रहावें. आणि 'मुंचामित्वा' या सूक्तानें प्रति ऋचेचे ठायीं तूप आणि भात यांचें हवन करावें. ॥ ४ ॥ ज्यास वातगुल्म झाला असेल त्या मनुष्यानें 'मुंचामि' या सूक्ताचा दहा हजार जप करावा.

## अथ हृद्रोगकर्मविपाकनिर्णयः

कर्मविपाकसमुच्चये ॥ परमर्मोद्घाटनं स्यात् हृद्रोगस्यादिकारणम् ॥ चांद्रायणत्रयं कुर्यात्पंचाशद्विप्रभोजनम् ॥ १ ॥ अग्निंदूतात्यवृतेन चरुणासर्पिषा युतम् ॥ अष्टाधिकं तु जुहुयादुक्तरोगस्य शांतये ॥ २ ॥

## हृद्रोगाच्या कर्म विपाकाचा निर्णय.

कर्मविपाकसमुच्चयांतील वचन. जो दुसऱ्याचें मर्म फाडितो त्यास हृद्रोग होतो. त्यानें तो दूर होण्याकरितां तीन चांद्रायणें करून पन्नास ब्राह्मणांस भोजन घालावें. ॥ १ ॥ 'अग्निं दूतं' या सूक्तानें चरु आणि तूप यांच्या योगानें एकशें आठ हवन करावें. म्हणजे हृद्रोग नाहींसा होतो. ॥ २ ॥

## अथ मूत्रकृच्छ्ररोगकर्मविपाकनिर्णयः

कर्मविपाके ॥ अश्मरी मूत्रकृच्छ्राणां कारणानि तु ॥ परस्त्रीविपरामन्या

तिर्यग्योनिषु संगमः ॥ चत्वार्याहुस्तथान्यच्च मूत्रकृच्छ्रे द्वयं स्मृतम् ॥ १ ॥ शातातपः ॥ गुरुजायाभिगमनान्मूत्रकृच्छ्रं प्रजायते ॥ तेनापि निष्कृतिः कार्या शास्त्रदृष्टेन वर्त्मना ॥ गुरुतल्पप्रायश्चित्तार्द्धं कुर्यादित्यर्थः ॥ २ ॥ स्थापयेत्कुंभमेकं तु पश्चिमायां शुभं दिशि ॥ ३ ॥ नीलवस्त्रसमाच्छिन्नं नीलमाल्यविभूषितम् ॥ तस्योपरि न्यसेद्देवं लोहपात्रे प्रचेतसम् ॥ ४ ॥ सुवर्णनिष्कषट्केण निर्मितं यादसांपतिं ॥ यादसामधिपो देवो विश्वेषामपि पावनः ॥ ५ ॥ संसारार्णवकर्णधारो वरुणः पावनोस्तु ते ॥ इमं मंत्रं समुच्चार्य आचार्याय यथाविधि ॥ दद्यादेवमलंकृत्य मूत्रकृच्छ्रप्रशांतये ॥ ६ ॥ अथापरंशातातपः ॥ पशुयोनौ च गमनात् मूत्रकृच्छ्रं प्रजायते ॥ तिलपात्रत्रयं चैव सद्द्यादात्मशुद्धये ॥ ७ ॥ तिलपात्रदानप्रकारमाह विष्णुः ॥ ताम्रपात्रे तिलान् कृत्वा पलषोडशकल्पिते ॥ सहिरण्यं स्वशक्त्या वा विप्राय प्रतिपादयेत् ॥ ८ ॥ नाशयेत्त्रिविधं पापं वाङ्मनःकायसंभवम् ॥ कर्मविपाकसमुच्चये ॥ मत्सरी गुरुणा यश्च विधवामभिगच्छति ॥ ९ ॥ स भवेन्मूत्रकृच्छ्री तु गुरुतल्पार्द्धमाचरेत् ॥ गुरुतल्पप्रायश्चित्तस्यार्द्धं षड्वार्षिकम् ॥ १० ॥ वायुपुराणे ॥ सुरापो मूत्रकृच्छ्री स्यात् ॥ जैमिनिः सुवर्णकमलं दानं कृत्वा पूर्णं पलेन तु ॥ द्विजाय श्रोत्रियायात्र मूत्रकृच्छ्रात्प्रमुच्यते ॥ ११ ॥

## मूत्रकृच्छ्ररोगाच्या कर्मविपाकाचा निर्णय.

कर्मविपाकांतील वचन. अश्मरी ( मुतखडा. ), शर्करामूत्र, मूत्रकृच्छ्र, हे उत्पन्न होण्यास चार कारणें आहेत. परस्त्रियेशीं गमन करणें, तसेंच विधवा, कन्या आणि पशुयोनी यांच्याशीं समागम करणें हीं आहेत. ॥ १ ॥ शातातपाचें वचन. गुरुस्त्रियेशीं गमन केलें असतां मूत्रकृच्छ्र रोग होतो. तो दूर होण्यास शास्त्रांत गुरुस्त्रियेशीं गमन केल्याबद्दल जें प्रायश्चित्त सांगितलें आहे, त्याचें अर्धे प्रायश्चित्त आचरण करावें. ॥ २ ॥ दुसरा उपाय पश्चिम दिशेचे ठायीं एक कुंभ स्थापन करावा. तो कुंभ नील वस्त्रानें आच्छादित करून नीलपुष्पांनीं भूषित करावा. आणि त्याच्यावर एक लोहपात्र स्थापन करावें. त्यापात्रामध्यें सहा तोळे सोन्यानें तयार केलेली वरुणाची मूर्ति स्थापन करावी. नंतर तिची षोडशोपचार पूजा करून ' यादसामधिपो देवो ' या मंत्रानें ब्राह्मणास ती मूर्ति द्यावी. असें केल्यानें मूत्रकृच्छ्र दूर होतो. ॥ ३ ॥ ४ ॥ ५ ॥ ६ ॥ शातातपाचें वचन. पशूयोनीचे ठायीं गमन केलें असतां मूत्रकृच्छ्र होतो. तो दूर होण्यास तीन तिलपात्रें ब्राह्मणास द्यावींत. ॥ ७ ॥ तिलपात्राचा प्रकार. चौसष्ट तोळ्यांचें तांब्याचें तिलपात्र करून त्यांत तीळ घालून तें पात्र सुवर्णानें सहित असें ब्राह्मणास द्यावें. ॥ ८ ॥ ह्मणजे वाणि, मन आणि देह यां पासून झालेलें पातक नाहींसें होतें. जो गुरुशीं मत्सर करितो, अथवा विधवास्त्रियेशीं गमन करितो, त्यास मूत्रकृच्छ्र होतो. तो दूर होण्यास गुरुपत्नीगम-

नाचें जें प्रायश्चित्त त्याचें अर्धं प्रायश्चित्त आचरण करावें. ॥ ९ ॥ १० ॥ दारू पिणारे मनुष्यास मूत्रकृच्छ्र होतो, तो दूर होण्यास जैमिनीनें असें सांगितलें आहे कीं, चार तोळ्यांचें सुवर्ण कमल करून ब्राह्मणास द्यावें. ह्मणजे मूत्रकृच्छ्राचा परिहार होतो. ॥ ११ ॥

## अथाश्मरीरोगकर्मविपाकनिर्णयः

शातातपः ॥ मातुः सपत्नीगमने जायते चाश्मरीगदः॥ स तत्पापविशुद्ध्यर्थं प्रायश्चित्तं समाचरेत् ॥ १२ ॥ प्रायश्चित्तं त्रैमासिकम् ॥ दद्याद्विप्राय विदुषे मधुधेनुं यथोदितं ॥ तिलद्रोणशतं चैव हिरण्येन समन्वितम् ॥ १३ ॥ शातातपः ॥ दुग्धचोरस्तु पुरुषो जायते बहुमूत्रवान् ॥ स दद्याद्दुग्धधेनुं च ब्राह्मणाय यथाविधि ॥ १४ ॥ कर्मविपाकसमुच्चये ॥ सौंदर्यगामिनोरोगोजायते बहुमूत्रता ॥ पराकत्रितयं चत्वारिंशद्ब्राह्मणभोजनं च कारयेत् ॥ १५ ॥ शातातपः ॥ मातृगामी भवेद्यस्तु तस्य लिंगं विनश्यति ॥ तत्र प्रतिक्रियां कर्तुं कुंभमुत्तरतोन्यसेत् ॥ १६ ॥ कृष्णवस्त्रसमाछन्नंकृष्णमाल्यविभूषितं ॥ तस्योपरि न्यसेत् कांस्यपात्रे देवं धनेश्वरम् ॥ १७ ॥ ततोतस्य षोडशोपचारैः पूजां कृत्वा सहिरण्यं वेदविदे ब्राह्मणाय दद्यादत्र विशेषस्तु कर्मविपाकग्रंथे द्रष्टव्यः ॥ १८ ॥

## अश्मरी ( मुतखडा ) रोगाच्या कर्मविपाकाचा निर्णय.

शातातपाचें वचन. सापत्नमातोश्रीशीं जो गमन करितो त्यास अश्मरी ह्मणजे मूत्रकृच्छ्र रोग होतो, तो दूर होण्याकरितां त्रैमासिक प्रायश्चित्त आचरण करावें. वेदवेत्त्या ब्राह्मणास मधुधेनु आणि चारशें पायल्या तीळ, सुवर्ण हें दान करावें ॥१२॥१३॥ शातातपाचें वचन. जो दूध चोरितो त्यास बहुमूत्र होतो. त्यानें दुग्धधेनु द्यावी. ॥ १४ ॥ सौंदर्ययुक्त आशा स्त्रियेशीं गमन करणाऱ्या मनुष्यास बहुमूत्र रोग होतो, त्यानें तो दूर होण्यास तीन पराक प्रायश्चित्तें करून चाळीस ब्राह्मणास भोजन घालावें. ह्मणजे रोगपरिहार होतें. ॥ १५ ॥ शातातपाचें वचन-जो मातोश्रीशीं गमन करितो त्याचें लिंग नाहींसें होतें, तो दोष दूर होण्याकरितां उत्तर दिशेकडे कुंभ स्थापन करावा ॥ १६ ॥ तो काळे वस्त्रानें वेष्टित करावा. व त्यास गंध व काळीं पुष्पें यांनीं पूजा करून त्याचे वर कांस्याचें पात्र ठेऊन त्यामध्यें कुबेराची प्रतिमा ठेऊन तिची षोडशोपचार पूजा करून सुवर्ण दक्षिणा सहित वेदवेत्त्या ब्राह्मणास द्यावी. यासंबंधानें विशेष विचार कर्मविपाकसंग्रहामध्यें पाहावा. ॥ १७ ॥ १८ ॥

## अथ प्रमेहरोगकर्मविपाकनिर्णयः

जैमिनिः ॥ पितृगोत्रभवां नारीं कामयंति विमोहिताः ॥ नराश्च नार्योपि तथा

पुरुषेषु च संयुताः ॥ १ ॥ ते पीड्यंते प्रमेहेण पुत्रकेण तव प्रभो ॥ सुवर्णतस्कराश्चान्ये मूत्रकृच्छ्रेण सर्वदा ॥ २ ॥ सुवर्णसिकतां दत्त्वा सौवर्णं देवभूषणम् ॥ पलप्रमाणं तुलितं प्रमेहान्मुच्यते जनः ॥ ३ ॥ कर्मविपाकसुधानिधौ ॥ नवैतानि निदानानि प्रमेहस्य प्रचक्षते ॥ ब्राह्मणस्वर्णहरणं तापसीगमनं तथा ॥ ४ ॥ गुरुतल्पगमद्वेषौ परहृत्क्लेशकारिता ॥ परस्त्रीविधवाकन्यातिर्यग्योनिषु संगमः ॥ ५ ॥ चांडालीगमनात्सर्वप्रमेहव्याधिमान् भवेत् ॥ क्षुत्पिपासातुरश्चैव जायते तस्य निष्कृतिः ॥ ६ ॥ चांद्रायणत्रयं कुर्याद्यवमध्यं तथापरम् ॥ पिपीलिकामध्यचांद्रायणत्रयमुदाहृतम् ॥ ७ ॥ कर्मविपाकसंग्रहे ॥ तिर्यग्गामी स शूलेन प्रमेहेण युतो भवेत् ॥ कुर्यात्सांतपनादिंतु प्रायश्चित्तं यथाविधि ॥ ८ ॥ पर्वण्यवायी मनुजः कन्यागामी तथैव च ॥ वातप्रमेहयुक्तः स्यात्कुर्याच्चांद्रायणत्रयम् ॥९॥ कर्मविपाकसमुच्चये ॥ मधुमेही मातृगामी सततं जायते नरः ॥ पितृभार्यासपत्नजननीगामिनःप्रायश्चित्तं क्रमादत्र षड्वर्षाण्यथपंच च ॥१०॥ अब्दमित्याचरेत्सम्यक् ततो रोगात्प्रमुच्यते ॥ क्रमेण षडब्दं पंचाब्दमित्यर्थः ॥११॥ वायुपुराणे ॥ ब्राह्मणस्वर्णहारी च प्रमेही जायते नरः ॥ तच्छांतये सुवर्णधेनुं दद्यात्॥ अत्र विषये विशेषस्तु कर्मविपाकसंग्रहे दृष्टव्यः ॥ १२ ॥

## प्रमेहरोगाच्या कर्मविपाकाचा निर्णय.

जैमिनीचें वचन. जे मनुष्य कामानें अत्यंत मोहित होऊन पित्याच्या कुळामध्यें उत्पन्न झालेल्या स्त्रियेस इच्छा करितात; ज्या स्त्रिया आपल्या पितृवंशात झालेल्या पुरुषांशीं रममाण होतात. ॥ १ ॥ ते पुरुष आणि स्त्रिया क्षयरोगाचा जो पुत्र प्रमेह त्यानें पीडित होतात. तसेंच सुवर्णाची चोरी करणारे मनुष्य मूत्रकृच्छ्ररोगानें पीडित होतात. ॥ २ ॥ चार तोळे वजनाचे सोन्याचे देव, भूषणें अथवा सोन्याची वाळुका करून ब्राह्मणास द्यावी. ह्मणजे प्रमेह रोगापासून मनुष्य मुक्त होतो. ॥ ३ ॥ कर्मविपाकसुधानिधींतील वचन. प्रमेहरोग उत्पन्न होण्यास नऊ कारणें सांगितलीं आहेत. ब्राह्मणाच्या सोन्याची चोरी करणें, तपस्वी अशा स्त्रीशीं समागम करणें, गुरुस्त्रीशीं गमन करणें अथवा तिचा द्वेष करणें, दुसऱ्याच्या हृदयास पीडा करणें, परस्त्री, विधवा, मुलगी आणि पशुयोनि याचे ठायीं गमन करणें. ॥ ४ ॥ ५ ॥ चांडाळ स्त्रियेशीं गमन केलें असता सर्व प्रकारचे प्रमेह रोग होतात. तसेंच मनुष्य क्षुधा आणि तृषा यांनीं पीडित असा होतो. ॥ ६ ॥ हा दोष परिहार होण्यास यवमध्य, पिपीलिकामध्य, ऋषिचांद्रायण अशीं तीन चांद्रायणें करावींत. कर्मविपाकसारांतील वचन. जो मनुष्य पशुयोनीचे ठायीं गमन करितो, त्यास शूलयुक्तप्रमेह होतो. तो परिहार होण्याकरितां शास्त्रांत सांगितल्याप्रमाणें सांतपनप्रायश्चित्त करावें. ॥ ७ ॥ ८ ॥ जो पर्वदिवशीं मैथुन करितो, अथवा कन्येशीं गमन करितो, त्यास वातप्रमेह होईल. तो परिहार होण्याकरितां तीन चांद्रायणें

आचरण करावींत.. कर्मविपाकसमुच्चयांतील वचन. जो सापत्नमातोश्रीशीं गमन करितो त्यास मधुमेह रोग होतो, तो दूर होण्यास त्यानें पडब्द प्रायश्चित्त करावें. ॥ ९ ॥ १० ॥ ११ ॥ वायुपुराणांतील वचन–जो ब्राह्मणाचें सोनें चोरितो, त्यास प्रमेह रोग होतो. तो दूर होण्यास त्यानें सुवर्णधेनु ब्राह्मणास द्यावी. यासंबंधानें विशेष विचार कर्मविपाकसंग्रहामध्यें पहावा ॥ १२ ॥

## अथोदररोगकर्मविपाकनिर्णयः

तत्र जैमिनिः ॥ जलोदरो यातु जनं गर्भपातिनमादरात् ॥ पश्चात् त्यजतु तं भूत प्रपापूण्येन भूपितम् ॥ १ ॥ शातातपः ॥ गर्भपातनजा रोगा यकृत्प्लीहजलोदराः ॥ तेषां प्रशमनार्थाय प्रायश्चित्तमिदं स्मृतम् ॥ २ ॥ एतेषु दद्याद्विप्राय जलधेनुं विधानतः ॥ सुवर्णरौप्यताम्राणां पलत्रयसमन्विताम् ॥ ३ ॥ कर्मविपाकसंग्रहे ॥ भृतकाध्यापको यस्तु कन्यादूषणतत्परः ॥ प्लीहावान् स भवेद्विप्रो जपेच्छ्रीसूक्तमेव हि ॥४॥ विश्वस्तविपदाता च प्लीहावान् जायते नरः ॥५॥ चांद्रायणं पराकं च गायत्रीजप एव च ॥ अपामार्जनकस्यापि जपः संध्यात्रये भवेत् ॥६॥ राज्ञा वा तु नियुक्तेन नियुक्तो धर्मनिश्चये ॥ पुरोहितः प्राड्विवाकः सचिवो वान्यथा चरेत् ॥ ७ ॥ जलोदरत्वं प्राप्नोति तस्य वक्ष्यामि निष्कृतिम् ॥ पयसा वर्तयेन्मासत्रितयं व्रतमुत्तमम् ॥ ८ ॥ सहस्रकलशस्नानं महादेवस्य चैव हि ॥ भोजयेच्च शतं विप्रान्मुच्यते किल्बिषात्ततः॥९॥ यो ब्रह्मविष्णुरुद्राणां भेदमुत्तमभावतः ॥ साधयेदुदरव्याधियुक्तो भवति मानवः ॥ १० ॥ कुर्यात्कृच्छ्रं सातिकृच्छ्रं चांद्रायणमथापरम् ॥ सहस्रकलशस्नानमीश्वरस्य तु कारयेत्॥११॥ जपेदयुतसंख्याकमुद्यंनघतृचं तथा ॥ आतेपितरसंसूक्तात् घृतेन चरुणा पृथक् ॥ १२॥ अष्टोत्तरसहस्रं हि जुहुयाच्च ततः परं॥मधुनाज्येन संयुक्तं हिरण्यं शक्तितो दिशेत्॥१३॥

## उदररोगाच्या कर्मविपाचा निर्णय.

*जैमिनीचें वचन. गर्भपात करणाऱ्या मनुष्यास जलोदर रोग होतो. नंतर त्यानें पानपोयी स्थापन करावी, त्यापुण्यानें रोगपरिहार होईल ॥ १ ॥* शातातपाचें वचन. यकृत्, प्लीहा, जलोदर, हे रोग गर्भपात केल्यापासून होतात. हे दूर होण्यास सोनें, रुपें, तांबें बाराबारा तोळे घेऊन त्याच्याशीं सहित जलधेनु ब्राह्मणास द्यावी. म्हणजे वरील रोग नाहींसे होतात. ॥२॥३॥ कर्मविपाकसंग्रहांतील वचन. जो मनुष्य पगार घेऊन लोकांस अध्ययन शिकवितो, अथवा कन्येस दूषित करितो, त्यास प्लीहारोग होईल. तो दूर होण्यास त्यानें श्रीसूक्ताचा जप करावा. ॥ ४ ॥ विश्वासुक मनुष्यास जो विष घालील त्यास प्लीहारोग होतो. तो परिहार होण्यास चांद्रयण आणि पराक हीं प्रायश्चित्तें करावीं. तसेंच निरंतर सन्ध्येचेठायीं अपामार्जन मंत्राचा जप करावा ॥ ५ ॥ ६ ॥ धर्मनिश्चयाचे ठायीं राजा अथवा राजानें नेमलेला मनुष्य, उपाध्याय, मुनसफ,

अथवा प्रधान हे जर विपरीत काम करतील तर त्यास जलोदर रोग उत्पन्न होईल. तो दूर होण्यास तीन महिने पर्यंत पयोव्रत ह्मणजे दूध पिऊन रहावें, आणि शंकरास हजार कळशानें स्नान घालावें. आणि शंभर ब्राह्मणास भोजन घालावें. ह्मणजे त्या पातकापासून मुक्त होतो. ॥७॥८॥९॥ जो मनुष्य ब्रह्मा, विष्णु, महेश याच्या मध्यें उत्तम पणाचा भेद करितो त्यास उदररोग उत्पन्न होतो. तो दूर होण्यास कृच्छ्र, अतिकृच्छ्र, चांद्रायण हीं प्रायश्चित्तें करावींत. तसेंच महादेवास हजार घागरींनें स्नान घालावें. ॥ १० ॥ ११ ॥ तसेंच उद्वंनय या ऋचेचा दहा हजार जप करावा. आतेपितर या सूक्ताचा तूप आणि चरु याच्या योगानें एक हजार आठ होम करावा. आणि ब्राह्मणास तूप, मध यानें सहित आपल्या शक्तिप्रमाणें सुवर्णदान करावें. ह्मणजे उदररोगाचा नाश होतो. ॥ १२ ॥ १३ ॥ या प्रमाणें उदर रोगाचा निर्णय जाणावा.

## अथ शोफरोगकर्मविपाकनिर्णयः

कर्मविपाकसंग्रहे ॥ अद्रौ मार्गे नदीतीरे छायायां पुलिने नरः ॥ मूत्रं पुरीषं वल्मीके यः प्रमुंचेज्जलेपि वा ॥ १ ॥ श्वयथुव्याधिमाप्नोतीत्येवमाह सदाशिवः ॥ छायायामितिवृक्षदेवालयछायायां मूत्रपुरीषग्रहणं ष्ठीवनादेरुपलक्षणम् ॥ २ ॥ आदिग्रहणं च पुण्यस्थानोपलक्षणार्थं ॥ तत्र वृद्धबौधायनः ॥ विघ्नकर्ता च भोक्तॄणां शोफी भवति मानवः ॥ ३ ॥ तत्प्रतीकारः ॥ इंद्रवइतिमंत्रं हि जपेदष्टोत्तरायुतं ॥ ह्मापोहिष्ठेतिहोमः स्याच्चरुणा सर्पिषायुतम् ॥ ४ ॥ जैमिनिः ॥ अजां प्रयच्छति नरः श्रद्धया कांचनावृतां ॥ विप्राय वेदविदुषे शोफो मुंचति तं नरं ॥ ५ ॥

## शोफ ( सूज ) च्या कर्मविपाकाचा निर्णय.

कर्मविपाक संग्रहांतील वचन. पर्वताच्या उत्तमभूमिचेठायीं, मार्ग, नदीतीर, सांवली, वाळवंट, वारूळ, पाणी यामध्यें जो मनुष्य मलमूत्र करितो त्यास सुजेचा रोग उत्पन्न होतो. या प्रमाणें श्रीशंकरानीं सांगितलें आहे. येथें सांवली शद्बानें झाड, देवालय याची सांवली घ्यावयाची आहे. मलमूत्र शब्दांनीं थुकणें, शेंबूड टाकणें वगैरे घ्यावयाचें आहे. अद्रि शब्दानें पुण्यस्थानें घ्यावयाचीं. ॥ १ ॥ २ ॥ वृद्ध बौद्धायनाचें वचन. जेवणारे मनुष्यास जो विघ्न करितो त्यास सूजेचा रोग उत्पन्न होईल. ॥ ३ ॥ तो दूर होण्यास उपाय. इंद्रव यामंत्राचा एकशें आठ जप करावा. आणि आपोहिष्ठा या मंत्रानें तूप आणि भात याचें एकशें आठ हवन करावें. ॥ ४ ॥ जैमिनीचें वचन, जो मनुष्य श्रद्धेनें युक्त होऊन सुवर्णानें युक्त अशा शेळीचें दान ब्राह्मणास देईल, त्याची सुज नाहींशी होईल. ॥ ५ ॥

## अथ गंडमाला तथागलगंडकर्मविपाकनिर्णयः

शातातपः ॥ अध्यापयति शिष्यांस्तु यः प्रतार्य गुरुस्तथा ॥ शिष्यो गुरुं वंचयित्वा योधीते शृणु तस्य च ॥ १ ॥ जायते गंडमालाख्यो रोगस्तदुपशांतये ॥ अभक्ष्यपानपायी वा गंडमाली भवेन्नरः ॥ २ ॥ गलगंडी गणद्रव्यहर्तो भवति मानवः ॥ जैमिनिः ॥ परस्याननसंस्थं यो ग्रासं हरति मंदधीः ॥ देवोपकरणान्येव गंडमालातमीहते ॥ नानारत्नप्रदानेन गंडमाला विलीयते ॥ ३ ॥ ४ ॥ शातातपः ॥ कृच्छ्रत्रयं प्रकुर्वीत चांद्रायणमथापरं ॥ अष्टोत्तरसहस्रं तु जपेत्पुरुषसूक्तकम् ॥ ५ ॥ सौरमंत्रजपस्तद्वच्छक्त्या ब्राह्मणभोजनं ॥ इति कृत्वा नरः सम्यक् गलगंडाद्विमुच्यते ॥ ६ ॥ माणिक्यं पद्मरागं च वज्रं मौक्तिकमेव च ॥ वैडूर्यंपुष्परागं च वज्रं मरकतं तथा ॥७॥ एभिर्मालां प्रकुर्वीत सूत्रमप्यत्र राजतं ॥ अलाभे मौक्तिकाद्यन्यतमैर्मालां प्रकल्पयेत् ॥ ८ ॥ ताम्रपात्रे विनिक्षिप्य तिलानामुपरिन्यसेत् ॥ तिलानां च परिमाणं द्रोणपंचकमिष्यते ॥ तस्योर्ध्वं नवग्रहादिमहाशांतिं कुर्यात् ॥ ९ ॥ रत्नमालां पूजयित्वा वेदशास्त्रविदे ब्राह्मणाय दद्यात् ॥ अत्रविशेषस्तु कर्मविपाकसंग्रहे द्रष्टव्यः ॥ १० ॥

## गलगंड, गंडमालारोगाच्या कर्मविपाकाचा निर्णय.

शातातपाचें वचन. जो गुरु शिष्यास ठकवून अध्ययन शिकवितो, अथवा जो शिष्य गुरूस ठकवून अध्ययन शिकतो त्यास. ॥ १ ॥ गंडमाला रोग होतो. तसेंच शास्त्रांत खाण्यास व पिण्यास निषेध केलेल्या पदार्थांचें जो भक्षण करितो त्यास गंडमाला रोग उत्पन्न होतो. ॥२॥ जो समुदायाच्या द्रव्याला हरण करितो त्यास गलगंड रोग उत्पन्न होईल. जैमिनीचें वचन. दुसऱ्याच्या मुखांतील ग्रास जो हरण करितो, तसेंच देवाचीं उपकरणें जो हरण करितो त्यास गलगंड रोग उत्पन्न होतो. तो परिहार होण्यास नाना प्रकारचीं रत्नें ब्राह्मणास द्यावीं. ॥ ३ ॥ ४ ॥ शातातपाचें वचन. गलगंड परिहार होण्यास तीन कृच्छ्रें प्रायश्चित्त, तसेंच चांद्रायण आणि पुरुषसूक्तमंत्राचा एक हजार आठ जप करावा. ॥ ५ ॥ तसेंच सौरमंत्राचा जप करावा. आपल्या शक्तिप्रमाणें ब्राह्मणास भोजन घालावें. याप्रमाणें केल्यानें गलगंड रोगापासून मनुष्य मुक्त होतो. ॥ ६ ॥ माणिक, पद्मराग, हिरा, मोतीं, पुष्कराग. ॥ ७ ॥ यांची रुप्याच्या सुतांत माळ करावी. हीं रत्नें न मिळाल्यास मोती वगैरे जे मिळतील त्यांची माळ करावी. ॥ ८ ॥ आणि ती माळ तांब्याचे पात्रामध्यें ठेवून तें पात्र तिळाच्या राशीवर स्थापन करावें. येथें तिळ वीस पायल्या घेण्यास सांगितले आहेत. नंतर नवग्रहाची महाशांती करावी. ॥ ९ ॥ व रत्नमाळेची पूजा करून वेदशास्त्रवेत्ता कुटुंबवत्सळ ब्राह्मणास द्यावी. या संबंधाचा विशेष विचार कर्मविपाकसंग्रहांत पहावा. ॥ १० ॥

धृत. माग न रोग ...

## अथ वल्मीकरोगकर्मविपाकनिर्णयः.

तत्र जैमिनिः ॥ त्वं रक्षेति धनं प्रोक्तः स्वयं लोभेन मोहितः ॥ स्थापितं न ददास्यस्मै वित्तेशयोरुपातकी ॥ १ ॥ वल्मीकं तत्पदं प्राप्य स्थूलं जायेत रोपितं ॥ ब्राह्मणेभ्यो धनं भूरि प्रयच्छति जनस्तु यः ॥ २ ॥ तं न वल्मीकको याति पीडितुं हरिसेवकं ॥ शातातपः ॥ स्वगोत्रस्याभिगमनात् स्त्रीपदी जायते नरः ॥ ३ ॥ योन्यामसृक् स्रवति तत्र चांद्रायणं चरेत् ॥ मासं पयोव्रतं चैव तस्माद्रोगात्प्रमुच्यते ॥ ४ ॥

## वल्मीक ( वारुळ ) रोगाच्या कर्मविपाकाचा निर्णय.

जैमिनीचें वचन. एखादे मनुष्या जवळ संरक्षाणाकरितां द्रव्य दिलें असोन त्या द्रव्याच्या लोभानें मोहित होऊन, ज्या मनुष्यानें द्रव्य ठेविलें असेल तें द्रव्य त्यास जर परत न देईल तर त्याचे पायास मोठें वारुळ होईल. तें परिहार होण्याकरितां ब्राह्मणास पुष्कळ द्रव्य द्यावें. ॥ १॥ ॥ २ ॥ जो विष्णूची सेवा करितो त्यास वारुळ रोगाची पीडा होणार नाहीं. शातातपाचें वचन. जो मनुष्य आपल्या वंशांत उत्पन्न झालेल्या स्त्रीयेशीं गमन करितो त्यास वारुळ रोग उत्पन्न होतो. ॥ ३ ॥ जी स्त्री आपल्या वंशांत उत्पन्न झालेल्या पुरुषाशीं गमन करील तिला रक्तप्रदर होईल. हें परिहार होण्यास चांद्रायणव्रत करावें. तसेंच महिनाभर पर्यंत पयोव्रत ( दूध पिऊन राहावें. ) केल्यानें रोग परिहार होईल. ॥ ४ ॥

## अथ व्रणरोगकर्मविपाकनिर्णयः

शातातपः ॥ जात्युत्तमस्त्रीगमनाज्जायते मस्तकव्रणी ॥ श्रोत्रीयस्त्रीप्रसंगेन जायते नासिकाव्रणी ॥ १ ॥ कर्मविपाकसंग्रहे ॥ कर्मकाले कुक्कुटं च खरादीन्वा य ईक्षते ॥ स नासिकाव्रणी च स्यादार्द्रनेत्रश्च जायते ॥ २ ॥ शातातपः ॥ पितृस्वसाभिगमने दक्षिणांगव्रणी भवेत् ॥ मातृस्वसाभिगमने वामांगोत्थव्रणी भवेत् ॥ ३ ॥ जैमिनिः ॥ कर्मविपाकसंग्रहे ॥ अतिमानादतिक्रोधादतिस्नेहाद्भयादपि ॥ यो धर्मनिश्चयं जानन्न्यथा कुरुते नरः ॥ स पूयशोणितयुक्तव्रणी जायेतविनिश्चितम् ॥ ४ ॥ शतमष्टोत्तरं घोरं व्रणानां मम मानिनां ॥ तुलापुरुषदानेन समग्रं तत्प्रशाम्यति ॥ ५ ॥ अर्धप्रसूतां सुरभीं यथोक्तां यः प्रयच्छति ॥ तस्य गात्रे च तैः सर्वैः व्रणैः स्थेयं न कर्हिचित् ॥ ६ ॥ शातातपः ॥ उचंब्रयेत्पृचा चाज्यं जुहुयादयुतं चरुं ॥ श्रीसूक्तं च जपेद्द्राक्षां दूर्वाक्षतविमिश्रिताम् ॥ ७ ॥ शिखायां च निबध्नीयात् शिवसंकल्पमंत्रितम् ॥

## व्रणरोगाच्या कर्मविपाकाचा निर्णय.

शातातपाचें वचन. जो मनुष्य आपलेपेक्षां उत्तम जातीच्या स्त्रीयेशीं गमन करितो त्याचे मस्तकास व्रणरोग होईल. अग्निहोत्रीब्राह्मणाच्या स्त्रीयेशीं गमन केलें असतां त्याचे नाकास व्रणरोग होईल. ॥ १ ॥ कर्मविपाकसंग्रहांतील वचन. जो मनुष्य स्नान संध्यादि करितेसमयीं कोंबडा, गाढव इत्यादि जनावरास पाहतो त्याचे डोळे नेहेमीं पाण्यानें युक्त असे आणि नासिकेस व्रण हे होतात. ॥ २ ॥ शातातपाचें वचन. आपल्या बापाच्या बहिणीशीं गमन केलें असतां उजव्या अंगाचे ठायीं व्रणरोग होईल. आईची बहीण ( मावशी ) इचेशीं गमन केलें असतां डाव्या अंगाचे ठायीं व्रणरोग होईल. ॥ ३ ॥ कर्मविपाकसंग्रहांतील वचन. अत्यंत अभिमान केल्यानें, तसेंच अतिक्रोध, अतिस्नेह, अतिभय, यामुळें जो मनुष्य धर्माचा निश्चय समजूनही विपरीत रीतिनें करितो त्यास पू, रक्त याला वाहणारा असा व्रण निश्चयानें होईल. ॥ ४ ॥ जैमिनीचें वचन. तुलापुरपाचें दान केलें असतां एकशें आठ तऱ्हेचे व्रण नाहींसे होतात. ॥ ५॥ जो मनुष्य अर्धी प्रसवलेली ह्मणजे जीचें वासरू निमे बाहेर आलें आहे अशा गायीचें शास्त्रांत सांगितल्याप्रमाणें दान करील त्याचे शरीरावर कधींही व्रण होणार नाहींत. ॥ ६ ॥ शातातपाचें वचन. उद्यंबध या मन्त्राचा जप आणि तूप, चरु याच्या योगानें दाहा हजार हवन करावें. श्रीसूक्ताचा जप करावा. शेंटीमध्यें दूर्वा अक्षता यानें युक्त केलेली रक्षा ( भस्म ) शिवसंकल्प मन्त्रानें बांधावी. ॥ ७ ॥

## अथ भगंदरकर्मविपाकनिर्णयः

शातातपः ॥ स्वगोत्रस्त्रीप्रसंगेन जायते च भगंदरी ॥ भगंदरोजनं त्यक्त्वा सौवर्णं कदलीफलं ॥ दातारं पलमात्रं हि ब्राह्मणाय प्रयच्छतु ॥ १ ॥

## भगंदररोगाच्या कर्मविपाकाचा निर्णय.

शातातपाचें वचन. जो मनुष्य आपल्या कुळांत उत्पन्न झालेल्या स्त्रीशीं गमन करितो त्यास भगंदररोग उत्पन्न होतो. तो परिहार होण्याकरितां चार तोळे सोन्याचें कदलीफळ करून ब्राह्मणास द्यावें ह्मणजे रोग परिहार होईल. ॥ १ ॥

## अथ त्वग्दोषकर्मविपाकनिर्णयः

शातातपः ॥ पुरुषं भाषते व्यर्थं सत्वग्दोषयुतो भवेत् ॥ चांद्रायणत्रयं कुर्यात्मदयादौषधानि च ॥ वैद्यकोक्तानि विप्राय शक्त्या ब्राह्मणभोजनम् ॥ १ ॥

## त्वचेच्या रोगाच्या कर्मविपाकाचा निर्णय.

शातातपाचें वचन. जो मनुष्य व्यर्थ कठोर भाषण करितो त्यास त्वचेचा रोग उत्पन्न

होईल. तो जाण्याकरितां त्यानें तीन चांद्रायणें करावीं. वैद्यशास्त्रांत सांगितल्याप्रमाणें रोगी अशा गरीब मनुष्यास औषधें द्यावीं आणि आपल्या शक्तीप्रमाणें ब्राह्मण भोजन करावें. ॥ १ ॥

## अथ कुष्टरोगकर्मविपाकनिर्णयः

शिवधर्मोत्तरे ॥ सर्वांगकुष्ठी तिमिरी नरो भवति पापतः ॥ दीपं देवगृहाद्धृत्वा पंगुश्चांधो भवेन्नरः ॥ पापमत्र गोवधादिदोषबाहुल्यात् ॥ १ ॥ व्यवहारी पुष्पवत्यां भुक्त्वा कुष्टी ज्वरी भवेत् ॥ अनपत्यो दरिद्रश्च विश्वस्तस्य विषप्रदः ॥ २ ॥ घृतहारी भवेत् कुष्टी तस्मात् भ्रष्टः कृमिर्भवेत् ॥ घृतस्य सर्वशरीरपोषकत्वात्कुष्टस्य च सर्वशरीरदाहकत्वात् ॥ ३ ॥ शिवगीतायां ॥ यो नरो हंति वै जंतून् कुष्टरोगी भवेत्तु सः ॥ सांतपनं प्रकुर्वीत भगवानाह शंकरः ॥ सांतपनं यतिसांतपनं ॥ ४ ॥ शातातपः ॥ दीक्षितस्त्रीप्रसंगेन जायते रक्तकुष्ठवान् ॥ तत्पातकविशुद्ध्यर्थं प्राजापत्यचतुष्टयम् ॥५॥ भ्रातृजायाभिगमने गुल्फकुष्टं प्रजायते ॥ स्ववधुगमने चैव कृष्णकुष्टं प्रजायते ॥ स्ववधूस्त्वपुत्रभार्या ॥ ६ ॥ तेन तत्पातकविशुध्यर्थं षड्वार्षिकप्रायश्चित्तं घृताक्ततिलैर्होमश्च कार्यः ॥७॥ शातातपः ॥ ब्रह्महा नरकस्यांते जायते चित्रकुष्टवान् ॥ प्राजापत्यत्रयं कृत्वा देयं रूप्यं पलत्रयम् ॥८॥ अथौदुंबरकुष्टहरं ॥ शातातपः ॥ औदुंबरी ताम्रचोरोनरकांते प्रजायते ॥ प्राजापत्यशतं कृत्वा ताम्रं पलशतं दिशेत् ॥ ९ ॥ अथ कुष्टरोगप्रतिमादानं ॥ कर्मविपाकसारे ॥ कुष्टः कुंचितसर्वांगः स्थूलो यज्ञोपवीतधृक् ॥ धावन् प्राणहरः क्रुद्धस्त्रिनेत्रः किंकणीयुतः ॥ १० ॥ एवं प्रतिमां कृत्वा सदक्षिणां वेदविदे ब्राह्मणाय दद्यात् ॥ अत्र विशेषस्तु कर्मविपाकग्रंथेषु द्रष्टव्यः ॥ ११ ॥

## कुष्टरोगाच्या कर्मविपाकाचा निर्णय.

शिवधर्मांतील वचन. जो मनुष्य गोवधादि पातकें करितो त्यास कुष्टरोग व नेत्रास अंधपणा होतो. देवग्रहापासून जो दीप हरण करील त्याचे डोळ्यास अंधपणा आणि तो पंगु असा होईल. ॥ १ ॥ जो मनुष्य विटाळशी स्त्रीयेशीं समागम करून स्नान न करितां भोजन करील त्यास कुष्टरोग व ज्वररोगही होतील. विश्वासुक मनुष्यास जो विष देईल तो अपत्यरहित आणि दरिद्री असा होईल. ॥ २ ॥ जो तूप चोरील त्यास कुष्ट आणि कृमी हे रोग उत्पन्न होतील. ॥ ३ ॥ शिवगीतेंतील वचन. जो मनुष्य प्राण्यांचा संहार करितो त्यास कुष्टरोग होतो. तो परिहार होण्याकरितां यतिसांतपन प्रायश्चित्त आचरण करावें. असें श्रीशंकरांनीं सांगितलें आहे. ॥ ४ ॥ शातातपाचें वचन. दीक्षित (ज्यानें यज्ञ केला आहे) अशा ब्राह्मणाच्या स्त्रीयेशीं समागम केला असता रक्तकुष्टरोग उत्पन्न होतो. तें पातक परिहार होण्यास चार प्राजापत्य प्रायश्चित्त आचरण करावें. ॥ ५ ॥ बंधूच्या स्त्रीयेशी गमन केलें असतां घो-

त्याचे ठायीं कुष्ट होतें. आपल्या मुलाच्या स्त्रीयेशीं गमन केलें असतां काळें कोड उत्पन्न होतें. तें परिहार होण्यास षड्वार्षिक प्रायश्चित्त आचरण करावें. आणि तूप, तीळ याच्या योगानें हवन करावें. ॥ ६ ॥ शातातपाचें वचन. ब्रह्महत्या करणारे मनुष्यास नरकामध्यें बरेच दिवस वास करावा लागतो, त्यानंतर या लोकीं जन्म येतें. नंतर त्याचे शरीरास चित्र विचित्र कुष्टरोग होतो. तो परिहार होण्यास तीन प्राजापत्यें प्रायश्चित्तें करून बारा तोळे रुपें ब्राह्मणास द्यावें. ॥ ७ ॥ शातातपाचें वचन. जो तांबें चोरितो त्यास नरकभोगानंतर जन्म प्राप्त होतो. आणि त्याचे देहास औदुंबर कुष्ट होतें, तें परिहार होण्यास त्यानें शमर प्राजापत्य प्रायश्चित्त करून चारशें तोळे तांबें ब्राह्मणास दान करावें. ॥ ८ ॥ कर्मविपाकसारांत कुष्टरोगाची प्रतिमा दान करण्यास सांगितली आहे. ज्याचें सर्व अंग संकुचित झालें आहे, स्थूल यज्ञोपवीत धारण करणारा, दुसऱ्याचे प्राणनाश करण्याविषयीं तयार, ज्यानें आपल्या शरीरावर लहान घुंगरे धारण केलीं आहेत, ज्यास तीन डोळे आहेत, अशी कुष्टरोगाची प्रतिमा करावी. आणि ती वेदवेत्त्या विद्वान ब्राह्मणास द्यावी. येथील विशेष प्रकार कर्मविपाकग्रंथांत पाहावा. ॥ ९ ॥ १० ॥ ११ ॥

## अथ मुखरोगकर्मविपाकनिर्णयः

शातातपः ॥ तांबूलहरणाच्चैव श्वेतोष्ठः संप्रजायते ॥ स दक्षिणासहितं दद्यात्सवैडूर्यमणिद्वयम् ॥१॥ कर्मविपाकसुधानिधौ ॥ दशाहुर्मुखरोगस्य निदानानि मनीषिणः ॥ सर्वदा परदुःखानां करणं कूटसाक्षिता ॥ २ ॥ गुरौ परुषभाषा च पैशुन्यानृतवादिता ॥ परोष्ठजिह्वयोश्छेद अश्रुपादंतपातनम् ॥ ३ ॥ परवार्ताविघातश्च प्रायश्चित्तमथोच्यते ॥ कर्मविपाकसंग्रहे ॥ धर्मकर्माण्युपक्रम्य मध्ये व्रजति यो नरः ॥ ४ ॥ अविद्यमान् दोषान् वान्येषां यः प्रकाशयेत् ॥ स भवेत्पूतिवक्त्रस्तु कुर्याच्चांद्रायणव्रतम् ॥ ५ ॥ धूपस्य चंदनादिभिः सुगंधीनि च शक्तितः ॥ दद्याद्विप्राय पंचाशत् ब्राह्मणान् भोजयेत्तथा ॥ ६ ॥ कर्मविपाकसंग्रहे ॥ पश्चाच्चा विघ्नकर्ता मूकरोगी प्रजायते ॥ मर्मोद्घाटकोन्येषां मुखरोगः प्रजायते ॥ ७ ॥ सहस्रत्रितयं कुर्यान्मंत्रैर्व्याहृतिभिर्घृतं ॥ जुहुयाद्विसहस्रं च दद्यात् भूम्यादिकांचनम् ॥ ८ ॥ शातातपः ॥ श्वमार्जारादिभिः स्पृष्टं भुक्त्वा दुर्गंधवान् भवेत् ॥ पीत्वा त्रिरात्रं गोमूत्रं भोजयेद्ब्राह्मणत्रयम् ॥ ९ ॥ कर्मविपाकसमुच्चये ॥ दुष्टभाषी भवेत् वक्त्ररोगी शोणितपित्तवान् ॥ कृच्छ्रातिकृच्छ्रौ कुर्वीत चांद्रायणमथापरं ॥ १० ॥ कुर्यात्पुन्मौष्ठहोमं च गायत्रीमयुतं जपेत् ॥ दद्यात् हिरण्यं व्रीहींश्च मुखरोगस्य शांतये ॥ ११ ॥ बौधायनः ॥ वाग्विरोधं गुरोः कृत्वा मुखरोगी भवेन्नरः ॥ तस्य दानेन विहितः मनोदारोपमुन्यते ॥ १२ ॥ गोरसं गजंदाप दंतावरेतेन वा ॥ रोपयेत्स्वर्णं गौल्यं यथा ॥ भवतोपि वा ॥ १३ ॥ तदर्धं पादपर्तो दवत्म रजतेन ह ॥ पुष्पं समौक्तिकं कुर्यादशनानां समौ तथा ॥ एवं मखान

कृत्वा विमाय दद्यात् ॥१४॥ अत्र विशेषस्तु कर्मविपाकसंग्रहे द्रष्टव्यः ॥ शातातपः ॥ सूकरे निहते चैव दंतुरो जायते नरः ॥ स दद्यात्तु विशुद्ध्यर्थं घृतकुंभं सदक्षिणम् ॥१५॥ शातातपः ॥ श्यावदंतः स्यात्प्राजापत्याष्टकं चरेत् ॥ शर्करायास्तुलाः सप्त प्रदद्यात्पापशुद्धये ॥ १६ ॥ जपित्वा च महारौद्रं दशांशं जुहुयात्तिलान् ॥ ततोभिषेकः कर्तव्यो मंत्रैर्वरुणदेवतैः ॥ १७॥ एवं कृते दोषपरिहारोभवेत् ॥

## मुखरोगाच्या कर्मविपाकाचा निर्णय.

शातातपाचें वचन. तांबूल चोरल्यापासून पांढरे ओठ होतात. तो दोष परिहार होण्याकरितां ब्राह्मणास दक्षिणासहित वैडूर्यमणि दान करावे. ॥ १ ॥ मुखरोग उत्पन्न होण्यास दहा कारणें सांगितलीं आहेत. सार्वकाळ दुसऱ्यास दुःख उत्पन्न करणें, खोटी साक्ष देणें, आपल्या गुरूशीं निष्ठुर भाषण करणें, चाडी करणें, खोटें बोलणें, दुसऱ्याचे ओठ आणि जीभ यांचा छेद करणें, दुसऱ्यास दोष नसतांना दोष लावणें, दांत पाडणें, दुसऱ्याची बातमी फोडणें, या कारणांनीं मुख रोग होतो. ॥ २ ॥ ३ ॥ कर्मविपाकसंग्रहांतील वचन. जो धर्मकर्मास आरंभ करून तें समाप्त न करतां मध्येंच निघून जाईल अथवा दुसऱ्याचे दोष नसोन जो दोष प्रकाशित करितो तो पूतिवक्र ह्मणजे त्याच्या तोंडाची दुर्गंधी येईल. तें परिहार होण्यास चांद्रायण प्रायश्चित्त करावें. ॥ ४ ॥ ५ ॥ धूप, माळा, चंदन इत्यादिक सुगंधी द्रव्यें ब्राह्मणास देऊन नंतर पन्नास ब्राह्मण भोजन घालावें. ह्मणजे मुखरोग नाहींसा होतो. ॥ ६ ॥ जो दुसऱ्याच्या वाणीस विघ्न करितो, तसेंच दुसऱ्याचें मर्म काढितो त्यास मुखरोग होईल. त्यानें तीन कृच्छ्र प्रायश्चित्त आचरण करावें. आणि ब्राह्मणास तांबूल आणि सोनें दान करावें. ह्मणजे मुखरोगाचा परिहार होईल. ॥ ७ ॥ ८ ॥ शातातपाचें वचन. कुत्रें, मांजर इत्यादिकांनीं चाटलेलें अथवा स्पर्श केलेलें अन्नपानादि जो भक्षण करील अथवा प्राशन करील त्यास मुखदुर्गंधी रोग उत्पन्न होईल. तो परिहार होण्यास त्रिरात्र गोमूत्र प्राशन करून तीन ब्राह्मणास भोजन घालावें. ॥ ९ ॥ कर्मविपाकसमुच्चयांतील वचन. जो मनुष्य खोटी साक्ष देईल त्यास मुखरोग आणि रक्तपित्त रोगही होतात. हे परिहार होण्यास कृच्छ्र, अतिकृच्छ्र हीं प्रायश्चित्तें करून चांद्रायण प्रायश्चित्त करावें. व कूष्मांड होम करून दहा हजार गायत्रीजप करावा, आणि ब्राह्मणास सुवर्ण आणि तांबूल दान करावें. ह्मणजे मुखरोग दूर होईल. ॥ १० ॥ ११ ॥ बौधायनाचें वचन. गुरूच्या भाषणास जो विरोध करितो त्या मनुष्यास मुखरोग होईल. ॥ १२ ॥ तो परिहार होण्यास उपाय सोनें, रुपें, तांबें, आपल्या शक्त्यनुरूपयांतील एक धातु घेऊन त्याचे चार अथवा दोन तोळे वजनाचा एक हत्ती करावा. ॥ १३ ॥ त्याचे दोन दांत रुप्याचे करावे. शेपूट मोत्याचें करावें. डोळ्यास रत्नें लावावीं असा उत्तम हत्ती तयार करून तो ब्राह्मणास द्यावा. या संबंधानें विशेष विचार कर्मविपाकसंग्रहामध्यें पहावा. ॥ १४ ॥ डुकर मारलें असतां दंताळा असा मनुष्य होतो. तें पाप दूर होण्याकरितां ब्राह्मणास दक्षिणेसहित घृतकुंभ दान करावा.

॥ १५ ॥ शातातपाचें वचन. काळे दांत असतील त्यांनीं तो दोष जाण्याकरितां आठ प्राजापत्य प्रायश्चित्तें करावीं. तसेंच तें पातक नाहींसें होण्यास सात तुळा साखर दान करावी. व महारुद्राचा जप करून त्याचे दशांश तीळांचें हवन करावें. नंतर वरुणदेवतेच्या मंत्रानें अभिषेक करावा. असें केल्यानें दोष परिहार होईल. ॥ १६ ॥ १७ ॥

## अथ जिव्हारोगकर्मविपाकनिर्णयः

कर्मविपाकसमुच्चये ॥ जिव्हारोगनिदानानि चत्वार्यार्याः प्रचक्षते ॥ गुरौ परुषभाषित्वमन्यदुःखकृतिः सदा ॥ १ ॥ शातातपः ॥ पक्वान्नहरणाच्चैव जिव्हारोगः प्रजायते ॥ गायत्र्याः प्रजपेल्लक्षं दशांशं जुहुयात्तिलैः ॥ २ ॥ शातातपः ॥ परेषां दुःखकरणात्सर्वदानृतभाषणात् ॥ जिव्हाच्छेदात्तथान्येषां पक्षपाताच्च संसदि ॥ जिव्हारोगी भवेदास्ये व्रणी चैवाभिजायते ॥ ३ ॥ पराकद्वितीयं चैव होमः कूष्मांडसंज्ञकः ॥ कयानश्चित्रसूक्तस्य जपो होमस्तथैव च ॥ ४ ॥ ब्रीह्यादीनां तथा दानमौषधस्य च संस्मृतं ॥ जपहोमसंख्याष्टोत्तरशतादिः ॥ ५ ॥

## जिव्हारोगाच्या कर्मविपाकाचा निर्णय.

कर्मविपाक समुच्चयांतील वचन. जिव्हारोगाचीं कारणें. गुरुशीं कठोरपणानें भाषण करणें, दुसऱ्यास दुःख उत्पन्न करणें, शिजलेलें अन्न चोरणें हीं आहेत. हें दूर होण्यास लक्ष गायत्रीमंत्राचा जप करावा. आणि त्याचे दशांश तिळांनीं होम करावा. ॥ १ ॥ २ ॥ शातातपाचें वचन. दुसऱ्यास दुःख करणें, खोटें भाषण करणें, दुसऱ्याची जिव्हा तोडणें, सभेमध्यें पक्षपात करणें, यापासून जिव्हारोग तसेंच मुखामध्यें व्रण उत्पन्न होतो. ॥ ३ ॥ हा रोग परिहार होण्यास दोन पराक प्रायश्चित्ताचरण करावें. तसेंच कूष्मांड होम करावा. आणि कयानश्चित्र या सूक्ताचा जप आणि होम करावा. ब्राह्मणास तांबूल दान करावें. आणि रोग्यास धर्मार्थ औषध द्यावें. येथें जप होम जो करावयाचा तो रोगतारतम्यानें एकशें आठ अथवा एक हजार करावा. ॥ ४ ॥ ५ ॥

## मूकरोगकर्मविपाकनिर्णयः

शातातपः ॥ मूको भ्रातृवधाच्चैव तस्येयं निष्कृतिः स्मृता ॥ तेन कार्यं विशुध्यर्थं पतितचांद्रायणत्रयम् ॥ व्रतांते पुस्तकं दद्यात्सुवर्णपलसंयुतं ॥ ब्राह्मणाय चतुर्वेदविदे वचेण संयुतं ॥ २ ॥ इमं मंत्रं समुच्चार्य ब्राह्मणं तं विसर्जयेत् ॥ सरस्वति जगन्मातः शब्दब्रह्माधिदैवते ॥ दुष्कर्मकारिणं पापं रक्षमां परमेश्वरि ॥ ३ ॥ अथैडमूकत्वहरं शातातपः ॥ विद्यापुस्तकहारी च एडमूकः प्रजायते ॥ इतिहासशतं दद्याद्ब्राह्मणाय सदक्षिणं ॥ ४ ॥ गुर्वाज्ञां विना वेदाद्यध्येता विद्याहारी ॥ इतिहासशतं भारतं दद्यात् ॥

## मूकरोगाच्या कर्मविपाकाचा निर्णय.

शातातपाचें वचन. बधूचा नाश केल्यापासून मनुष्य मुका होतो. तो दोष जाण्याकरितां त्यानें तीन यतिचांद्रायणें करावींत ॥ १ ॥ प्रायश्चित्त समाप्ती नंतर चतुर्वेद जाणणाऱ्या ब्राह्मणास चार तोळे सोनें आणि वस्त्र यांनीं युक्त असे पुस्तक द्यावें. ॥ २ ॥ पुस्तकदानाचा मंत्र ॥ सरस्वति जगन्मातः शब्दब्रह्माधिदैवते ॥ दुष्कर्मकारिणं पापं रक्ष मां परमेश्वरि ॥३॥ हा मंत्र ह्मणून ब्राह्मणास दान देऊन विसर्जन करावें. शातातपाचे वचन. जो विद्या आणि पुस्तक चोरितो तो एडमूक ( ज्यास ऐकावयास व बोलावयास येत नाहीं तो. ) असा होतो. तो दोष जाण्याकरिता ब्राह्मणास भारताचें पुस्तक द्यावें. येथें विद्याहरण ह्मणजे गुरूच्या आज्ञेवाचून वेदादिकाचें अध्ययन करणें. ॥ ४ ॥

## कर्णरोगकर्मविपाकनिर्णयः

कर्मविपाकसुधानिधौ ॥ कर्णरोगनिदानानि भाषंते त्रीणि सूरयः॥ पैशून्यं कर्णभेदं च तथा वार्ताभिघातनम् ॥ १ ॥ अथ कर्णपूयहरं ॥ कर्मविपाकसंग्रहे ॥ मातापितृगुरूणां च देवब्राह्मणयोस्तथा ॥ शृणोति निंदां बुध्या यः कर्णाभ्यां तस्य शोणितम् ॥ २ ॥ पूयं च प्रस्रवेत्तस्य शांतिः कृच्छ्रचतुष्टयात् ॥ हिरण्यरक्तवस्त्राणां दानाद्ब्राह्मणभोजनात् ॥ ३ ॥ जपाद्धोमाच्च भवति सौरमंत्रेण शक्तितः ॥ जपहोमसंख्या अष्टोत्तरशताद्ययुतांता ॥ ४ ॥ अथ कर्णक्रिमिहरं ॥ कर्मविपाकसमुच्चये ॥ सर्वाचारविहीनश्च प्रेतश्राद्धाशनेरतः ॥ स भवेत्क्रिमिकर्णस्तु तत्पापस्यापनुत्तये ॥ ५ ॥ दद्यान्नीलवृषान् पंच यथोक्तविधिना नरः ॥ विधिना वृषदानंचगोवत्सांवरकांचनमित्यनेन ॥ ६ ॥ अथ बाधिर्यहरं ॥ कर्मविपाकसुधानिधौ ॥ बाधिर्यस्य निदानानि त्रीणि शास्त्रातिलंघनं ॥ उन्मार्गवर्तिता चैव महाशब्दप्रकाशनमिति ॥७॥ शातातपः॥ स्वसृघाती तु बधिरोनरकांते प्रजायते ॥ तेन कार्यं विशुध्यर्थं यतिचांद्रायणत्रयम् ॥ ८ ॥ व्रतांते पुस्तकं दद्यात्सुवर्णपलसंयुतं ॥ ब्राह्मणाय चतुर्वेदविदे वस्त्रेण संयुतं॥९॥ इमं मंत्रं समुच्चार्य ब्राह्मणं तं विसर्जयेत् ॥ इमं मंत्रं समुच्चार्य पुस्तकं दद्यादित्यन्वयः ॥ १० ॥ सरस्वति जगन्मातः शब्दब्रह्माधिदैवते ॥ दुष्कर्मकारिणं पापं रक्ष मां परमेश्वरि ॥ ११॥ अथ कर्णशूलहरं ॥ कर्मविपाकसमुच्चये ॥ मैथुनं शृणुयात्पित्रोः कर्णशूली भवेत्तु सः ॥ स चैव बधिरः कष्टं कपालेऽसह्यशब्दवान् ॥ निष्कविंशतिकंदद्याद्ब्राह्मणाय कुटुंबिने ॥ विष्णुप्रकाशकान्मंत्रान् जपेद्रोगोपशांतये ॥ १२ ॥ वैष्णवा मंत्राः पुरुषसूक्तं तद्विष्णोरितिद्वयोश्चजपसंख्या चाष्टसहस्रमष्टशतमयुतं वा ॥ अपामार्जनमंत्रेण मंत्रितं सलिलं पिबेत् ॥ भोजनं ब्राह्मणेभ्यश्च प्रदद्याद्दक्षिणां तथा ॥ १३॥

# कर्णरोगाच्या कर्मविपाकाचा निर्णय.

कर्मविपाकसुधानिधींतील वचन. चाढी करणें, दुसऱ्याचा कान फोडणें, तसेंच गुप्त बातमी प्रसिद्ध करणें, हीं तीन कारणें कर्णरोगास सांगितलीं आहेत. ॥ १ ॥ मातोश्री, पिता, गुरु, देव, ब्राह्मण यांची निंदा जो बुद्धिपुरःसर श्रवण करितो त्याचे कानापासून रक्त आणि पू हीं वाहूं लागतात. त्याची शांतता होण्याकरितां चार कृच्छ्र प्रायश्चिताचरण करावें. तसेंच सुवर्ण, तांबडी वस्त्रें हीं दान करावीं. ब्राह्मणास भोजन घालावें. ॥ २ ॥ ३ ॥ येथें जप सौरमंत्राचा करावा. होमही त्याच मंत्रानें करावा. जप होमाची संख्या रोग तारतम्यानें एकशें आठ, हजार, दहा हजार इत्यादिक जाणावी. ॥ ४ ॥ जो मनुष्य आचाररहित, तसेंच शवश्राद्ध जेवण्याविषयीं आदर युक्त असा होतो त्याचे कानांत कृमि उत्पन्न होतात. तें पातक दूर होण्यास पांच काळ्या रंगाचे बैल, पांढरें वस्त्र व सुवर्ण यांनी पूजित केलेलें असें शास्त्रोक्तप्रकारानें ब्राह्मणास दान करावें. ॥ ५ ॥ ६ ॥ शास्त्रमर्यादेचें उल्लंघन करणें, वाईट मार्गानें वागणें, गायत्रीमंत्रादिक प्रसिद्ध करणें, या तीन कारणांनीं मनुष्य बहिरा होतो. ॥७॥ शातातपाचें वचन. जो मनुष्य आपल्या बहिणीचा नाश करितो त्यास नरक भोगानंतर जन्म प्राप्त झाल्यावर बधिरपणा येतो. तो दोष जाण्याकरितां त्यानें तीन वसिचांद्रायणें करावीत. ॥ ८ ॥ मतांतीं चतुर्वेदी ब्राह्मणास वस्त्र आणि सुवर्णही द्यावें. त्याचा मंत्र. सरस्वति जगन्मातः हा मंत्र म्हणोन पुस्तक दान करावें. ॥ ९ ॥ १० ॥ ११ ॥ कर्मविपाकसमुच्चयांतील वचन. जो मनुष्य मातापितरांचें मैथुन श्रवण करील त्यास कर्णशूल, बधिरपणा तसेंच कानाळ दुखणें, हे रोग उत्पन्न होतात. हे दूर होण्यास ब्राह्मणास पांच निष्क ( निष्क म्हणजे चार रुपये. ) द्यावे. तसेंच पुरुषसूक्त, हरिम्नो, हा विष्णु देवतेचे मंत्रांचा आठ हजार, दहा हजार रोगतारतम्यानें जप करावा. आणि भस्मार्जन मंत्र म्हणून अभिमंत्रित केलेलें पाणी प्राशन करावें. आणि ब्राह्मणास भोजन घालावें. तसेंच दक्षिणा द्यावी. ॥ १२ ॥ या प्रमाणें कर्णरोगाचा निर्णय जाणावा.

## अथ नासिकारोगकर्मविपाकनिर्णयः

नासिकारोगहराणि कर्मविपाकसुधानिधौ ॥ निक्षानभेदकं विप्रं पैशुन्यं नासि· काद्भवः ॥ कर्मविपाकसंग्रहे ॥ ब्राह्मणशाकहर्ता तु शिर्गमाणाधिपाणिकः ॥ पर्यस्त्व· धादेव जायते तस्य निष्कृतिः ॥ १ ॥ वपनमयपूर्वं सम्यक् जपेदष्टशतानि ॥ इक्षुपायिदण्डिम्ना रक्तवासांसि धापयं ॥ दद्याद्देवद्विजगवां सुपांत्सूनां स्वशक्तिः ॥ २ ॥ शातातपः ॥ शांतीपदाभिसंयोगेन जायते नासिकाव्रणी ॥ भाषेतर्सार्थं· स्वर्ण मासकायकमदद्यादु ॥ १ ॥

## नासिकारोगाच्या कर्मविपाकाचा निर्णय.

कर्मविपाकसुधानिधींतील वचन. चाड्या करणें हें नासिकारोगास कारण आहे. कर्मविपाक संग्रहांतील वचन. मीठ, भाज्या चोरणारा यास नेहेमी नासिका वाहणें व पाय फुटणें, व घोगरा स्वर होणें हे रोग होतात. हे दूर होण्यास उयन्त्रय या ऋचेचा दहा हजार आठ असा जप करावा. तीळ व तूप यांचें हवन करावें. देव, ब्राह्मण, गायी यांची पूजा करून तांबडीं वस्त्रें व सोनें हें दान करावें. ॥ १ ॥ २ ॥ शातातपाचें वचन. अग्निहोत्र्याच्या स्त्रीयेशीं समागम केल्यास नासिकाव्रण रोग उत्पन्न होतो. तो दूर होण्यास चार चांद्रायणप्रायश्चित्तें करावींत. ॥ ३ ॥

## अथ कंठरोगकर्मविपाकनिर्णयः

कर्मविपाकसुधानिधौ ॥ निदानं कंठरोगस्य गलगंडस्य च स्मृतं ॥ गणद्रव्यापहरणं तस्याद्दार्थविनिष्कृतिः ॥ १ ॥ शातातपः ॥ अश्वे विनिहते चैव वक्रकंठः प्रजायते ॥ प्राजापत्यानि चत्वारि सप्तधान्यानि चोत्सृजेत् ॥ शतं पलानि दद्याच्च चंदनं सद्द्विजातये ॥ २ ॥ अथ दीर्घगलत्वहरणे शातातपः ॥ बकघाती दीर्घगलो दद्याद्गां धवलां शुभां ॥ अथापरं ब्रह्मांडे ॥ अभक्ष्यभक्षदोषात्तु कंठरोगः प्रजायते ॥ कृच्छ्रत्रयं प्रकुर्वीत दद्याद्धेनुं सदक्षिणाम् ॥ ३ ॥ कंबलदानं च कार्यं ॥ कंबलदान मंत्रस्तु ॥ कुणिच्छादनलोकानां शीतवातभयापह ॥ सर्वदुःखहरं यस्मादतः शांतिं प्रयच्छ मे ॥ ४ ॥

## कंठरोगाच्याकर्म विपाकाचा निर्णय.

कर्मविपाक सुधानिधींतील वचन. गलगंड, कंठरोग हे समुदायाचें द्रव्य हरण केल्यापासून होतात. ॥ १ ॥ अश्वाचा नाश केला असतां वक्रकंठ ( वांकडा गळा. ) होतो. तो दोष जाण्यास चार प्राजापत्यें करावींत. तसेंच ब्राह्मणास सप्तधान्यें व चंदन द्यावें. ॥ २ ॥ शातातपाचें वचन. जो बगळ्याचा नाश करितो त्याचा दीर्घ गळा होतो तो दोष जाण्यास ब्राह्मणास पांढरी गाय द्यावी. ब्रह्मांडपुराणांतील वचन. भक्षण करण्यास अयोग्य असे पदार्थ भक्षण केल्यांपासून कंठरोग उत्पन्न होतो. तो दूर होण्यास तीन कृच्छ्रप्रायश्चित्तें करून ब्राह्मणास दक्षिणा सहित गोप्रदान द्यावें. तसेंच कंबल दान करावें. त्यास मंत्र कुणिच्छादनलोकानां शीतवात भयापह ॥ सर्वदुःखहरं यस्मादतः शांतिं प्रयच्छ मे ॥ ३ ॥ ४ ॥

## अथ नेत्ररोगकर्मविपाकनिर्णयः

कर्मविपाकसुधानिधौ ॥ अक्षिरोगनिदानानि चत्वारीति प्रचक्षते ॥ कृतघ्नतान्यदृग्भेदः परनारीनिरीक्षणं ॥ तद्ब्रह्मज्योपदेशेन द्विपु दृष्टेः प्रसज्जनम् ॥ १ ॥

कर्मविपाकसमुच्चये ॥ परदृष्टिविघातेन भिषग्मिथ्याचरेण च ॥ कामात्परस्त्रियं दृष्ट्वा नेत्ररोगी भवेन्नरः ॥ २ ॥ चांद्रायणं पराकं च पंचाशद्विप्रभोजनं ॥ कुर्याद्वयःसु-पर्णेति चरुणा सर्पिषा तथा ॥ अष्टोत्तरसहस्रं तु जुहुयाद्रोगशांतये ॥ ३ ॥ वर्चो-दासिमंत्रं हि जपेदाज्यं सकांचनं ॥ दद्याद्विप्राय विधिवन्नेत्ररोगः प्रशाम्यति ॥४॥ भोजनं मुद्गप्रधानं ॥ मुद्गान्नं ब्राह्मणे दद्यान्नेत्ररोगापनुत्तये ॥ इतिब्रह्मांडपुराणात् ॥ वर्चोदासीति दशाक्षरो मंत्रः ॥ जपसंख्या सहस्राद्ययुतांता ज्ञेया ॥ ५ ॥ अथ नेत्रपू-यहरं ॥ कर्मविपाकसंग्रहे ॥ दंपतीभ्यां प्रवृत्तं तु मैथुनं यो निरीक्षते ॥ स नेत्रपूययुक्तः स्यादक्षिभ्यामिति मंत्रतः ॥ ६ ॥ जपहोमौ च कुर्वीत शक्त्या ब्राह्मणभोजनं ॥ सह-स्रकलशस्नानं रवेः कुर्याद्विजोत्तमः ॥ ७ ॥ पूयशब्देन दूषिका पुनरग्निश्चक्षुरादि-त्यनेन जपहोमौ समुच्चीयते ॥ स्नानं च सौरसूक्तैः दुग्धाज्यमध्विक्षुरसतीर्थोदकान्यतरैः कुर्यादिति महार्णवः ॥ शातातपः ॥ घृतचौरस्तु पुरुषो जायते नेत्ररोगवान् ॥ उपोष्य स मदद्याद्वै घृतधेनुं विधानतः ॥ ८ ॥

## नेत्ररोगाच्या कर्मविपाकाचा निर्णय.

कर्मविपाक सुधानिधींतील वचन. केलेला उपकार न जाणणें, दुसऱ्याच्या नेत्राचा भेद करणें, परस्त्रियेस दुष्टइच्छेनें पहाणें, औषधाच्या मिषानें दुसऱ्याच्या स्त्रियेकडे पाहणें, हीं चार नेत्र रोग उत्पन्न होण्यास कारणें सांगितलीं आहेत. ॥ १ ॥ कर्मविपाक समुचयांतील वचनाचा अर्थ असाच आहे. ॥ २ ॥ चांद्रायण, पराक, हीं प्रायश्चित्तें करून पन्नास ब्राह्मणास भोजन घालावें. तसेंच वयःसुपर्ण या मंत्रानें चरु आणि तूप यानें एक हजार आठ हवन करावें. म्हणजे नेत्र रोग दूर होतो. ॥ ३ ॥ वर्चोदा या मंत्राचा जप करावा. व ब्राह्मणास तूप आणि सोनें दान करावें. म्हणजे नेत्ररोग दूर होतो. ॥ ४ ॥ ब्राह्मणास मुगाची डाळ व तांदूळ याची खिचडी द्यावी. असें ब्रह्मांडपुराणांत सांगितलें आहे. वर्चोदा असी हा मंत्र दहा अक्षरांचा आहे. याचे जपाची संख्या हजारापासून दहा हजार पर्यंत जाणावी. ॥ ५ ॥ कर्मविपाक संग्रहांतील वचन. जो मनुष्य नवरा बायकोचें प्रवृत्त झालेलें असें मैथुन अवलोकन करितो. त्याचे नेत्र चिपडें आणि पू यानीं युक्त असे होतात. तो दोष जाण्यास अक्षिभ्यां या मंत्राचा जप व होम करावा. शक्तिप्रमाणें ब्राह्मण भोजन करावें. सूर्य प्रतिमेस हजार घागरी पाण्यानें स्नान घालावें. ॥ ६ ॥ ७ ॥ येथें पूयशब्दानें नेत्रमळ घ्यावयाचा अग्निचक्षुरादित्य या मंत्रानें जप होम करावा, स्नान सौरसूक्तानें घालावें. दूध, तूप, उंसाचा रस, तीर्थोदक, यांतील कोणता तरी एक पदार्थ घेऊन स्नान घालावें असें महार्णव ग्रंथांत सांगितलें आहे. शातातपाचें वचन, जो मनुष्य तूप चोरितो त्यास नेत्ररोग उत्पन्न होतात. त्यानें एक दिवस उपोषण करून ब्राह्मणास घृतधेनु द्यावी. घृतधेनुचा प्रकार क्षयरोग प्रकरणांत सांगितला आहे. ॥ ८ ॥

# अथ नीललोचनहरत्वनिर्णयः

शातातपः ॥ शाकहारी च पुरुषो जायते नीललोचनः ॥ ब्राह्मणाय प्रदातव्यं महानीलमणिद्वयम् ॥ ९ ॥ अथ कपिलाक्षित्वहरं ॥ शातातपः ॥ रीतिहृत्कपिलाक्षः स्यादुपोष्य दिवसद्वयं ॥ रीतीं पलशतं दद्यादलंकृत्य द्विजातये ॥ रीतिपित्तलं ॥ १० ॥ अथ मंददृष्टित्वहरं ॥ कर्मविपाकसंग्रहे ॥ उच्छिष्टो यो नरोदित्यं पश्येदुद्यंतमंबरे ॥ मध्यंगतमथास्तं च यातमुच्छिष्टवान् तथा ॥ ११ ॥ नक्षत्राण्यथवा चंद्रं स भवेन्मंददृष्टियुक् ॥ कौर्मे घृतेन चरुणा तेन रश्मिहीने हुताशने ॥ जुहुयादयुतं सम्यगितिशास्त्रविनिश्चयः ॥ १२ ॥ दद्यादन्नं च वै रक्तवासांसि व्याधिशांतये ॥ उद्यन्निति तृचेन चरुघृताभ्यां प्रत्येकं मिलित्वायुतं जुहुयादिति महार्णवः ॥ अथ तिमिरहरं ॥ कर्मविपाकसंग्रहे ॥ देवद्विजगृहे तीर्थे पुण्यस्थाने च संस्थित ॥ प्रदीपं भंजयित्वा तु तिमिरव्याधिमान् भवेत् ॥ १३ ॥ रूपप्रकाशकैर्मंत्रैरभिमंत्र्य जलं ततः ॥ गात्राणि प्रोक्षयेत्तस्मान्मुक्तोभवति किल्बिषात् ॥ १४ ॥ सहस्रकलशस्नानमीश्वरस्यापि कारयेत् ॥ रूपप्रकाशकैः सूर्यप्रकाशकैरुद्यन्नितित्रिभिर्मुखगात्राणि क्षालयेत् ॥ अथाक्षिवेदनाहरं गरुडदानं हेमाद्रौ महार्णवे च पाद्मे ॥ परेषामक्षिरोधेन जायते ह्यक्षिवेदना ॥ वक्ष्यामि तत्प्रकारं तु ब्रह्मणाभाषितं पुरा ॥ १५ ॥ पलेन कारयेद्धेम्ना गरुडं विष्णुवाहनं ॥ राजतौ च तथा पक्षौ रत्नबद्धौ सुविस्तृतौ ॥ १६ ॥ कर्तव्यं चाक्षियुगलं माणिक्याभ्यां प्रकल्पितं ॥ पूजयेत्तच्छुचिर्भूत्वा गंधपुष्पाक्षतादिभिः ॥ होमश्च तत्र कर्तव्यो मंत्रैस्तद्वाचकैः शुभैः ॥ ततो विप्राय सहिरण्य दद्यात्तेनाक्षिरोगनाशो भवेत् ॥ १७ ॥ अथ नक्तांध्यहरगोपालदानं हेमाद्रौ महार्णवे च ब्राह्मे नक्तांध्यं जायते तस्य यो गवां नयनद्वये ॥ करोति धूलिप्रक्षेपं तस्य वक्ष्यामि निष्कृतिं ॥ १८ ॥ विष्णोः श्रीगोपवेषस्य यथाशक्त्या स्वभक्तितः ॥ सुवर्णेन प्रतिमां कृत्वा वेणुवादनतत्परं ॥ बर्हिपीडकसंयुक्तं द्विभुजं भुवनोत्तरं ॥ ततो वेदविदे विप्राय दद्यात् ॥ एवं कृत्वा प्रतीकारं गोपवेषस्य दानतः ॥ अचिरादेव हि सुखी जायते नात्र संशयः ॥ १९ ॥ अथ नेत्रशूलहरं कर्मविपाकसंग्रहे ॥ नग्नां परस्त्रियं दृष्ट्वा सूर्यं वास्तमयोदये ॥ नेत्रशूली भवेत्सोपि नेक्षितुं क्षमते दिशः ॥ २० ॥ वर्चोमेदेहि मंत्रेण होमः स्याद्दष्टाधिकायुतं ॥ वय:सुपर्णइति च नेत्रे सिंचेच्च वारिणा ॥ अक्षिभ्यांतइति जपेत्ततः शूलं प्रशाम्यति ॥ २१ ॥

शातातपाचें वचन. जो मनुष्य भाजी चोरितो त्याचे नेत्र काळ्यारंगाचे होतात. तो दोष जाण्या करिता ब्राह्मणास दोन इंद्रनीलमणी दान करावेत. ॥ ९ ॥ शातातपाचें वचन. जो पितळ चोरितो त्याचे नेत्र काळसर रंगाचे होतात. तो दोष जाण्यास त्यानें दोन दिवस उपोषण क-

रून ब्राह्मणास वस्त्रादिकानीं भूषित करून च्यारशें तोळे पितळ दान करावें. ॥ १० ॥ कर्मविपाकसंग्रहांतील वचन. जो मनुष्य भोजनानंतर मुखादि प्रक्षालन न करिता तसेंच उद्धेपणानें उदयास आलेल्या सूर्यास अथवा दोन प्रहरच्या वेळीं आकाशाच्या मध्यभागीं असणाऱ्या सूर्यास अथवा अस्तास जाणाऱ्या सूर्यास जो अवलोकन करील, तसेंच नक्षत्रादिकास अथवा चंद्रास जो अवलोकन करील त्याची दृष्टी मंद होईल. तो दोष जाण्याकरिता त्यानें तूप आणि चरु याच्या योगानें दहा हजार हवन करावें. ॥ ११ ॥ १२ ॥ ब्राह्मणास अन्न व तांबडीं वस्त्रे दान करावींत. उद्वन्त्य या ऋचेनें तूप आणि चरु याच्या योगानें दहा हजार हवन करावें. असें महार्णवग्रंथात सांगितलें आहे. कर्मविपाकसंग्रहांतील वचन. देव, ब्राह्मण यांच्या घरामध्यें अथवा तीर्थें, पुण्यस्थान यांचे ठायीं असलेला दिवा जो भग्न करितो त्याचे डोळ्यास अवपणाचा रोग होतो. ॥ १३ ॥ हा रोग दूर होण्यास रूपाला प्रकाशित करणारे अशा मंत्रानीं अभिमंत्रित केलेलें पाणी सगळ्या अंगास व नेत्रास लावावें व प्राशन करावें. ह्मणजे या रोगापासून मुक्त होईल. ॥१४॥ शकरास हजार कलशानीं स्नान घालावें. रूप प्रकाशक ह्मणजे सूर्याला प्रकाशित करणारे असे उद्वन्त्य इत्यादिक मंत्र घ्यावेत. नेत्राची पीडा दूर करणारें असें गरुड दान सांगितलें आहे. त्यास पद्मपुराणांतील वचन. दुसऱ्याच्या डोळ्यास रोध केल्यानें नेत्रास पीडा उत्पन्न होते. ती दूर होण्याकरितां चार तोळे सोन्याचा एक गरुड करावा. त्यास रुप्याचे रत्नखचित असे दोन पंख करावेत. आणि दोन्ही डोळ्यास दोन माणिक बसवावेत. ॥ १५ ॥ १६ ॥ नंतर शुचिर्भूत होऊन गंध, अक्षता, पुष्प इत्यादिकानीं पूजा करावी. त्या त्या शुभमंत्रानें होम करावा. नंतर सुवर्ण सहित तो गरुड ब्राह्मणास द्यावा. त्याच्या योगानें नेत्र रोगाचा नाश होतो. ॥ १७ ॥ ब्रह्मपुराणाचें वचन जो मनुष्य गायीचे डोळ्यामध्यें धूळ टाकितो त्याला रातांधळ्याचा विकार होईल. ॥ १८ ॥ त्यानें गोपवेषधारण करणारा असा जो श्रीविष्णु याची सुवर्णाची प्रतिमा करून वेदवेत्या ब्राह्मणास द्यावी. ह्मणजे शीघ्र रातांधळ्याचा रोग नाहींसा होतो. ॥ १९ ॥ कर्मविपाकसंग्रहांतील वचन. जो मनुष्य नग्न अशा परस्त्रीस अवलोकन करितो. तसेंच अस्तास जाणाऱ्या सूर्यास जो अवलोकन करील. त्यास नेत्रशूळ रोग उत्पन्न होईल. आणि तो दिशा पाहण्यास समर्थ होणार नाहीं. ॥ २० ॥ यच्चेमे देहि या मंत्रानें दहा हजार हवन करावें. ययस्सुपर्ण या मंत्रानें पाणि अभिमंत्रित करून अक्षिभ्यांते या मंत्राचा जप करून तें पाणी नेत्रास शिंपडावें ह्मणजे नेत्रशूळ दूर होतो. ॥ २१ ॥

## अथ शिरोरोगकर्मविपाकनिर्णयः

कर्मविपाकसुधानिधौ ॥ ब्रह्मद्वेषः शिरोरोगनिदानं तस्य निष्कृतिः ॥ नागहारी च सततं पुरुषः शीर्षरोगवान् ॥ सीसं पळशतं दद्यादुपोष्य स तु वामरं ॥ १ ॥ कर्मविपाकसमुच्चये ॥ गुरुपरोषी शिरसि रोगवान् जायते नरः ॥ कृच्छ्रातिकृच्छ्रे कु

वीत चांद्रायणमथापरं ॥ २ ॥ औषधानि मदद्याच तिलपात्रं तथैव च ॥ औषधानि शिरोरोगहराणि ॥ अथापरं ॥ ३ ॥ गोहत्यायाव्रतं कुर्यात्पंचाशद्द्विजभोजनं ॥ उद्वयंतृचंजपेच्चैव होमः कुष्मांडसंज्ञकः ॥ भवेदितिशेषः ॥ ४ ॥ अथ शिरोरोगघ्नयज्ञोपवीतदानं ॥ हेमाद्रौ महार्णवे च वायुपुराणे ॥ उपवीतं सुवर्णेन निर्मितं तु पलार्धतः ॥ तदर्धेन तदर्धेन यथाविभवतोपि वा ॥ ५ ॥ उत्तरीयं राजतं वा तावत्या संख्यया कृतं ॥ ब्राह्मणाय ब्रह्मविदे श्रोत्रियाय निवेदयेत् ॥ ६ ॥ मंत्रेणानेन विधिवत्पूजितायांगुलीयकैः ॥ धाताविधाताजगतां परमात्मा चतुर्मुखः ॥ विनाशयतु मे क्षिप्रं रोगवेगं शिरोगतं ॥ दानमंत्रब्रह्मप्रकाशनात्सोत्तरीययज्ञोपवीते ब्रह्मजज्ञानमितिब्रह्मपूजां विधाय दद्यात् ॥ अथैकांशशिरोरोगहरं ॥ नारदः ॥ ब्रह्मचारी यदाश्नीयाद्भिन्नपात्रे विशेषतः ॥ एकांशेन शिरोरोगी भवेदित्याह नारदः ॥ ७ ॥ अक्षिभ्यामित्येतत्सूक्तमष्टोत्तरशतं ॥ जपेचरुघृताभ्यां प्रत्येकमष्टोत्तरशतसकलसूक्तेन होम इतिमहार्णवः ॥ ८ ॥ अथ सूर्यावर्तहरं ॥ औषधस्यापि हरणात्सूर्यावर्तः प्रजायते ॥ तेन सूर्यः प्रदातव्यः निष्कैकस्य यथाविधि ॥ ९ ॥

## शिरोरोगा ( मस्तक रोग ) च्या कर्मविपाकाचा निर्णय.

कर्मविपाकसुधानिधींतील वचन. ब्राम्हणाचा द्वेष केल्यापासून, तसेंच शिसें चोरल्यापासून डोकें दुखणें वगैरे मस्तकरोग होतात. हे परिहार होण्याकरितां एक दिवस उपोषण करून ब्राह्मणास प्यारशें तोळे शिसे द्यावें. ॥ १ ॥ कर्मविपाकसमुच्चयांतील वचन. जो गुरूचा अपराध करितो त्यास मस्तकरोग उत्पन्न होतात. त्याच्या नाशाकरितां कृच्छ्र, अतिकृच्छ्र, चांद्रायण हीं आचरण करावींत. ॥ २ ॥ मस्तकरोग नाश करणारीं अशीं औषधें धर्मादाय द्यावीं. तिळपात्र दान करावें. ॥ ३ ॥ मस्तकरोग नाश होण्याकरितां गोहत्या प्रायश्चित्ताचरण करावें. पन्नास ब्राह्मणास भोजन द्यावें. उद्वयंया ऋचेचा जप व कूष्मांड होम करावा. वायुपुराणांत असें सांगितलें आहे कीं, आपल्या शक्तिप्रमाणें सुवर्णाचें यज्ञोपवीत अथवा रुप्याचें पांघरण्याचें वस्त्र करून वेदवेत्त्या अग्निहोत्री अशा ब्राम्हणास पूजा करून धाताविधाता हा मंत्र म्हणून दान करावें. ॥ ४ ॥ ५ ॥ ६ ॥ नारदाचें वचन. ब्रम्हचारी यानें फुटकें पात्रामध्यें भोजन केलें असतां मस्तकाचा एकच भाग दुखणें हा रोग होईल. ॥ ७ ॥ त्यानें अक्षिभ्या या सूक्ताचा एकशें आठ जप करावा. तसेंच चरु आणि तूप यांचें एकशें आठ पूर्वोक्तसूक्तानें हवन करावें ॥ ८ ॥ सूर्यावर्त म्हणजे अर्धें मस्तक दुखणें, याचा निर्णय औषध चोरल्यापासून सूर्यावर्त रोग उत्पन्न होतो तो जाण्यास आपल्या शक्तिप्रमाणें सोनें अथवा रुपें याचा सूर्य करून ब्राम्हणास दान करावा म्हणजे सूर्यावर्त रोग नाहींसा होतो. याप्रमाणें शिरोरोगाच्या कर्मविपाकाचा निर्णय जाणावा ॥ ९ ॥

## अथ स्फोटरोगकर्मविपाकनिर्णयः

कर्मविपाकसंग्रहे ॥ चांडालकृतवापीषु तडागे कूपकादिषु ॥ स्नात्वा पीत्वा च सर्वांगे दाहवान् हस्तपादयोः ॥ १ ॥ स्फोटयुक्तस्तु स भवेदित्यपि प्रतिजन्मनि ॥ अनिर्दशाया गोः पीत्वा पयो विस्फोटवान् भवेत् ॥ उपवासत्रयं कुर्याद्भोजयेद्विंशति द्विजान् ॥ २ ॥

## स्फोटरोगा (फोडरोगा) च्या कर्मविपाकाचा निर्णय.

कर्मविपाकसंग्रहांतील वचन. जो मनुष्य चांडालांनीं केलेल्या विहीर, तळें, आड, इत्यादिकांमध्यें स्नान करील अथवा पाणी प्राशन करील त्याच्या हात पाय सर्वांग याचे ठायीं अन्यजन्मामध्यें दाह आणि फोड हे होतील. तसेंच व्यालेल्या गायीचें दहा दिवसाचे आंतील दूध जो प्राशन करील त्याचे शरीरावर फोड होतील. ते दूर होण्याकरितां त्यानें तीन उपवास करावे. आणि वीस ब्राम्हणास भोजन घालावें. ॥ १ ॥ २ ॥

## अथ पार्श्वस्फोटहरनिर्णयः

कर्मविपाकसंग्रहे ॥ खरकाकादिमांसानां भक्षकः स्फोटवान् भवेत्॥पार्श्वयोस्तन्निवृत्त्यर्थं कृच्छ्रं चांद्रायणं तथा ॥१॥ अतिकृच्छ्रं च कर्तव्यो जपश्चाष्टोत्तरायुतं ॥ शिवसंकल्पसूक्तस्य पार्श्वस्फोटाद्विमुच्यते ॥ २ ॥

## पार्श्व स्फोटाचा निर्णय.

कर्मविपाक संग्रहांतील वचन. जो मनुष्य गाढव, कावळा इत्यादिकांचे मांस भक्षण करितो त्याचे पार्श्वभागाचे ठायीं फोड उत्पन्न होतील. ते दूर होण्याकरितां कृच्छ्र, चांद्रायण, अतिकृच्छ्र प्रायश्चित्ताचरण करावें. तसेंच शिवसंकल्प सूक्ताचा दहा हजार आठ जप करावा म्हणजे पार्श्व स्फोट रोगापासून मुक्त होईल ॥ १ ॥ २ ॥

## अथ स्तनस्फोटहरनिर्णयः

कर्मविपाकसमुच्चये ॥ अवमत्य तु भर्तारं जारमालिंग्य तेन च ॥ सार्द्धं क्रीडति या नारी तमेवानुस्मरत्यपि ॥ १ ॥ तस्यास्तनयोः स्फोटा जायंते जननांतरे ॥ भग्नं च रक्तं स्रवते तद्रोगस्य प्रशांतये ॥ २ ॥ दद्याद्गाः पंचलवणं हरिद्राधान्यमेव च ॥ उमामहेश्वरं चैव पूजयेच्च धने सति ॥ ३ ॥ निष्कद्वादशकं दद्याज्जपेत्तामग्निसूक्तं ॥ तामग्निमितिमध्यप्रतीकेनजातवेदसइतिसप्तर्चं तैत्तिरीयोपनिषत्पठितं सूक्तमुच्यते ॥ धने सति निष्कद्वादशकं दद्यात् ॥ ४ ॥

## स्तनस्फोटाचा निर्णय.

जी स्त्री पतीचा अवमान करून जारास आलिंगन करून त्याला निरंतर आठवून क्रीडा करिते ॥ १ ॥ तीच्या स्तनाचे ठायीं अन्यजन्मीं फोड उत्पन्न होतात. आणि योनीपासून स्राव होतो. तो दूर होण्यास पांच गायी ब्राह्मणास द्याव्या तसेंच मीठ, हळद, धणे हे ब्राह्मणास द्यावे. पार्वतीपरमेश्वराची पूजा करावी. ॥ २ ॥ ३ ॥ द्रव्य असेल तर चार निष्क ब्राह्मणास द्यावेत. आणि तामग्नि या सूक्ताचा जप करावा. ह्मणजे रोगपरिहार होईल. ॥ ४ ॥

## अथ स्त्रीस्तन्याभावकर्मविपाकनिर्णयः

कर्मविपाकसमुच्चये ॥ क्षीरमुष्णाति या नारी पूर्वजन्मनि सुव्रता ॥ जन्मांतरे तु तस्या वै क्षीरं न क्षरतस्तनौ ॥ १ ॥ क्षीरान्नं भोजयेद्विमान् साज्यं समधुमंडकं ॥ अनुलिपेच्च तेनैव ह्युच्छिष्टान्नेन भक्तितः ॥ २ ॥

## स्त्रियेस दूध येत नाहीं त्याचा निर्णय.

जी स्त्री पूर्वजन्मीं दूध चोरिते तिला अन्यजन्माचे ठायीं स्तनास दूध येणार नाहीं. तो दोष परिहार होण्याकरितां ब्राह्मणास तूप, मध, दूध यांच्यासीं सहित मांडे वगैरे अन्नाचें भोजन द्यावें. ब्राह्मणभोजनानंतर त्यांच्या उच्छिष्टानें स्तनास भक्तीनें लेप करावा. ॥ १ ॥ २ ॥

## अथ पुष्पाभावनिर्णयः

महार्णवे॥ क्षुत्पिपासातुरं नारी भर्तारमवमत्य या ॥ मिष्टान्नं स्वयमश्नाति न सा पुष्पवती भवेत् ॥ १ ॥ मिथुनानि च पंचाशद्भोजयेत्तन्निवृत्तये ॥ दद्यात्सौभाग्यवस्तूनि तेभ्यः शक्त्यनुसारतः ॥ २ ॥ इक्षवस्तवराजं च हरिद्रा चैव धान्यकं ॥ विकारवस्तुगोक्षीरं कुसुमं कुंकुमं तथा ॥ ३ ॥ लवणं चाष्टमं ह्येते सौभाग्याष्टकमुच्यते ॥ स्तवराजः सुवर्णरजकः कर्पूरो वा शर्करावेति महार्णवः ॥ विकारः आमिक्षा दध्यादि ॥ ४ ॥

## जी स्त्री अस्पर्श होत नाहीं त्याचा निर्णय.

महार्णवांतील वचन. जी स्त्री क्षुधातुर झालेल्या अशा पतीचा अपमान करून आपण मिष्टान्न भक्षण करिते. ती अन्यजन्मीं अस्पर्श होत नाहीं. तो दोष जाण्यास पन्नास दंपतीस भोजन घालावें. आपल्या शक्तिप्रमाणें ऊंस, सुवर्णाचें रज, हळद, धणे, दुधाचे विकार. ह्मणजे दहीं, लोणी, इत्यादिक. गाईचें दूध, फुलें, केशर, मीठ यांस सौभाग्याष्टक ह्मणतात. हे ब्राह्मणास द्यावे. महार्णवानें स्तवराजशब्दाचा अर्थ कापूर अथवा साखर असा केला आहे. ॥१॥२॥३॥४॥

# अथ वंध्यात्वहरकर्मविपाकनिर्णयः

कर्मविपाकसुधानिधौ ॥ गुरुद्वेषो बालघातः परहिंसा तथैव च ॥ प्राणिभक्षणमन्येषां प्राण्यंतरसुखेषु च ॥ १॥ द्वेषः प्राण्यंडजग्धिश्च मृगशावहतिस्तथा ॥ अष्टकादिषुश्राद्धेषु पितृकर्माविधायिता ॥ २ ॥ मातुर्वियोजनं वत्सैस्तेषां निष्कृतिरुच्यते ॥ वंध्यात्वं च दत्तकादिपुत्रसत्वेपि ॥ ३ ॥ मनुना पुत्रप्रतिनिधीनाहुरितिप्रतिनिधित्वोक्त्या तस्मिन् पुत्रत्वाभावबोधनात् ॥ पिता पुत्रस्य जातस्य पश्येच्चेज्जीवतोमुखमितिबह्वृचश्रुतौ जातशब्दोक्तेश्च गर्भस्रावे च न मृतापत्यत्वं ॥ गर्भेनापत्यशब्दप्रयोगात् ॥ किंत्वनपत्यत्वमेव ॥ पितुस्तु जीवत्पुत्रमुखदर्शनोत्तरं पुत्रमरणेपि न लोकहानिः उक्तबह्वृचश्रुतेः ॥ ४ ॥ अनपत्यं च स्वर्गादेः प्रतिबंधकं न मुक्तेः ॥ नापुत्रस्य लोकोस्तीतिश्रुतेः ॥ मुक्तौ लोकशब्दाप्रसिद्धेः ॥ ५ ॥

# वांझपणाकर्मविपाकनिर्णय.

कर्मविपाकसुधानिधींतील वचन. गुरूचा द्वेष करणें, बालहत्या करणें, दुसऱ्याची हिंसा करणें, प्राणी भक्षण करणें, दुसऱ्या प्राण्याच्या सुखाचा द्वेष करणें, ॥ १ ॥ प्राण्यांचीं अंडीं खाणें, हरिणाचे बालकाचा नाश करणें, अष्टकादि श्राद्धें न करणें, मातोश्री व मुलें यांची ताडातोड करणें, याच्या योगानें अपत्यहीनता येते. ॥ २ ॥ दत्तकादि पुत्र असताही वंध्यात्व जात नाही. ॥ ३ ॥ कारण मनूनें दत्तकादिक पुत्र पुत्रसदृश असें सांगितलें आहे. अर्थात् पुत्रसदृशत्व सांगितल्यामुळें प्रत्यक्ष पुत्रपणा त्यास येत नाहीं. तसेंच आश्वलायनश्रुतिमध्यें जन्मास आलेला जो पुत्र याचें मुख पाहिलें असतां पितृऋणापासून मुक्त होतो. येथें जन्मास आलेला असा शब्द आहे यामुळें गर्भस्राव झाला असता मृतापत्य न येत नाहीं. कारण गर्भाचे ठायीं अपत्यशब्दाचा प्रयोग नाहीं. पित्यास जीवत्पुत्राचें मुख दर्शन झाल्यानंतर जरी पुत्र मृत होईल. तरी त्यामुळें पित्याची स्वर्गलोक हानि होत नाहीं. ॥ ४ ॥ अपत्यशून्यता ही स्वर्गादिकास प्रतिबंधक आहे; मुक्तीस नाहीं. कारण अपुत्रास लोक नाहीं अशी श्रुति आहे. आणि मुक्तीचे ठायी लोकशब्दाची प्रसिद्धी नाहीं. ॥ ५ ॥

# अथ गर्भस्रावहरयज्ञोपवीतदाननिर्णयः

तत्र वृद्धगौतमः ॥ स्रवद्गर्भा भवेद्यस्या स्त्री पातयेत् हंति या विधेः ॥ वायुपुराणे ॥ यज्ञोपवीतं कुर्वीत कांचनं तु स्वशक्तितः ॥ १ ॥ अत्यंतवर्णयुक्तेन राजतं चोत्तरीयकं ॥ अत्यंतवर्णयुक्तमित्यर्थः ॥ तेन कांचनेन पलार्धेन तदर्धेन तदर्धेनापि वा पुनः ॥ २ ॥ इदं परिमाणमुत्तरीयस्यापि ॥ गर्भिण्यंशे तु देयं मौक्तिकं यवमेव च ॥

यज्ञोपवीतस्य ग्रंथिप्रदेशे मौक्तिकं ॥ एवं यज्ञोपवीतमुत्तरीयं च कृत्वा पंचगव्येन गायत्र्या प्रक्षाल्य वेदविदे ब्राह्मणाय सदक्षिणाकं दद्यात् ॥ अत्रविषये विशेषस्तु कर्मविपाकसंग्रहे द्रष्टव्यः ॥ ३ ॥

## गर्भस्रावास नाशक असें जें यज्ञोपवीतदान त्याचा निर्णय.

वृद्धगौतमाचें वचन. जी स्त्री विषादिकानें बालकाचा नाश करिते. तीचा गर्भस्राव होतो. वायुपुराणांतील वचन. गर्भस्राव परिहार होण्याकरिता आपल्या शक्तिप्रमाणें सुवर्णाचें यज्ञोपवीत करावें. त्याचें उत्तरीय वस्त्र करावें. यज्ञोपवीताच्या गाठीस मोति लावावें. आणि उत्तरीयाच्या ग्रथीस हिरा बसवावा. या प्रमाणें यज्ञोपवीत आणि उत्तरीय करून पंचगव्यानें गायत्री मंत्र म्हणून यज्ञोपवीत आणि उत्तरीयाचें प्रक्षाळन करून वेदवेत्या ब्राह्मणास दान करावें. या संबंधाचा विशेष विचार तर कर्मविपाकसंग्रहामध्यें पाहावा. ॥ १ ॥ २ ॥ ३ ॥

## अथ मृतपुत्रत्वकर्मविपाकनिर्णयः

हंति वै बालकं सुप्तं विषशस्त्रादिभिस्तथा ॥ तेन सा जायते वंध्या मृतवत्सा च नारकी ॥ १ ॥ तत्पातकविनाशाय तया कार्यं प्रयत्नतः ॥ सौवर्णं बालकं कृत्वा दद्याद्दोलासमन्वितं ॥ २ ॥ अनड्वाहं ततोदद्यादृषद्वयसमन्वितं ॥ तत्पातकविनिर्मुक्ता पश्चाद्भवति पुत्रिणी ॥ ३ ॥ इदं स्त्रीकर्तृकमेव ॥ अथापरं शातातपः ॥ बालघाती च पुरुषो मृतवत्सः प्रजायते ॥ ब्राह्मणोद्वाहने चैव कर्तव्य तेन शुध्यति ॥ ४॥ श्रवणं हरिवंशस्य कर्तव्य च यथाविधि ॥ महारुद्रजपं चैव कारयेच्च यथाविधि ॥ ५ ॥ जुहुयाच्च दशांशेन दूर्वामाज्यपरिप्लुतां । एकादशपशूंश्चैव दद्याद्वित्तानुसारतः ॥ ६ ॥ अन्येभ्योपि यथाशक्त्या द्विजेभ्यो दक्षिणां दिशेत् ॥ स्नापयेद्दंपती पश्चात्मंत्रैर्वरुणदैवतैः । ७ ॥ आचार्याय प्रदेयानि वस्त्रालंकरणानि च ॥ एकादशनिष्का एकादशऋत्विग्भ्यो इत्यर्थः ॥ ८ ॥ हरिवंशश्रवणविधिस्तु कर्मविपाकसंग्रहे द्रष्टव्यः ॥

## ज्याची संतती उत्पन्न होऊन मृत होत असेल त्याचा विचार.

जी स्त्री विष, शस्त्र इत्यादि उपायानें बाळकाचा नाश करिते. ती स्त्री वंध्या अथवा संतती झाली असता मृत होणारी अशी होते. ॥ १ ॥ ते पाप नाश होण्याकरिता सोन्याचा एक बालक व पाळणा करून ब्राम्हणास दान करावा आणि दोलासहित तो बालक व दोन वर्षे व एक बैल दान करावा म्हणजे त्या पातकापासून मुक्त होऊन स्त्री पुत्रवती अशी होते. ॥ २ ॥ ॥ ३ ॥ शातातपाचें वचन जो मनुष्य बालहत्या करितो त्याची मुलें मृत होतात तो दोष जाण्याकरिता त्यानें ब्राम्हणाचें लग्न करून द्यावें. ॥ ४ ॥ तसेंच शास्त्रांत सांगितल्याप्रमाणें हरिवंश

श्रवण करावा, महारुद्र जप करावा. ॥ ५ ॥ जपाचे दशांश तूपांत बुडविलेल्या अशा दूर्वांनी हवन करणें, आपल्या शक्तीप्रमाणें अकरा बैल ब्राह्मणास दान करावे. ॥ ६ ॥ अन्य ब्राह्मणास दक्षिणा द्यावी वरुण देवतेच्या मत्रानें दंपतीस स्नान घालावें. आचार्यास वस्त्रालंकार द्यावे. ऋ-त्विजास अकरा निष्क द्यावे, हरिवंश श्रवणाचा प्रकार कर्मविपाकसंग्रहामध्यें पाहावा. ॥७॥८॥

## अथ मृतभार्याकर्मविपाकनिर्णयः

कर्मविपाकसंग्रहे ॥ ज्येष्ठे भ्रातर्यनूढे तु योनुजोद्वहति स्वयं ॥ स भवेन्मृतपत्नीक उष्णज्वरसमन्वितः ॥ १ ॥ प्राजापत्यत्रयं कुर्याद्देवं त्रयमेव वा ॥ तामग्निमिति-चान्येन चरुणाष्टोत्तरायुतं ॥ जुहुयाद्भोजयेद्विप्रानेवं पापात्प्रमुच्यते ॥ २ ॥ अथापरं शातातपः ॥ मित्रभार्याभिगामी च मृतभार्यः प्रजायते ॥ तस्य पापविशुध्यर्थं द्विजमेकं विवाहयेत् ॥ ३ ॥

## ज्याची स्त्री मृत होत असेल त्याचा निर्णय.

कर्मविपाकसंग्रहांतील वचन. वडील बंधूचें लग्न झालें नसोन जो धाकटा बंधू आपलें लग्न करितो, त्याची स्त्री मृत होते. आणि तो उष्णज्वरानें पीडित असा होईल. ॥ १ ॥ तो दोष जाण्याकरितां त्यानें तीन प्राजापत्यें आणि तीन चांद्रायणें करावीत. तामग्नि या मंत्रानें चरूच्या योगानें एकशेंआठ हवन करावें. आणि शक्तिप्रमाणें ब्राह्मणास भोजन द्यावें. ह्मणजे त्या पातकापासून मुक्त होतो. ॥ २ ॥ शातातपाचें वचन. जो मित्राच्या स्त्रीयेशीं गमन करितो त्याची स्त्री मृत होते. तो दोष जाण्याकरितां एका ब्राह्मणाचें लग्न करून द्यावें. ॥ ३ ॥

## अथ प्रज्ञाहीनकर्मविपाकनिर्णयः

पराशर. ॥ परापवादान्मर्त्यस्तु मतिहीनो भवेदसौ ॥ अतिकृच्छ्रं तदा कुर्याच्चांद्रायणसमन्वितम् ॥ १ ॥

## बुद्धिहीनतेच्या कर्मविपाकाचा निर्णय.

पराशराचें वचन. जो दुसऱ्याचे दोष प्रगट करितो तो मनुष्य बुद्धिहीन होईल. त्यानें चांद्रायण आणि अतिकृच्छ्र प्रायश्चित्ताचरण करावें. ॥ १ ॥

## अथ सर्वकार्यासिद्धिकर्मविपाकनिर्णयः

शातातपः ॥ सर्वकार्येष्वसिद्धार्थो जगद्द्वाती भवेन्नरः ॥ प्रसादं कारयेत्तत्र गणनाथस्य भक्तितः ॥ १ ॥ अथवा गणनाथस्य मंत्रं लक्षं जपेद्बुधः ॥ दशांशहोमः पुष्पैश्च गणशांतिपुरःसरम् ॥ गणशांतिविधानस्य शांतिः शांतिपाठो वा ॥ २ ॥

## सर्वकार्य असिद्धीच्या कर्मविपाकाचा निर्णय.

शातातपाचें वचन. जो मनुष्य वृक्षादिक जे जंगम वस्तु त्याचा नाश करिल त्याचें कार्य सिद्ध होणार नाहीं. त्यानें भक्तीनें गणपतीचा प्रसाद संपादन करावा. ॥ १ ॥ तसेंच गणेश शांतिपुरःसर गणनाथमंत्राचा लक्ष जप करावा आणि पुष्पांनीं त्याचे दशांश हवन करावें. ॥ २ ॥

## अथ दारिद्यहरकर्मविपाकनिर्णयः

तत्र धनदमूर्तिदानं ॥ वायुपुराणे ॥ दरिद्रो जायते मर्त्यो दानविघ्नं करोति यः ॥ ऐश्वर्यं जायते येन कर्मणा तच्छृणुष्व मे ॥ १ ॥ पलार्द्धेन तदर्धेन चतुर्थांशेन वा पुनः ॥ धनदस्य प्रतिकृतिं कुर्यात् हेममयीं शुभां ॥ २ ॥ द्विभुजां वाहनोपेतां नयनानंदकारिणीं ॥ शंखपद्मनिधिभ्यां च युक्तां तां पार्श्वयोर्द्वयोः ॥ ३ ॥ श्वेतवस्त्रेण संवेष्ट्य तंदुलोपरि विन्यसेत् ॥ तंदुलानां परिमाणं भवेद्द्रोणचतुष्टयं ॥ ४ ॥ तदर्धं वा तदर्धं वा वित्तशाठ्यं न कारयेत् ॥ श्वेतमाल्यैस्तथागंधैरनुलिप्य तु पूजयेत् ॥ ५ ॥ आग्नेयां दिशि होमस्तु समिदाज्यतिलैर्भवेत् ॥ मंत्रो राजाधिराजायेत्यपेयोज्यः स्वलिंगकैः ॥ ६ ॥ तिलहोमो व्याहृतिभिः कर्तव्यो धनकांक्षिभिः ॥ आचार्यः सर्वशास्त्रज्ञो विनीतः संमतः शुचिः ॥ कारयेदर्चनं तेन धनदस्य विधानतः ॥ ७ ॥ तस्मै होमकृते प्रदद्यात्प्रतिमां तु तां ॥ मंत्रेणानेन विधिवत्प्राङ्मुखाय ह्युदङ्मुखः ॥ ८ ॥ उत्तराशापते देव कुबेर नरवाहन ॥ पद्मशंखनिधीनां त्वं पतिः श्रीकंठवल्लभ ॥ अदानेन यथाप्राप्तं दारिद्यं मम दुःखदं ॥ तत्सर्वं तव दानेन पापमाशु विनाशय ॥ ९ ॥ एवं कुबेरदानं यः करोति विधिपूर्वकं ॥ धनदेन समो मर्त्यस्तत्क्षणादेव जायते ॥ १० ॥ अथापरमृग्विधाने श्रियः पंचदशर्चं हिरण्यवर्णां हरिणीमितिसूक्तं श्रीकामःसततं जपेत् ॥ ११ ॥ अन्येऽपि नानाविधदुःखपरिहारोपायाः कर्मविपाकसंग्रहादिग्रंथेषु उक्ताः सन्ति ग्रंथविस्तारभयादत्र नोच्यन्ते ते तत्रैव द्रष्टव्याः ॥ श्रीरस्तु ॥

॥ शुभं भवतु ॥

## दरिद्रपणाच्या कर्मविपाकाचा निर्णय.

वायुपुराणांतील वचन. जो मनुष्य दान कर्मास विघ्न करितो तो दरिद्री होतो. त्यास ऐश्वर्य प्राप्त होण्यास उपाय सांगतों. ॥ १ ॥ त्यानें सोन्याची कुबेराची मूर्ती चार, दोन अथवा एक तोळ्याची शक्तीप्रमाणें करावी. ॥ २ ॥ त्यामूर्तीस दोन हात, वाहनावर बसलेली, शंख पद्म इत्यादि निधियुक्त अशी करावी. ॥ ३ ॥ ती मूर्ती सोळा अथवा आठ पायल्या तांदुळावर स्थापन करावी. आणि तिला पांढऱ्या वस्त्रानें वेष्टित करावें. पांढरें गंध वाहावें. पांढऱ्या फुलांनीं

निची पूजा करावी. ॥ ४ ॥ ५ ॥ अग्नेयदिशेचे ठायीं समिधा, तूप, तांदूळ यांच्यायोगानें होम करावा. हवन कुबेराच्या मंत्रानें करावें. ॥ ६ ॥ अथवा मंत्रलिंगानें हवन करावें. ॥ ७ ॥ तीळाचा होम व्याहृतीनें करावा. सर्वशास्त्रज्ञ, नम्र, शुचिर्भूत अशा अचार्यानें कुबेराची पूजा करावी. आपण उत्तरेकडे तोंड करून बसून पूर्वाभिमुख बसलेल्या होम करणाऱ्या ब्राह्मणास उत्तराशापते देव हा वरील लिहिलेला मंत्र म्हणोन कुबेराची प्रतिमा दान करावी. आणि पूर्वजन्मीं दान न केल्यामुळें दुःख देणारें असें दारिद्र्य मला प्राप्त झालें आहे. तें सर्व दारिद्र्य कुबेरप्रतिमादानाच्या योगानें नाश होवो. अशी प्रार्थना करावी. ॥ ८ ॥ ९ ॥ या प्रमाणें विधिपूर्वक जो कुबेराच्या प्रतिमेचें दान करितो. तो तात्काळ कुबेराशीं तुल्य श्रीमान् असा होईल. ॥ १० ॥ अन्य उपाय ज्यास थोरथोरा सवची प्राप्त व्हावी असी इच्छा असेल त्यानें हिरण्यवर्णां हरिणीं हें पंधरा ऋचेचें सूक्तानुक्त प्रति दिवशीं म्हणावें. ॥ ११ ॥ नानाप्रकारचें दुःख परिहार करणारे त्यागवे पुष्कळ उपाय कर्मविपाकनमहार्णवांत सांगितले आहेत, परंतु ग्रंथविस्तार भयास्तव ते येथें लिहिले नाहींत.

इति श्रीधारकरकरोपनामकमौद्गलिककुलावतंसगोमाधरयाजिदुर्गादासमुतविद्वज्जनदृष्टीरंगागनगरप्रपादानाजिंतप्रकृतमहादीनानाथसुतपौंडरिकक्षेत्रनिवासी श्रीपांडुरंगचरणारविंदनिविष्टचेतोवृत्तिदाजीत्यपरपर्यायकाशीनाथसूनुविठ्ठलेन विरचिते प्रायश्चित्तव्यवहारप्रकाशसंग्रहाख्यग्रंथे कर्मविपाकनिर्णयो नाम तृतीयभागः समाप्तः ॥ ॥ श्रीरस्तु श्रीपांडुरंगार्पणमस्तु.

शुभं भवतु.









॥ श्रीगणेशाय नमः ॥

# अथ प्रायश्चित्तव्यवहारप्रकाशे चतुर्थभागारंभः ॥

## ॥ व्यवहारनिर्णयः ॥

प्रणम्य रुक्मिणीकांतं पुंडरीकवरप्रदम् ॥ संक्षेपादुच्यते चात्र व्यवहारविनिर्णयः ॥ १ ॥ तत्र व्यवहारलक्षणं विप्रतिपद्यमाननरांतरगताज्ञाताधर्मज्ञापनानुकूलो व्यापारो व्यवहारः ॥ मिताक्षरायां ॥ अन्यविरोधेन स्वात्मसंबंधितया कथनं व्यवहारः ॥ यथा कश्चिदिदं क्षेत्रादि मदीयमिति कथयति ॥ अन्योऽपि तद्विरोधेन मदीयमिति ॥ २ ॥ तथा च मिताक्षरायां स्मृतिवचनं ॥ परस्परं मनुष्याणां स्वार्थविप्रतिपत्तिषु ॥ वाक्यन्यायाद्व्यवस्थानं व्यवहार उदाहृतः ॥ ३ ॥ भाषोत्तरक्रियासाध्यसिद्धिभिः क्रमवृत्तिभिः ॥ आक्षिप्तश्चतुरंशस्तु चतुष्पादभिधीयते ॥ ४ ॥ याज्ञवल्क्यः ॥ चतुष्पाद्व्यवहारोऽयं विवादेषूपदर्शितः ॥ सचाष्टादशधा ॥ तत्र मनुः ॥ तेषामाद्यमृणादानं निक्षेपोऽस्वामिविक्रयः ॥ संभूय च समुत्थानं दत्तस्यानपकर्म च ॥ ५ ॥ वेतनस्यैवचादानं संविदश्च व्यतिक्रमः ॥ क्रयविक्रयानुशयो विवादः स्वामिपालयोः ॥ ६ ॥ सीमाविवादधर्मश्च पारुष्ये दंडवाचिके ॥ स्तेयं च साहसं चैव स्त्रीसंग्रहणमेव च ॥ ७ ॥ स्त्रीपुंधर्मो विभागश्च द्यूतमाह्वय एव च ॥ पदान्यष्टादशैतानि व्यवहारस्थिताविह ॥ ८ ॥

श्री पांडुरंग प्रसन्न.

# प्रायश्चित्तव्यवहारप्रकाश चतुर्थभागारंभ.

## व्यवहाराचा निर्णय.

श्रीरुक्मिणीचा पति आणि पुंडरीकास वर देणारा असा जो श्रीविठ्ठल देव यास नमस्कार करून या चतुर्थभागाचे ठायीं संक्षेपानें व्यवहाराचा निर्णय सांगतों ॥ १ ॥ त्यांत प्रथम व्यवहाराचें लक्षण, विवाद करणारे जे दोघे मनुष्य यांमध्यें अन्यायकरणार कोण आहे हें माहीत नसेंव, तें शाव होण्याकरितां जो उपायरूप व्यापार त्यास व्यवहार अशी संज्ञा आहे. मिताक्षरेमध्यें व्यवहार ह्मणजे एका वस्तुविषयीं दुसरा मनुष्य विरुद्ध बोलत असतां, ही माझी आहे असें सांगणें. जसें–एखादा मनुष्य हें शेत, हें घर माझें

आहे असें ह्मणतो. दुसरा मनुष्य त्याच्या विरोधानें माझें ह्मणतो. यास व्यवहार अशी संज्ञा आहे ॥ २ ॥ मिताक्षरेंतील स्मृतिवाक्य–मनुष्य स्वार्थाविषयीं परस्पर विवाद करीत असतां न्यायेंकरून व वचनेंकरून यथार्थनिर्णय करणें, त्यास व्यवहार अशी संज्ञा आहे ॥ ३ ॥ त्या व्यवहाराचे फिर्याद, उत्तर, पुरावा, निर्णय असे चार अंश सांगितले आहेत, ह्मणून यास चतुष्पाद व्यवहार अशी संज्ञा आहे ॥ ४ ॥ याज्ञवल्क्याचें वचन विवादाचे ठायीं फिर्याद इत्यादिक चार आहेत भाग ज्याचे असा चतुष्पाद व्यवहार सांगितला आहे. व्यवहाराचे अठरा भेद सांगितले आहेत. यास मनूचें वचन. अठरांमध्यें प्रथम १ ऋणादान, सावकारापासून घेतलेलें कर्ज परत नदेणें. २ निक्षेप, (ठेव ठेवणें) ह्मणजे कांहीं एखादी वस्तु दाखवून विश्वासानें दुसऱ्या मनुष्यापाशीं जी ठेविली जाते ती ठेव. ३ अस्वामिविक्रय, एखाद्या वस्तुविषयीं आपली मालकी नसून दुसऱ्याच्या मालकीचा जो पदार्थ तो त्याच्या संमतिवांचून विकणें. ४ संभूयसमुत्थान, व्यापाराकरितां भागीदार मंडळींनीं मिळून जें काम करणें तें. ५ दत्तानपकर्म, न्यायरीतीनें दिलेलें द्रव्य पुनः परत घेतलें जात नाहीं, असा जो दानसंज्ञक व्यवहार त्यास दत्तानपकर्म अशी संज्ञा आहे ॥ ५ ॥ ६ वेतनादान, चाकरी करून घेऊन पगार न देणें. ७ संविद्व्यतिक्रम, संकेताचें उल्लंघन करणें. ८ क्रयविक्रयानुशय, एखादी वस्तु विकत घेऊन खरेदी करणाराच्या पसंतीस पडत नाहीं ह्मणून त्या विषयींचा व्यवहार. ९ स्वामिपशुपालविवाद, गायी, ह्मशी वगैरे पशु शेतांत शिरून शेताची नुकसानी झाल्याबद्दल शेताच्या मालकाचा व गुरेंराख्याचा जो व्यवहार तो स्वामिपशुपालविवाद. ॥ ६ ॥ १० सीमाविवाद, देश, गांव, शेत, घर यांच्या हद्दीबद्दलचा वाद. ११ दंडपारुष्य, हात, पाय, हत्यार इत्यादिकांनें दुसऱ्या मनुष्यास पीडा करणें. अथवा दुसऱ्याच्या अंगास राख, चिखल इत्यादि लावणें, त्यास दंडपारुष्य ह्मणावें. १२ वाक्पारुष्य, शिव्यागाळी करणें. १३ स्तेय, चोरी करणें १४ साहस, मोठें साहसकर्म करणें. १५ स्त्रीसंग्रहण, व्यभिचार ॥ ७ ॥ १६ स्त्रीपुंधर्म, स्त्री आणि पुरुष यांच्यासंबंधीं व्यवहाराचा विचार. १७ विभाग, वांटण्या. ( दायविभाग ) १८ द्यूतआह्वय, द्यूत ह्मणजे फांसे, पादी, सवई इत्यादिकें करून जें निर्जीववस्तु पणास लावून जुगार खेळणें. आह्वय ह्मणजे पैज लावून हाले, बकरे, इत्यादिकें करून लढाया करणें. याप्रमाणें व्यवहाराचीं अठरा प्रकरणें सांगितलीं आहेत ॥ ८ ॥

## ॥ अथ दायविभागनिर्णयः ॥

एतेषां पाष्टादशपदानां स्वल्पाण्यग्रे तत्तत्प्रकरणे व्यक्तीकरिष्यंते ॥ एतेषु दाय-

विभागस्य विशेषोपयोगित्वादादौ तद्विचारो लिख्यते ॥ तत्र दायोनाम पितृपितामहाद्युपार्जितं देयं धनम् ॥ तथा च निघंटौ ॥ विभक्तव्यं पितृद्रव्यं दायमाहुर्मनीषिण इति ॥ पितृपदं संबंधिमात्रोपलक्षणम् ॥ १ ॥ स्मृत्यर्थसारेच ॥ पितृद्वारागतं द्रव्यं मातृद्वारागतं च यत् ॥ कथितं दायशब्देन तद्विभागोऽधुनोच्यते ॥ २ ॥ अयं दायो द्विधः सप्रतिबंधः अप्रतिबंधश्च ॥ यत्र धनस्वामिनस्तत्पुत्रादेश्च जीवनं प्रतिबंधकं सः सप्रतिबंधः यथा पितृव्यादिधनम् ॥ ३ ॥ यत्तु स्वामिसंबंधादेव पुत्रादेर्धनार्जनोपायांतरनिरपेक्षात्स्वं भवति सोऽप्रतिबंधो यथा पितृधनमिति दायस्वरूपम् ॥ ४ ॥ अथ तद्विभागः ॥ तत्र विभागोनाम द्रव्यसमुदायविषयाणामनेकस्वामिनां तत्तदेकदेशेषु द्रव्यस्य व्यवस्थापनं ॥ एतदेवाभिप्रेत्योक्तं नारदेन ॥ विभागोऽर्थस्य पित्र्यादेः पुत्रैर्यत्र निरूप्यते ॥ दायभागइति प्रोक्तस्तद्विवादपदं बुधैः ॥ ५ ॥ पुत्रैरिति पौत्रादीनामप्युपलक्षणं ॥ इदं च दायभागस्वरूपमुक्तम् ॥ ६ ॥ द्रव्यसामान्याभावेपि त्वत्तोऽहं विभक्तइति व्यवस्थामात्रेणापि भवत्येव विभागः ॥ बुद्धिविशेषमात्रमेव हि विभागः ॥ तस्यैवाभिव्यंजिकेयं व्यवस्था ॥ ७ ॥

## दायविभागाचा विचार.

हे जे अठरा प्रकारचे व्यवहार सांगितले त्यांमध्यें दायविभागाचा विशेष उपयोग आहे, ह्मणून प्रथम त्याचा विचार येथें सांगतों. नंतर अन्यव्यवहारांचे प्रकार पुढें त्या त्या प्रकरणांत सांगितले जातील. दाय ह्मणजे बाप, आजा, पणजा इत्यादिकांनीं संपादन केलेलें, विभाग करण्यास योग्य असें जें द्रव्य तें त्याविषयीं निघंटूंतील वचन. विभाग करण्यास योग्य असें जें पितरांचें द्रव्य त्यास पंडित दाय असें ह्मणतात. येथें पितृशब्दानें आपणास ज्यांचें द्रव्य मिळण्याचा वारसा संभवत असेल ते सर्व संबंधि मनुष्य घ्यावयाचे आहेत ॥ १ ॥ स्मृत्यर्थसारांतील वचन. पित्याच्या द्वारानें अथवा मातोश्रीच्या द्वारानें आलेलें असें जें द्रव्य त्यास दाय अशी संज्ञा आहे. आतां त्याचा विभाग येथें सांगतों ॥ २ ॥ दाय दोन प्रकारचा. एक सप्रतिबंध आणि एक अप्रतिबंध. जेथें द्रव्याचा मालक अथवा त्याचे पुत्रपौत्रादिक जिवंत असल्यामुळें द्रव्य घेण्यास प्रतिबंधक होतात. त्यास सप्रतिबंध दाय ह्मणावें. जसें–चुलता, बंधु इत्यादिकांचें द्रव्य ॥ ३ ॥ जें द्रव्य मालकीच्या संबंधानें पुत्रादिकांस संपादन करण्याच्या उपायादिकांवांचूनच स्वतःचें होतें त्यास अप्रतिबंध दाय ह्मणावें. जसें–पित्याचें द्रव्य. याप्रमाणें दायाचें स्वरूप जाणावें ॥ ४ ॥ विभाग ह्मणजे एका द्रव्यसमुदायावर अनेकांची मालकी असतां तें द्रव्य

त्या त्या मालकास देणें, याच अभिप्रायाचें नारदाचें वचन, पितरादिकांच्या द्रव्याचा पुत्रानें जेथें विभाग केला जातो, त्यास दायविभाग अशी संज्ञा आहे. ॥ ५ ॥ येथें पुत्र शब्द द्रव्याचे विभागी जे पौत्रादिक त्यांच्या उपलक्षणाचा आहे. याप्रमाणें हें दायविभागाचें स्वरूप सांगितलें ॥ ६ ॥ पित्याचें द्रव्य कांहींएक नसलें तरी मी तुझ्यापासून विभक्त झालों अशा व्यवस्थामात्रेंकरूनही विभाग होतो. कारण विभाग ह्मणजे, एक बुद्धिविशेष आहे. मी तुझ्यापासून विभक्त झालों असें जें सांगितलें, ही त्या विभक्तपणाच्या सूचनेची व्यवस्था आहे ॥ ७ ॥

## ॥ अथ विभागकालनिर्णयः ॥

विभागस्य चत्वारः कालाः ॥ १ ॥ तत्र पित्रोरूर्ध्वं पुत्रैः समेत्य विभागः कार्यः सएकः ॥ २ ॥ निवृत्तरजस्कायां मातरि स्त्रीसुखानभिलाषिणि द्रव्यनिस्पृहे च पितरि पित्रनिच्छायामपि यदा पुत्रेच्छा सोऽन्यः ॥ ३ ॥ सरजस्कायामपि मातरि अनिच्छत्यपि पितरि तस्मिन् वृद्धे अधर्मवर्तिनि अचिकित्सितरोगग्रस्ते सति यदि पुत्रेच्छा सोऽन्यतरः ॥ ४ ॥ जीवत्येव पितरि पितुर्यदा विभागेच्छा सतावदेकः ॥ तत्र प्रथमपक्षमाह याज्ञवल्क्यः ॥ विभजेरन् सुताः पित्रोरूर्ध्वं रिक्थमृणं समम् ॥ पित्रोर्मातापित्रोरूर्ध्वं रिक्थं तदीयद्रव्यं तदीयमृणं च समं विभजेरन्नित्यर्थः ॥ १ ॥ मनुरपि ॥ ऊर्ध्वं पितुश्च मातुश्च समेत्य भ्रातरः समम् ॥ भजेरन् पैतृकं रिक्थमनीशास्ते हि जीवतोः ॥ २ ॥ चशब्दोपादानेऽपि मरणसमुच्चयो नविवक्षितः ॥ अतएव मदनरत्ने स्मृतिसंग्रहे ॥ पितृद्रव्यविभागः स्याज्जीवंत्यामपि मातरि ॥ न स्वतंत्रतया स्वाम्यं यस्मान्मातुः पतिं विना ॥ ३ ॥ मातृद्रव्यविभागोऽपि तथा पितरि जीवति ॥ सत्स्वपत्येषु यस्मान्न स्त्रीधनस्य पतिः प्रभुः ॥ ४ ॥ पितुरूर्ध्वं विभागे याज्ञवल्क्यः ॥ पितुरूर्ध्वं विभजतां माताप्यंशं समं हरेत् ॥ विष्णुः ॥ मातरः पुत्रभागानुसारिभागहारिण्यः ॥ स्मृत्यंतरे ॥ जनन्यः स्वधनाः पुत्रैर्विभागेंऽशं समं हरेत् ॥ ५ ॥ सधनायास्तु यावता स्वधनपुत्रांशसमभागता भवति तावदेव हरेदित्यर्थः ॥ अंशाधिकधनायास्तु नांशः ॥ ६ ॥ सापत्नमातुः पितामह्याश्चांशमाह व्यासः ॥ असुताश्च पितुः पत्न्यः समानांशाः प्रकीर्तिताः ॥ पितामह्यश्च ताः सर्वा मातृतुल्याः प्रकीर्तिताः ॥ सर्वा इत्यनेन पितामहीसपत्न्योऽपिगृह्यंते ॥ ७ ॥ याज्ञवल्क्यः ॥ असंस्कृतास्तु संस्कार्या भ्रातृभिः पूर्वसंस्कृतैः ॥ भगिन्यश्च निजादंशाद्दत्वांशं तु तुरीयकम् ॥ ८ ॥ असंस्कृतानां विवाहांतसंस्कारैरसंस्कृतानां

भ्रातृणां भगिनीनां च विवाहांतसंस्कारं कृत्वा पश्चाद्विभागः कर्तव्यइत्यर्थः ॥ भगिन्यश्चेत्यादेरयं तात्पर्यार्थः ॥ ९ ॥ भगिनीनामसंस्कृतानां विवाहं कृत्वा ताश्च्य-श्चतुर्थं चतुर्थमंशं प्रत्येकं दद्यात् ॥ केचन एवं मन्यंते ॥ चतुर्थमंशं कन्यकायै दत्त्वा तेनैव विवाहः कर्तव्यः ॥ नतु समुदितद्रव्येण विवाहं कृत्वा पुनरपि चतुर्थांशदान-मिति तन्मेधातिथिमिताक्षराकारादीनामनभिमतत्वादुपेक्षणीयं ॥ अथवा देशाचारतो व्यवस्था ज्ञेया ॥ १० ॥

## विभागकालाचा निर्णय.

विभाग करण्याचे चार काळ सांगितले आहेत. त्यामध्यें १ मातापित्याचे प-श्चात् पुत्रांनीं मिळून विभाग करून घ्यावेत. हा एक काळ. २ मातोश्रीची रजो-निवृत्ति झाली असतां आणि पिता स्त्रीसुखाविषयीं निरिच्छ आणि द्रव्याविषयीं निस्पृह झाला असतां, विभाग करण्याची पित्याची इच्छा नसतांही पुत्रांनीं आपले इच्छेनें वि-भाग केला जातो. ३ मातोश्रीची रजोनिवृत्ति झाली नसूनही पिता विभाग कर-ण्याची इच्छा न करणारा असा असताही तो पिता वृद्ध, ज्या रोगाचा परिहार व्हाव-याचा नाहीं अशा महारोगानें ग्रस्त झाला असतां अथवा अधर्मानें वागत असेल तर पुत्रांनीं आपले इच्छेनें विभाग करावेत. ४ पिता जिवंत असतां पित्यानें आपल्या इच्छेनें पुत्राचे विभाग करावेत. याप्रमाणें चार काळ जाणावेत. प्रथमपक्षाविषयीं याज्ञ-वल्क्याचें वचन. आईबापाचे पश्चात् मुलांनीं आईबापाचें द्रव्य आणि ऋण सारख्या प्रमाणानें वांटून घ्यावें ॥ १ ॥ मनूचें वचन. माता, पिता याचे पश्चात् बंधूंनीं मिळून त्यांचें द्रव्य आणि ऋण सारखें वांटून घ्यावें. पिता जिवंत असेपर्यंत पुत्र त्याचें द्रव्य वांटण्यास समर्थ होत नाहीं ॥ २ ॥ येथें च शब्द दोघाचे मरणाचा समुच्चयवाचक नाहीं. मदनरत्नांतील स्मृतिसंग्रहाचें वचन. पित्याचे द्रव्याचा विभाग मातोश्री जिवंत अस-तांही करितां येतो; कारण मातोश्रीस पतिवांचून त्या द्रव्याविषयीं स्वतंत्ररीतीनें मा-लकी नाहीं ॥ ३ ॥ मातोश्रीचे द्रव्याचा विभाग पिता जिवंत असतांही करितां येतो. कारण मातृधनावर मालकी तिच्या संबंधीची आहे, पतीची नाहीं. ॥ ४ ॥ पित्याचे प-श्चात् विभाग करते समयीं पुत्रांनीं आपल्यासमान विभाग मातोश्रीसही द्यावा असें याज्ञ-वल्क्यानें सांगितलें आहे. विष्णूचें वचन. पित्याच्या स्त्रिया पुत्रासमान विभाग ग्रहण करणाऱ्या आहेत. म्हणून त्यांनीं पुत्राच्या विभागसमयीं आपलाही समान विभाग ग्रहण करावा ॥ ५ ॥ ज्या मातोश्रीपाशीं स्त्रीधन असेल तें स्त्रीधन यांत पुत्राच्या अंशापेक्षां

कमी असल्यास, जितका अंश कमी असेल तितकेंच धन घ्यावें. अधिक धन असेल तर भाग घेऊं नये ॥ ६ ॥ सापत्नमातोश्री आणि बापाची आई यांसही सारखे विभाग द्यावेत. यास व्यासाचें वचन. ज्यास संतति नाहीं अशा पित्याच्या स्त्रिया आणि पितामही व सापत्नपितामही यांस आपले मातोश्रीप्रमाणें विभाग द्यावेत ॥ ७ ॥ याज्ञवल्क्याचें वचन. उपनयनविवाहादि संस्कार ज्यांचे झाले आहेत, अशा बंधूंनीं संस्कार न झालेल्या बंधूंचे संस्कार करावेत. तसेंच भावांनीं आपापल्या हिश्शांतून चवथा हिस्सा काढून असंस्कृत ज्या भगिनी त्यांचे विवाहादिसंस्कार करावेत, आणि त्यांस चवथा हिस्सा द्यावा ॥ ८ ॥ ९ ॥ या स्मृतींतील भगिन्यश्च याचें तात्पर्य असें आहे कीं, ज्यांचीं लग्नें झालीं नाहींत अशा बहिणींचीं लग्नें एकत्रांतील द्रव्यानें करून प्रत्येक बहिणीस चौथा चौथा हिस्सा द्यावा. कित्येक असें ह्मणतात कीं, चौथा भाग मुलीस देऊन त्या द्रव्यानेंच तिचा विवाह करावा. समाईक द्रव्यानें तिचा विवाह करून पुनः चौथा भाग देऊं नये. हें मेधातिथिमिताक्षराकार इत्यादिकांस मान्य नाहीं. सबब या मताची उपेक्षा करावी. त्यांचें मत असें आहे कीं, समाइकांतील द्रव्यानें विवाह करून नंतर चौथा हिस्सा कन्येस द्यावा. ज्या देशांत जसा आचार असेल तशी व्यवस्था करावी ॥ १० ॥

द्वितीयपक्षमाह नारदः ॥ अतऊर्ध्वं पितुः पुत्राविभजेयुर्धनं समं ॥ मातुर्निवृत्ते रजसि प्रत्तासु भगिनीषु च ॥ ११ ॥ निवृत्ते चापि रमणे पितर्युपरतस्पृहे ॥ रमणः कामः उपरतस्पृहो विरक्तः ॥ प्रत्तासु विवाहितासु भगिनीषु चेति ॥ १२ ॥ तृतीयपक्षमाह हारीतः ॥ अकामे पितरि रिक्थभागो वृद्धे विपरीतचेतसि दीर्घरोगिणि चेति ॥ अकामे विभागेच्छारहितइति मदनरत्ने ॥ विपरीतचेतसि अधर्मवर्तिनि ॥ पितुरनिच्छायामपि विभागो भवतीति भावः ॥ १३ ॥ पितर्यसमर्थे ज्येष्ठपुत्रानुमत्या विभागमाह हारीतः ॥ कामं दाने प्रोषिते आर्त्तिगते वा ज्येष्ठोऽर्थान्श्चिंतयेदिति ॥ १४ ॥ शंखलिखितौ ॥ पितर्यशक्ते कुटुंबस्य व्यवहारं ज्येष्ठः कुर्यात्तदनंतरो वा कार्यज्ञस्तदनुमतेनेति ॥ अनंतरोऽनुजः ॥ कुटुंबभरणादिसामर्थ्येच्छया विभागः॥ सर्वपां तथात्वे त्वनियमइति निष्कर्षः ॥ १५ ॥ चतुर्थपक्षमाह याज्ञवल्क्यः ॥ विभागं चेत्पिता कुर्यादिच्छया विभजेत्सुतान् ॥ ज्येष्ठं वा ज्येष्ठभागेन सर्वे वा स्युः समांशिनः ॥ १६ ॥ ऐच्छिकविभागस्य विवृत उत्तरार्धेन ॥ इच्छया संभवति उकपक्षद्वयातिक्रमे स्वातंत्र्यायोगात ॥ वाक्यभेदापत्तेः ॥ एकस्मै लक्षं कस्मैचित्कपर्दिकामन्यस्मै न किमपीत्यव्यवस्थापत्तेश्च ॥ १७ ॥ ज्येष्ठविभागे विशेषमाह मनुः ॥

ज्येष्ठस्य विंशउद्धारः सर्वद्रव्याच्च यद्वरं ॥ तदर्धं मध्यमस्य स्यात्तदर्धं तु कनीयसः ॥ १८ ॥ अस्यार्थः ॥ विभज्ये द्रव्ये विंशतितमो विभागः ॥ यच्च विभज्यद्रव्ये श्रेष्ठं तज्ज्येष्ठाय दातव्यम् ॥ मध्यमस्य चत्वारिंशत्तमो भागो मध्यमं द्रव्यं च मध्यमाय ॥ अशीतितमो भागो हीनं च द्रव्यं कनिष्ठाय दातव्यम् ॥ ततोऽवशिष्टं द्रव्यं समं विभज्य गृण्हीयादिति ॥ १९ ॥ एवमन्यान्यपि विषमविभागप्रतिपादकानि गौतमादिवचनानि बहूनि संति तानि ग्रंथविस्तरभयान्नेह प्रदर्शितानि ॥ २० ॥

द्वितीयपक्षाचा विचार–नारदाचें वचन. मातोश्रीची रजोनिवृत्ति झाली असतां, आणि पिता स्त्रीसुखाविषयीं विरक्त झाला असतां, भगिनींचे विवाह झाल्यानंतर पुत्रांनीं पित्याचें द्रव्य सारख्या प्रमाणानें वाटून घ्यावें ॥ ११ ॥ १२ ॥ तृतीय पक्षाविषयीं हारिताचें वचन. पित्यास विभाग करण्याची इच्छा नसताही, तो वृद्ध ज्याचे चित्तास भ्रम पडला आहे, किंवा महारोगग्रस्त झाला असता, पुत्रानें आपले इच्छेनें विभाग करावा. पिता विभाग करण्यास समर्थ नसेल तर ज्येष्ठ पुत्राच्या अनुमतीनें विभाग करावा. ज्येष्ठ पुत्रही समर्थ नसेल तर जो कुटुंब भरणाविषयीं समर्थ असेल त्याच्या अनुमतीनें विभाग करवा ॥ १३ ॥ १४ ॥ १५ ॥ चतुर्थपक्षाविषयीं याज्ञवल्क्याचें वचन. पित्यानें आपल्या इच्छेनें पुत्रास विभाग करून द्यावेत. वडील मुलास ज्येष्ठ विभाग द्यावा, अथवा सर्वांस सारखे विभाग द्यावेत ॥ १६ ॥ इच्छेनें विभाग करून द्यावेत ह्मणून जें सांगितलें त्याचेंच विवरण ज्येष्ठास ज्येष्ठ भाग अथवा सर्वांस समभागही आहेत. असें जर न केलें तर वाक्यभेददोष येतो, तसेंच एका मुलास लक्ष रुपये, व दुसऱ्यास एक कवडी, तिसऱ्यास कांहींएक नाहीं अशी अव्यवस्था होऊं लागेल ॥ १७ ॥ वडील मुलाच्या विभागाविषयीं मनूनें विशेष सांगितलें आहे. वडील मुलास सर्व द्रव्यापैकीं विसावा हिस्सा व जें श्रेष्ठ धन असेल तें द्यावें. मध्यमबंधूस चाळिसावा हिस्सा व मध्यम द्रव्य, व कनिष्ठबंधूस ऐशींवा हिस्सा व कनिष्ठ द्रव्य असें द्यावें ॥ १८ ॥ याप्रमाणें विभाग करून बाकी राहिलेलें द्रव्य सारख्या प्रमाणानें सर्व बंधूंनीं वाटून घ्यावें ॥ १९ ॥ याप्रमाणें अन्यही विषम भागास प्रतिपादन करणारीं गौतमादिकाचीं पुष्कळ वचनें आहेत, परंतु तीं ग्रंथविस्तरभयामुळें येथें सांगितलीं नाहींत ॥ २० ॥

एवं विषमविभागस्य शास्त्रसिद्धत्वेऽपि लोकविरुद्धत्वादस्वर्ग्यं लोकविद्विष्टं धर्ममप्याहरेन्नतु इतिवचनाच्चायं विभागक्रमो नानुष्ठेयः ॥२१॥ तथायं विषमविभागः कलौ निषिद्धः ॥ तथाचादिपुराणे कलिवर्ज्यप्रकरणे ॥ ऊढायाः पुनरुद्वाहं ज्येष्ठांशं गोवधं

नथा ॥ कलौ पंच न कुर्वीत भ्रातृजायां कमंडलुम् ॥ २२ ॥ अत्र ज्येष्ठविभागप्रसंगात् यमलयोर्ज्येष्ठविचारः कथ्यते ॥ यमलयोर्मध्ये प्रथमप्रसूतस्य ज्यैष्ठ्यं मनुराह॥ जन्मज्येष्ठेन चाव्हानं सुब्रह्मण्यास्वपि स्मृतम् ॥ यमलयोश्चैव संज्ञासु जन्मतो ज्येष्ठता मता ॥ २३ ॥ यस्य जातस्य यमयोः पश्यंति प्रथमं मुखम् ॥ संतानः पितरश्चैव तस्मिन् ज्यैष्ठ्यं प्रतिष्ठितमिति ॥२४॥ यत्तु पिंडसिद्धादिवैद्यकग्रंथेषु अनंतरप्रसूतस्य ज्यैष्ठ्यमुक्तं तदनेन कार्यांशे बाध्यते तस्याश्रुतिमूलत्वात् ॥ मासेन शुद्धो भवतीतिवत् ॥ यत्तु द्वौ तदा भवतो गर्भौ सूतिर्वेशविपर्यादित्यादिना भागवते पश्चाज्जातस्य ज्येष्ठ्यमुक्तं तदप्यनेन बाध्यते॥ पुराणेषु स्मृतिविरुद्धाचाराणां बहुशो दर्शनात्॥ अत्र देशाचारतो व्यवस्था ज्ञेयेति केचित् ॥ युक्तं तु पूर्वोक्तमेव ॥ २५ ॥ याज्ञवल्क्यः ॥ न्यूनाधिकविभक्तानां धर्म्यः पितृकृतः स्मृतः॥ धर्म्यो यदि धर्मादनपेतस्तर्हि न निवर्तनीयइत्यर्थः ॥ अधर्म्यश्चेन्निवर्त्यते इत्युक्तं भवति ॥ २६ ॥ तथा च नारदः॥ अन्यथाशास्त्रकारी च न विभागे पिता प्रभुः ॥ यत्र च विषमविभागे लोकविद्वेषाभावस्तत्र विषमविभागो भवत्येव ॥ २७ ॥ यदाह नारदः ॥ द्वावंशौ प्रतिपद्येत विभजन्नात्मनः पितेति ॥ एतच्च स्वतंत्रोपार्जकपरम् ॥ यदाह वसिष्ठः ॥ येन चैषां स्वयमुपार्जितं स्यात् सद्व्यंशमेव लभेतइति ॥ एषां दायार्हपितृभ्रात्रादीनाम् ॥२८॥ विवादार्णवसेतौ तु ॥ पिता स्वोपार्जितद्रव्ये स्वेच्छयैव विभागं कुर्यात् ॥ पित्रैव तु विभक्ता ये समन्यूनाधिकैर्धनैः ॥ तेषां सएव धर्मः स्यात्सर्वस्य हि पिता प्रभुरिति नारदीयात् ॥ २९ ॥ पितामहधने तु पितापुत्रयोस्तुल्यविभागः ॥ तद्विषये अनुपदं वक्ष्यामः ॥ यदि कुर्यात्समानंशान् पत्न्यः कार्याः समांशिकाः ॥ न दत्तं स्त्रीधनं यासां भर्त्रा वा श्वसुरेण वा ॥ दत्तेत्वर्द्धं देयम् ॥३०॥ दत्ते त्वर्द्धं प्रकल्पयेदिति ॥ अर्द्धं पूर्वदत्तं स्त्रीधनं यावता पुत्रांशसमं भवति तावदित्यर्थः ॥ अंशाधिकधनायास्तु नांशः ॥ अर्जनसमर्थस्य पुत्रस्य दायजिघृक्षाभावे आह सएव ॥ शक्तस्यानीहमानस्य किंचिद्दत्वा पृथक्क्रिया॥ किंचिद्दानं च तत्पुत्राणां दायजिघृक्षानिवृत्त्यर्थमिति मिताक्षरायामुक्तम् ॥ ३१ ॥

याप्रमाणें विषम रीतीची वांटणी जरी शास्त्राधारें सप्रमाण आहे तरी लोकविरुद्धपणामुळें मान्य नाहीं. कारण लोकविरुद्ध असल्यामुळें धर्म जरी असेल आणि लोक त्याची निंदा करीत असतील तर तो स्वर्ग देणारा होत नाहीं. सबब तो आचरण करूं नये असें वचन आहे. सबब विषमविभाग करूं नयेत ॥ २१ ॥ वरीलच या विभागाचा [illegible] सीपर्व्ये निषेधही केला आहे. त्यास आदित्यपुराण कलियज्यंप्रकरणांतील वचन

एक वेळां लग्न झालेल्या स्त्रीचें पुनः लग्न करणें, वडील बंधूस श्रेष्ठांश देणें, गायीचा वध करणें, भ्रातृपत्नीशीं गमन करणें, कमंडलु धारण करणें हीं पांच कर्में कलीचे ठायीं वर्ज्य करावींत ॥ २२ ॥ येथें ज्येष्ठविभागाच्या प्रसंगानें आवळेजावळे मुलांतील ज्येष्ठपणाचा विचार सांगतों. जुळ्यांपैकीं प्रथम जो जन्मला तो वडील असें मनूचें मत आहे. अग्निष्टोम यज्ञांत सुब्रलण्य या नांवाचा मंत्र आहे त्या मंत्रानें इंद्रास बोलावितात. त्यांत जन्मानें जो वडील असेल त्यानें देववेचें आव्हान करावें. आवळेजावळे जे गर्भ असतील त्यांमध्यें प्रथम ज्याचा जन्म झाला असेल तोच वडील असें सांगितलें आहे ॥ २३ ॥ या जुळ्यांपैकीं प्रथम ज्याचें मुखदर्शन होईल तोच वडील व वंश चालविणारा असा होतो ॥ २४ ॥ पिंडसिद्धिनामक वैद्यक ग्रंथामध्यें जुळ्यांतील मागाहून जो जन्मास आला तो वडील असें सांगितलें आहे. या वैद्यकवचनानें पूर्व वचनास बाध येतो. परंतु वैद्यकवचनास स्मृतीचा आधार नाहीं. जसें जननाशौचाची महिन्यानें शुद्धता होते, परंतु जातेष्टि इत्यादिक कर्तव्य असतां दहा दिवसांनंतर करावें येथें जसा जननाशौचाचा बाध होतो त्याप्रमाणें येथें जाणावें. जेव्हां दोन गर्भ राहतात त्यावेळीं गर्भधारणेंत व गर्भप्रसवास त्याचा विपर्यास होतो. भागवत तृतीयस्कंध अध्याय १७ श्लोक १८ यामध्यें पाठीमागून जो जन्मास आला त्यास ज्येष्ठपणा सांगितला आहे. हें या वचनानें बाधित केलें जातें. पुराणामध्यें स्मृतिविरुद्ध जे आचार ते बहुत दिसतात. येथें देशाचारानें व्यवस्था करावी. असें कित्येक ग्रंथकार ह्मणतात. जुळ्यांमध्यें प्रथम जो जन्मास आला तोच ज्येष्ठ हें सांगणेंच उक्त आहे. याप्रमाणें व्यवहारमयूखांचें मत आहे ॥ २५ ॥ याज्ञवल्क्याचें वचन. क्रमजात प्रकारानें पित्यानें विभाग केले असतां आणि ते धर्मास अनुसरून असल्यास ते योग्य, तसें नसल्यास फिरविलें जातें ॥ २६ ॥ यास नारदाची उक्ति. शास्त्राच्या विरुद्धरीतीनें विभाग करण्याविषयीं पिता समर्थ नाहीं. ज्या विषमभागाविषयीं लोक निंदा करीत नाहींत, तो विषमविभाग करण्यास हरकत नाहीं ॥ २७ ॥ वांटण्या करते समयीं स्वसंपादित द्रव्य असेल तर दोन हिस्से आपण घ्यावेत. बाकीचें द्रव्य मुलांस यथाविभाग वांटून द्यावें. पिता, बंधु इत्यादिकांमध्यें ज्यानें स्वतः संपादन केलें असेल, त्यानें दोन हिस्से घ्यावे अशी वसिष्ठोक्ति आहे ॥ २८ ॥ विवादार्णवसेतुनामकग्रंथामध्यें तर स्वसंपादन केलेल्या द्रव्याचे विभाग पित्यानें आपल्या इच्छेनें करावेत. नारदाचें वचन. समान, न्यून अथवा अधिक द्रव्य देऊन बापानें वांटण्या केल्या असतां त्या सर्व धर्मयुक्तच जाणाव्या. कारण पिता सर्व द्रव्याचा मालक आहे ॥ २९ ॥ आजानें संपादन केलेल्या द्रव्याविषयीं तर पितापुत्रांचा सारखा विभाग आहे.जर सारख्या हिश्यानें वांटण्या केल्या असल्या तर स्त्रियांसही

सारखे विभाग द्यावेत. पति अथवा सासरा यांनीं स्त्रीधन दिलें असल्यास सारखा विभाग न देतां अर्धे विभाग द्यावा ॥ ३० ॥ अर्धं धन ह्मणजे जें पूर्वीं दिलेलें स्त्रीधन असेल तें जेवढया दिलेल्या द्रव्यानें पुत्राच्या हिस्सावरोबर होईल तेवढें द्रव्य द्यावें विभागापेक्षां अधिक जर स्त्रीधन असेल तर त्या स्त्रियांस वांटणी देऊं नये. द्रव्य मिळविण्याविषयीं मुलगा समर्थ असून त्यास वांटणी घेण्याची इच्छा नसेल तर त्यास कांहीं तरी देऊन त्याची वांटणी करावी. कारण ज्यानें विभाग घेतला नाहीं त्याचे मुलास पुनः विभाग घेण्याची इच्छा होऊं नये; अशाकरितां कांहींतरी देऊन विभाग करावा असें मिताक्षरेंत सांगितलें आहे ॥ ३१ ॥

## ॥ अथ पितामहद्रव्यविभागनिर्णयः ॥

बृहस्पतिः ॥ द्रव्ये पितामहोपात्ते स्थावरे जंगमे तथा ॥ सममंशित्वमाख्यातं पितुः पुत्रस्य चैव हि ॥ १ ॥ याज्ञवल्क्यः ॥ भूर्या पितामहोपात्ता निबंधो द्रव्यमेव वा ॥ तत्र स्यात्सदृशं स्वाम्यं पितुः पुत्रस्य चोभयोः ॥ २ ॥ कात्यायनः ॥ सकलं द्रव्यजातं तद्भागैर्गृह्णंति तत्समैः ॥ पितरो भ्रातरश्चैव विभागो धर्म्य उच्यते ॥ ३ ॥ बृहस्पतिः ॥ क्रमागते गृहक्षेत्रे पितापुत्राः समांशिनः ॥ पैतृकेन विभागार्हाः सुताः पितुरनिच्छया ॥ ४ ॥ अर्थात्पितामहार्यार्जिते तदनिच्छयाऽपि विभागार्हा इत्यर्थः ॥ पैतामहेऽपि क्वचित्पितुरिच्छयैव विभागमाहतुर्मनुविष्णू ॥ पैतृकं तु पिता द्रव्यमनवाप्यं यदाप्नुयात् ॥ नतत्पुत्रैर्भजेत्सार्धं अकामः स्वयमार्जितम् ॥ ५ ॥ बृहस्पतिः ॥ पैतामहं हृतं पित्रा स्वशक्त्या यदुपार्जितम् ॥ विद्याशौर्यादिना यात्तं तत्रस्वाम्यं पितुः स्मृतम् ॥ ६ ॥ प्रदानं स्वेच्छया कुर्याद्भोगं चैव ततो धनात् ॥

## आजानें मिळविलेल्या द्रव्याच्या विभागाचा निर्णय.

बृहस्पतीचें वचन. स्थावर अथवा जंगम, पितामह ( आजा ) यानें संपादन केलेलें द्रव्य याचे ठायीं पिता आणि मुलगा यांचा विभाग सारखा सांगितला आहे ॥ १ ॥ याज्ञवल्क्याचें वचन. पितामहानें संपादन केलेली भूमि किंवा राजानें दिलेलें वेतन अथवा द्रव्य याविषयीं मुलगा आणि बाप यांची मालकी सारखी आहे ॥ २ ॥ कात्यायनाचें वचन. सर्व द्रव्य जेथें पिता आणि बंधु सारख्या विभागानें वांटून घेतात, तो विभाग धर्मयुक्त असें जाणावें ॥ ३ ॥ बृहस्पति. क्रमानें आलेलें घर, शेत याविषयीं पितापुत्र हे सारखे विभागी आहेत. ते विभाग करण्याविषयीं पित्याच्या इच्छेची जरूर नाहीं ॥ ४ ॥ तात्पर्य पितामहादिकानें संपादन केलेलें जें द्रव्य त्याचा विभाग पित्याची इच्छा नसतांही

होतो मनु आणि विष्णु यांचीं वचनें. दुसऱ्याचे हस्तगत झालेलें व मिळण्यास अशक्य असें आजाचें द्रव्य पित्यानें स्वशक्तीनें अथवा विद्या, शौर्य इत्यादिकानें जर पुनः संपादन केलें असेल तर त्याविषयीं मालकी पित्याचीच आहे. सबब त्या द्रव्याचा विभाग पित्याच्या इच्छेवांचून होत नाहीं ॥ ५ ॥ ६ ॥ ७ ॥

## ॥ अथानेकभ्रातृपुत्राणां विभागनिर्णयः ॥

तत्र याज्ञवल्क्यः अनेकपितृकाणां तु पितृतो भागकल्पना ॥ एकस्यैकः पुत्रो परस्य द्वावन्यस्य त्रयस्तेषां पितृसंख्ययैव विभागो न विभाजकसंख्ययेत्यर्थः ॥ १ ॥ कात्यायनः अविभक्तेऽनुजे प्रेते तत्सुतं रिक्थभागिनं ॥ कुर्वीत जीवनं येन लब्धं नैव पितामहात् ॥ २ ॥ लभेतांशं सपित्र्यं तु पितृव्यात्तस्य वा सुतात् ॥ स एवांशस्तु सर्वेषां भ्रातृणां न्यायतो भवेत् ॥ ३ ॥ लभते तत्सुतो वापि निवृत्तिः परतो भवेत् ॥ अनुजपदं ज्यायसोप्युपलक्षणं ॥ परतः प्रपौत्रात् प्रपौत्रपुत्रादिः ॥ ४ ॥ पितृपितामहप्रपितामहेषु मृतेषु अनंतरं वृद्धप्रपितामहेऽन्यस्मिंश्च तत्पुत्रादिके जीवति तद्धनं न लभते पुत्रपौत्रप्रपौत्रसामान्याभावे सोपि लभत एवेत्यर्थः॥५॥इदं च नाविभक्तपरं किंतु संसृष्टपरं ॥ अविभक्तविभक्तानां कुल्यानां वसतां सह ॥ भूयो दायविभागः स्यादाचतुर्थादितिस्थितिरिति देवलोक्तेः ॥६॥ ऋणं लेख्यं गृहं क्षेत्रं यस्य पैतामहं भवेत् ॥ चिरकालप्रोषितोवा भागभागागतस्तु सः ॥ ७ ॥ गोत्रसाधारणीं त्यक्त्वा योऽन्यं देशं समाश्रितः ॥ तद्वंशस्यागतस्यांशः प्रदातव्यो न संशयः ॥ ८ ॥ इदं च समदेशस्थितपरं ॥ देशांतरस्थस्तु पंचमादिरपि लभत एव ॥ तृतीयः पंचमश्चैव सप्तमश्चापि यो भवेत् ॥ जन्मनामपरिज्ञाने लभेतांशं क्रमागतमिति देशांतरक्रमेण बृहस्पतिस्मृतेः ॥ ९ ॥

## पुष्कळ बंधूंच्या मुलांच्या विभागाचा विचार.

याविषयीं याज्ञवल्क्याचें वचन. बंधूंचीं जीं मुलें त्यांचा विभाग पित्याच्या संख्येनें करावा. जसें एका बंधूस एक मुलगा, द्वितीयास दोन, तिसऱ्यास तीन, येथें मुलांच्या संख्येनें विभाग न करितां पित्याच्या संख्येनेंच विभाग होतो ॥ १ ॥ यास कात्यायनाचें वचन. एकत्रांतील बंधु मृत झाले असतां त्यांच्या मुलांस इस्टेटीचा विभाग द्यावा. ज्यास आजापासून उपजीविकेचा विभाग मिळाला नसेल, त्यानें चुलत्यापासून अथवा चुलत्याच्या मुलापासून आपले पित्याचा विभाग घ्यावा. असा चुलत्यापासून घेतलेला जो विभाग तोच

सर्व बंधूंचा विभाग होतो ॥ २ ॥ याप्रमाणेंच मृताचे नातवासही विभाग घेतां येतो. त्याच्या पुढच्या संततीस ह्मणजे प्रपौत्रादिकास भाग मिळत नाहीं. कात्यायन वचनांत 'अनुज' असें जें पद आहे तें वडीलबंधूचेंही उपलक्षक आहे ॥३॥ ४ ॥ बाप, आजा, पणजा हे मृत झाले असून नंतर वृद्धप्रपितामह ह्मणजे पणजाचा बाप मृत झाला असतां व त्याचे पुत्रादि जीवंत असतां तर, खापरपणतूस विभाग मिळणार नाहीं. पुत्रपौत्रप्रपौत्र इत्यादि कोणी नसतील तर खापरपणतूसही विभाग मिळेल ॥ ५ ॥ परंतु हें अविभक्त संबंधानें नाहीं; तर संसृष्ट संबंधानें आहे. संसृष्ट ह्मणजे विभक्त होऊन पुनः एकत्रतेनें राहणें. यास देवलाचें वचन. सपिंडांतील पुरुष एक वेळ विभक्त झाल्यानंतर पुनः एकत्र झाल्यास दुसऱ्यानें होणारा दायविभागाचा हक्क चौथ्या पिढीपर्यंत आहे ॥ ६ ॥ ऋण, खतेंपत्रें वगैरे लेख, घर, शेत हे ज्याच्या आजाचे असून, जो चिरकालपर्यंत देशांतरास गेला असेल तर त्याचा विभाग त्यास दिला पाहिजे ॥ ७ ॥ आपल्या वंशास साधारण असें गृहक्षेत्रादिक टाकून जो अन्य देशास जाऊन राहिला असेल,त्याच्या वंशांतील कोणी विभाग घेण्यास आले असतां त्याचा विभाग त्यास निःसंशय दिला पाहिजे ॥ ८ ॥ देशांतरीं राहणारा असा पांचव्या, साहाव्या पिढीचा जरी असेल तरी त्यास विभाग मिळतो. यास बृहस्पतीचें वचन. तिसऱ्या, पांचव्या, सातव्या पिढीचा असला तरी त्याचें जन्म आणि नांव याची माहिती असली ह्मणजे, वंशक्रमानें आलेला जो विभाग तो त्यास मिळतो. या प्रमाणें देशांतरक्रमाच्या संबंधानें बृहस्पतीची उक्ति आहे ॥ ९ ॥

## ॥ विभागादूर्ध्वमुत्पन्नपुत्रस्य विभागनिर्णयः ॥

तत्र बृहस्पतिः ॥ पुत्रैः सह विभक्तेन पित्रा यत्स्वयमर्जितं ॥ विभक्तजस्य तत्सर्वं अनीशाः पूर्वजाः स्मृताः ॥ १ ॥ यथा धने तथर्णे च दानादानक्रयेषु च ॥ परस्परमनीशास्ते मुक्त्वा शौचोदकक्रियाम् ॥ २ ॥ ऋणमात्रसत्वे तु पूर्वविभक्तेभ्यो विभागग्रहणं विना तेन ऋणं नैव देयं ॥ रिक्थग्राहऋणे दाप्य इति वक्ष्यमाणत्वात् ॥ पितृमरणोत्तरं विभागकालेऽस्पष्टगर्भायां मातरि तत्सपत्न्यां भ्रातृपत्न्यां वाऽनंतरमुत्पन्ने विशेषमाह याज्ञवल्क्यः ॥ विभक्तेषु सुतो जातः सवर्णायां विभागभाक् ॥ विभागश्च संवंभ्रात्रादिभिः स्वस्वांशात्किंचित्किंचिदुद्धृत्य यथास्वांशसमो भवति तथा कार्यः ॥ ३ ॥ विष्णुः ॥ पितृविभक्ताविभागानंतरोत्पन्नस्य विभागं दद्युः ॥ भ्रातॄणां विभागकाले विशेषमाह वसिष्ठः ॥ अथ भ्रातॄणां दायविभागस्य या गर्भिण्यः स्त्रियस्तासामाप्रसवात् प्रतीक्षा कार्येति शेषः ॥ ४ ॥

## विभाग झाल्यानंतर उत्पन्न झालेला जो मुलगा त्याच्या विभागाचा निर्णय.

बृहस्पतीचें वचन. पित्यानें मुलाचा व आपला विभाग करून विभक्त झाल्यानंतर पुनः त्यास जर पुत्र होईल, तर त्या पुत्रानें, विभक्त झाल्यानंतर पित्यानें जें द्रव्य मिळविलें असलें तें द्रव्य त्या पुत्रानें घ्यावें. विभक्तपुत्राचा त्या द्रव्यावर हक्क नाहीं ॥ १ ॥ जसा द्रव्यावर संबंध नाहीं, त्याप्रमाणेंच कर्ज, दान, गहाण, खरेदी यांवरही त्या विभक्त झालेल्या बंधूंचा संबंध नाहीं. परंतु सुतक, वृद्धि, तर्पण एवढ्यापुरता त्यांचा संबंध आहे ॥ २ ॥ पित्याचें फक्त कर्ज मात्र असल्यास, पूर्वीं विभक्तझालेल्या बंधूपासून विभाग घेतल्याशिवाय कर्ज घेऊं नये, कारण ज्यानें द्रव्य घेतलें असेल, त्यानेंच कर्ज घावें. असें ऋणादानप्रकरणामध्यें सांगितलें आहे. पित्याचे मरणानंतर वांटणीचे वेळीं अस्पष्टगर्भ असलेली अशी मातोश्री, अथवा सापत्नमातोश्री, बंधूची स्त्री विभाग झाल्यानंतर प्रसूत होऊन मुलगा होईल तर त्याविषयीं विशेष याज्ञवल्क्य सांगतात. विभक्त झाल्यानंतर जर मुलगा उत्पन्न होईल तर सर्वबंधूंनीं आपापले हिश्शांतून थोडें थोडें काढून त्या विभक्तोत्पन्न झालेल्या मुलास आपले हिश्शाबरोबरीचा हिस्सा जमवून घावा ॥ ३ ॥ विष्णूचें वचन. पित्यापासून विभक्त झालेले जे बंधू त्यांनीं विभागानंतर उत्पन्न झालेला जो बंधु त्यास विभाग द्यावा. बंधूच्या विभागकालाच्या संबंधानें वसिष्ठानें विशेष सांगितलें आहे. बंधूंनीं विभाग करते समयीं गर्भिणी ज्या स्त्रिया ह्मणजे मातोश्री, सापत्नमातोश्री, विधवा भ्रातृपत्नी या प्रसूत होईपर्यंत विभाग करूं नये. प्रसूत झाल्यानंतर विभाग करावा ॥ ४ ॥

## दायग्रहणव्यवस्थोपयोगितया मुख्यगौणपुत्रव्यवस्थामाह याज्ञवल्क्यः

औरसो धर्मपत्नीजस्तत्समः पुत्रिकासुतः ॥ क्षेत्रजः क्षेत्रजातस्तु सगोत्रेणेतरेण वा ॥ १ ॥ गृहे प्रच्छन्नउत्पन्नो गूढजस्तत्सुतः स्मृतः ॥ कानीनः कन्यकाजातो मातामहसुतो मतः ॥ २ ॥ अक्षतायां क्षतायां वा जातः पौनर्भवः स्मृतः ॥ दद्यान्माता पिता वा यं सपुत्रो दत्तको भवेत् ॥३॥ क्रीतश्च ताभ्यां विक्रीतः कृत्रिमः स्यात्स्वयंकृतः ॥ दत्तात्मा तु स्वयंदत्तो गर्भेविन्नः सहोढजः ॥ ४ ॥ उत्सृष्टो गृह्यते यस्तु सोऽपविद्धो भवेत्सुतः ॥ सवर्णायां धर्मपत्न्यामुत्पन्न औरसः पुत्रो मुख्यः ॥५॥ पुत्रिकासुतो द्वेधा तत्राद्यमाह वसिष्ठः ॥ अभ्रातृकां प्रदास्यामि तुभ्यं कन्यामलंकृताम् ॥ अस्यां यो जायते पुत्रः स मे पुत्रो भविष्यतीति ॥ ६ ॥ अंत्यमाह सएव ॥ तृतीयः

पुत्रिकैवेति ॥ अस्मिन् पक्षे कन्ययैवं पितुरौर्ध्वदेहिकादि कार्यं ॥ अत्र दत्तकभिन्ना गौणाः पुत्राः कलौ वर्ज्याः ॥ दत्तौरसेतरेषां तु पुत्रत्वे न परिग्रह इति तन्निषेधेषु पाठात् ॥ ७ ॥

दायविभाग घेण्याचे व्यवस्थे संबंधानें उपयोगी पडण्याकरितां मुख्यपुत्र आणि गौणपुत्र यांची व्यवस्था सांगतात. त्यास याज्ञवल्क्याचें वचन. सशास्त्ररीतीनें विवाह केलेली अशी जी स्त्री तिचेपासून झालेला जो मुलगा तो औरस पुत्र जाणावा ॥ १ ॥ आपले मुलीचा जो मुलगा तो मुलाप्रमाणेंच जाणावा अथवा मुलगी हाच मुलगा जाणावा ॥ २ ॥ पतीच्या सगोत्रपुरुषापासून अथवा अन्यपुरुषापासून स्त्रियेचे ठायीं झालेला जो मुलगा तो क्षेत्रज जाणावा ॥ ३ ॥ १ ॥ घरामध्यें गुप्तरीतीनें अन्य पुरुषापासून उत्पन्न झालेला पुत्र त्यास गूढज असें ह्मणावें ॥ ४ ॥ लग्न होण्याच्या पूर्वी कन्यावस्थेमध्यें झालेला जो मुलगा त्यास कानीन अशी संज्ञा आहे. हा मुलगा आईचे बापाचा ह्मणजे मातामहाचा जाणावा ॥ ५ ॥ २ ॥ प्रथम लग्न झालेल्या, तिचा नवऱ्याशीं समागम झाला असो अथवा नसो अशा स्त्रियेचे ठायीं अन्यपुरुषापासून झालेला जो मुलगा त्यास पौनर्भव असें ह्मणावें ॥ ६ ॥ मातोश्री अथवा पिता ज्या मुलास दुसऱ्यास देतात तो दत्तक मुलगा होय ॥ ७ ॥ ३ ॥ आईबापांनीं विकलेला जो मुलगा त्यास क्रीत असें ह्मणावें ॥ ८ ॥ पुत्राप्रमाणें पाळलेला अथवा मानलेला जो मुलगा त्यास कृत्रिम असें ह्मणावें ॥ ९ ॥ आपण होऊन जो दुसऱ्यास दत्तक होतो तो स्वयंदत्त ह्मणावा ॥ १० ॥ विवाह होण्यापूर्वीं गर्भांत असलेला जो मुलगा त्यास सहोढज अशी संज्ञा आहे ॥ ११ ॥ ४ ॥ जो मुलगा आईबापांनीं टाकिलेला आणि दुसऱ्या मनुष्यानें घेऊन संभाळलेला असा जो मुलगा त्यास अपविद्ध असें ह्मणावें ॥ १२ ॥ या बारांमध्यें आपल्या धर्मपत्नीचे ठायीं उत्पन्न झालेला जो पुत्र तो मुख्य जाणावा ॥ ५ ॥ पुत्रिकापुत्र दोन प्रकारचा सांगितला आहे. त्यास वशिष्ठाचें वचन. जिला बंधु नाहीं अशी आपली कन्या ही अलंकृत करून तुजला देतों. हिचे ठायीं जो पुत्र होईल तो माझा पुत्र होईल असें ह्मणून विवाह झाल्यानंतर जो मुलगा होईल तो पुत्रिकापुत्र जाणावा ॥ ६ ॥ याप्रमाणें बारा पुत्र सांगितले खरे परंतु कलीमध्यें औरस आणि दत्तक याहून भिन्न जे पुत्र ते वर्ज्य करण्यास सांगितले आहेत. दत्तक आणि औरस यांहून इतर पुत्रांचा स्वीकार कलीमध्यें करूं नये असें कलिवर्ज्य प्रकरणांत सांगितलें आहे ॥७॥

## ॥ अथ दत्तकनिर्णयः ॥

नापुत्रस्य लोकोऽस्ति ॥ पुत्रेण लोकान् जयति पौत्रेणानंत्यमश्नुते ॥ इत्यादिवच-

नात् ॥ पुत्राभावे दत्तकसुतो ग्राह्यः ॥ १ ॥ तत्रात्रिः अपुत्रेणैव कर्तव्यः पुत्रप्रतिनिधिः सदा ॥ पिंडोदकक्रियाहेतोर्यस्मात्तस्मात्प्रयत्नतइति ॥ २ ॥ अपुत्रेणैवेत्येवकारेण पुत्रवतो नाधिकारः ॥ अपुत्रेणेत्यत्र पुत्रपदं पौत्रप्रपौत्रयोरप्युपलक्षकम् ॥ ३ ॥ मनुः मातापिता वा दद्यातां यमद्भिः पुत्रमापदि ॥ सदृशं प्रीतिसंयुक्तं स ज्ञेयो दत्रिमः सुतः ॥ ४ ॥ वाशब्दान्मात्रभावे पितैव दद्यात् ॥ पित्रभावे मातैवोभयसत्वेतूभावपीति मदनः ॥ आपद्ग्रहणादनापदि न देयः ॥ अत्र सदृशं जात्या ॥ ५ ॥ तत्र सपिंडापत्यकं चैव सगोत्रजमथापि वा ॥ अपुत्रको द्विजो यस्मात्पुत्रत्वे परिकल्पयेत् ॥ ६ ॥ एवं शौनकोप्याह ब्राह्मणानां सपिंडेषु कर्तव्यः पुत्रसंग्रहः ॥ तदभावेऽसपिंडेषु अन्यत्र तु न कारयेत् ॥ ७ ॥ तत्र सन्निहितसगोत्रसपिंडेषु पुत्रसदृशो भ्रातृपुत्रएव पुत्रीकार्यः ॥ अपुत्रस्य पितृव्यस्य तत्पुत्रो भ्रातृजो भवेत् ॥ सएव तस्य कुर्वीत पिंडदानोदकक्रियाः ॥ ८ ॥ एवं भ्रातृणामेकजातानामेकश्चेत् पुत्रवान् भवेत् ॥ सर्वे ते तेन पुत्रेण पुत्रिणो मनुरब्रवीत् ॥ ९ ॥ इत्यादिवचनात् ॥ तदभावे सापत्नभ्रातृपुत्रो वा ॥ तदभावे सगोत्रसपिंडो यः कश्चित् ॥ तदभावे त्वसगोत्रसपिंडो मातलकुलजपितृष्वस्रादिकुलजः ॥ तदभावे तु असपिंडः समानगोत्रः तदभावे तु असपिंडः पृथग्गोत्रोऽपि ॥ असगोत्रसपिंडेषु भागिनेयदौहित्रौ वर्ज्यौ ॥ एवं विरुद्धसंबंधापत्यापुत्रवुद्धयनर्हो मातुलोऽपि न ग्राह्यः ॥ अतएव सगोत्रसपिंडेषु भ्राता पितृव्यो वा न ग्राह्यः ॥ १० ॥

## दत्तकाचा निर्णय.

ज्यास मुलगा नाहीं त्यास स्वर्गादि लोकप्राप्ति होत नाहीं. ज्यास पुत्र झाला आहे तो या लोकास जिंकून परलोकास जातो. पौत्र झाल्यानें स्वर्ग, ब्रह्मादि लोकांप्रत जाऊन अनेक सुखांप्रत भोगितो. इत्यादिवचनें आहेत ह्मणून पुत्र जर नसेल तर दत्तक मुलगा घ्यावा ॥ १ ॥ त्यास अत्रीचें वचन. पिंडोदक क्रियेकरितां ज्यास पुत्र नाहीं त्या मनुष्यानें प्रयत्नानें पुत्र प्रतिनिधि ह्मणजे दत्तकपुत्र घ्यावा ॥ २ ॥ या वचनांत एवकार आहे त्यामुळें ज्यास मुलगा असेल त्यानें दत्तक घेऊं नये. येथें अपुत्रेण हें पद पुत्रपौत्रांचें उपलक्षक आहे. ह्मणजे मुलगा, नातु, पणतु, कोणीही ज्यास नसतील त्यानें दत्तक घ्यावा ॥ ३ ॥ मनूचें वचन. मातोश्रीनें अथवा पित्यानें अथवा उभयतांनीं आपत्काळीं प्रीतीनें उदकदानपूर्वक सदृश प्रीतियुक्त जो पुत्र दिला जातो त्यास दत्तकपुत्र असें ह्मणावें ॥ ४ ॥ आईनें अथवा बापानें अशा विकल्पावरून मातोश्रीच्या अभावीं पित्यानें व

पित्याच्या अभावीं मातोश्रीनें, अथवा उभयतांनीं द्यावा. याप्रमाणें मदनाचें मत आहे. आपत्ति नसतां पुत्रास दत्तक देऊं नये. येथें सदृश ह्मणजे एका जातीचा असा अर्थ आहे ॥ ५ ॥ दत्तक घेणें तो आपले सपिंड ह्मणजे सात पिढयांतील घ्यावा. सपिंडांतील नसेल तर सगोत्र ह्मणजे आठव्या पिढीपासून चौदाव्या पिढींतील घ्यावा. कदाचित तसें नसेल तर असमानोदक सगोत्रज ह्मणजे पंधराव्या पिढीपासून एकविसाव्या पिढीपर्यंत जे असतील त्यांचे पुत्र वरील अनुक्रमानें घ्यावे. तेही नसतील तर असगोत्र ह्मणजे बाविसाव्या पिढीपासून अठ्ठाविसाव्या पिढीपर्यंत जे असतील त्यांचा घ्यावा ॥ ६ ॥ शौनकाचें वचन. ब्राह्मणांनीं सपिंडांतील मुलगा दत्तक घ्यावा. सपिंडांतील नसेल तर सगोत्रांतील घ्यावा. दुसरा घेऊं नये. ॥ ७ ॥ सगोत्र सपिंडांतील सख्ख्या भावाचाच मुलगा दत्तक घ्यावा. कारण भावाचा मुलगा तोच निपुत्रिकाचा पुत्र होय. त्याच मुलानें त्याच्या सर्व पारलौकिक क्रिया कराव्या ॥ ८ ॥ याप्रमाणें सख्ख्या बंधूंमध्यें एकाला मुलगा असेल तर तोच सर्वबंधूंचा मुलगा होय असें मनूचें वचन आहे ह्मणून बंधूचाच मुलगा दत्तक घ्यावा ॥ ९ ॥ तो नसल्यास सावत्रबंधूंचा घ्यावा. तो नसेल तर सगोत्र सपिंडांतील घ्यावा. त्यांतील नसेल तर भिन्नगोत्रांतील असून सपिंड असा मातुल कुळांतील किंवा पित्याच्या भगिनी इत्यादिकांच्या कुळांतील घ्यावा. तसा न मिळेल तर असपिंड समानगोत्र असा घ्यावा. असपिंड समान गोत्र असाहि न मिळेल तर असपिंड असून निराळ्या गोत्रांतील घ्यावा. आपल्या गोत्रांतील नसून सपिंड असे जे त्यांमध्यें भागिनेय ( बहिणीचा पुत्र ) व आपल्या कन्येचा पुत्र हे दत्तक घेऊं नयेत. याप्रमाणें विरुद्ध संबंध होतो. या योगानें पुत्र असें मनांत आणण्याला अयोग्य असा मातुळ तोही घेऊं नये व याकरितांच सगोत्र असून सपिंड असे जे, त्यांतील आपला भाऊ किंवा चुलता हे घेऊं नयेत ॥ १० ॥

क्षत्रियाणां स्वजातौ वा गुरुगोत्रसमोपि वा ॥ वैश्यानां वैश्यजातिषु शूद्राणां शूद्रजातिषु ॥ ११ ॥ सर्वेषां चैव वर्णानां ज्ञातिष्वेव च नान्यतः ॥ दौहित्रो भागिनेयश्च शूद्रस्यापि च दीयते ॥ १२ ॥ नैकपुत्रेण कर्तव्यं पुत्रदानं कदाचन ॥ बहुपुत्रेण कर्तव्यं पुत्रदानं प्रयत्नतः ॥ १३ ॥ अत्यंतापत्तौ एकपुत्रोऽपि देयइति केचिदाधुनिकाः॥ बहुपुत्रत्वेपि ज्येष्ठपुत्रो न ग्राह्यो न देयः ॥ ज्येष्ठेन जातमात्रेण पुत्रीभवति मानवइति ज्येष्ठस्यैव पुत्रकारणे मुख्यत्वात् ॥ अयं निषेधो दातुरेव न प्रतिग्रहीतुः ॥ १४ ॥ ज्येष्ठभ्राता पितुः समइति वचनात् ॥ मातापित्रोरभावे पितृसमैरपि दातव्यः॥ एवं न स्त्री पुत्रं दद्यात् नप्रतिगृह्णीयात् वा भर्तुः अनुज्ञां विना ॥

भर्तुरसत्वे तु विधवयाऽपि पुत्रो ग्राह्यः ॥ बहुपुत्रत्वे देयश्च सपत्नीपुत्रे सति न ग्राह्यः॥१५॥ सर्वासामेकपत्नीनामेका चेत्पुत्रिणी भवेत् ॥ सर्वास्तास्तेन पुत्रेण पुत्रिण्यो मनुरब्रवीत् ॥ इतिवचनात् सएव तस्याः पुत्रः ॥ १६ ॥ विवादार्णवसेतौ तु ॥ अथ दत्तकं राजनि निवेद्य व्याहृतिभिर्हुत्वा आचार्याय कांचनं हैमंतिकं च धान्यं दत्वा संजातचूडादिसंस्कारकं पंचवर्षानूर्ध्ववयस्कं बालकं पितृदत्तं तदनुज्ञया मातृदत्तं वा सति च तयोः पुत्रांतरे गृह्णीयात् ॥ १७ ॥ अत्र दाता गृहीता पुत्रदानस्वीकारौ होमश्चावश्यकाः ॥

क्षत्रियानें आपल्या जातीचा अथवा गुरूच्या गोत्राशीं ज्याचें गोत्र समान असेल असा दत्तक घ्यावा. वैश्यांनीं वैश्यजातीचा, शूद्रांनीं शूद्रजातीचा दत्तक घ्यावा ॥ ११ ॥ सर्ववर्णांस आपापलें जातींतील दत्तक होतो. भिन्नजातींतील होत नाहीं. मुलीचा मुलगा अथवा बहिणीचा मुलगा ( भाचा ) हे शूद्रांमध्यें दत्तक होतात ॥ १२ ॥ ज्यास एकच मुलगा आहे त्यानें तो दत्तक देऊं नये. ज्यास पुष्कळ मुलें आहेत त्यानें त्यांतील मुलगा दत्तक द्यावा ॥ १३ ॥ परंतु ज्येष्ठपुत्र दत्तक देऊं नये व घेणारानेंही घेऊं नये. कारण मनुष्य वडील मुलगा झाल्यानेंच पुत्रवान् होतो. ह्मणजे पितृऋणापासून मुक्त होतो. सबब वडील मुलासच पितरांच्या उद्देशानें पुत्रानें जीं कामें करावयाचीं त्यांविषयीं मुख्यपणा आहे. वडील मुलगा देऊं नये; ह्मणून जो निषेध सांगितला हा देणारासच आहे. घेणारास नाहीं ॥ १४ ॥ अत्यंत आपत्ति असेल तर एक पुत्रही द्यावा; असें कित्येक राजकार्यनियुक्त आधुनिक विद्वान् ह्मणतात. वडील बंधु पित्यासमान आहे याप्रमाणें वचन आहे. यामुळें मातापितर नसतां पित्यासारखें ज्यास शास्त्रानें सांगितलें आहे, त्यानें दत्तक पुत्र द्यावा. याप्रमाणें स्त्रियांनीं पतीच्या आज्ञेवांचून दत्तक पुत्र देऊं नये व घेऊं नये. पति नसेल तर विधवेनेंही दत्तक पुत्र घ्यावा. व पुष्कळ पुत्र असल्यास दत्तक पुत्र द्यावा. सवतीस मुलगा असतां आपण दत्तक घेऊ नये ॥ १५ ॥ पुष्कळ सापत्नस्त्रिया असून त्यांपैकीं एकीस पुत्र असतां त्या पुत्राच्या योगानें त्या सर्व स्त्रिया पुत्रवती होतात. असें मनुवचन आहे. यामुळें सवतीचा मुलगा दुसऱ्या स्त्रियेचा मुलगा जाणावा ॥ १६ ॥ विवादार्णवसेतूमध्यें तर जो दत्तक घ्यावयाचा तो राजास सांगून व्याहृतीनें होम करून आचार्याकारणें सोनें तसेंच हेमंतऋतूमध्यें उत्पन्न होणारें धान्य देऊन, चौलादिक संस्कार ज्याचे झाले आहेत, असा पांचवर्षांचे आंतील वयाचा मुलगा, ज्या आईबापांस दुसरीं मुलें आहेत, अशा आईबापांनीं दिलेला घ्यावा. आई नसेल तर बापानें दिलेला अथवा बापाचे आज्ञेनें आईनें दिलेला घ्यावा. येथें देणार, घेणार, पुत्रदान, पुत्रग्रहण व होम ह्या मुख्यगोष्टी आहेत ॥ १७ ॥

कृतोपनयनोऽपि दत्तको भवति ॥ मयूखे तु संजातपुत्रोऽपि दत्तको भवतीत्युक्तम् ॥ १८ ॥ यत्तु कालिकापुराणे–पितुर्गोत्रेण यः पुत्रः संस्कृतः पृथिवीपते ॥ आचूडांतं न पुत्रः स पुत्रतां याति चाऽन्यतः ॥ १९ ॥ चूडोपनयनसंस्कारा निजगोत्रेण वै कृताः ॥ दत्ताद्यास्तनयास्तेस्युरन्यथा दास उच्यते ॥ २० ॥ ऊर्ध्वंतु पंचमाद्वर्षान्न दत्ताद्याः सुता नृप ॥ गृहीत्वा पंचवर्षीयं पुत्रेष्टिं प्रथमं चरेदिति॥२१॥ तदसगोत्रपरं ॥ आचूडांतमित्याङभिव्याप्त्यर्थो मर्यादार्थत्वे चूडोपनयनसंस्काराइत्यनेन विरोधापत्तेः ॥ इदं तु वचो न तथाविश्रंभणीयं ॥ द्वित्रिकालिकापुराणपुस्तकेष्वदर्शनात् ॥ २२ ॥ दत्तके प्रतिगृहीते औरसः यदि उत्पद्येत तर्हि दत्तको चतुर्थभागभागी स्यात् ॥ तथा च कात्यायनः–उत्पन्ने त्वौरसे पुत्रे चतुर्थांशहराः सुताः ॥ सवर्णा असवर्णास्तु ग्रासाच्छादनभागिनः ॥ २३ ॥ धनस्वामिनि मृते तदीयपत्नी दुहित्रादिषु सत्स्वपि दत्तकपुत्रएव रिक्थं लभते ॥ दत्तौरसपुत्राभावे पत्नीदुहितरश्चेत्यादिना पत्न्यादीनां रिक्थग्रहणाधिकारप्रतिपादनात् ॥ २४ ॥

मुंज झालेलाही दत्तक घेतां येतो. मयूखामध्यें तर ज्यास मुलगा झालेला आहे असाही दत्तक घेतां येतो, असें सांगितलें आहे ॥ १८ ॥ कालिकापुराणामध्यें असें सांगितलें आहे कीं, ज्या पुत्रास जनकपित्याच्या गोत्रानें चौलपर्यंत संस्कार झाले आहेत, तो दत्तक घेणाराच्या पुत्रपणाप्रत पावत नाहीं ॥ १९ ॥ सबब पालकपित्यानें आपल्या गोत्रेंकरून ज्यामुलाचे चौलोपनयनसंस्कार केले आहेत, ते दत्तकादि पुत्र त्याचे होतील. नाहींतर दास समजावे ॥ २० ॥ असें आहे यास्तव पांचवर्षांचा मुलगा घेऊन प्रथमतः पुत्रेष्टि करावी असें आहे ॥ २१ ॥ सबब पांचवर्षांपुढील दत्तकादि पुत्र होत नाहींत. हें जें सांगितलें तें भिन्नगोत्रातील दत्तक घेण्याच्या संबंधानें आहे. 'आचूडांतं' म्हणजे चौलकर्म धरून पूर्वींचे सर्व संस्कार होई पावेतों, अशा अर्थी येथें 'आ' हें अव्यय आहे. चौलकर्म सोडून पूर्वींचे संस्कार याअर्थीं हा 'आङ्' समजल्यास 'चौलोपनयनसंस्काराः' शेंडी राखणें, मुंजकरणें, इत्यादिक संस्कार जे पुढील वाक्यांत लिहिले आहेत त्याचा या वचनाशीं विरोध येतो. दुसरें हें कालिकापुराणांतील जें वचन याजवर विश्वास ठेवतां येत नाहीं. दोन तीन ज्या कालिकापुराणाच्या पुस्तकाच्या प्रती आहेत त्यांत हें वचन दिसत नाहीं. सबब मयूखानें लिहिल्याप्रमाणें दत्तक घेण्यास हरकत नाहीं. कारण तसा दत्तक घेण्यास कोठें निषेध दिसत नाहीं ॥ २२ ॥ दत्तक घेतल्यानंतर जर औरसपुत्र उत्पन्न होईल तर इस्टेटींतील चौथा हिस्सा दत्तकास द्यावा आणि तीन हिस्से औरसानें घ्यावे. त्यास कात्यायनाचें वचन. दत्तकपुत्र घेतल्यानंतर औरसपुत्र होईल व ते दत्तकपुत्र सवर्ण असतील तर एकविभागाचा चतुर्थांश घेण्याचे ते अधिकारी होतात. परंतु ते

भिन्नवर्णाचे असल्यास अन्नवस्त्र घेण्याचेच अधिकारी होतात ॥ २३ ॥ दत्तक घेणारा असा द्रव्याचा मालक मरण पावला असतां त्याची स्त्री, मुली इत्यादिक असतांही दत्तक पुत्रच सर्व इस्टेटीचा मालक होतो. कारण दत्तक व औरसपुत्र नसेल तर मात्र स्त्री, मुली इत्यादि द्रव्य घेण्यास अधिकारी होतात असें सांगितलें आहे ॥ २४ ॥

## ॥ अथ दत्तकस्य विवाहाद्युपयोगिगोत्रादिनिर्णयः ॥

दत्तकदीधितौ तु-तत्र यश्च प्रतिग्रहीत्रा जातकर्मादिभिश्चूडादिभिर्वा संस्कृतस्त-देकगोत्रः ॥ एतमभिप्रेत्यैव गोत्ररिक्थे जनयितुर्नहरेद्दत्रिमः सुतः ॥ इति शास्त्रमपि प्रवृत्तम् ॥ एतदन्यस्तु प्रतिग्रहीत्रोपनयनमात्रसंस्कृतस्तदुत्तरप्रतिग्रहोतो वा देवरातवत् द्विगोत्रएवज्ञेयः ॥ २५ ॥ तथाप्येषा व्यवस्था अभिवादनश्राद्धादिगतगोत्रनिर्देशार्था ॥ विवाहे तु दत्तकमात्रेण बीजिप्रतिग्रहीत्रोः पित्रोर्गोत्रप्रवरवर्जनं कार्यं प्रवरमंजर्यादि ग्रंथेषु तन्निषेधोक्तेः ॥ २६ ॥ अतः सर्वदत्तकेन जनकपालकयोरुभयोरपि पित्रो-र्गोत्रप्रवरसंबंधिनी कन्या वर्जनीया ॥ नात्र सातपुरुषं पांचपुरुषमित्येवं पुरुषनियम उपलभ्यते ॥ २७ ॥

## दत्तकाच्या विवाहादिकास उपयोगी अशा गोत्रादिकांचा निर्णय.

दत्तकदीधितीमध्यें असें सांगितलें आहे कीं, जो दत्तक घेणाऱ्या पित्यानें जातकर्मादिसंस्कार चूडादिसंस्कार ज्याचे केले आहेत, त्या दत्तकास पालक जो पिता त्याचें एकच गोत्र लागू होतें. या अभिप्रायास अनुसरून मनूनें सांगितलें आहे. दत्तकानें जनकपित्याचें गोत्र व द्रव्य घेऊं नये, याहून भिन्न ह्मणजे घेणारानें दत्तक घेऊन उपनयनमात्र केलेला, अथवा मौंजी झाल्यावर घेतलेला तो देवराताच्या सारखा द्विगोत्रच जाणावा ॥ २५ ॥ जनकपित्याचें गोत्र घेऊं नये ह्मणून जें सांगितलें, तें वडिलांस नमस्कार करितेसमयीं व श्राद्धादिकांमध्यें गोत्राचा उच्चार करते समयींचें आहे. विवाहाविषयीं तर दत्तकमुलानें जनकपिता व दत्तकघेणारा पिता या दोघांचेंही गोत्र वर्ज्य करावें. असा प्रवरमंजर्यादिग्रं-थांमध्यें निषेध सांगितला आहे ॥ २६ ॥ ह्मणून सर्वदत्तकांनीं जनकपिता व पालकपिता या उभयतांच्या गोत्रप्रवरसंबंधाची जी मुलगी तिच्याशीं विवाह करूं नये. येथें सातपुरुष अथवा पांचपुरुष असा पुरुषांचा नियम सांगितला नाहीं ॥ २७ ॥

## ॥ अथ दत्तकसापिंड्यनिर्णयः ॥

दत्तकस्य जनकगोत्रेणोपनयने जनकपितृमात्रोः कुले सातपुरुषं पंचपुरुषं ग्रही-तृमातृपितृकुले त्रिपुरुषम् ॥ ग्रहीतृगोत्रेणोपनयनमात्रे कुले उभयत्र पंचपुरुषं पितृकुले

मातृकुले तु त्रिपुरुषम् ॥ २८ ॥ जातकर्माद्युपनयनांतसंस्कारे ग्रहीत्रा कृते ग्रहीतृकुले साप्तपुरुषम् मातृतः पंचपुरुषम् ॥ अतोन्यूनं जनककुले कल्प्यम् ॥ २९ ॥ केचित्तु दत्तकप्रवेशे कुलद्वयेपि सर्वथा न्यूनमेव सापिंड्यमित्याहुः ॥ एवं दत्तकसंततेरपि सापिंड्यं ज्ञेयम् ॥ ३० ॥ एवं कन्यायाऽपि दत्तकत्वेन उक्तविधिना स्वीकारः कार्यः ॥ तत्र परगोत्रोत्पन्नायाः ग्रहणे विवाहे गोत्रद्वयवर्जनं प्राग्वत् ॥ पुत्रपत्योरभावे दत्तकन्यैव पितृधनभागिनी ॥ ३१ ॥ इति दत्तोपयोगी सर्वनिर्णयः ॥

## दत्तक सापिंड्याचा निर्णय.

जनकपित्याच्या गोत्रानें दत्तकाची मौंजी झाली असेल तर, जनकबाप व मातोश्री यांच्या कुळामध्यें, पितृकुळामध्यें सात पुरुषपर्यंत व मातोश्रीचे कुळांत पांच पुरुषपर्यंत सापिंड्य जाणावें. दत्तकघेणारा जो पिता व मातोश्री यांच्या कुळामध्यें तीन पुरुषपर्यंत सापिंड्य मानावें. ज्यानें दत्तक घेतला असेल त्याच्या गोत्रानें दत्तकाचें फक्त मौंजीबंधन झालें असेल तर, जनकपिता व पालकपिता या उभय कुळांमध्यें पाच पुरुष सापिंड्य मानावें. व उभय मातृकुळामध्यें तीन पुरुषपर्यंत सापिंड्य मानावें ॥ २८ ॥ जातकर्मापासून मौंजीपर्यंत संस्कार दत्तक घेणारानें केले असतील तर घेणाराचे कुळामध्यें सात पुरुष सापिंड्य व मातृकुळामध्यें पांच पुरुषपर्यंत सापिंड्य. याहून जनकाचे कुळामध्यें सापिंड्य कमी मानावें ॥ २९ ॥ कित्येक ग्रंथकार तर दत्तकाचा प्रवेश झाला असतां दोन्हीं कुळांमध्यें सर्वथा कमीच सापिंड्य मानावें असें सांगतात. याप्रमाणें दत्तकसंततीस सापिंड्य जाणावें ॥ ३० ॥ जसा मुलगा दत्तक घेण्यास सांगितला त्याप्रमाणेंच मुलगीही सांगितलेल्या प्रकारानें दत्तक घ्यावी. त्यामध्यें परगोत्रांत उत्पन्न झालेली अशी मुलगी दत्तक घेतली असेल तर त्या मुलीच्या विवाहास जनकपिता व दत्तकपिता या उभयांचें गोत्र वर्ज्य करावें. दत्तक घेणाऱ्या मनुष्यास मुलगा अथवा मुलगी नसेल तर दत्तकमुलगीच पित्याच्या द्रव्याची ग्रहण करणारी अशी होते ॥ ३१ ॥ याप्रमाणें दत्तकसंबंधाचा निर्णय जाणावा.

## ॥ अथ दत्तकग्रहणनिर्णयः ॥

शौनकः-शौनकोऽहं प्रवक्ष्यामि पुत्रसंग्रहमुत्तमम् ॥ अपुत्रो वा मृतपुत्रः पुत्रार्थं समुपोष्य च ॥ १ ॥ वाससी कुंडले दत्वा उष्णीषं चांगुलीयकम् ॥ आचार्यं धर्मसंयुक्तं वैष्णवं वेदपारगम् ॥ २ ॥ बर्हिः कुशमयं चैव पालाशं चेध्ममेव च ॥ एतानाहृत्य बंधूंश्च ज्ञातीनाहूय तत्परः ॥ ३ ॥ बंधूंश्चान्नेन संपूज्य ब्राह्मणांश्च विशेषतः ॥ अन्वाधानादि यत्तंत्रं कृत्वाऽऽज्योत्पवनादिकम् ॥ ४ ॥ दातुः समक्षं गत्वा तु पुत्रं

देहीति याचयेत् ॥ दाने समर्थो दाताऽस्मै येयज्ञेतिच पंचभिः ॥ ५ ॥ देवस्यत्वेति मंत्रेण हस्ताभ्यां प्रतिगृह्य च ॥ अंगादंगेत्यृचं जप्त्वा चाघ्राय शिशुमूर्धनि ॥ वस्त्रादिभिरलंकृत्य पुत्रच्छायागतं शिशुम् ॥ नृत्यगीतैश्च वाद्यैश्च स्वस्तिशब्दैश्च संयुतः ॥ गृहमेत्येध्ममाधाय चरुंहुत्वा विधानतः ॥६॥ स्विष्टकृतादिशेषं च कृत्वा होमं समापयेत् ॥ ७ ॥ स्त्रीभिः पुत्रादिस्वीकारे व्रतादिवद्विप्रद्वारा होमादिकं कार्यम् ॥ एवं शूद्रेणापि ॥ विप्रः शूद्रादिदक्षिणामादाय वैदिकमंत्रैस्तदीयहोमादि करोति तत्र शूद्रः पुण्यफलभाग्भवति किंतु विप्रस्यैव प्रत्यवायः ॥ ८ ॥ उपवासो व्रतं होमस्तीर्थस्नानजपादिकम् ॥ विप्रैः संपादितं यस्य संपन्नं तस्य तत्फलमिति पराशरोक्तेः ॥ ९ ॥ स्मार्तहारिनाथावप्येवमेव ॥ यत्तु पराशरएव–दक्षिणार्थं तु यो विप्रः शूद्रस्य जुहुयाद्धविः ॥ ब्राह्मणस्तु भवेच्छूद्रः शूद्रस्तु ब्राह्मणो भवेदिति. ॥ १० ॥ तत्तु शूद्रस्य कर्मसाद्गुण्यं विप्रस्य च दोषः प्रतिपादयतीति माधवः ॥ स्त्रियाअपि शूद्रवदेवाधिकारः स्त्रीशूद्राश्च सधर्माणइति वाक्यात् ॥ ११ ॥ एवमुक्तविध्यभावे परिगृहीतस्य तु विवाहोचितधनमात्रभागित्वम् ॥ नत्वंशभागित्वमिति ॥ तथा मनुः–अविधाय विधानं यः परिगृण्हाति पुत्रकम् ॥ विवाहविधिभाजं तं न कुर्याद्धनभाजनम् ॥१२॥

## दत्तक घेण्याचा निर्णय.

शौनक सांगतात. ज्यास मुलगा नाहीं अथवा मुलगा होऊन मृत झाला. असेल त्यानें पुत्राकरितां उपोषण करून ॥१॥ धर्मसंपन्न, विष्णुभक्त, वेदपारंगत अशा ब्राह्मणास आचार्य करून त्यास वस्त्रें, कुंडलें, पागोटें, आलंकार, आंगठी हीं देऊन ॥२॥ कुशांसुद्धां बर्हि आणि पळसाच्या समिधा इत्यादिक आणवून आणि बंधु व जातीची मंडळी यांस बोलावून ॥ ३ ॥ बंधूंस व ब्राह्मणांस विशेषेंकरून भोजन घालून अन्वाधानादि आज्योत्पवनांत कर्म करून ॥ ४ ॥ नंतर पुत्र देणाऱ्याच्या समक्ष ( सन्निध ) जाऊन पुत्र दे अशी याचना करावी. नंतर दानकरणारानें 'येयज्ञेन' हे पूर्वोक्त पांचमंत्र तोंडानें म्हणून दात्यानें पुत्र द्यावा ॥ ५ ॥ आणि ' देवस्यत्वा' हा मंत्र तोंडानें म्हणून घेणारानें आपले दोन्ही हातानीं पुत्र घ्यावा व ' अंगादंगात्' या वेदऋचेचा जप करून पुत्राचें मस्तक हुंगावें. नंतर पुत्रास वस्त्रालंकार इत्यादिकांनीं भूषित करून, त्या मुलास नृत्यगीत वाद्यांसहवर्तमान ब्राह्मणांकडून स्वस्तिपाठ करीत गृहाच्या मध्यभागीं आणावें आणि शास्त्रोक्तरीतीनें हवन करावें ॥६॥ 'यस्त्वाहृदाकीरिणामन्यमानोमर्त्यंमर्त्योजोहवीमि' इत्यादि पांचऋचांनीं हवन करावें. नंतर स्विष्टकृतादि होम करून अवशिष्ट राहिलेलें कर्म समाप्त करावें ॥ ७ ॥

जेथें स्त्रियांनीं दत्तक घेतला असेल तेथें व्रतादिकांप्रमाणें होमादिक सर्व कर्म ब्राह्मणाकडूनच करवावें. याप्रमाणें शूद्रांनेंही दत्तक घेतला असतां सर्व कर्म ब्राह्मणाकडूनच करवावें. ब्राह्मणांनीं शूद्रापासून दक्षिणा घेऊन वेदोक्तमंत्रांनीं शूद्रावद्दल होमादि केलें असतां शूद्रास पुण्यफल प्राप्त होतें; परंतु त्याजवद्दलचा दोष ब्राह्मणासच लागतो ॥ ८ ॥ त्यास पराशराचें वचन. उपवास, व्रत, होम, तीर्थांचे ठायीं स्नान, जपादिक ब्राह्मणांनीं ज्याच्यावद्दल जें केलें असेल, तें फळ त्या मनुष्यास प्राप्त होतें ॥ ९ ॥ जो ब्राह्मण दक्षिणेच्या आशेनें शूद्रावद्दल होम करितो, तेथें शूद्र ब्राह्मण होतो, व ब्राह्मण शूद्र होतो. ह्मणजे शूद्राचें कर्म परिपूर्ण होतें, व ब्राह्मणास दोष लागतो ॥ १० ॥ स्त्रियांसही शूद्राप्रमाणें अधिकार जाणावा. कारण स्त्रिया व शूद्र हे समानधर्म असें वाक्य आहे ॥११॥ याप्रमाणें दत्तकाच्या संबंधानें होमादिक जो प्रकार सांगितला त्याप्रमाणें विधियुक्त प्रकारानें दत्तक जर नाहीं घेतला तर दत्तकाच्या विवाहास जितकें द्रव्य लागेल तेवढें मात्र द्रव्य द्यावें. त्यास सर्व द्रव्याचा विभाग मिळावयाचा नाहीं. मनूचें वचन. विधान झाल्यावांचून जो दत्तक घेतला जातो त्यास त्याचे लग्नास जेवढें द्रव्य लागेल तेवढें द्रव्य द्यावें. तो सर्व द्रव्याचा मालक होत नाहीं ॥ १२ ॥ याप्रमाणें दत्तक घेण्याचा निर्णय जाणावा.

## ॥ अथ ऋणविभागनिर्णयः ॥

तत्र कात्यायनः ॥ पित्र्यं पित्र्यर्णसंबद्धमात्मीयं चात्मनाकृतम् ॥ ऋणमेवं कृतं शोध्यं विभागे बंधुभिः सह ॥ १ ॥ पित्र्यर्णसंबद्धं पितृऋणापाकरणार्थं कृतं आत्मीयं स्वकुटुंबभरणाद्यर्थमन्येन कृतं सएव-भ्राता पितृव्यमातृभ्यां कुटुंबार्थमृणं कृतं ॥ विभागकाले देयं तद्रिक्थिभिः सर्वमेव तु ॥ २ ॥ रिक्थाद्ल्पर्णविषयेऽपि सएव-ऋणं प्रीतिप्रदत्तं तु दत्त्वा शेषं विभाजयेत् ॥ प्रदत्तं प्रतिश्रुतं ॥ नारदः यच्छिष्टं पितृदायेभ्यो दत्त्वर्णं पैतृकं च यत् ॥ भ्रातृभिस्तद्विभक्तव्यमृणी स्यादन्यथा पिता ॥ ३ ॥ पितृदायः पित्रा प्रतिश्रुतं ॥ सएव-धर्मार्थं प्रीतिदत्तं च यच्चणं स्वेन योजितम् ॥ तदृश्यमानं विभजेन्नदानं पैतृकाद्धनात् ॥ ४ ॥ धर्मार्थं प्रीत्या च यद्दत्तं दातुं प्रतिश्रुतं पित्रा ॥ स्वेन योजितं स्वयंकृतं तदृणं दृश्यमानं च द्रव्यं विभजेत् ॥ एतदृणातिरिक्तस्य पैतृकाद्धनाद्दानं नास्तीत्यर्थः ॥ ५ ॥ अदृश्यमानशंकायामपि सएव-दृश्यमानं विभज्येत गृहक्षेत्रं चतुष्पदम् ॥ गूढद्रव्याभिशंकायां प्रत्ययस्तत्र कीर्तितः ॥ ६ ॥ गृहोपस्कारवाह्याश्च दोह्याभरणकर्मिणः ॥ दृश्यमाना विभज्यंते कोशं गूढेऽब्रवीन्मनुः ॥ ७ ॥ कर्मिणो दासादयः ॥

## एकत्रांतील ऋणाच्या विभागाचा निर्णय.

कात्यायनाचें वचन. बापानें केलेलें कर्ज, तसेंच पित्यानें केलेलें कर्ज तें फेडण्याकरितां दुसरें काढलेलें कर्ज, कुटुंब पोषणाकरितां कोणीही केलेलें कर्ज, हें कर्ज बंधूंनीं वांटणीचे वेळीं तें आपल्या हिश्शाप्रमाणें विभाग करून घ्यावें ॥ १ ॥ कात्यायनाचें वचन. कुटुंब पोषणाकरितां जें कर्ज, बंधु, चुलता, मावोश्री यांनीं केलें असेल तें कर्ज विभागाचे वेळीं सर्व दायादांनीं द्यावें ॥ २ ॥ वांटणीच्या द्रव्यापेक्षां कर्ज कमी असेल तर.कात्यायनाचें वचन. जें कर्ज असेल तें व पित्यानें दुसऱ्यास देण्याचें जें कबूल केलें असेल तें देऊन बाकीचें जें द्रव्य राहील तें वांटून घ्यावें. नारदाचें वचन. पित्यानें देण्याचें कबूल केलेलें देऊन व बापाचें कर्ज फेडून अवशिष्ट राहील तें बंधूंनीं वांटून घ्यावें. असें न केलें तर पिता ऋणी होईल ॥ ३ ॥ पित्यानें धर्माकरितां अथवा संतोषानें प्रतिश्रत केलेलें व पित्याचें स्वतःचें कर्ज व विद्यमान जी इस्टेट असेल ती इस्टेट वांटून घ्यावी. या ऋणावांचून अन्य जें ऋण ( एखाद्या दुर्व्यसनामुळें कुटुंब पोषणाशिवाय केलेलें कर्ज ) पित्याच्या इस्टेटींतून देऊं नये ॥ ४ ॥ ५ ॥ कांहीं इस्टेट वंचना करून ठेविली अशी शंका असतां नारद सांगतात. दृष्टिगोचर असलेलें घर, शेत, पशू हे वांटून घ्यावेत ॥ ६ ॥ कोणी ठकवून ठेविल्याची शंका आल्यास विश्वास उत्पन्न करणारें असें दिव्य करावें. घरांतील सामुग्री जनावरें, डागडागिने, दासदासी जें विद्यमान असेल तें वांटून घ्यावें ॥ ७ ॥

## ॥ अथ विभक्तस्य स्वर्यातस्य पुत्रपौत्ररहितस्य दायग्रहणादिक्रमः ॥

तत्र याज्ञवल्क्यः–पत्नी दुहितरश्चैव पितरौ भ्रातरस्तथा ॥ तत्सुतो गोत्रजो बंधुः शिष्यः सब्रह्मचारिणः ॥ १ ॥ एषामभावे पूर्वस्य धनभागुत्तरोत्तरः ॥ स्वर्यातस्य ह्यपुत्रस्य सर्ववर्णेष्वयं क्रमः ॥ २ ॥ पत्नी विवाहसंस्कृता सवर्णैव कलावसवर्णविवाहनिषेधात् एकवचनं तु जात्यपेक्षया ॥ सा पतिव्रता धनहारिणी न व्यभिचारिणी ॥ पत्नी भर्तुर्धनहारी या स्यादव्यभिचारिणीति कात्यायनोक्तेः ॥ ३ ॥ विधवा यौवनस्था चेन्नारी भवति कर्कशा ॥ आयुष्यक्षपणार्थं तु दातव्यं जीवनं तदेति हारीतोक्तेः ॥ ४ ॥ प्रजापतिः—पूर्वं मृता त्वग्निहोत्रं मृते भर्तरि तद्धनम् ॥ लभेत्पतिव्रता नारी धर्म एष सनातनः ॥ ५ ॥ अग्निहोत्रमग्नीन् ॥ सएव-जंगमं स्थावरं वापि कुप्यहेमरसांवरम् ॥ आदाय दापयेच्छ्राद्धं मासषाण्मासिकादिकम्॥६॥

पितृव्यगुरुदौहित्रान्भर्तुः स्वस्त्रीयमातुलान् ॥ पूजयेत्कव्यपूर्ताभ्यां वृद्धांश्चाप्यतिथीन् स्त्रियइति ॥ ७ ॥ कुप्यं त्रपुसीसादि ॥ यत्तु बृहस्पतिः–यद्विभक्ते धनं किंचिदाध्यादि विविधं स्मृतम् ॥ तज्जाया स्थावरं मुक्त्वा लभेत मृतभर्तृका ॥ ८ ॥ व्रतस्थापि कृतेप्यंशेन स्त्री स्थावरमर्हतीति ॥ तदुहितृमती तु स्थावरमपि लभतइति स्मृतिचंद्रिकायाम् ॥ दायादानुमतिं विना स्थावरविक्रयादि निषेधपरमिति माधवः ॥ ९ ॥

## विभक्त निपुत्रिक मयताचे द्रव्याचें ग्रहण करणाऱ्यांच्या क्रमाचा निर्णय.

याज्ञवल्क्याचें वचन. प्रथम विवाहितस्त्री, मुली, आई, बाप, बंधु, बंधूची मुलें, गोत्रज (याचा उल्लेख पुढें करूं.) बंधु (आत्मबंधु, पितृबंधु, मातृबंधु.)• शिष्य, सब्रह्मचारी ॥ १ ॥ एका गुरुपाशीं अध्ययन केलेले (गुरुबंधु) हे जे सांगितले त्यांतील प्रथम नसल्यास पुढील मयताचें धन घेण्यास वारस होतात ॥ २ ॥ येथें पत्नी हें एक वचन जात्यभिप्रायाचें आहे. ह्मणजे जितक्या निपुत्रिकाच्या स्त्रिया असतील तितक्या प्रथम वारस. येथें जी स्त्री पतिव्रता असेल तिजला धन घेण्याचा अधिकार आहे. व्यभिचारिणीस नाहीं. यास कात्यायनाचें वचन. पत्नीही पतीचें धन घेण्यास अधिकारी होवे. परंतु ती व्यभिचारिणी नसावी ॥ ३ ॥ हारीताचें वचन–तरुण अशी विधवा स्त्री व्यभिचारिणी असेल तर तिला मरेपर्यंत अन्न द्यावें ॥ ४ ॥ प्रजापतीचें वचन–प्रथम स्त्री मरण पावली असतां अग्निहोत्र ग्रहण करून जावें. ह्मणजे स्त्री मरणानें अग्निहोत्र नाहींसें होवें. पति मरण पावला असतां त्याचें द्रव्य पतिव्रता स्त्री ग्रहण करिते. असा चिरकालापासून चालत आलेला धर्म आहे ॥ ५ ॥ पतिव्रता स्त्रीनें स्थावर, जंगम, सोनें, रुपें, रस, वस्त्रें, कांसें, शिसें इत्यादिक सर्व घेऊन पतीचें मासिकश्राद्ध आब्दिकश्राद्ध करावें ॥ ६ ॥ ससेंच पतीचे चुलते, बाप, दौहित्र, पतीचे मामाभाचे यांचीं श्राद्धें करावींत. वृद्ध अतिथि स्त्रिया यांस अन्न घालावें ॥ ७ ॥ बृहस्पतीचें असें वचन आहे कीं, विभक्त झाले असतां गहाण वगैरे सर्व प्रकारचें द्रव्य मृताच्या स्त्रियेनें घ्यावें. ती पतिव्रता असेल तरीही तिजला स्थावर मिळत नाहीं ॥ ८ ॥ तिजला कन्या असल्यास तिजला स्थावरही मिळतें असें स्मृतिचंद्रिकेमध्यें सांगितलें आहे. दायादाच्या अनुमतीवांचून स्थावराची विक्री करण्यास निषेध आहे असें माधवानें सांगितलें आहे ॥ ९ ॥

यत्तु कात्यायनः ॥ मृते भर्तरि भर्त्रंशं लभेत कुलपालिका ॥ यावज्जीवं नहि स्वाम्यं दानाधमनविक्रयइति ॥ १० ॥ तदर्द्धिधारणार्थदानादिनिषेधपरं ॥

अदृष्टार्थदानतदुपयोग्याधमनादि तु भवत्येव ॥ व्रतोपवासनिरता ब्रह्मचर्ये व्यवस्थिता ॥ दमदानरता नित्यं अपुत्राऽपि दिवं व्रजेदिति कातीयाच ॥ ११ ॥ कात्यायनः- स्वर्याते स्वामिनि स्त्री तु ग्रासाच्छादनभागिनी ॥ अविभक्ते धनांशं तु प्राप्नोत्या- मरणांतिकम् ॥ १२ ॥ सएव–अपकारक्रियायुक्ता निर्लज्जा चार्थनाशिनी ॥ व्यभि- चाररता या च स्त्री धनं न च साऽर्हति ॥ १३ ॥ तत्र एवं सिद्धं संयता पत्नी धन- ग्राहिणीति ॥ अनेकास्तु ता विभज्य गृह्णीयुः ॥ तस्याभावे दुहिता ॥ १४ ॥ अत- एव मनुः–यथैवात्मा तथा पुत्रः पुत्रेण दुहिता समा ॥ तस्यामात्मनि तिष्ठंत्यां क- थमन्यो धनं हरेत् ॥ १५ ॥ दुहितरोऽनेकाश्चेद्विभज्य गृह्णीयुः ॥ तत्रापि काचिदूढा काचिदनूढा चेदनूढैव ॥ १६ ॥ ऊढा तु काचित्सधना परा निर्धनाचेत्सैव लभेत ॥ स्त्रीधनं दुहितॄणामप्रत्तानामप्रतिष्ठितानां चेति गौतमोक्तेः ॥ १७ ॥ स्त्रीपदं पितु- रप्युपलक्षकमिति सांप्रदायिकाः ॥

कात्यायनाचें वचन. पतिमरणानंतर स्त्रियेस आपले नवऱ्याचा हिस्सा जीवात्मा असेपर्यंत मिळतो. परंतु दान देण्यास अथवा गहाण किंवा विक्री करण्यास तिला मा- लकी नाहीं ॥ १० ॥ असें जें वचन आहे तें स्तुतिपाठक, चारण इत्यादिकांकरितां दा- नादि करण्यास निषेध करण्याबद्दलचें आहे. स्वर्गादिकलोकप्राप्तीकरितां दान अथवा तीर्थयात्रा इत्यादि कारणांस्तव गहाण वगैरे ठेववां येतें. कारण व्रत उपवासानें युक्त, ब्रह्मचर्येनें वागणारी जिनें आपलीं इंद्रियें स्वाधीन केलीं आहेत, निरंतर दान करण्या- विषयीं तत्पर, अशी निपुत्रिक स्त्री देखील स्वर्गास जाते ॥ ११ ॥ एकत्रांत असून पति मरण पावला असतां स्त्रियेस अन्नवस्त्र मरेपर्यंत मिळतें. विभक्त होऊन पति मरण पावला असतां सर्वद्रव्य स्त्रियेस मिळतें ॥ १२ ॥ ज्या स्त्रियेविषयीं व्यभिचाराची शंका उत्पन्न होते, तिचें संरक्षणच करावें ॥ १३ ॥ यास हारीताचें वचन. सर्व वचनांच्या विचारें असें सिद्ध होतें कीं, स्त्री इंद्रियनिग्रह करून राहील तर तिला पतीचें द्रव्य घेण्याचा अधिकार येतो. एका पुरुषास अनेक स्त्रिया असल्यास त्यांनीं पतीचें द्रव्य विभाग क- रून घ्यावें. मृत पुरुषास पत्नी नसेल तर मुलगी वारस होते ॥ १४ ॥ त्यास मनूचें वचन. जसा आपण तसाच पुत्र पुत्राशीं समान कन्या सांगितली आहे. ती कन्या असतांना अन्य मनुष्यास द्रव्य घेण्याचा अधिकार कसा मिळेल ? ॥ १५ ॥ मुली पु- ष्कळ असल्यास पित्याचें द्रव्य त्यांनीं विभाग करून घ्यावें. मुलींमध्यें विवाहित आणि अविवाहित अशा असतां जी अविवाहित असेल तिजला द्रव्य घेण्याचा अधिकार आहे ॥ १६ ॥ सर्व विवाहित मुली असतां त्यांपैकीं जी निर्धन असेल तिला द्रव्य मिळतें.

कारण विवाहित, निर्धन, अशा मुलीला स्त्रीधन मिळावें अशी गौतमाची उक्ति आहे ॥ १७ ॥ येथें स्त्रीशब्द पित्याचाही उपलक्षक आहे असें सांप्रदायिक ह्मणतात.

दुहित्रभावे दौहित्रः ॥ दौहित्रो ह्यखिलं रिक्थमपुत्रस्य पितुर्हरेत् ॥ सएव दद्यात् द्वौ पिंडौ पित्रे मातामहाय च ॥ १८ ॥ पौत्रदौहित्रयोर्लोकेन विशेषोऽस्ति धर्मतः ॥ तयोर्हिमातापितरौ संभूतौ तस्य देहतः ॥ दौहित्रोऽपि ह्यमुत्रैनं संतारयति पौत्रवत् ॥ इतिमनूक्तेः ॥ १९ ॥ दौहित्राभावे पिता तदभावे माता ॥ तथा च कात्यायनः-अपुत्रस्यास्य कुलजा पत्नी दुहितरोऽपिवा ॥ तदभावे पिता माता भ्राता पुत्राः प्रकीर्तिताः ॥ २० ॥ विष्णुश्च-अपुत्रधनं पत्न्यभिगामि ॥ तदभावे दौहित्रगामि ॥ तदभावे पितृगामि ॥ तदभावे मातृगामि ॥ तदभावे भ्रातृगामि ॥ तदभावे भ्रातृपुत्रगामि ॥ तदभावे सकुल्यगामीति ॥ २१ ॥ मातुरभावे भ्राता सोदरः ॥ तदभावे तत्पुत्रः ॥ भ्रातृपुत्राभावे गोत्रजाः सपिंडाः ॥ २२ ॥ तत्राप्यादौ पितामही ॥ अनपत्यस्य पुत्रस्य माता दायमवाप्नुयात् ॥ मातर्यपि च वृत्तायां पितुर्माता हरेद्धनमिति मनूक्तेः ॥ २३ ॥ यद्यपीयं मातुरनंतरं श्रुता तथापि यद्धक्रमभ्रातृपुत्रांतेषु मध्ये निवेशायोगाद्दागंतूनामंते निवेशइतिवत् भ्रातृपुत्रांते निवेश्या ॥ तदभावे भगिनी ॥ अनंतरः सपिंडाद्यस्तस्य तस्य धनं भवेदिति मनूक्तेः ॥ २४ ॥ बहवो ज्ञातयो यत्र सकुल्याबांधवास्तथा ॥ यस्त्वासन्नतरस्तेषां सोनपत्यधनं हरेदिति बृहस्पत्युक्तेः ॥ २५ ॥

मुलगी नसल्यास मुलीचा मुलगा धनाचा मालक होतो. त्यास मनूचें वचन. पुत्ररहित अशा पुरुषाचें द्रव्य दौहित्रानें ग्रहण करावें आणि आपला पिता, आपल्या मातोश्रीचा पिता या दोघांस पिंडदान करावें ॥ १८ ॥ मुलाचा मुलगा व मुलीचा मुलगा यांमध्यें धर्मकृत्याचे ठायीं विशेष भेद नाहीं. हे दोघे सारखेच आहेत. कारण एकाची मातोश्री व एकाचा पिता हे दोघे एकाच्या शरीरापासून झाले आहेत. सबब मुलीचा मुलगाही मुलाच्या मुलाप्रमाणेंच मातामह ह्मणजे आईचे पित्यास परलोकाविषयीं तारणारा होतो अशी मनूक्ति आहे ॥ १९ ॥ मुलीचा मुलगा नसेल तर पिता, पिता नसेल तर मातोश्री. यास कात्यायनाचें वचन. निपुत्रिक असा जो मनुष्य त्याची प्रथम पतिव्रता स्त्री धन घेण्यास अधिकारी होते, ती नसेल तर मुलगी, मुलगी नसल्यास तिचीं मुलें, मुलें नसल्यास मयताचा बाप, बाप नसल्यास मातोश्री, मातोश्री नसल्यास बंधु, बंधु नसल्यास त्याचीं मुलें ॥ २० ॥ विष्णुस्मृतीचाही अर्थ असाच आहे. पुतणे नसतील तर गोत्रज द्रव्य घेतील असा आहे ॥ २१ ॥ मातोश्री नसेल तर सख्खा बंधु, तो नसेल तर त्याचा मुलगा, मुलगा नसेल तर गोत्रज सपिंड ॥ २२ ॥ त्यामध्यें प्रथम पितामही (बा-

पाची आई ) ज्यास अपत्य नाहीं असा जो पुत्र त्याची मातोश्री दायग्रहण करिते. मातोश्री निवृत्त झाली असतां पितामहीनें द्रव्य घ्यावें अशी मनूक्ति आहे ॥ २३ ॥ आतां जरी येथें आईचे पश्चात् बापाची आई वारस सांगितली, तथापि स्त्रियेपासून पुतण्यापर्यंत सांगितलेला जो क्रम त्यामध्यें पितामहीचा सन्निवेश करितां येत नाहीं. कारण आगंतुक जे आहेत त्यांचा शेवटीं सन्निवेश करावा असा न्याय आहे, म्हणून पुतण्याच्या नंतर बापाच्या आईला दायाचा वारसा सांगितला आहे. बापाची आई नसेल तर सपिंड, कारण सपिंडामध्यें जो नात्यानें जवळचा असेल तो मृताचें द्रव्य घेण्यास अधिकारी होईल अशी मनूची उक्ति आहे ॥ २४ ॥ ज्ञाती, बंधुकुलांतले असे पुष्कळ असतां त्यांत जो नात्यानें मृताच्या जवळचा संबंधी असेल त्यानें मृताचें द्रव्य घ्यावें. अशी बृहस्पतीची उक्ति आहे ॥ २५ ॥

तस्या अपि भ्रातृगोत्रउत्पन्नत्वेन गोत्रजत्वाविशेषाच्च ॥ सगोत्रता परं नास्ति ॥ न च सात्र धनग्रहणप्रयोजकत्वेनोक्ता ॥ तदभावे पितामहसापत्नभ्रातरौ विभज्य गृह्णतः ॥ २६ ॥ स्वजनकजनकत्वेन स्वजनकजन्यत्वेन च समानप्रत्यासत्तेः ॥ प्रत्यासत्तिसाम्ये पाठक्रमायणाविशेषांतराभावे याऽन्यत्राप्येवमेव ॥ २७ ॥ तेन तयोरभावे प्रपितामहपितृव्यभिन्नोदरभ्रातृपुत्राः विभज्य गृह्णीयुः ॥ सर्वे सपिंडाः समानोदकाश्च प्रत्यासत्तिक्रमेण ॥ २८ ॥ तोश्चाह मनुः–सपिंडता पुरुषे सप्तमे विनिवर्तते ॥ समानोदकभावस्तु निवर्तेत चतुर्दशे ॥ २९ ॥ जन्मनामस्मृतेरेके तत्परं गोत्रमुच्यते ॥ सोदकाभावे बंधवः ॥ ३० ॥ ते च स्मृत्यंतरे–आत्मपितृष्वसुः पुत्रा आत्ममातृष्वसुः सुताः ॥ आत्ममातुलपुत्राश्च विज्ञेया आत्मबांधवाः ॥ पितुः पितृष्वसुः पुत्राः पितुर्मातृष्वसुःसुताः ॥ पितुर्मातुलपुत्राश्च विज्ञेयाः पितृबांधवाः ॥ ३१ ॥ मातुः पितृष्वसुः पुत्रा मातुर्मातृष्वसुः सुताः ॥ मातुर्मातुलपुत्राश्च विज्ञेया मातृबांधवाः ॥ ३२ ॥ अथ क्रमः पाठिकएव ॥

बहिणीसहि बंधूच्या गोत्रामध्यें उत्पन्न झाल्यामुळें गोत्रजपणा आहे, परंतु सगोत्रता नाहीं. द्रव्य घेण्यास सगोत्रता असली पाहिजे असें येथें सांगितलें नाहीं. बहीण नसल्यास बापाचा बाप ( पितामह ) सावत्रभाऊ यांनीं मपताच्या द्रव्याची सारख्या रीतीनें वांटणी करून घ्यावी ॥ २६ ॥ कारण आपल्या पित्याचा जनक म्हणून आजाशीं व आपल्या पित्यापासून उत्पन्न झालेला म्हणून सावत्र भावाशीं मृत मनुष्याचा संबंध सारखाच आहे. जेथें संबंधाचा सारखेपणा असेल, असें अन्यस्थलींहि धन घेण्याचे अधिकारी जे सांगितले असतील त्यांचे क्रमांत विशेष वचनेंकरून कांहीं विशेष हक्क क-

धन केले नसतील तेथें हाच नियम समजावा ॥ २७ ॥ आजा व सावत्रभाऊ हे नसतील तर पणजा व चुलते व सावत्रभावाचीं मुलें यांनीं द्रव्य सारखें वांटून घ्यावें. तेही नसतील तर सर्व सपिंड ( पित्याकडील सात पुरुष ) व मातोश्रीकडील पाच पुरुष, समानोदक, ( पित्याकडील चौदा पुरुषांपर्यंत ) यांनीं आपल्या जवळच्या नात्याच्या क्रमानें द्रव्य वांटून घ्यावें ॥ २८ ॥ मनूचें वचन. सपिंडता सात पुरुषांपर्यंत. पुढें निवृत्त होते. समानोदकपणा चौदा पुरुषांपर्यंत. पुढें निवृत्त होतो ॥ २९ ॥ जन्म आणि नांव यांचें जों कालपर्यंत स्मरण आहे, तोंपर्यंत समानोदकपणा आहे. त्याच्या पुढें सगोत्र असें ह्मणतात. समानोदक नसेल तर बंधूस वारसा येतो ॥ ३० ॥ ते बंधु तीन प्रकारचे. आत्मबंधु, पितृबंधु, मातृबंधु. यास वचन. आत्मबंधु ह्मणजे आपल्या आतेचे मुलगे, आपल्या मावशीचे मुलगे, आणि आपल्या मामाचे मुलगे हे आत्मबंधु जाणावेत ॥ ३१ ॥ पितृबंधु ह्मणजे बापाच्या आतेचे पुत्र, बापाच्या मावशीचे पुत्र, बापाच्या मामाचे पुत्र हे पितृबंधु जाणावेत. मातृबंधु ह्मणजे आईच्या आतेचे पुत्र, आईच्या मावशीचे पुत्र आणि आईच्या मामाचे पुत्र हे मातृबंधु जाणावेत ॥ ३२ ॥ हे लिहिलेल्या अनुक्रमानेंच धन घेण्यास अधिकारी होतात.

बंधूनामभावे आचार्यस्तदभावे शिष्यः पुत्राभावे प्रत्यासन्नसपिंडस्तदभावे आचार्यस्तदभावेऽन्तेवासीत्यापस्तंबोक्तेः ॥ १ ॥ शिष्याभावे सहाध्यायी तदभावे श्रोत्रियः. ॥ श्रोत्रिया ब्राह्मणस्यानपत्यस्य रिक्थं भजेरन्निति गौतमोक्तेः ॥ २ ॥ तदभावेऽन्यो ब्राह्मणः ॥ सर्वेषामप्यभावे तु ब्राह्मणा रिक्थभागिनः ॥ त्रैविद्याः शुचयो दांतास्तथाधर्मो न हीयतइति कातीयात् ॥ ३ ॥ नारदश्च–सर्वत्रादायकं राजा हरेत् ब्रह्मस्ववर्जितम् ॥ अदायिकं तु ब्रह्मस्वं श्रोत्रियेभ्यः प्रदापयेत् ॥ ४ ॥ बृहस्पतिः—ये पुत्राः क्षत्रविट्शूद्राः पत्नीभ्रातृविवर्जिताः ॥ तेषां धनहरो राजा सर्वस्याधिपतिर्हि सः ॥ ५ ॥

बंधु नसतील तर आचार्य, आचार्य नसेल तर शिष्य, यास आपस्तंबाचें वचन. पुत्राचा अभाव असेल तर जवळचा सपिंड, तो नसेल तर आचार्य, आचार्य नसेल तर सहाध्यायी ॥ १ ॥ तो नसेल तर श्रोत्रिय, गौतमाचें वचन. ज्यास संतति नाहीं अशा मनुष्याचें द्रव्य श्रोत्रियब्राह्मणानें घ्यावें ॥ २ ॥ श्रोत्रिय नसेल तर अन्य ब्राह्मणानें घ्यावें. कात्यायनाचें वचन. कोणीहि वारस नसल्यास त्रैविद्य, शुद्ध, व ज्यांनीं इंद्रियांचें दमन केलें आहे असे जे ब्राह्मण ते द्रव्याचे वारस होतात ॥ ३ ॥ असें केल्यानें धर्माची हानी होत नाहीं. नारदाचें वचन. ज्यास कोणी वारस नाहीं अशा

ब्राह्मणाखेरीज इतर जातीच्या मनुष्याचें द्रव्य राजानें घ्यावें. ब्राह्मणाचें बेवारशी द्रव्य श्रोत्रियास द्यावें ॥ ४ ॥ बृहस्पतीचें वचन. ज्यास पुत्र, बंधु इत्यादिक कोणी नाहींत असे जे क्षत्रिय, वैश्य, शूद्र यांचें द्रव्य राजानें घ्यावें. कारण राजा हा सर्वांचा मालक आहे ॥ ५ ॥

## ॥ अथ वानप्रस्थादीनां धनविभागनिर्णयः ॥

याज्ञवल्क्यः—वानप्रस्थयतिब्रह्मचारिणां रिक्थभागिनः ॥ क्रमेणाचार्यसच्छिष्यधर्मभ्रात्रेकतीर्थिनः ॥ १ ॥ ब्रह्मचारी नैष्ठिकः ॥ उपकुर्वाणस्य तु पित्राद्यएव ॥ धर्मभ्राता प्रतिपन्नो भ्राता ॥ एकतीर्थः एकाश्रमी ॥ धर्मभ्राताचासावेकतीर्थीति कर्मधारयः ॥ मृतस्य रिक्थग्राहिणा येन केनापि राजपर्यंतं तेनौर्ध्वदेहिकं दशाहांतं कार्यम् ॥ तथा च विष्णुः ॥ यश्चार्थहरः स पिंडदायी स्मृत इति ॥ २ ॥

## वानप्रस्थादिकांच्या द्रव्याचा निर्णय.

याज्ञवल्क्याचें वचन. वानप्रस्थाचें द्रव्य आचार्यानें घ्यावें. संन्याशाचें द्रव्य त्याच्या शिष्यानें घ्यावें. ब्रह्मचाऱ्याचें द्रव्य एकाच आश्रमांतील जो धर्मबंधु त्यानें घ्यावें ॥ १ ॥ येथें ब्रह्मचारी शब्दाचा अर्थ नैष्टिक ब्रह्मचारी ह्मणजे जन्मभर ब्रह्मचारी राहणारा. उपकुर्वाण ह्मणजे कांहीं नियमित काळपर्यंत ब्रह्मचर्यानें राहणारा. उपकुर्वाणब्रह्मचाऱ्याचे वारस पित्रादिकच आहेत. धर्मभ्राता ह्मणजे धर्मार्थ मानलेला बंधु. एकतीर्थी ह्मणजे एका आश्रमाचे धर्मबंधु. मृताचें जो द्रव्य घेईल तो राजापर्यंत जे अधिकारी सांगितले त्यानें दहा दिवसपर्यंत क्रिया करावी. यास विष्णूचें वचन. जो द्रव्य ग्रहण करणारा त्यानें पिंडदान करावें ॥ २ ॥

## ॥ अथ संसृष्टधनविभागः ॥

तत्र संसर्गिणोबृहस्पतिना दर्शिताः ॥ यथा—विभक्तोयः पुनः पित्रा भ्रात्रा चैकत्र संस्थितः ॥ पितृव्येणाथवा प्रीत्या सतु संसृष्ट उच्यते ॥ १ ॥ तेन पित्रादिभिः सह विभक्तानां पुनरन्योन्येच्छया पूर्वकृतविभागमुपेक्ष्य ॥ यत्तव धनं तन्मम धनं यन्मम धनं तत्तवापीति व्यवस्थया एकरूपतयाऽवस्थानं संसर्ग इति प्रतिपन्नं ॥ येषामेवोत्पत्तितोऽविभक्तत्वं तेषामेव विभागानंतरमेकत्रावस्थानं संसर्गः ॥ २ ॥ मयूखः—विद्यमानं भावि वा धनमावयोः पुनर्विभागावधि साधारणमित्याकारिका बुद्धिरिच्छा वा संसर्गः ॥ ३ ॥

## संसृष्ट द्रव्याच्या विभागाचा निर्णय.

बृहस्पतीनें संसृष्ट सांगितले आहेत ते असे, प्रथमतः पिता, बंधु यांच्यापासून विभक्त होऊन पुनः प्रीतीच्या योगानें एकत्र होऊन जो राहतो त्यास संसृष्ट असें ह्मणावें ॥ १ ॥ तात्पर्य पित्यादिकाशीं सहवर्तमान विभक्त होऊन पुन: परस्परांच्या इच्छेनें पूर्वी केलेला जो विभाग याची उपेक्षा करून जें तुझें द्रव्य तें माझें द्रव्य व जें माझें द्रव्य तें तुझें द्रव्य अशा एकरूपतेनें जें राहणें त्याचें नांव संसर्ग. ज्यास उत्पत्तीनेंच अविभक्तपणा आहे त्याचेच विभागानंतर जें एकत्र राहणें त्यास संसर्ग असें ह्मणतात ॥ २ ॥ मयूखामध्यें तर यावेळीं विद्यमान व पुढें जें मिळेल तें द्रव्य तुमचे आणि आमचे विभाग होईपर्यंत समाईक, अशी जी बुद्धि अथवा इच्छा त्याचें नांव संसर्ग ॥ ३ ॥

मनुविष्णू– विभक्ताः सहजीवंतो विभजेरन्पुनर्यदि ॥ समस्तत्र विभागः स्याज्ज्येष्ठ्यं तत्र न विद्यते ॥ ४ ॥ अत्र समंइत्यनेन विंशोद्धाराद्यभावएव सूचितः ॥ नत्वसवर्णभ्रातॄणामपि भागसमता ॥ अतएव बृहस्पतिः ॥ विभक्ता भ्रातरो ये च संप्रीत्यैकत्र संस्थिताः ॥ पुनर्विभागकरणे तेषां ज्यैष्ठ्यं न विद्यते ॥ ५ ॥ इदं तु ज्येष्ठांशमेव निषेधयति न तु भागसाम्यमपि ज्ञापयति ॥ बृहस्पतिः–संसृष्टानां तु यः कश्चिद्विद्याशौर्यादिना धनम् ॥ प्राप्नोति तस्य दातव्यो ह्यंशः शेषाः समांशिनः ॥ ६ ॥ यदि तु येन केनचित्पुत्रेण सह पिता संसृष्टः स पुत्रांतरमुत्पाद्य मृतस्तदा तद्धनं संसृष्टविभक्तजाभ्यां पुत्राभ्यां समं विभजनीयम् ॥ ७ ॥ ऊर्ध्वं विभागाज्जातस्तु पित्र्यमेव हरेद्धनम् ॥ संसृष्टास्तेन वायेस्तुर्विभजेरंस्तैः सह ॥ इतिभागुरुक्तमनुवचनात् ॥ ८ ॥ तत्रायं विशेषः ॥ असंसृष्टेन पित्रा स्वासाधारणधनशरीरायासाभ्यां यदर्जितं तद्विभक्तजस्यैव न तु पुत्रांतरस्यापि ॥ तथा च बृहस्पतिः–पुत्रैः सह विभक्तेन पित्रा यत्स्वयमर्जितम् ॥ विभक्तजस्य तत्सर्वमनीशाः पूर्वजाः स्मृताः ॥ ९ ॥ अत्र स्वयमित्यनेनासाधारणधनशरीरायासेनार्जनं दर्शयति सर्वशब्देन च पित्रार्जितं बहुतरमपि विभक्तजस्यैवेति सूचितम् ॥ १० ॥

मनु आणि विष्णु यांचीं वचनें- प्रथमतः विभक्त होऊन नंतर एकत्र राहून पुनः जर विभक्त होऊं लागतील तर तेथें विभाग सारख्यारीतीनें करावा. तेथें वडीलपणा वगैरे यांच्या विचाराची जरूरी नाहीं ॥ ४ ॥ बृहस्पतीच्या वचनाचा अर्थ असाच आहे ॥ ५ ॥ संसृष्टी जे मनुष्य त्यांमध्यें एखाद्यानें विद्या, शौर्य इत्यादिकेंकरून जर द्रव्यसंपादन केलें, तर त्यास दोन भाग द्यावेत. बाकीच्या मंडळीनें सारखे विभाग करून

घ्यावेंव ॥ ६ ॥ पिता प्रथमतः विभक्त होऊन नंतर एखाद्या मुलाशीं संसृष्ट होऊन राहिला, आणि नंतर त्यास दुसरा पुत्र झाल्यानंतर पिता मरण पावला असतां तें द्रव्य संसृष्टावस्थेंत झालेला मुलगा त्यानें व पूर्वी विभक्त होऊन पुनः पित्याशीं एकत्र राहिलेल्या मुलानें सारख्या हिश्शानें वांटून घ्यावें ॥ ७ ॥ विभागानंतर झालेला जो मुलगा त्यानें पित्याचें द्रव्य ग्रहण करावें जे संसृष्ट असतील त्यांनींही घ्यावें. जे संसृष्ट नसतील त्यांचा संबंध नाहीं ॥ ८ ॥ यामध्यें असा विशेष. संसृष्ट न झालेला असा जो बाप त्यानें आपल्या द्रव्यानें अथवा शरीरानें जें द्रव्य संपादन केलें असेल, तें विभागानंतर झालेला जो मुलगा त्याचेंच आहे. अन्य मुलांचें नाहीं. बृहस्पतीच्या वचनाचा अर्थही असाच आहे ॥ ९ ॥ याप्रमाणें विभक्त झाल्यानंतर पित्यानें स्वतःकरितां जें कर्ज वगैरे केलें असेल तेंही विभागानंतर झालेला मुलगा त्यानेंच द्यावें ॥ १० ॥

एवं विभक्तजपित्रा यदृणादिकं स्वार्थमेव कृतं तद्विभक्तजेनैव देयं ॥ यथा धने तथर्णेऽपि दानाधानक्रयेषु च ॥ इति प्रागुक्तवचनात् ॥ ११ ॥ यदि पुनः संसृष्टेन सह साधारण्येन ऋणादिकं पित्रा कृतं तदा तदुभाभ्यां संसृष्टविभक्ताभ्यां समाधेयम् ॥ १२ ॥ प्रजापतिः—अंतर्धनं तु यद्द्रव्यं संसृष्टानां तु यद्भवेत् ॥ भूमिं गृहं त्वसंसृष्टाः प्रगृह्णीयुर्यथांशतः ॥ १३ ॥ शंखनारदस्मृतिः—भ्रातृणामप्रजाः प्रेयात्कश्चिच्चेत्प्रव्रजेत वा ॥ विभजेरन्धनं तस्य शेषास्ते स्त्रीधनं विना ॥१४॥ नारदः—रक्षंति शय्यां भर्तुश्चेदाच्छिंद्युरितरासु च ॥ भरणं चास्य कुर्वीरन् स्त्रीणामाजीवनक्षयात् ॥ १५ ॥ बृहस्पतिः—या तस्य भगिनी सा तु ततोंऽशं लब्धुमर्हति ॥ अनपत्यस्य धर्मोऽयं अभार्यापितृकस्य च ॥ १६ ॥ केचित्तु यातस्य दुहितेति पेठुः ॥ दुहितृभगिन्योरभावेऽनंतरः सपिंडः ॥

जर संसृष्ट पुत्र व विभक्त झालेला पुत्र हे एकत्र असतां ऋण केलें असेल तर उभयतां मुलांनींहि तें द्यावें ॥ ११ ॥ १२ ॥ प्रजापतीचें वचन. जें गुप्त करून ठेविलेलें असें सोनें, रुपें इत्यादिक द्रव्य तें संसृष्टांनींच घ्यावें. भूमि, घर इत्यादिक स्थावर इस्टेट यथाविभाग असंसृष्टानें घ्यावें ॥ १३ ॥ शंख नारदस्मृतींतील वचन. बंधूंपैकीं कोणी मरण पावेल किंवा संन्यासी होईल तर त्याचें द्रव्य इतर बंधूंनीं वांटून घ्यावें. परंतु स्त्रीधन खेरीजकरून ॥ १४ ॥ आणि त्याच्या पतिव्रता स्त्रिया असतील तर त्यांचें रक्षण मरणपर्यंत करावें. पतिव्रता नसतील तर रक्षण करण्याची जरूर नाहीं ॥ १५ ॥ बृहस्पतीचें वचन. ज्यास संतति आणि भार्या वगैरे कोणी नाहीं, असा मनुष्य मेल्यानंतर त्याचें द्रव्य त्याच्या बहिणीनें घ्यावें. कित्येक ग्रंथकार

त्याची कन्या असेल तर तिनें घ्यावें असें ह्मणतात. मुलगी आणि बहीण, हे दोघेही नसल्यास जवळचा सपिंड जो असेल त्यानें द्रव्य घ्यावें. याप्रमाणें संसृष्टधनाचा निर्णय जाणावा ॥ १६ ॥

## ॥ अथस्त्रीधननिर्णयः ॥

तत्र मिताक्षरा—विभजेरन्सुताः पित्रोरित्यत्र स्त्रीपुंसधनविभागं संक्षेपेणाभिधाय पुरुषधनविभागो विस्तरेणाभिहितः ॥ इदानीं स्त्रीधनविभागं विस्तरेणाभिधास्यन् तत्स्वरूपमाह याज्ञवल्क्यः ॥ पितृमातृपतिभ्रातृदत्तमध्यग्न्युपागमत् ॥ अधिवेदनिकाद्यं च स्त्रीधनं तत्प्रकीर्तितम् ॥ १ ॥ यत्पुनर्मनुनोक्तम्–अध्यग्न्यध्यावहनिकं दत्तं च प्रीतिकर्मणि ॥ भ्रातृमातृपितृप्राप्तं षड्विधं–स्त्रीधनं स्मृतमिति स्त्रीधनस्य षड्विधत्वं ॥ तन्न्यूनसंख्यावच्छेदार्थं नाधिकसंख्यावच्छेदाय ॥ २ ॥ विष्णुः–पितृमातृसुतभ्रातृदत्तमध्यग्न्युपागतं ॥ आधिवेदनिकं बंधुदत्तं शुल्कान्वाधेयकमिति अध्यग्न्यादिस्वरूपं च कात्यायनेनाभिहितम् ॥ विवाहकाले यत्स्त्रीभ्यो दीयते वह्निसन्निधौ ॥ तदध्यग्निकृतं सद्भिः स्त्रीधनं परिकीर्तितम् ॥ ३ ॥ यत्पुनर्लभते नारी नीयमाना पितुर्गृहात् ॥ अध्यावहनिकं नाम स्त्रीधनं तदुदाहृतम् ॥ प्रीत्या दत्तं तु यत्किंचित्श्वश्र्वा वा श्वशुरेण वा ॥ पादवंदनिकं चैव प्रीतिदत्तं तदुच्यते ॥ ४ ॥ ऊढया कन्यया वापि पत्युः पितृगृहेपिवा ॥ भर्तुः सकाशात्पित्रोर्वा लब्धं सौदायिकं स्मृतमिति ॥ ५ ॥ सुदायाः संबंधिनः तेभ्यः लब्धं धनं सौदायिकं ॥ कात्यायनः ॥ विवाहात्परतोयत्तु लब्धं भर्तृकुलात् स्त्रिया ॥ अन्वाध्येयं तु तत्प्रोक्तं यल्लब्धं स्वकुलात्तथा ॥ ६ ॥

## स्त्रीधनाचा निर्णय.

मिताक्षराचें वचन. मुलांनीं मातापितरांचें द्रव्य विभाग करून घ्यावें. असें सांगून स्त्रीपुरुषांचें द्रव्य संक्षेपानें सांगून पुरुषद्रव्याचा विभाग विस्तारानें सांगून आतां स्त्रीधनाचा विभाग सांगण्याकरितां त्याचें स्वरूप याज्ञवल्क्य सांगतात. १ मुलीस बापानें दिलेलें द्रव्य, २ मातोश्रीनें दिलेलें, ३ पतीनें दिलेलें, ४ बंधूंनीं दिलेलें, ५ कन्येस विवाहाचेवेळीं अग्निजवळ मामा इत्यादिकांनीं दिलेलें द्रव्य अध्यग्नि स्त्रीधन, ६ अधिवेदनिक ह्मणजे द्वितीय विवाह करिते समयीं पहिल्या स्त्रियेच्या समजुतीसाठीं जें त्या स्त्रियेस द्रव्य दिलें जावें, त्या स्त्रीधनास आधिवेदनिक अशी संज्ञा आहे. ७ आद्यशब्दानें रिक्थक्रीतादि जें तिजला मिळालें असेल त्यासही स्त्रीधन असें सांगितलें आहे ॥ १ ॥ जें पुनः मनूनें

अध्यग्नि, 'आध्यहवनिक, प्रीतिकर्मांचे ठायीं दिलेलें (प्रीतिदत्त) बंधु, मातोश्री, पिता यांपासून प्राप्त झालेलें, असें सहा प्रकारचें स्त्रीधन सांगितलें आहे. मनूनें आपले वाक्यांत सहा प्रकारचें स्त्रीधन ह्मणून सांगितलें आहे, तें सहांपेक्षां कमी नाहीं असें सुचविण्याकरितां आहे ॥ २ ॥ विष्णूचें वचन. बाप, आई, मुलगा, बंधु यांनीं दिलेलें, लग्नाचेवेळीं अग्नीचे जवळ मिळालेलें तें अध्यग्नि, आधिवेदनिक दुसरें लग्न करतेसमयीं पहिले स्त्रीस दिलेलें, बंधुदत्त ह्मणजे पितृबंधु, मातृबंधु आणि आत्मबंधु इत्यादिकांनीं दिलेलें शुल्क मुलीस लग्नाचे वेळीं दुसरे पदार्थाचे किंमतीबद्दल दिलेलें, अन्वाधेयक लग्न झाल्यानंतर मिळालेलें. या प्रत्येकास स्त्रीधन अशी संज्ञा आहे. अध्यग्न्यादिकांचें स्वरूप कात्यायन सांगतात. लग्नाचे वेळीं अग्निसन्निध जें द्रव्य स्त्रीस दिलें जावें, त्यास अध्यग्नि अशी संज्ञा आहे. पित्याचे घरांतून नवऱ्याचे घराला स्त्री जात असतां त्यावेळेस जें द्रव्य दिलें जातें, त्यास आध्यहवनिक असें सांगितलें आहे ॥ ३ ॥ पादवंदनसमयीं प्रीतीनें सासरा, सासु इत्यादिकांनीं जें द्रव्य स्नुषेस दिलें जातें, त्यास पादवंदनिक व प्रीतिदत्त अशी संज्ञा आहे ॥ ४ ॥ लग्न झालेल्या मुलीस बापाचे घरीं अथवा पतीचे घरीं पति अथवा मातापितर यांपासून मिळालेलें द्रव्य त्यास सौदायिक अशी संज्ञा आहे ॥ ५ ॥ सुदाय ह्मणजे संबंधी लोक त्यांपासून मिळालेलें जें द्रव्य, त्यास सौदायिक अशी संज्ञा आहे. कात्यायनाचें वचन. लग्न झाल्यानंतर पतीचे कुळाकडून, तसेंच बापाचे कुळाकडून मिळालेलें द्रव्य, त्यास अन्वाधेयक स्त्रीधन असें ह्मणतात ॥ ६ ॥

गृहोपस्करवाह्यानां दोह्याभरणकर्मिणाम् ॥ मूल्यं लब्धं तु यत्किंचिच्छुल्कं तत्परिकीर्तितम् ॥ ७ ॥ कात्यायनः–अधिविन्नस्त्रियै दद्यादाधिवेदनिकं समम् ॥ न दत्तं स्त्रीधनं यासां दत्ते त्वर्द्धं प्रकल्पयेत् ॥ ८ ॥ देवलः–भर्त्रा प्रतिश्रुतं देयमृणवत्स्त्रीधनं सुतैः ॥ प्रतिश्रुतं स्त्रियै स्त्रीभ्यो धनदाने विशेषमाह कात्यायनः–पितृमातृपतिभ्रातृज्ञातिभिः स्त्रीधनं स्त्रियै ॥ यथाशक्त्या द्विसाहस्राद्दातव्यं स्थावरादृते ॥ स्थावरातिरिक्तं सहस्रद्वयपणावधिज्ञेयमिति मदनः ॥ ९ ॥ व्यासोऽपि–द्विसाहस्रः परो दायः स्त्रियै देयो धनस्य च ॥ इदं च द्विसाहस्रावधिकं दानं प्रतिवर्षं ॥ अनेकवर्षेषु इतोऽधिकमपि शक्तौ स्थावरमपि च देयमित्यपि ॥ १० ॥ सपत्नदायादवंचने दत्ते द्रव्ये धारणमात्रार्थं दत्ते च भूषणादौ स्त्रीस्वत्वं नास्तीत्याह कात्यायनः–तत्र सोपधि यद्दत्तं यच्च योगवशेन वा ॥ पित्रा भ्रात्राऽथ पत्या वा न च स्त्रीधनमुच्यते ॥ ११ ॥ अतएव मनुः–न निर्हारं स्त्रियः कुर्युः कुटुंबाद्बहुमध्यकात् ॥ अपि च वित्तादिभ्वस्य भर्तुरनाज्ञयेति निर्हारो व्ययः ॥ १२ ॥

घरांतील सामग्री बैल, घोडे, हत्ती, उंट वगैरे वाहनें, दूध देणारे गायी, म्हशी इत्यादिक अलंकार यांच्या किमतीबद्दल जें धन मिळालें असेल त्यास शुल्क अशी संज्ञा आहे ॥ ७ ॥ कात्यायनाचें वचन. दुसरें लग्न करतेसमयीं पहिले स्त्रीस तिच्या समजुतीकरितां जें द्रव्य दिलें जातें त्यास आधिवेदनिक स्त्रीधन अशी संज्ञा आहे. ज्या स्त्रीस स्त्रीधन दिलें नसेल तिला आधिवेदनिक द्रव्य द्यावें. स्त्रीधन दिलें असेल तर अर्धं द्रव्य द्यावें ॥ ८ ॥ देवलाचें वचन. पतीनें स्त्रियेस देण्याचें कबूल केलेलें द्रव्य मुलांनीं कर्जाप्रमाणें दिलेंच पाहिजे. याविषयीं कात्यायनाचें वचन. पिता, मातोश्री, बंधु, पति, आदीची मंडळी यांनीं स्त्रियेला स्त्रीधन आपल्या शक्तीप्रमाणें दोनहजार पर्यंत द्यावें. स्थावर मात्र देऊं नये ॥ ९ ॥ व्यासाचें वचन. दोन हजार रुपयेपर्यंत स्त्रियेस धन द्यावें. ही जी दोन हजारांची मर्यादा सांगितली, ती प्रतिवर्षीं, अनेक वर्षांबद्दल द्यावयाचें असल्यास याहून अधिकही द्रव्य द्यावें. शक्ति असल्यास स्थावरही द्यावें ॥ १० ॥ व्यासाचें वचन. बंधुजनास फसवून स्त्रियेस द्रव्य दिलें असतां, अगर केवळ अंगावर धारण करण्याकरितां स्त्रियेस डागिने दिले असतां, तें स्त्रीधन होत नाहीं. कपटानें अगर विशेष कारणानें पिता, बंधु, पति यांनीं स्त्रियेस दिलेलें जें द्रव्य तें स्त्रीधन होत नाहीं ॥ ११ ॥ मनूचें वचन. पुष्कळमनुष्यांच्या कुटुंबांतील खर्च अथवा आपलें स्त्रीधनाचा खर्च पतीचे आज्ञेवांचून स्त्रियांनीं कधींही करूं नये ॥ १२ ॥

## ॥ कस्मिंश्चिद्धने स्वातंत्र्यमाह कात्यायनः ॥

सौदायिकं धनं प्राप्य स्त्रीणां स्वातंत्र्यमिष्यते ॥ यस्मात्तदानृशंसार्थं तैर्दत्तमुपजीवनम् ॥ १ ॥ सौदायिके सदा स्त्रीणां स्वातंत्र्यं परिकीर्तितम् ॥ विक्रये चैव दाने च यथेष्टं स्थावरेष्वपि ॥ २ ॥ सौदायिकलक्षणं प्रागुक्तं ॥ भर्तृदत्ते स्थावरे तु स्त्रियो न स्वातंत्र्यं ॥ भर्त्रा प्रीतेन यद्दत्तं स्त्रियै तस्मिन्मृतेपि तत् ॥ सा यथाकामश्नीयाद्दद्याद्वास्थावरादृतइति नारदोक्तेः ॥ ३ ॥ भर्त्रादीनां स्त्रीधने स्वातंत्र्याभावमाह सएव–न भर्ता नैव च सुतो न पिता भ्रातरो न च ॥ आदाने वा विसर्गे वा स्त्रीधने प्रभविष्णवः ॥ ४ ॥ यदि त्वेकतरो ह्येषां स्त्रीधनं भक्षयेद्बलात् ॥ सवृद्धिकं स दाप्यः स्याद्दंडं चैव समाप्नुयात् ॥ ५ ॥ तदेव यद्यनुज्ञाप्य भक्षयेत्प्रीतिपूर्वकम् ॥ मूलमेव सदाप्यः स्याद्यदा स भगवान् भवेत् ॥ ६ ॥ मनुः–जीवंतीनां तु तासां ये तद्धरेयुः स्वबांधवाः ॥ तांच्छिष्याघोरदंडेन धार्मिकः पृथिवीपतिः ॥ ७ ॥ पत्यौ जीवति यः स्त्रीभिरलंकारो धृतो भवेत् ॥ न तं भजेरन् दायादा भजमानाः पतंति

ते ॥ ८ ॥ धृतो भर्त्रादिना तस्यै दत्तः सतया धृतइत्यर्थः ॥ देवलः–वृत्तिराभरणं शुल्कं लाभश्च स्त्रीधनं भवेत् ॥ भोक्त्री च स्वयमेवेदं पतिर्नार्हत्यनापदि ॥ ९ ॥ वृथा मोक्षे च भोगे च स्त्रियै दद्यात्सवृद्धिकम् ॥ पुत्रार्तिहरणेऽपि स्त्रीधनं च भोक्तुमर्हति ॥ १० ॥

## कित्येक धनाचे ठायीं स्त्रियेचें स्वातंत्र्य आहे असें कात्यायन सांगतात.

१ सौदायिक ह्मणजे लग्न झालेल्या मुलीस बापाचे घरीं अथवा नवऱ्याचे घरीं भावापासून अथवा आईबापांपासून मिळालेलें द्रव्य. या द्रव्याचे ठायीं स्त्रियेची मालकी आहे. कारण तिला खेद न होण्याकरितां आणि उपजीविकेकरितां तिजला हें द्रव्य दिलें आहे ॥ १ ॥ हें द्रव्य जरी स्थावर असेल तरी विक्री करण्यास अथवा आपले इच्छेप्रमाणें देण्यास तिला अधिकार आहे ॥ २ ॥ २ पतीनें दिलेलें स्थावर त्याविषयीं स्त्रीची मालकी नाहीं. याविषयीं नारदाची उक्ति. संतुष्ट झालेल्या पतीनें स्त्रीला दिलेलें द्रव्य पति मृत झाल्यानंतर स्त्रियेनें आपल्या इच्छेप्रमाणें त्याचा उपभोग घ्यावा व यथेच्छ दानही करावें. परंतु तें स्थावर असल्यास दुसऱ्यास देण्यास मालकी नाहीं ॥ ३ ॥ ३ स्त्रीधनाचे ठायीं पति इत्यादिकांची मालकी नाहीं. पति, मुलगा, बंधु हे स्त्रीधन घेण्यास अथवा तें घेऊन दुसऱ्यास देण्यास मालक नाहींत ॥ ४ ॥ पति, मुलगा, बंधु यांपैकीं कोणी स्त्रीधन बलात्कारानें घेतलें असेल तर राजानें तें स्त्रीधन सव्याज स्त्रीस देववून घेणारास दंड करावा ॥ ५ ॥ जर स्त्रीच्या आज्ञेनेंच व तिच्या संतोषानें स्त्रीधन घेतलें असेल तर त्याजकडून स्त्रीस मुद्दल द्रव्य देववावें ॥ ६ ॥ ४ स्त्रिया जिवंत असतां त्यांचें द्रव्य जर बंधु हरण करतील तर त्यांस राजानें दंड करावा ॥ ७ ॥ ५ पति जीवंत असतां स्त्रिया जे अलंकार आपले अंगावर नेहमीं घालीत असतील, बंधूंनीं विभाग करतेसमयीं त्या अलंकारांची वांटणी करूं नये. वांटून घेतले असतां ते अधोगतीस जातील ॥ ८ ॥ धारण केलेले अलंकार ह्मणजे पति इत्यादिकांनीं स्त्रीस दिलेला अलंकार. ६ देवलाचें वचन. वृत्ति, अलंकार, शुल्क, लाभ हें स्त्रीधन सांगितलें आहे. याचा उपभोग घेण्याची मालकी स्त्रियेचीच आहे. आपत्तिवांचून पति घेण्यास मालक होत नाहीं ॥ ९ ॥ व्यर्थ तें स्त्रीधन लोकांस दिलें असतां अथवा त्याचा आपण उपभोग घेतला असतां तें स्त्रियेस सव्याज परत द्यावें. मुलास कांहीं पीडा आली असून ती दूर करण्याकरितां स्त्रीधन घेण्यास पति योग्य होतो ॥ १० ॥

वृत्तिर्जीवनार्थं पित्रादिदत्तं धनं ॥ लाभो वृद्धिः ॥ मोक्षस्त्यागो दानमिति यावत् ॥ पुत्रपदं कुटुंबोपलक्षकम् ॥ याज्ञवल्क्यः–दुर्भिक्षे धर्मकार्ये च व्याधौ संप्रतिरोधके ॥ गृहीतं स्त्रीधनं भर्त्रा न कामो दातुमर्हति ॥ ११ ॥ अत्र भर्तृग्रहणाद्भिन्नेन दुर्भिक्षाद्यापद्यपि स्त्रीधनं न ग्राह्यमित्युक्तं ॥ संप्रतिरोधके बंधने ॥ क्वचिदकामो दद्यादित्याह देवलः–अथ चेत्स द्विभार्यः स्यान्न च तां भजते पुनः ॥ प्रीत्या निसृष्टमपि च पतिर्दाप्यश्च तद्बलात् ॥ १२ ॥ ग्रासाच्छादनवासानामाच्छेदो यत्र योषितः ॥ तत्र स्वमाददीत स्त्रीविभागं रिक्थिनस्तदा ॥ १३ ॥ रिक्थिनः सकाशादित्यर्थः ॥ इदं च साध्वीपरं ॥ दुष्टा तु न विभागमर्हति ॥ तथाच सएव–अपकारक्रियायुक्ता निर्मर्यादाऽर्थनाशिका ॥ व्यभिचाररता या च स्त्रीधनं न च सार्हति ॥ १४ ॥ सएव—यज्ञार्थं द्रव्यमुत्पन्नं तस्माद्द्रव्यं नियोजयेत् ॥ स्थानेषु धर्मयुक्तेषु न स्त्रीधर्मविधर्मिषु ॥ १५ ॥ स्त्रीमरणोत्तरमन्वाधेयाख्यतद्धनग्रहणे अधिकारिव्यवस्थामाह मनुः—अन्वाधेयं च यद्दत्तं पत्या प्रीतेन चैव यत् ॥ पत्यौ जीवति वृत्तायाः प्रजायास्तद्धनं भवेत् ॥ १६ ॥ प्रजां विशिनष्टि सएव—जनन्यां संस्थितायां तु समं सर्वे सहोदराः ॥ भजेरन्मातृकं रिक्थं भगिन्यश्च सनाभयः ॥ १७ ॥

वृत्ति ह्मणजे पित्यानें अथवा अन्यमनुष्यानें स्त्रियेस निर्वाहाकरितां दिलेलें द्रव्य. लाभ ह्मणजे व्याजवट्टा करून वाढविलेलें द्रव्य. येथें मोक्ष ह्मणजे दान. पुत्र शब्दानें कुटुंबाचें ग्रहण करावयाचें आहे. याज्ञवल्क्याचें वचन. दुष्काळामध्यें, तसेंच धर्मकृत्यासाठीं व व्याधि दूर करण्याकरितां, किंवा बंधनांतून सुटण्याकरितां पतीनें स्त्रीधन घेतलें असतां तें परत देण्याची त्याची इच्छा नसल्यास न दिलें तरी चालेल ॥ ११ ॥ येथें पतिशब्द सांगितला आहे सबब पतीहून इतर मनुष्यानें दुर्भिक्षादिक आपत्कालींही स्त्रीधन घेऊं नये. कित्येक स्थळीं परत देण्याची इच्छा नसतांही देण्यास सांगितलें आहे. त्यास देवलाचें वचन. दोन स्त्रिया असून त्यांपैकीं एका स्त्रीस मुळींच सेवन करीत नसेल, आणि तिनें प्रीतीनें जरी स्त्रीधन दिलें असेल तरी तें द्रव्य राजानें बलात्कारानें पतीकडून स्त्रियेस देववावें ॥ १२ ॥ अन्न, वस्त्र, राहण्यास जागाही ज्यावेळेस मिळत नसेल त्यावेळेस तिनें आपलें द्रव्य घ्यावें व दायादापासून आपला विभागही घ्यावा. परंतु ही स्त्री पतिव्रता असल्यास, ती दुष्ट असल्यास तिजला विभाग मिळणार नाहीं. ॥ १३ ॥ त्यास देवलाचें वचन. अपकार करणारी, मर्यादा सोडून वागणारी, द्रव्याचा नाश करणारी, व्यभिचारिणी, अशी जी स्त्री तिला स्त्रीधन मिळत नाहीं ॥१४॥ द्रव्य यज्ञाकरितां उत्पन्न केलें आहे, सबब द्रव्याची योजना यज्ञाचे ठायीं करावी. या-

स्तव अधर्मानें चालणाऱ्या स्त्रियेचे ठायीं त्या द्रव्याची योजना करूं नये ॥ १५ ॥ स्त्रियेचे पश्चात् अन्वाधानाख्य स्त्रीधन घेण्याविषयीं अधिकारी सांगतात. मनूचें वचन. अन्वाधेय द्रव्य व पतीनें संतुष्ट होऊन दिलेलें द्रव्य, तें द्रव्य पति जीवंत असतांही स्त्री मरण पावली असतां तिच्या अपत्यानें घ्यावें ॥ १६ ॥ मातोश्री मृत झाली असतां तिचें द्रव्य सख्खे बंधु आणि बहिणी यांनीं विभाग करून घ्यावें ॥ १७ ॥

दौहित्रीभ्योऽपि किंचिद्देयं ॥ यास्तासां स्युर्दुहितरस्तासामपि यथार्हतः ॥ मातामह्या धनात्किंचित्प्रदेयं प्रीतिपूर्वकं इति मनूक्तेः ॥ १८ ॥ कुमारी सापत्नमातुरपि धनं गृह्णीयात् ॥ तथा च मनुः– स्त्रियास्तु यद्भवेद्वित्तं पित्रा दत्तं कथंचन ॥ ब्राह्मणी तद्धरेत्कन्या तदपत्यस्य वा भवेत् ॥ ब्राह्मणीपदं समोत्तमजातिकन्योपलक्षकं ॥ १९ ॥ बृहस्पतिः– मातृष्वसा मातुलानी पितृव्यस्त्री पितृष्वसा ॥ श्वश्रूः पूर्वजपत्नी च मातृतुल्याः प्रकीर्तिताः ॥ यदासामौरसो न स्यात्सुतो दौहित्र एव वा ॥ तत्सुतो वा धनं तासां स्वस्रीयाद्याः समाप्नुयुः॥ दुहितृदौहित्र्योरप्यभावोऽत्र बोध्यः॥ तदभावएव औरसदौहित्रतत्पुत्राभावे ॥ २० ॥ इति स्त्रीधननिर्णयः ॥

मुलीच्या मुलीसही मातामहीच्या ( आईच्या आईचे ) स्त्रीधनांतील थोडा अंश द्यावा. यास मनूचें वचन. ज्या मुलीच्या मुली असतील त्यांसही यथायोग्य रीतीनें मातामहीच्या धनांतील अंश प्रीतीनें द्यावा ॥ १८ ॥ मुलगी, जिला मुलगा मुलगी नाहीं अशा सापत्न मातोश्रीच्या स्त्रीधनाची अधिकारिणी आहे. यास मनूचें वचन. पित्यानें जें स्त्रियेस दिलेलें द्रव्य असेल, तें द्रव्य जिला संतति नाहीं अशी जी स्त्री तिचें तें स्त्रीधन ब्राह्मणकन्या घेईल. येथें ब्राह्मणीशब्दाचा अर्थ समान उत्तम जातीच्या कन्यांचा उपलक्षक आहे ॥ १९ ॥ बृहस्पतीचें वचन. मावशी, मामी, चुलती, आत, सासू, वडील भावाची स्त्री ह्या मातोश्रीसारख्या सांगितल्या आहेत. त्यांस जर मुलगी अथवा मुलीची मुलगी नसेल तर औरस पुत्र किंवा दौहित्र घेईल. औरस पुत्र व दौहित्र अथवा दौहित्राचा मुलगा नसेल तर बहिणीचे मुलगे वगैरे स्त्रीधन घेतील ॥ २० ॥ याप्रमाणें स्त्रीधनाचा निर्णय जाणावा.

## ॥ अथ अनंशानां निर्णयः ॥

याज्ञवल्क्यः—क्लीबोऽथ पतितस्तज्जः पंगुरुन्मत्तको जडः ॥ अंधोऽचिकित्स्यरोगश्च भर्तव्याः स्युर्निरंशकाः ॥ १ ॥ तज्जः पतितोत्पन्नः ॥ विभागोत्तरमौषधादिना पुंस्त्वादियुक्तास्त्वंशं लभंतएव ॥ २ ॥ विभक्तोत्पन्नवत् ॥ मनुः–अनंशौ क्लीब-

पतितौ जात्यंधबधिरौ तथा ॥ उन्मत्तजडमूकाश्च ये च केचिन्निरिंद्रियाः ॥ ३ ॥ निरिंद्रिया घ्राणादिरहिताः ॥ नारदः–पितृद्विट् पतितः षंढो यश्च स्यादपपात्रितः ॥ औरसा अपि नैवांशं लभेरन् क्षेत्रजाः कुतः ॥ ४ ॥ दीर्घतीव्रामयग्रस्ता ये जडोन्मत्तपंगवः ॥ भर्तव्याः स्युः कुलस्यैते तत्पुत्रास्त्वंशभागिनः ॥ ५ ॥ अपपात्रितः ॥ व्यवसायार्थं समुद्रमध्ये द्वीपांतरं गतः ॥ द्विजस्याब्धौ तु नौयातुः शोधितस्याप्यसंग्रहइति तस्य कलौ संसर्गनिषेधात् ॥६॥ कात्यायनः–प्रतिलोमप्रसूतायास्तस्याः पुत्रो न रिक्थभाक् ॥ ग्रासाच्छादनमत्यंतं देयं तद्बंधुभिर्मतमिति ॥७॥ गुणवत्पुत्रांतरसत्वे दुर्वृत्तस्यांशाग्राहितामाह मनुः–सर्वएव विकर्मस्था नार्हंति भ्रातरो धनमिति॥बृहस्पतिः–सवर्णजोप्यगुणवान्नार्हः स्यात्पैतृके धने ॥ तत्पिंडदाः श्रोत्रिया ये तेषां तत्तु विधीयते ॥ ८ ॥ उत्तमर्णादधमर्णो यः पितरं त्रायते सुतः ॥ अतस्तु विपरीतेन तेन नास्ति प्रयोजनम् ॥ ९ ॥ एतेवानंशा रिक्थग्राहिभिर्यावज्जीवं पोषणीयाः ॥ सर्वेषामपि तु न्यायं दातुं शक्त्या मनीषिभिः ॥ १० ॥ ग्रासाच्छादनमत्यंतं पतितोऽपि दद्यन्नेदिति मनूक्तेः ॥ अत्यंतं यावज्जीवं भर्तव्यास्ते निरंशकाइति पूर्वोक्तयाज्ञवल्क्योक्तेश्च ॥ आश्रमांतरगतपतितपुत्रास्तु न भर्तव्याः ॥ ११ ॥ औरसाः क्षेत्रजास्तेषां निर्दोषा भागहारिण इति याज्ञवल्क्योक्तेश्च ॥ तत्कन्यासु पत्नीषु च विशेषमाह सएव–कन्याश्चैषां प्रभर्तव्या यावद्वै भर्तृसात्कृताः ॥ अपुत्रा योषितश्चैषां भर्तव्याः साधुवृत्तयः ॥ १२ ॥ निर्वास्या व्यभिचारिण्यः प्रतिकूलास्तथैवच ॥ व्यभिचारे बहिर्निष्कासनमपोषणं वा प्रतिकल्प्यं बहिर्निष्कासनमेव भरणं तु कार्यमेवेति मदनादयः ॥ १३ ॥

## विभाग घेण्यास जे अधिकारी नाहींत त्यांचा निर्णय.

याज्ञवल्क्याचें वचन. नपुंसक, बाटलेला, बाटलेल्या मनुष्याचा मुलगा, पांगळा, वेडा, अज्ञानी, अंधळा, ज्या रोगाचें निवारण होत नाहीं अशा रोगानें ग्रस्त झालेला हे विभागास अनधिकारी आहेत. यांचें पोषण करावें ॥ १ ॥ वांटण्या झाल्यानंतर औषधादिकानें दोषाचें निवारण होऊन पुरुषत्वादिकानें युक्त झाला असतां त्यास विभाग दिला पाहिजे ॥ २ ॥ जसें विभक्त झाल्यानंतर उत्पन्न झालेल्या पुत्रास विभाग मिळतो. मनूचें वचन. नपुंसक, पतित, जन्मांध, जन्मबधिर, उन्मत्त, अज्ञानी, मुका, ज्यास एखादें इंद्रिय नाहीं असा, यास विभाग मिळणार नाहीं ॥ ३ ॥ नारदाचें वचन. बापाचा द्वेष करणारा, पतित, षंढ, अपपात्रित हे औरस पुत्र असतील तरी त्यांस वि-

भाग मिळणार नाहीं. अर्थात् क्षेत्रज पुत्रास मिळावयाचा नाहीं ॥ ४ ॥ अपयात्रित ह्मणजे व्यापार करण्याकरितां नावेंतून समुद्रमार्गानें द्वीपांतरास गेलेला. कारण नावेंत बसून समुद्रांत जाणारे ब्राह्मणास प्रायश्चित्त देऊन शुद्ध केलें तरी आपले जातींत त्यास घेऊं नये. याप्रमाणें कलिवर्ज्य प्रकरणांत द्वीपांतरास समुद्रमार्गानें जाणाऱ्या मनुष्याच्या संसर्गांचा निषेध सांगितला आहे ॥ ५ ॥ ६ ॥ कात्यायनाचें वचन. आपल्या जाती-पेक्षां कमी जातीच्या पुरुषाशीं लग्न झालेल्या स्त्रियेच्या मुलास विभाग देऊं नये. फक्त त्यास त्याच्या सापत्नबंधूनें अन्नवस्त्र द्यावें ॥ ७ ॥ गुणवान मुलें असतां दुराचारी मु-लांस विभाग देण्याचा अधिकार नाहीं. त्यास मनूचें वचन. जितके बंधु वाईटमार्गानें वागणारे असतील त्यांस विभाग देऊं नये. बृहस्पतीचें वचन. सवर्णस्त्रियेपासून झा-लेला असा असूनही, गुणरहित असल्यास वडिलार्जित द्रव्य घेण्यास अधिकारी होत नाहीं. जे पुत्र पित्यास पिंड देणारे व विद्वान् असतील त्यांसच तें द्रव्य द्यावें ॥ ८ ॥ जो मुलगा पित्यास पितृऋणांतून मुक्त करितो तोच पुत्र होय. याचे विरुद्ध ज्याची वर्त-णूक असेल तो मुलगा असूनही कांहीं कारण दिसत नाहीं. सबब त्यास विभाग देऊं नये ॥ ९ ॥ ज्यांनीं विभाग घेतला असेल त्यांनीं यावज्जीव विभाग न घेणाराचें पोषण करावें. मनूचें वचन. द्रव्य घेणाऱ्या शहाण्या मनुष्यानें विभागास अयोग्य अशा म-नुष्यास आपल्या शक्तीप्रमाणें त्यास अन्नवस्त्र द्यावें ॥ १० ॥ न दिल्यास द्रव्य घेणारा पतित होईल. ज्यास विभाग दिला नाहीं त्याचें जन्मभर संरक्षण करावें अशी याज्ञव-ल्क्याची उक्ति आहे. दुसऱ्या आश्रमांत गेलेला, पतित, पतिताचीं मुलें यांचें रक्षण करण्याची जरूरी नाहीं ॥ ११ ॥ ज्यास विभाग घेण्याचा अधिकार नाहीं, त्याचे पुत्र निर्दोषी असल्यास त्यांस विभाग दिला पाहिजे. त्यास याज्ञवल्क्याची उक्ति. द्रव्य-विभाग घेण्यास अयोग्य अशीं जीं मनुष्यें त्यांचे औरस अथवा क्षेत्रज पुत्र हे निर्दोषी असतील तर ते विभाग घेण्यास अधिकारी होतात. क्षेत्रज ( कलियुगामध्यें क्षेत्रज पु-त्राचा निषेध सांगितला आहे सबब हें युगांतरसंबंधाचें आहे ) जे विभाग घेण्यास अ-योग्य त्यांचे कन्या व स्त्रिया यांविषयीं विशेष याज्ञवल्क्य सांगतात. त्याच्या मुलीचें लग्न होईपर्यंत अन्नवस्त्र देऊन संरक्षण करावें व ज्यास मुलें नाहींत असे जे विभागास अयोग्य मनुष्य त्यांच्या स्त्रिया त्या योग्यरीतीनें वागणाऱ्या असल्यास त्यांचें अन्नवस्त्र देऊन संरक्षण करावें ॥ १२ ॥ त्या व्यभिचारिणी असल्यास किंवा प्रतिकूळ असल्यास व्यभिचारिणी घराबाहेर काढून देऊन तिचें पोषण करूं नये आणि प्रतिकूळ असणारी घराच्या बाहेर काढावी, परंतु तिचें पोषण केलेंच पाहिजे असें मदनादिक ग्रंथकर्त्यांचें मत आहे ॥ १३ ॥

## ॥ अथ अविभाज्यधननिर्णयः ॥

मनुः-विद्याधनं तु यद्यस्य तत्तस्यैव धनं भवेत् ॥ मैत्र्यमौद्वाहिकं चैव माधुपर्किकमेव च ॥ १ ॥ व्यासः-विद्याप्राप्तं शौर्यधनं यच्च सौदायिकं भवेत् ॥ विभागकाले तत्तस्य नविभाज्यं स्वरिक्थिभिः ॥ २ ॥ सौदायिकं च वक्ष्यते-एतच्च पितृद्रव्याविरोधेनार्जितं ज्ञेयं ॥ तथा च याज्ञवल्क्यः-पितृद्रव्याविरोधेन यद्द्रव्यं स्यात्स्वयमर्जितम् ॥ मैत्र्यमौद्वाहिकं चैव दायादानां न तद्भवेत् ॥ ३ ॥ क्रमादभ्यागतं द्रव्यं हृतमभ्युद्धरेत्तु यः ॥ दायादेभ्यो न तद्दद्याद्विद्यया लब्धमेव च ॥ ४ ॥

## विभाग करण्यास अयोग्य अशीं जीं द्रव्यें त्यांचा निर्णय.

मनूचें वचन. विद्येनें मिळविलेलें ( दुसऱ्याचें अन्न खाऊन अन्य मनुष्यापासून विद्या संपादन करून जें मिळविलेलें द्रव्य त्यास विद्याधन असें ह्मणतात ) जें द्रव्य तें संपादकानेंच घ्यावें. तसेंच मैत्र्य ( मित्रापासून मिळालेलें द्रव्य ) औद्वाहिक ह्मणजे लग्नाचे वेळीं मिळालेलें द्रव्य. माधुपर्किक ह्मणजे लग्नामध्यें मधुपर्काचे वेळीं मिळालेलें द्रव्य, हें द्रव्य ज्यास मिळालें असेल त्याचेंच तें आहे ॥ १ ॥ व्यासाचें वचन. विद्येनें मिळालेलें, शूरपणानें मिळविलेलें, सौदायिक ह्मणजे लग्नाचे वेळीं आईबाप, सासूसासरे इत्यादिकांनीं दिलेलें द्रव्य, हीं द्रव्यें वांटणीचे वेळीं दायादांनीं याचा विभाग घेऊं नये. ज्याचें त्यास ठेवावें ॥ २ ॥ परंतु हें पित्याच्या द्रव्याचा खर्च न होतां संपादन झालें असेल तर, त्यांस याज्ञवल्क्याचें वचन. आईबापांच्या द्रव्याचा व्यय न होतां स्वतः जें द्रव्य संपादन केलें असेल, तसेंच मित्रापासून मिळालेलें व लग्नाचे वेळीं मिळालेलें, तें वारसास मिळणार नाहीं ॥ ३ ॥ तसेंच परंपरेनें आलेलें आणि दुसऱ्यानें हरण केलेलें असून आपण तें जर मिळविलें असेल तर तें व विद्येनें मिळविलेलें द्रव्य वारसास द्यावयास नको ॥ ४ ॥

## ॥ क्रमागतायामुद्धृतायां भुवि विशेषमाह ॥

शंखः-पूर्वनष्टां तु यो भूमिं एकश्चेदुद्धरेत्क्रमात् ॥ यथाभागं लभंतयन्ये दत्त्वांशं तु तुरीयकम् ॥ १ ॥ उद्धृतायाश्चतुर्थमंशमुद्धर्त्रे दत्त्वावशिष्टमुद्धर्त्रा सह विभजेयुः ॥ मनुः-अनुपघ्नन् पितृद्रव्यं श्रमेण यदुपार्जितम् ॥ दायादेभ्यो न तद्दद्याद्विद्यालब्धं च यद्धनम् ॥ २ ॥ अत्र सर्वत्रापि विद्याधिगमतया द्रव्यार्जने च पितृद्रव्याविरोधे सत्ये यावविभाज्यत्वं विरोधे तु विभाज्यमेव ॥ अतएव कात्यायनः-कुले विनीतविद्यानां भ्रातृणां पितृतोऽपि वा ॥ शौर्यप्राप्तं तु यद्वित्तं विभाज्यं तद्बृहस्पतिः ॥३॥

पितृद्रव्यविरोधेप्यर्जकस्यांशद्वयमस्त्येव ॥ येन चैषां स्वयमुपार्जितं स्यात्सद्व्यंशमेव हरेदिति वसिष्ठोक्तेः ॥ ४ ॥ कश्चिद्विद्याधने विशेषमाह नारदः-कुटुंबं बिभृयात् भ्रातुर्यो विद्यामधिगच्छतः ॥ भागं विद्याधनात्तस्मात्स लभेताश्रुतोऽपिसन् ॥ ५ ॥ अश्रुतो अविद्यइति मदनरत्ने ॥ भागं दास्यामीत्यप्रतिश्रुतइति तु युक्तम् ॥ पित्रादिदत्तस्याविभाज्यत्वमाह बृहस्पतिः-पितामहपितृभ्यां च दत्तं मात्राऽपि यद्भवेत् ॥ तस्य तन्नापहर्तव्यं शौर्यभार्याधने तथा ॥ ६ ॥ नारदः-शौर्यभार्याधने चोभे यच्च विद्याधनं भवेत् ॥ त्रीण्येतान्यविभाज्यानि प्रसादो यश्च वै पितुः ॥ ७ ॥ कात्यायनः-ध्वजाहृतं भवेद्यत्तु विभाज्यं नैव तत्स्मृतम् ॥ संग्रामादाहृतं यच्च विद्राव्य द्विषतां बलम् ॥ ८ ॥ स्वाम्यर्थे जीवितं त्यक्त्वा तद्ध्वजाहृतमुच्यते ॥ सएव-आरुह्य संशयं यत्र प्रसभं कर्म कुर्वते ॥ तस्मिन् कर्मणि तुष्टेन प्रसादः स्वामिना कृतः ॥ ९ ॥ तत्र लब्धं तु यत्किंचिद्धनं शौर्येण तद्भवेत् ॥ अत्र विशेषमाह व्यासः-साधारणं समाश्रित्य यत्किंचिद्वाहनादिकम् ॥ शौर्यादिनाऽऽप्नोति धनं भ्रातरस्तत्र भागिनः ॥ १० ॥ तस्य भागद्वयं देयं शेषास्तु समभागिनः ॥ विद्यादिव्यतिरिक्तप्रकारेण तु लब्धं विभाज्यमेव ॥ तथा च मनुः-अविद्यानां तु सर्वेषामीहातश्चेद्धनं भवेत् ॥ समस्तत्रविभागः स्यादपित्र्य इतिधारणा ॥ ईहा कृष्यादिचेष्टा ॥ अपित्र्ये पितृद्रव्याणामश्रयणे ॥ ११ ॥

## क्रमानें आलेली आणि दुसऱ्यानें हरण केलेली ती आपण मिळविलेली भूमी तिचेविषयीं विशेष शंख सांगतात.

पूर्वी दुसऱ्यानें हरण केलेली जी भूमि, जो संपादन करील त्यास चौथा हिस्सा देऊन राहिलेल्या भूमीचा भाग संपादन करणाऱ्या बंधूसह इतर बंधूनीं सारखी वांटणी करून घ्यावी ॥ १ ॥ मनूचें वचन. आईबापाच्या द्रव्याचा खर्च न करतां जें द्रव्य मिळविलें असेल, तें विभागाचे वेळीं बंधुवर्गास द्यावयास नको ॥ २ ॥ येथें विद्येनें जें द्रव्य मिळविलें असेल, त्यास आईबापाच्या द्रव्याचा खर्च झाला नसेल तर त्याचा विभाग देऊं नये. मातापितरांच्या द्रव्याचा खर्च झालेला असेल तर विभाग दिला पाहिजे. त्यास कात्यायनाचें वचन. *कुलज पुरुषापासून किंवा पित्यापासून विद्यासंपादन करणारे यांचें द्रव्य, अथवा* शौर्यानें मिळविलेलें द्रव्य, तें बंधूनीं विभाग करून घ्यावें ॥ ३ ॥ पित्याच्या द्रव्याचा खर्च करून जर द्रव्य मिळविलें असेल तर संपादन करणारास दोन हिस्से यावेत. त्यास वसिष्ठाची उक्ति. ज्यानें संपादन केलें असेल, त्यानें दोन हिस्से घ्यावे ॥ ४ ॥ विद्याधनाविषयीं

**नारदाची उक्ति.** एकबंधु विद्या संपादन करीत असतां त्यावेळीं दुसराबंधु त्याचे कुटुंबाचें पोषण करील तर, त्या विद्येनें मिळविलेलें जें द्रव्य त्याचा विभाग अविद्वान बंधूस दिला पाहिजे ॥ ५ ॥ आईबापइत्यादिकांनीं दिलेलें द्रव्य अविभाज्य आहे. त्यास **बृहस्पतीचें वचन.** आजा, बाप, आई यांनीं ज्यास जें द्रव्य दिलें असेल, तें आणि जें शौर्यानें मिळविलेलें, आणि स्त्रीधन याचा विभाग करूं नये ॥ ६ ॥ नारदाच्या वचनाचा अर्थ असाच आहे ॥ ७ ॥ **कात्यायनाचें वचन.** ध्वजाहृत जें द्रव्य तेंही अविभाज्य आहे. लढाईमध्यें शत्रूचें सैन्य पळवून शत्रूचे ध्वजापर्यंत जाऊन जें द्रव्य मिळविलें असेल तें ॥ ८ ॥ तसेंच संकटसमयीं मालकाकरितां प्राण देऊन जें द्रव्य मिळविलें असेल त्यास ध्वजाहृत ह्मणावें. **कात्यायनाचें वचन.** प्राण जाईल असा जेथें संभव आहे अशा स्थळावर चढून बलात्कारानें एखादें कर्म केलें असतां, अशाकर्मानें संतुष्ट झालेल्या मालकानें जें द्रव्य दिलेंजातें त्यास शौर्यसंपादित द्रव्य असें ह्मणतात ॥ ९ ॥ **व्यासाचें वचन.** लढाईकांतील वाहनें, शस्त्रें इत्यादिकांच्या आश्रयानें जें द्रव्य मिळविलें जातें, तें द्रव्य संपादकास दोन विभाग देऊन बाकीचें सर्व बंधूनीं सारखें वांटून घ्यावें ॥ १० ॥ विद्या, शौर्य इत्यादिकांवांचून अन्य प्रकारानें मिळविलेलें द्रव्य सारख्या प्रमाणानें विभाग, करून घ्यावें. त्यास मनूचें वचन. अविद्वान असे जे बंधु यांनीं मातापितरांच्या द्रव्यांचा व्यय न करितां शेती वगैरे करून जें द्रव्य मिळविलें असेल त्या द्रव्याचा विभाग सर्वांस समान द्यावा ॥ ११ ॥

तथान्यदविभाज्यमुक्तं मनुना—वस्त्रं पत्रमलंकारो कृतान्नमुदकं स्त्रियः ॥ योगक्षेमप्रचारं च न विभाज्यं प्रचक्षते ॥ १ ॥ धृतानामेव वस्त्राणामविभाज्यत्वम् ॥ यद्येन धृतं तत्तस्यैव ॥ न्यूनाधिकमूल्यास्तु विभाज्याएव ॥ पितृधृतानि तु पितुरूर्ध्वं विभजतां श्राद्धभोक्त्रे दातव्यानि ॥ यथाह बृहस्पतिः—वस्त्रालंकारशय्यादि पितुर्यद्वाहनादिकम् ॥ गंधमाल्यैः समभ्यर्च्य श्राद्धभोक्त्रे समर्पयेदिति ॥ २ ॥ अभिनवानि तु वस्त्राणि विभाज्यान्येव ॥ पत्रं वाहनमश्वशिबिकादि ॥ तदपि यद्येनारूढं तत्तस्यैव पित्र्यं तुवस्त्रवदेव ॥ अश्वादीनां बहुत्वे तु तद्विक्रयोपजीविनां विभाज्यत्वमेव वैषम्येणाविभाज्यत्वे ज्येष्ठस्य ॥ ३ ॥ अजाविकं चैकशफं न जातु विषमं भजेत् ॥ अजाविकं चैकशफं ज्येष्ठस्यैव विधीयत इति मनुस्मरणात् ॥ ४ ॥ अलंकारोऽपि यो येन धृतः स तस्यैवाधृतः साधारणो विभाज्यएव ॥ पत्यौ जीवति यः स्त्रीभिरलंकारो धृतो भवेत् ॥ न तं भजेरन् दायादा भजमानाः पतंति ते ॥ ५ ॥ अलंकारो धृतो भवेदिति विशेषेणोपादानादधृतानां विभाज्यत्वं गम्यते ॥ कृतान्नं तंदुल-

मोदकादि तदप्यविभाज्यंयथासंभवं भोक्तव्यम् ॥ उदकं उदकाधारः कूपादिः ॥ तच्च विषमं न मूल्यद्वारेण विभाज्यं पर्यायेणोपभोक्तव्यम् ॥ स्त्रियश्च दास्यो विषमा नमूल्यद्वारेण विभाज्याः ॥ ६ ॥ पर्यायेण कर्मकारयितव्याः ॥ अवरुद्धास्तु पित्रा स्वैरिण्याद्याः ॥ समाअपि पुत्रैर्न विभाज्याः ॥ स्त्रीषु च संयुक्तास्वविभागइति गौतमस्मरणात् ॥ ७ ॥

त्याप्रमाणें दुसरेंही विभागास अयोग्य असें मनूनें सांगितलें आहे तें असें. वस्त्रें, वाहनें, डागडागिने, शिजविलेलें अन्न, पाण्याचे आधारभूत असे आड, विहिरी, स्त्रिया, इष्टापूर्तसंबंधी द्रव्य, गायी चरण्याचीं वनें याचा विभाग करूं नये ॥ १ ॥ येथें वस्त्रालंकार जे सांगितले, ते अंगावर धारण केलेलेच, त्यांचा विभाग होत नाहीं. कारण जें ज्यानें धारण केलें असेल तें त्याचेंच आहे असें जाणावें. तें न्यून अधिक किंमतीचें असल्यास विभाग करावा. पित्यानें धारण केलेलीं जीं वस्त्रादिक तीं पित्याचे पश्चात् बंधूंनीं विभाग न करितां श्राद्धभोजनाचेवेळीं द्यावीं. त्यास बृहस्पतीचें वचन. वस्त्र, अलंकार, शय्या, आसन, घोडा वगैरे वाहनें इत्यादिकांचा पित्यानें ज्याचा उपभोग घेतला असेल तीं गंधअक्षता लावून श्राद्धीं भोजन करणारे जे ब्राह्मण त्यांस द्यावीं ॥ २ ॥ नूतनवस्त्रांचा विभाग करून घ्यावा. घोडा, पालखी इत्यादिक जो ज्यावर नेमानें बसत असेल तें त्यानेंच घ्यावें. घोडेइत्यादिक पुष्कळ असतील तर, किंवा ते विकून उपजीविका करण्याचा व्यापार असेल तर त्याचा विभाग करून घ्यावा ॥ ३ ॥ शेळ्या, मेंढ्या किंवा ज्याचे खूर दुभांगले नसतात अशीं जनावरें विभागांत विषमविभागाच्या संख्येनें विभाग करण्याजोगी नसल्यास तीं ज्येष्ठ मुलास द्यावीं ॥ ४ ॥ अलंकारही जो ज्यानें धारण केला असेल तो त्याचाच. धारण केला नसेल त्याचा विभाग करावा. पति जिवंत असतां जे अलकार ज्या स्त्रिया नेहमीं धारण करीत असतील ते त्यांजळाच द्यावे. दायाद ह्मणजे वारसांनीं त्यांची वांटणी केली असतां ते पतित होतात ॥ ५ ॥ शिजलेलें अन्न ह्मणजे तांदुळ मोदक इत्यादिक त्याचा यथाविभाग उपभोग घ्यावा. पाणिशब्दानें येथें आड, विहीर वगैरे त्याचा विषमविभाग अथवा मौल्यद्वारानें विभाग न करितां विभागाच्या हिस्सेरशीनें उपभोग घेत जावा. येथें स्त्रिया ह्मणजे दासी, त्या विषम असल्यास त्यांची किंमत ठरवून विभाग करून घेऊं नये. वर क्रमानें त्याजकडून काम करवून घ्यावें ॥ ६ ॥ पित्यानें ज्या राखिलेल्या दासी असतील त्यांचा विभाग पुत्रांनीं करूं नये. कारण संयुक्तस्त्रियांचा विभाग करूं नये असें गौतमाचें वचन आहे ॥ ७ ॥

वस्त्रादिषु विशेषमाह बृहस्पतिः—वस्त्रादयोऽविभाज्यायैरुक्तं तैर्न विचारितम् ॥ धनं हिचेरसमृद्धानां वस्त्रालंकारसंश्रितम् ॥ ८ ॥ अपरिस्थितमनाजीव्यं दातुं नैकस्य

शक्यते ॥ युक्त्या विभाजनीयं तदन्यथानर्थकं भवेत् ॥ ९ ॥ विक्रीय वस्त्राभरणमृणमुद्ग्राह्यलेखितम् ॥ कृतान्नं वा कृतान्नेन परिवर्त्य विभज्यते ॥ १० ॥ उद्धृत्य कूपवाप्यंभः स्वानुसारेण भुज्यते ॥ एकां स्त्रीं कारयेत्कर्म यथांशेन गृहे गृहे ॥ बह्व्यः समांशतो देया दासानामप्ययं विधिः ॥ ११ ॥ यथाभागानुसारेण सेतुक्षेत्रं विभाज्यते ॥ प्रचारश्च यथांशेन कर्तव्यो रिक्थिभिः सदेति ॥ १२ ॥ उद्ग्राह्येति ॥ अधमर्णादुद्धृत्येत्यर्थः ॥ कात्यायनः–धनं पत्रनिविष्टं तु धर्मार्थं यन्निरूपितम् ॥ उदकं चैव दासश्च निबंधो यः क्रमागतः ॥ १३ ॥ धृतं वस्त्रमलंकारो नानुरूपं तु यद्भवेत् ॥ यथाकालोपयुक्तानि तथा योज्यानि बंधुभिः ॥ १४ ॥ धनमिति ॥ धर्मांशेनोत्सृज्य पत्रे लिखितमित्यर्थः ॥ उदकं कूपादिगतम् ॥ निबंधो वृत्तिः ॥ नानुरूपं विभागायोग्यम् ॥ १५ ॥

## वस्त्रादिकांच्या विभागाविषयीं विशेष बृहस्पति सांगतात.

वस्त्रादिकांचा विभाग करूं नये असें ज्यांनीं सांगितलें, त्यांनीं विचार केला नाहीं. श्रीमंताचें वस्त्र, अलंकार हेंच द्रव्य आहे ॥ ८ ॥ यास्तव हें न वांटतां तसेंच ठेवणें अगर एकासच देणें हें योग्य होत नाहीं. सबब युक्तीनें त्याचा विभाग करावा. तसें न केल्यास तीं वस्त्रादिक व्यर्थ होतील ॥ ९ ॥ वस्त्र, डागिने इत्यादिक विकून त्यांची किंमत करुन वांटून घ्यावी. तसेंच लिहिलेलें कर्ज वसूल करुन वांटून घ्यावें. शिजविलेलें अन्न, कोरडे अन्नाशीं समान करुन वांटून घ्यावें ॥ १० ॥ वापी कूप यांचें पाणी काढून हिस्सेरशीनें घेत जावें. एक स्त्री असेल तर हिस्सेरशीनें तिजकडून आपआपले घरीं काम करवावें. पुष्कळ स्त्रिया असतील तर आपल्या हिश्शानें वांटून घ्याव्याव. नोकरांविषयींही असाच नियम जाणावा ॥ ११ ॥ बांध, शेत, हे आपापल्या हिश्शाप्रमाणें विभागून घ्यावे. तसेंच जाण्यायेण्याचा रस्ता आपल्या अंशाप्रमाणें दायादानें त्याचा उपभोग घ्यावा ॥ १२ ॥ जें ऋण लोकांकडे यावयाचें असेल तें वसूल करून विभाग करून घ्यावें. कात्यायनाचें वचन. धर्मार्थ असा लेख करून ठेविलेलें द्रव्य, पाण्याचे आधारभूत आड, विहिरी वगैरे, दास, क्रमानें आलेले निबंध ( वर्षासनें, भूमि वगैरे ) वापरलेलें व विभागास योग्य नव्हे असें वस्त्र, अलंकार हीं सर्वबंधूंनीं कार्यानुरूप उपभोगावींत ॥ १३ ॥ १४ ॥ १५ ॥

## ॥ अथ सर्वभागविशेषः ॥

तत्र याज्ञवल्क्यः–अन्योन्यापहृतं द्रव्यं विभक्ते यदि दृश्यते ॥ तत्पुनस्तैः समे-

रंशैर्विभजेरन्निति स्थितिः ॥ १ ॥ विभागानंतरमन्योन्यापहृतं द्रव्यं ज्ञात्वा तत्समैरेवांशैर्विभजेरन् ॥ तथा विभागनिन्हवे ज्ञातिबंधुसाक्ष्यलेखितैः ॥ विभागभावना ज्ञेया गृहक्षेत्रैश्च यौतकैः ॥ २ ॥ विभागानंतरं कालांतरे विभागो न जातइत्यपलापे कृते ज्ञातिभिः पितृबंधुभिर्मातुलादिभिरुक्तलक्षणैः साक्षिभिर्लिखितेन विभागपत्रेण च विभागस्य भावनानिर्णयो विज्ञेयः ॥ ३ ॥ तथा यौतकैः पृथक्कृतगृहक्षेत्रैश्च विज्ञेयः ॥ पृथक् कृष्यादिप्रवर्तनेन पृथक् पंचमहायज्ञाद्यनुष्ठानेन च विज्ञेयइत्यर्थः ॥४॥ नारदः–विभागधर्मसंदेहे दायादानां विनिर्णयः ॥ ज्ञातिभिर्भागलेख्येन पृथक् कार्यप्रवर्तनात् ॥ ५ ॥ भ्रातृणामविभक्तानामेको धर्मः प्रवर्तते ॥ विभागे सति धर्मोऽपि भवेत्तेषां पृथक् पृथक् ॥ ६ ॥ साक्षित्वं प्रातिभाव्यं च दानं ग्रहणमेवच ॥ विभक्ता भ्रातरः कुर्युर्नाविभक्ताः कथंचन ॥ ७ ॥

## वांटण्यांतून राहिलेल्या द्रव्याचा विभाग.

याज्ञवल्क्याचें वचन. विभाग झाल्यानंतर एकामेकानें हरण करून ठेविलेलें द्रव्य जर समजेल तर बंधूनीं तें द्रव्य सारख्या रीतीनें वांटून घ्यावें ॥ १ ॥ विभाग झाला असून वांटणी झाली नाहीं असें जर कोणी ह्मणेल, तर जातीचे बंधु, पितृबंधु, मामा इत्यादिक जे साक्षीदार व लिहिलेलें जें विभागपत्र त्याच्या योगानें वांटणीचा निर्णय जाणावा ॥ २ ॥ ३ ॥ तसेंच वेगवेगळालीं घरें, शेतें व शेतादिकांची भिन्नभिन्न रीतीनें जी प्रवृत्ति व वेगवेगळ्या रीतीनें जें पंचमहायज्ञाचें अनुष्ठान त्याच्या योगानें विभाग झाल्याचें समजावें ॥ ४ ॥ नारदाचें वचन. विभक्तपणाचा संशय उत्पन्न झाला असतां वांटण्याचा निर्णय; जातीचीं माणसें, विभागाविषयीं लिहिलेलें जें पत्र, भिन्नभिन्न रीतीनें कार्याविषयीं जी प्रवृत्ति त्याच्या योगानें विभागझाल्याचा निर्णय करावा ॥ ५ ॥ बंधु एकत्र असतां पंचमहायज्ञादिकधर्म सर्वांचे एकाच ठिकाणीं होतात. विभाग झाले असता ते सर्व भिन्नभिन्न प्रकारानें होतात ॥ ६ ॥ तसेंच साक्षीपणा, जामिनकी, कर्ज घेणें व देणें हे बंधु विभक्त झाले असतां एकामेकाशीं करितात. एकत्र असतां करीत नाहींत ॥ ७ ॥ याप्रमाणें दायविभागाचा निर्णय जाणावा.

---

## ॥ अथ ऋणादाननिर्णयः ॥

तच्च ऋणादानं सप्तविधम् ॥ तत्र नारदः–ऋणं देयमदेयं च येन यत्र यथा च यत् ॥ दानग्रहणधर्माश्च ऋणादानमिति स्मृतम् ॥ १ ॥ बृहस्पतिः–कुसि-

तात् सीदतश्चैव निर्विशंकैस्तु गृह्यते ॥ चतुर्गुणं चाष्टगुणं कुसीदाख्यमृणं च तत् ॥ २ ॥ उत्तमर्णस्य दानविधिमाह मनुः-वसिष्ठविहितां वृद्धिं सृजेद्वित्तविवर्द्धिनीम् ॥ अशीतिभागं गृह्णीयान्मासाद्वार्धुपिकः शते ॥ ३ ॥ याज्ञवल्क्यः ॥ अशीतिभागो वृद्धिः स्यान्मासि मासि सबंधके ॥ वर्णक्रमाच्छतं द्वित्रिचतुःपंचकमन्यथा ॥ ॥ ४ ॥ दद्युर्वा स्वकृतां वृद्धिं सर्वे सर्वासु जातिषु ॥ सर्वे वा ब्राह्मणादयोऽधमर्णाः अबंधके सबंधकेवा स्वकृतां स्वाभ्युपगतां वृद्धिं सर्वासु जातिषु दद्युः ॥ ५ ॥ वृद्धिलक्षणमाह नारदः-कायिका कालिका चैव कारिता च तथापरा ॥ चक्रवृद्धिश्च शास्त्रेषु तस्य वृद्धिश्चतुर्विधा ॥ ६ ॥ कायाविरोधिनी शश्वत्पणपादादिकायिका ॥ प्रतिमासं स्रवंती या वृद्धिः सा कालिका मता ॥ ७ ॥ वृद्धिः सा कारिता नामाधमर्णेन स्वयंकृता ॥ वृद्धेरपि पुनर्वृद्धिश्चक्रवृद्धिरुदाहृतेति ॥ ८ ॥ धनिकस्य प्रयोगप्रकारमाह बृहस्पतिः-परिपूर्णं गृहीत्वाधिं बंधं वा साधुलग्नकम् ॥ लेख्यारूढं साक्षिमद्वा ऋणं दद्याद्धनी सदा ॥ ९ ॥ यावत्तावकमृणं न शोध्यते तावदेतद्गृहक्षेत्रादि विक्रयाधिकरणाद्यहं न करिष्यामीति निर्बंधो बंधः ॥ लग्नकः प्रतिभूः ॥ विष्णुः-यो गृहित्वा ऋणं सर्वं श्वो दास्यामीति सामकम् ॥ न दद्याल्लोभतः पश्चाद्दिनाद्वृद्धिमवाप्नुयात् ॥ १० ॥

## ऋणादान प्रकरणाचा निर्णय.

कर्ज वसूल करण्याच्या संबंधानें सात प्रकार सांगितले आहेत. त्यांविषयीं नारदाचें वचन. १ देण्यास योग्य असें ऋण कोणतें. २ देण्यास अयोग्य असें कर्ज कोणतें. ३ ऋण देण्याचा अधिकारी कोण. ४ कोणत्या वेळीं कर्ज द्यावें. ५ व तें कोणत्या प्रकारानें द्यावें. असे ऋणकोविषयीं पांच प्रकार आहेत. ६ कर्ज देणें आणि ७ परत घेणें. असे धनकोविषयीं दोन प्रकार. मिळून याप्रमाणें सात प्रकारचीं ऋणादानें सांगितलीं आहेत. १ बृहस्पतीचें वचन. विपत्तिग्रस्त आणि क्लेश पावणारा अशा ऋणको पासून शंकारहित अशा धनकोनें व्याजानें चौपट आठपट असें जें ऋण घेतलें जातें त्यास कुसीद अशी संज्ञा सांगितली आहे. ( दामदुप्पटीपेक्षां ज्यास्त देऊं नये त्यासंबंधानें पुढें सांगितलें आहे ) २ मनूचें वचन. द्रव्यास वाढविणारें असें व्याज वसिष्ठानें सांगितलें आहे. सावकारानें दरमहा शंभर रुपयांस ऐशींवा हिस्सा व्याज ह्मणजे सवा रुपया शेंकडा प्रमाणें दर महिन्यास व्याज घ्यावें. ३ याज्ञवल्क्यानें-गहाण ( तारण ) सहित असें जें ऋण असेल त्यास दर महिना सवा रुपया व्याज आणि गहाण ( तारण ) रहित जें कर्ज असेल त्यास ब्राह्मणास दोन रुपये शेंकडा, क्षत्रियास तीन, वैश्यास चार आणि

शूद्रास पांच याप्रमाणें व्याज सांगितलें आहे. ४ अथवा सर्वांनीं सर्वजातींत आपण करार ज्याप्रमाणें केला असेल त्याप्रमाणें व्याज द्यावें. सर्व ह्मणजे ब्राह्मणादिक कर्जदार यांनीं गहाणयुक्त अथवा गहाणरहित असें जें कर्ज असेल त्याविषयीं व्याजाची जी कबुली असेल त्याप्रमाणें सर्व जातीस व्याज द्यावें ५ व्याजाचें लक्षण नारद सांगतात. कायिक, कालिक, कारित, चक्रवाढ, असें शास्त्रामध्यें चार प्रकारचें व्याजाचें लक्षण सांगीतलें आहे ॥ ६ ॥ १ कायिक ह्मणजे दर महिना जी व्याजाची कबुली असेल तिच्या हिशोबानें दररोज जें पण ( पैसा ) किंवा त्याचा पाव ( दमडी ) इत्यादिक जें व्याज घेतलें जातें त्यास कायिक अशी संज्ञा आहे, २ कालिक ह्मणजे दर महिन्यास जें व्याज दिलें जातें तें त्यास कालिक अशी संज्ञा आहे ॥ ७ ॥ ३ कारिक ह्मणजे ऋणकोच्या संतोषानें जें व्याज कबूल केलें जातें त्यास कारिक अशी संज्ञा आहे. ४ चक्रवाढ ह्मणजे व्याजालाही व्याज पुनः घेतलें जातें त्यास चक्रवाढ व्याज अशी संज्ञा आहे ॥ ८ ॥ धनकोनें कर्ज देते समयीं कोणत्या प्रकारानें द्यावें त्याविषयीं बृहस्पतीचें वचन. सावकारानें कर्ज देणें तें सदोदित योग्य किमतीचें तारण किंवा गहाण घेऊन कबुलायत करून घेऊन जामीन घेऊन दस्तऐवज घेऊन साक्षीदारासमक्ष कर्ज द्यावें॥ ९ ॥ बंध ह्मणजे कर्ज फिटे तोंपर्यंत तारण अथवा गहाण दिलेलें घर, शेत अथवा इतर वस्तु हें दुसऱ्यास गहाण देणार नाहीं अथवा त्याची विक्री करणार नाहीं असा जो निर्बंध त्यास बंध अशी संज्ञा आहे. लग्नक ह्मणजे जामिनदार विष्णूचें वचन. जो उद्यां रकम परत देईन असें ह्मणून स्नेहसंबंधानें उसनवार कर्ज घेऊन लोभानें जर न देईल तर त्यानें घेतले दिवसापासून व्याज दिलें पाहिजे ॥ १० ॥

याचितके वृद्धिमाह कात्यायनः-यो याचितकमादाय तमदत्त्वा दिशं व्रजेत् ॥ ऊर्ध्वं संवत्सरात्तस्य धनं वृद्धिमवाप्नुयात् ॥ ११ ॥ कृत्वोद्धारमदत्त्वा यो याचितस्तु दिशं व्रजेत् ॥ ऊर्ध्वं मासत्रयात्तस्य तद्धनं वृद्धिमाप्नुयात् ॥ १२ ॥ स्वदेशेऽवस्थितो यस्तु न दद्याद्याचितः क्वचित् ॥ तं ततोऽकारितां वृद्धिमनिच्छंतं च दापयेत् ॥१३॥ नारदः-न वृद्धिः प्रीतिदत्तानां स्यादनाकारिता क्वचित् ॥ अनाकारितमप्यूर्ध्वं वत्सरार्द्धाद्वि वर्द्धते ॥ १४ ॥ कात्यायनः-प्रीतिदत्तं न वर्द्धेत यावन्न प्रतियाचितम् ॥ याच्यमानमदत्तं चेद्वर्द्धते पंचकं शतम् ॥ १५ ॥ पण्यं गृहीत्वा यो मूल्यमदत्त्वैव दिशं व्रजेत् ॥ ऋतुत्रयस्योपरिष्टात्तद्धनं वृद्धिमाप्नुयात् ॥ १६ ॥ निक्षिप्तं वृद्धिशेषं च क्रयं विक्रयएव च ॥ याच्यमानमदत्तं चेद्वर्द्धते पंचकं शतम् ॥ १७ ॥ नारदः-पण्यमूल्यं भृतिर्न्यासो दंडो यश्च प्रकल्पितः ॥ वृथादानाक्षिकपणा वर्द्धते न विवक्षिताः ॥१८॥ अक्षिकोऽक्षक्रीडासंबंधी ॥ याज्ञवल्क्यः-दीयमानं न गृह्णाति प्र-

युक्तं यत्स्वकं धनम् ॥ मध्यस्थस्थापितं तत्स्याद्वर्धते न ततः परम् ॥ १९ ॥ द्रव्यविशेषेण वृद्धिमाह याज्ञवल्क्यः—संततिस्तु पशुस्त्रीणां रसस्याष्टगुणापरा ॥ वस्त्रधान्यहिरण्यानां चतुस्त्रिद्विगुणापरा ॥ २० ॥

## उसनें घेतलेल्या कर्जास कात्यायन व्याज सांगतात.

याचना करून उसनवार कर्ज घेऊन तें परत न देतां देशांतरास जर कोणी जाईल, नंतर एक वर्षापुढें त्या द्रव्यास त्यानें व्याज दिलें पाहिजे ॥ ११ ॥ कोणी मनुष्य उधार ह्मणजे बिनव्याजी कर्ज घेऊन मागितलें असतां देशांतरीं पळून जाईल तर त्यानें घेतलेल्या कर्जास तीन महिन्यानंतर व्याज सुरू होईल ॥ १२ ॥ स्वदेशीं राहून जो ऋणको मनुष्य मागितलें असतां कर्ज देत नाहीं. त्याची व्याज देण्याची इच्छा नसेल तरीही त्याजकडून व्याज धनकोस देवविलें पाहिजे ॥ १३ ॥ नारदाचें वचन. स्नेहानें दिलेल्या ऋणास जरी व्याज द्यावयाचें नाहीं तरी सहा महिन्यानंतर व्याज सुरू होतें ॥ १४ ॥ कात्यायनाचें वचन. स्नेहानें दिलेलें कर्ज धनको ऋणकोस जो कालपर्यंत मागत नाहीं. तो कालपर्यंत त्यास व्याज नाहीं. मागितल्यानंतर जर तो न देईल तर शेंकडा पांच रुपये प्रमाणें त्याजवर व्याज सुरू होईल ॥ १५ ॥ एखादी वस्तु विकत घेऊन त्याची किंमत न देतां देशांतरास जाईल, तर सहा महिन्यानंतर त्या किंमतीच्या द्रव्यास व्याज द्यावें लागेल ॥ १६ ॥ ठेव ह्मणून ठेवलेलें द्रव्य, व्याजांतील अवशिष्ट राहिलेलें कर्ज, खरेदी केलेल्या मालाची किंमत, हें मागितलें असून न दिल्यास, त्या द्रव्यावर शेंकडा पांच रुपयेप्रमाणें व्याज द्यावें लागेल ॥ १७ ॥ नारदाचें वचन. विकलेल्या मालाची किंमत, पगाराचे पैसे, ठेव, एखाद्या मनुष्यास दंड झाला असतां त्या दंडाचे पैसे, अयोग्य कामास देऊं केलेले पैसे, जुवा वगैरे खेळासंबंधाचे पैसे, या सर्वांस व्याज देण्याची कबूली नसेल तर व्याज सुरू होत नाहीं ॥ १८ ॥ याज्ञवल्क्याचें वचन. धनकोस ऋणको जर कर्ज परत देत असतां तो न घेईल तर तें कर्ज एखाद्या विश्वासूक मनुष्यापाशीं ठेवावें. ह्मणजे ठेवल्या दिवसापासून त्या कर्जाचें व्याज बंद होतें ॥ १९ ॥ पदार्थांच्या भेदानें व्याजाचा भेद सांगतो. याच याज्ञवल्क्याचें वचन. पशु, दासी, यांची संतती हेंच व्याज, रसानें कितीही व्याज वाढविलें असेल तरी आठपट व्याज घ्यावें. वस्त्राचें चौपट, धान्याचें तिप्पट आणि सुवर्णाचें दुप्पट व्याज पराकाष्ठा जाणावें ॥ २० ॥

तत्र मिताक्षरा–अधुना प्रयुक्तस्य द्रव्यस्य वृद्धिग्रहणमंतरेणापि चिरकालावस्थितस्य कस्य द्रव्यस्य कियती परा वृद्धिरित्यपेक्षित आह ॥२१॥ रसस्य नैतुकाद्वृद्धि·

ग्रहणमंतरेण चिरकालावस्थितस्य स्वकृतया वृध्या वर्द्धमानस्याष्टगुणा वृद्धिः परा
नातः परंवर्द्धते॥२२॥ तथा, वस्त्रधान्यहिरण्यानां यथासंख्यं चतुर्गुणा त्रिगुणा द्विगुणा
च वृद्धिः परा ज्ञेया वसिष्ठेन तु रसस्य त्रैगुण्यमुक्तम्॥ द्वैगुण्यं हिरण्यं त्रैगुण्यं धान्यं
धान्येनैव रसाव्याख्याताः पुष्पमूलफलानि च तुलाधृतमष्टगुणमिति ॥ २३ ॥ मनुना
तु धान्यस्य पुष्पमूलफलादीनां च पंचगुणत्वमुक्तम् ॥ धान्ये शदे लवे वाह्ये नातिक्रा-
मति पंचतामिति ॥ शदः क्षेत्रफलं पुष्पमूलफलादि॥ लवो मेषोर्णा चमरीकेशादिः॥ वाह्यो
बलीवर्दतुरगादिः ॥ धान्यशदलववाह्यविषया वृद्धिः पंचगुणत्वं नातिक्रामतीति ॥२४॥
तत्राधमर्णयोग्यतावशेन महार्घसमर्घधान्यके दुर्भिक्षादिकालवशेन च व्यवस्था द्र-
ष्टव्या ॥ एतच्च सकृत्प्रयोगे सकृदाहरणे च वेदितव्यं ॥ पुरुषांतरसंक्रमणेन प्रयोगांतरक-
रणे तस्मिन्नेव वा पुरुषे अनेकशः प्रयोगांतरीकरणे सुवर्णादिकं द्वैगुण्याद्यतिक्रम्य
पूर्ववद्वर्द्धते ॥ सकृत्प्रयोगेपि प्रतिदिनं प्रतिमासं प्रतिसंवत्सरं वा वृध्याहरणेऽधमर्णे दे-
यस्य द्वैगुण्यासंभवात्पूर्वाहृतवृध्या सह द्वैगुण्यमतिक्रम्य वर्द्धतएव ॥ २५ ॥ यथाह
मनुः–कुसीदवृद्धिर्द्वैगुण्यं नात्येति सकृदाहितेति ॥ सकृदाहृतेत्यपि पाठोऽस्ति ॥ उप-
चयार्थं प्रयुक्तं द्रव्यं कुसीदं तस्य वृद्धिः कुसीदवृद्धिः॥ द्वैगुण्यं नात्येति नातिक्रामति
॥ २६ ॥ यदि सकृदाहिता सकृत्प्रयुक्ता पुरुषांतरसंक्रमणादिना प्रयोगांतरकरणे
द्वैगुण्यमत्येति ॥ सकृदाहृतेति पाठे तु शनैः शनैः प्रतिदिनं प्रतिमासं प्रतिसंवत्सरं वा-
ऽधमर्णादाहृता द्वैगुण्यमत्येतीति व्याख्येयम् ॥ २७ ॥ तथा गौतमेनाप्युक्तम्–चिरस्थाने
द्वैगुण्यं प्रयोगस्येति प्रयोगस्येत्येकवचननिर्देशात्प्रयोगांतरकरणे द्वैगुण्यातिक्रमोऽभि-
प्रेतः ॥ चिरस्थानइति निर्देशात् शनैः शनैर्वृद्धिग्रहणे द्वैगुण्यातिक्रमो दर्शितः ॥ २८ ॥

या संबंधानें मिताक्षराकार ह्मणतात. व्याजीं दिलेल्या द्रव्याचें व्याज न घेतां पु-
ष्कळ दिवसपर्यंत तसेंच द्रव्य राहिलें असतां कितपत जास्त व्याज होत आहे तें सांगत
आहे. रस ह्मणजे तेल, तूप इत्यादि यांचें व्याज न घेतां पुष्कळ दिवसपर्यंत तसेंच रा-
हिलें असतां नंतर व्याजाच्या हिशोबानें किवीही जास्त होत असेल तरी तें आठपटच
होतें जास्त होत नाहीं ॥ २१ ॥ वस्त्राची पराकाष्ठा चौपट वाढ, धान्याची तिप्पट आणि
नाण्याची पराकाष्ठा दामदुप्पट घ्यावी अधिक घेऊं नये ॥ २२ ॥ वसिष्ठानें वर नाणें
दुप्पट, धान्य आणि रस तिप्पट व पुष्प, फळ, मूळ यांची आठपट वाढ सांगितली आहे
॥ २३ ॥ मनूनें तर धान्याची, पुष्पें, फळें, मुळें इत्यादिकांची पाचपट वाढ सांगितली
आहे. धान्य ह्मणजे तांदूळ, गहूं इत्यादिक. शद ह्मणजे बागाइतांत झालेलीं फळें,
मूळें इत्यादिक. लव ह्मणजे मेंढयाची लोंकर, वाह्य ह्मणजे घोडे, बैल इत्यादिक यांची

वृद्धि पांच पटीपेक्षां अधिक होत नाहीं ॥ २४ ॥ आतां येथें याज्ञवल्क्य, वसिष्ठ, मनु यांनीं बहुतकाळ राहिलेल्या नाणीं, धान्य इत्यादिकांच्या व्याजाविषयीं न्यूनाधिक जो प्रकार सांगितला तो ऋणकोंच्या योग्य स्थितीच्या विचारानें अथवा जास्त किमतीचे अथवा स्वस्त किमतीचे धान्यादिकांच्या संबंधानें, तसेंच दुर्भिक्षादिकांच्या संबंधानें हर्व व्यवस्था जाणावी. १ हे दामदुपटीचे इत्यादिक जे प्रकार एक वेळां कर्ज दिलें आहे आणि एक वेळ परत घेणें आहे, तर त्याबद्दलचें जाणावें. २ ज्या ऋणकोकडे कर्ज आहे त्यास धनकोनें सांगितलें कीं, तुजकडे माझें जें ऋण आहे तें अमुक मनुष्यास दे, असें सांगितल्यावरून कुळानें त्यास दिलें असतां, अथवा पहिल्या धनकोपाशींच वारंवार त्या ऋणाची देवघेव केली असतां ते पूर्वीं घेतलेल्या व्याजासुद्धां, दामदुप्पट वगैरे वाढी-पेक्षां अधिक वाढतेंच. ३ एकदां कर्ज दिलें असलें तरी प्रतिदिवशीं किंवा दर महि-न्यास किंवा दरवर्षी कुळापासून केवळ व्याजच पावत आहे तर ऋणकोनें देण्यायोग्य जें कर्ज तें पूर्वीं घेतलेल्या व्याजासहवर्तमान दामदुपटीपेक्षां अधीकही वाढतेंच ॥ २५ ॥ यास मनूचें वचन. ( कुसीद ह्मणजे व्याज ) याची वाढ दुपटीपेक्षां अधिक होत नाहीं. परंतु तें कर्ज एक वेळांच दिलें असेल तर, अर्थात् त्याच ऋणकोशीं कर्जाची वारंवार देवघेव झाली असली तर दामदुपटीपेक्षांही जास्त देतां येतें ॥ २६ ॥ " सकृदाहिता " या मनुवचनांत सकृदाहृता असाही पाठ आहे. या दोन्हींही पाठांचा अर्थ मिताक्षरेंत स्पष्ट सांगितला आहे तो असा. कुसीद ह्मणजे व्याज त्याची वृद्धि ह्मणजे वाढ ती दुपटीपेक्षां जास्त होत नाहीं. परंतु ती एक वेळांच रक्कम द्यावयाची असेल तर, एक वेळां दिली असून पुनः दुसऱ्या पुरुषास दिल्यानें अथवा वारंवार देवघेव झाली असेल तर दुपटी-पेक्षांही जास्त होते. सकृदाहृता या पाठाचे ठिकाणीं तर वारंवार प्रतिदिवशीं प्रतिमहि-न्यास अथवा प्रतिवर्षी ऋणकोनें घेतलें असतां अथवा दिलें असतां ती रक्कम दुपटीपेक्षां जास्त होते ॥ २७ ॥ याप्रमाणें गौतमानेंही सांगितलें आहे. एक वेळां दिलेली रक्कम चिरकाळ राहिल्यास दुप्पट होते. या वाक्यांत प्रयोग शब्दाचें एकवचन दाखविलें आहे, यामुळें प्रयोगांतरकरण ह्मणजे वरचेवर देवघेव करणें असें झालें असेल तर दुपटीचें अतिक्रमण ह्मणजे दुपटीपेक्षां जास्त देववितां येतें. तसेंच वचनांत चिरस्थान असे शब्द घातले आहेत त्यावरून थोडें थोडें व्याज घेतलें असेल तर दुपटीपेक्षां जास्त रक्कम देव-वितां येते. तात्पर्य, दामदुपटीपेक्षां जास्त रक्कम देववितां येत नाहीं ह्मणजे सावकारास जेव्हां अखेर ती रक्कम घ्यावयाची त्यावेळेस जी रक्कम निघत असेल ती दामदुपटीपेक्षां जास्त देऊं नये एवढेंच त्याचें तात्पर्य आहे ॥ २८ ॥

## ॥ अथाधिनिर्णय ॥

धनप्रयोगे विश्वासहेतू द्वौ प्रतिभूराधिश्च ॥ यथाह नारदः-विस्रंभहेतू द्वावत्र प्रतिभूराधिरेवचेति ॥ तत्रादौ आधिर्निरूप्यते ॥ आधिर्नाम गृहीतस्य द्रव्यस्योपरि-विश्वासार्थमधमर्णेनोत्तमर्णेऽधिक्रियते आधीयतइत्याधिः॥ १ ॥ तत्र कतिविधा आ-धयइत्यपेक्षायामाह बृहस्पतिः-आधिर्बंधः समाख्यातः स च प्रोक्तश्चतुर्विधः ॥ जंगमः स्थावरश्चैव गोप्यो भोग्यस्तथैवच ॥ २ ॥ नारदः-आधिक्रियत इत्याधिः स विज्ञेयो द्विलक्षणः ॥ कृतकालोपनेयश्च यावद्देयो धृतस्तथा ॥ हारीतः-बंधं यथास्था-पितं स्यात्तथैव परिपालयेत् ॥ अन्यथा नश्यते लाभो मूलं नश्येद्व्यतिक्रमात् ॥ ३ ॥ व्यतिक्रम आधिनाशः ॥ याज्ञवल्क्यः-गोप्याधिभोगतो वृद्धिः सोपकारेऽथहापितइति॥ हापितउपभोगाक्षमतां नीतइत्यर्थः ॥ ४ ॥ कात्यायनः-अकाममननुज्ञातमाधिं यः कर्मकारयेत् ॥ भोक्ता कर्मफलं दाप्यो वृद्धिं वापि लभेत सः ॥ ५ ॥ मनुः-नत्वे-वाधौ सोपकारे कौसीदीं वृद्धिमाप्नुयात् ॥ न भोक्तव्यो बलादाधिर्भुंजानो वृद्धिमुत्सृ-जेत् ॥ ६ ॥ मूल्येन तोषयेच्चैनमाधिस्तेनोऽन्यथाभवेत् ॥ आधिश्चोपनिधिश्चोभौ न कालात्ययमर्हतः ॥ अवहार्यौ भवेतां तौ दीर्घकालमवस्थितौ ॥ ७ ॥ संप्रीत्या भुज्यमानानि न नश्यंति कदाचन ॥ धेनुरुष्ट्रोवहन्नश्वो यश्च दम्यः प्रयुज्यते ॥ ८ ॥ भुक्तिंचेद्दशवर्षाणि सन्निधौ प्रेक्षते धनी ॥ भुज्यमानं परैस्तूष्णीं न स तल्लब्धुमर्हति ॥ ९ ॥ अजडश्चेदपोगंडो विषये चास्य भुज्यते ॥ भग्नं तद्व्यवहारेण भोक्ता त-द्द्रव्यमर्हति ॥ १० ॥

## गहाणासंबंधाचा निर्णय.

ऋणकोस दिलेलें कर्ज परत येण्यास विश्वासास कारणभूत जामीन आणि गहाण असे दोन आहेत. त्यास नारदाचें वचन. विश्वास उत्पन्न करणारे जामीन आणि गहाण असे दोन आहेत. त्यामध्यें प्रथम गहाणाचा विचार सांगतों. गहाणास "आधि" अशी संज्ञा आहे. याचा अर्थ असा आहे कीं, कर्जदारानें घेतलेलें द्रव्य त्यापासून ध-नकोस परत येण्याचा विश्वास येण्यासाठीं ऋणको जो माल धनकोच्या स्वाधीन करतो त्यास आधि अशी संज्ञा आहे. १ तो आधि किती प्रकारचा तें बृहस्पति सांगतात. आधि ह्मणजे तारण, तें चार प्रकारचें सांगितलें आहे. जंगम, स्थावर, गोप्य व भोग्य. गोप्य ह्मणजे गुप्त ठेवण्यास योग्य, भोग्य ह्मणजे उपभोग घेण्यास योग्य, २ नारद. आधिक्रियते ह्मणजे दुसऱ्याच्या स्वाधीन केला जातो, तो दोन प्रकारचा आहे. एक

कृतकालोपनेय, ठरविलेला जो वेळ त्यावेळीं जो परत घेतला जातो त्यास ही संज्ञा आहे. यावद्देयोधृत, दुसरा द्रव्य परत येईपर्यंत जो धनकोपाशीं ठेवला जावो, तो. हारीताचें वचन. जसें गहाण ठेवलें असेल तसेंच तें संभाळून ठेवावें. तसें न राहिल्यास धनकोस व्याज मिळणार नाहीं व गहाणाचें तारण याचा नाश झाला असतां मुद्दल कर्जही बुडेल ॥ ३ ॥ याज्ञवल्क्य. तारण ह्मणून संभाळण्यास दिलेलें गहाण याचा उपभोग घेतला असतां, अथवा उपभोग करण्यास दिलेलें गहाण विघडविलें असतां धनकोस व्याज मिळावयाचें नाहीं ॥ ४ ॥ कात्यायन. गहाण ठेवणाराच्या कबुलीवांचून गहाणवस्तु कामास लावील तर त्या कामाचा लाभ गहाणाचे मालकास देववावा अथवा धनकोस व्याज देऊं नये ॥ ५ ॥ मनु. सावकाराच्या उपयोगी पडण्यास योग्य असें गहाण असो अथवा नसो धनको त्याचा उपभोग करीत असेल तर त्यास व्याज मिळणार नाहीं ॥ ६ ॥ संभाळण्यास दिलेलें असें वस्त्रालंकारादि गहाण बलात्कारानें त्याचा उपभोग घेऊं नये, जर धनको त्याचा उपभोग घेईल तर त्यास व्याज देऊं नये, गहाण जिन्नस उपभोग घेऊन विघडला असतां, जिनसाची किंमत देऊन ऋणकोस संतुष्ट करावें. तसें न केलें तर तो धनिक गहाणाची चोरी करणारा असा जाणावा. आधि ह्मणजे गहाण, उपनिधि ह्मणजे गुप्तरीतीनें करून ठेवलेलें द्रव्य हीं दोन्हीं ठेवणारा मालक ज्यावेळेस मागेल त्यावेळेसच दिलीं पाहिजेत. कालविलंब करूं नये ॥ ७ ॥ पुष्कळ दिवस जरी राहिलें असेल तरीही तें ठेवणाऱ्या मालकाचेंच आहे. गाय, उंट, घोडा, बैल हे गहाण ठेवले असून मालकाच्या संतोषानें त्यांचा उपभोग घेतला असतांही मालकाचें स्वामित्व जात नाहीं ॥ ८ ॥ कोणतीही वस्तु दहा वर्षेंपर्यंत मालकाचे समोर मालक पाहत असतां अन्य मनुष्य जर त्याचा उपभोग सारख्या रीतीनें घेईल, तर ती उपभोग घेणाराचीच होते ॥ ९ ॥ मालकाचें स्वामित्व नाहींसें होतें. कारण उपभोग घेणारा असें ह्मणतो कीं, ज्याची वस्तु आहे हा मनुष्य शहाणा, सोळा वर्षांपेक्षां जास्त वयाचा आहे आणि मी याचेसमक्ष उपभोग घेत असतां यानें माझें निवारण केलें नाहीं सबब व्यवहारानें ती वस्तु नष्ट झाली. यामुळें ती वस्तु, भोग घेणाराची होते ॥ १० ॥

आधिः सीमा बालधनं निक्षेपोपनिधिः स्त्रियः ॥ राजस्वं श्रोत्रियस्वं च न भोगेन प्रणश्यति ॥ ११– याज्ञवल्क्यः ॥ नष्टो देयो विनष्टश्च देवराजकृतादृते ॥ नष्टो विकृतिं गतः पूर्ववत्कृत्वा देयः ॥ १२ ॥ बृहस्पतिः–भुक्तेत्यसारतां प्राप्ते मूल्यहानिः प्रतीयते ॥ आधेर्विनाशे तन्मूल्यं दातव्यमित्याह ॥ १३ ॥ बृहस्पतिः–

देवराजोपघातेन यत्राधिर्नाशमाप्नुयात् ॥ तत्राधिं दापयेद्द्यात्सोदयं वा धनं ऋणी ॥ १४ ॥ व्यासः– देवराजोपघाते तु न दोषो धनिकस्य च ॥ नारदः– आधिस्तु द्विविधः प्रोक्तो जंगमः स्थावरस्तथा ॥ सिद्धिरस्योभयस्यापि भोगे यद्यस्ति नान्यथा ॥ १५ ॥ वसिष्ठोऽपि–तुल्यकाले निसृष्टानां लेख्यानामाधिकर्मणि ॥ येन भुक्तं भवेत्पूर्वं तस्याधिर्बलवत्तरः ॥ १६ ॥ सएव यद्येकदिवसे तौ तु भोक्तुकामावुपागतौ ॥ विभज्याधिः समस्तत्र भोक्तव्यइति निश्चयः ॥ १७ ॥ कात्यायनः–आधिमेकं द्वयोर्यस्तु कुर्यात्तं प्रति यद्भवेत् ॥ तयोः पूर्वकृतं ग्राह्यं तत्कर्ता चोरदंडभाक् ॥ १८ ॥ याज्ञवल्क्यः––आधिः प्रणश्येद्विगुणे धने यदि न मोक्ष्यते ॥ कालकालकृतो नश्येत्फलभाग्यो न नश्यति ॥ १९ ॥ बृहस्पतिः––हिरण्ये द्विगुणीभूते पूर्णे काले धृतावधौ ॥ बंधकस्य धनी स्वामी द्विसप्ताहं प्रतीक्षतः ॥ ॥ २० ॥ व्यासः– गोप्याधिर्द्विगुणादूर्ध्वं कृतकालः कृतावधेः ॥ आवेदयित्वर्णकर्त्तुर्भोक्तव्यस्तदनंतरम् ॥ २१ ॥ बृहस्पतिः– हिरण्ये द्विगुणीभूते मृते नष्टेऽधमर्णिके॥ द्रव्यं तदीयं संगृह्य विक्रीणीत ससाक्षिकम् ॥२२॥ याज्ञवल्क्यः–उपस्थितस्य मोक्तव्य आधिस्तेनोऽन्यथा भवेत्॥ प्रयोजके सति धनं कुलेऽन्यस्याधिमाप्नुयात्॥२३॥ तत्कालकृतमूल्यो वा तत्र तिष्ठेदवृद्धिकः ॥ बृहस्पतिः—क्षेत्राधिकं यदा भुक्तं ततः मूलोदयं प्रविष्टं चेत्तदाधिं प्राप्नुयादृणी ॥ २४ ॥ याज्ञवल्क्यः–यदा तु द्विगुणी भूतमृणमाधौ तदा खलु ॥ मोच्य आधिस्तदुत्पन्ने प्रविष्टे द्विगुणे धने ॥ २५ ॥

गहाणवस्तु, गांवाची शीव, अज्ञानाचें द्रव्य, ठेव, गुप्त करून ठेवलेली ठेव, दासी, राजद्रव्य, अग्निहोत्र्याचें द्रव्य, यांचा दहा वर्षें जरी उपभोग घेतला तरी मालकाचें स्वामित्व जात नाहीं ॥ ११ ॥ याज्ञवल्क्य. देव अथवा राजा यांच्या उपद्रवावांचून अन्य कारणानें गहाण ठेवलेल्या वस्तूचा नाश झाला असतां ठेवतेवेळीं ज्याप्रमाणें वस्तु असेल त्याप्रमाणेंच त्यास वस्तु करून दिली पाहिजे ॥ १२ ॥ बृहस्पति. तारण ठेवलेला पदार्थ निःसत्व झाला असतां त्याजवर दिलेलें कर्ज नाहींसें होतें. [1] गहाण ठेवलेली वस्तु नष्ट झाली असतां त्याची किंमत ऋणकोस द्यावी ॥ १३ ॥ बृहस्पति. देव अथवा राजा यांच्या उपद्रवानें जर गहाण ठेवलेली वस्तु नाश पावेल तर ऋणकोनें त्यास त्या किमतीचें गहाण आणून द्यावें, किंवा व्याजासुद्धां मुद्दल कर्ज परत द्यावें ॥ १४ ॥ व्यास. देव किंवा राजा यांच्या उपद्रवानें जर गहाण दिलेल्या वस्तूचा नाश होईल तर धनकोचा त्यांत कोणताही दोष नाहीं. नारद. आधि ह्मणजे गहाण. तें दोन प्रकारचें आहे. स्थावर आणि जंगम यांची सिद्धता होणें ह्मणजे, यांचा उपभोग घेणें हेंच आहे. जर उपभोग

न होईल तर तें गहाण झालें असें ह्मणतां येत नाहीं ॥ १५ ॥ वसिष्ठ. एककालीं एक वस्तु अनेक ठिकाणीं गहाण देऊन त्याचीं गहाणपत्रें झालीं असतां ज्यास गहाण दिलेल्या वस्तूचा पहिल्यानें कबजा मिळालेला असेल त्याचा हक्क अधिक आहे ॥ १६ ॥ वसिष्ठ. एकाच तारणाचा ताबा घेण्यासाठीं दोघेही सावकार जर येतील तर त्याविषयीं असा नियम आहे कीं, त्या तारणाचे सारखे विभाग करून दोघांनीं सारख्या प्रमाणानें वांटून घेऊन उपभोग घ्यावा ॥ १७ ॥ कात्यायनाचें वचन. जो कोणी मनुष्य एकच गहाण-वस्तु दोन धनकोस लावून देईल तर प्रथम ज्याचें देणें असेल तें कायम समजावें. एक वस्तु दोन ठिकाणीं ठेवणारास चोराची शिक्षा द्यावी ॥ १८ ॥ याज्ञवल्क्याचें वचन. गहाण ठेवलेली वस्तु त्याचेवर जें कर्ज घेतलें असेल तें दुप्पट झालें असतांही जर न सोडविलें तर ती वस्तु नाहींशी होते ह्मणजे ऋणकोचा त्या वस्तूवरचा हक्क नाहींसा होतो. गहाणास कांहीं मुदत केली असतां ती मुदत संपतांच ऋणकोचा त्याजवरील हक्क नाहींसा होतो. परंतु गहाणावर जें उत्पन्न होणारें तें घ्यावें व तारण तसेंच ठेवावें असा करार असल्यास तें कधींही नाहींसें होत नाहीं ॥ १९ ॥ बृहस्पतीचें वचन. सोनें याजवर जें कर्ज घेतलें असेल, तें दुप्पट झालें ह्मणजे आणि त्यास जी मुदत ठरविली असेल ती मुदत झाल्यानंतर ऋणकोनें तें चौदा दिवसांचे आंत सोडवून न नेल्यास पुढें धनको त्या ठेवलेल्या जिनसाचा मालक होतो ॥ २० ॥ व्यासाचें वचन. गुप्तरीतीनें ठेवलेलें गहाण त्याजवर दामदुप्पट झाली असतां किंवा त्यास जी मुदत केली असेल ती संपल्यानंतर ऋणकोस कळवावें. नंतर ऋणको जर न नेईल तर धनको त्याचा मालक होईल ॥२१॥ बृहस्पतीचें वचन. गहाण ठेवलेल्या सुवर्णादि वस्तूवर दुप्पट रक्कम झाली असून ऋणको मृत झाला असेल अथवा देशांतरीं गेला असेल तर गहाण ठेवलेली वस्तु घेऊन साक्षी-दारासमक्ष विकून टाकावी ॥ २२ ॥ याज्ञवल्क्याचें वचन. गहाण वस्तु सोडविण्यास तयार झालें असतां ती जर न देईल तर त्यास चोर असें ह्मणावें आणि तें द्रव्य दुसरी-कडे ठेवावें ॥ २३ ॥ बृहस्पतीचें वचन. जेव्हां तारणाबद्दल शेत वगैरे दिलें असून त्यापासून झालेलें उत्पन्न गहाणाच्या रकमेइतकें झालें असेल तर तें तारण त्याचें त्यास परत द्यावें ॥ २४ ॥ याज्ञवल्क्याचें वचन. जेव्हां तर गहाणावरचें कर्ज व्याजानें दुप्पट झालें असेल आणि गहाणाचें उत्पन्न द्विगुण आलें असेल तेव्हां तें गहाण सोडून द्यावें, ह्मणजे ऋणकोस परत द्यावें ॥ २५ ॥

## ॥ अथ प्रतिभूत्वनिर्णयः ॥

तत्र प्रतिभूत्वं नाम विश्वासार्थं पुरुषांतरेण सह समयः ॥ तच्च विषयभेदात्त्रेधा

तथा च याज्ञवल्क्यः—दर्शने प्रत्यये दाने प्रातिभाव्यं विधीयते ॥ प्रत्ययः समीचीनोयमित्युक्त्या विश्वासोत्पादनं ॥ १ ॥ बृहस्पतिस्तु चातुर्विध्यमाह ॥ दर्शने प्रत्यये दाने ऋणे द्रव्यार्पणे तथा ॥ चतुःप्रकारः प्रतिभूः शास्त्रे दृष्टो मनीषिभिः ॥ २ ॥ आहैको दर्शयाम्येनं साधुरेषोऽपरोऽब्रवीत् ॥ दाताहमेतद्द्रविणमर्पयाम्यपरो ब्रऽवीत् ॥ ॥ ३ ॥ तत्र दर्शने दर्शनापेक्षायां एनं दर्शयिष्यामीति ॥ प्रत्यये विश्वासे मत्प्रत्ययेनास्य धनं प्रयच्छ नायं त्वां वंचयिष्यते ॥ यतोऽमुकस्य पुत्रोऽयं उर्वराभायाभूरस्य ग्रामवरो वास्तीति ॥ दाने यद्ययं न ददाति तदानीमहमेव दास्यामीति ॥ अर्पयामि दापयिष्यामीत्यर्थः॥ प्रातिभाव्यं विधीयतइति प्रत्येकं संबंधः ॥४॥ आद्यौ तु वितथे दाप्यावितरस्य सुता अपि ॥ दर्शनप्रतिभूर्यत्र मृतः प्रात्ययिको पि वा ॥ नतत्पुत्रा ऋणं दद्युर्दद्युर्दानाय यः स्थितः ॥ ५ ॥ कात्यायनः—प्रातिभाव्यागतं पौत्रैर्दातव्यं तु न तत्कचित् ॥ पुत्रेणापि समं देयमृणं सर्वत्र पैतृकम् ॥ ६ ॥ व्यासः—ऋणं पैतामहं पौत्रः प्रतिभाव्यागतं सुतः ॥ समं दद्यात्तत्सुतौ तु न दाप्याविति निश्चयः ॥ ॥ ७ ॥ द्रव्यग्रहणेन प्रातिभाव्यांगीकारे तु पुत्रपौत्राभ्यामपि सवृद्धिकं देयम् ॥ तथा च कात्यायनः—गृहीत्वा बंधकं यत्र दर्शनेऽस्य स्थितो भवेत् ॥ विना पितृधनात्तस्माद्दाप्यः स्यात्तदृणं सुतः ॥ ८ ॥ कात्यायनः—नष्टस्यान्वेषणार्थं तु देयं पक्षत्रयं परम् ॥ यद्यसौ दर्शयेत्तत्र भोक्तव्यः प्रतिभूर्भवेत् ॥ ९ ॥ दर्शनप्रतिभूर्यास्तो देशे काले न दर्शयेत् ॥ निबंधमावहेत्तत्र देवराजकृताद्दते ॥ निबंधमावहेद्धनिकद्रव्यं दद्यात् ॥ १० ॥

## जामीनपणाचा विचार.

जामीनपणा ह्मणजे ज्यास कर्ज देणें, घेणें इत्यादि जो व्यवहार त्याच्या विश्वासाकरितां दुसऱ्या पुरुषाशीं करार करणें. जामीनपणा विषयभेदानें तीन प्रकारचा सांगितला आहे. त्यास याज्ञवल्क्याचें वचन. दाखविणें ह्मणजे हजर करणें. प्रत्यय ह्मणजे विश्वास (ह्मणजे हा चांगला आहे असें सांगून त्याजबद्दलचा विश्वास उत्पन्न करणें.) दान ह्मणजे द्रव्य अर्पण करणें ॥ १ ॥ बृहस्पतीनें चार प्रकारचा जामीनपणा सांगितला आहे. हे तीन व ऋणकोनें द्रव्य न दिल्यास मी त्याजकडून देववीन. १ त्यामध्यें दर्शन ह्मणजे ज्यावेळेस या मनुष्याची जरुरी लागेल त्यावेळीं मी तुह्मास या मनुष्यास आणवून दाखवीन. २ प्रत्यय ह्मणजे विश्वास, माझ्या विश्वासावर तुह्मी ऋणकोस कर्ज द्या. हा तुह्मांस ठकविणार नाहीं. हा अमक्याचा पुत्र आहे व याची जमीन सर्वधान्यें पिकणारी अशी आहे. अथवा याचा गांव आहे. ३ दानाविषयीं ह्मणजे यास दिलेलें कर्ज

यानें न दिल्यास हें ऋणाचें द्रव्य मी तुह्मांस देईन. ४ यानें घेतलेलें द्रव्य परत न दिल्यास मी याजकडून देववीन. याप्रमाणें चार प्रकारचे जामीन आहेत ॥ २ ॥ त्यांत प्रथमचे दोन ह्मणजे हजर करण्याविषयींचा जामीन व विश्वासाविषयींचा जामीन. हे दोन जामीन यांनीं वेळेस हजर न केल्यास अगर विश्वास खोटेपणाचा दाखविल्यास धनकोचें विवादास्पद जें द्रव्य तें या उभयतांकडून देववावें. १ आणि जो ऋणास जामीन झाला असेल, तो मृत झाला असतां त्याच्या मुलानें देखील तें कर्ज दिलें पाहिजे ॥ ३ ॥ २ हजर करण्याविषयींचा जामीन अथवा विश्वासाविषयींचा जामीन मरण पावेल तर त्याच्या मुलानें बापाच्या जामीनकीचें कर्ज देऊं नये ॥ ४ ॥ माल देण्याविषयीं जो जामीन झाला असेल त्याच्या पुत्रानेंही जामीनकीचें पित्याचें द्रव्य दिलें पाहिजे ॥ ५ ॥ कात्यायन. जामीन संबंधाचें ऋण नातवानें कधींही देऊं नये. पुत्रानें मात्र मुद्दल कर्ज द्यावें ॥ ६ ॥ व्यासाचें वचन. आजाचें कर्ज नातवानें मुद्दल द्यावें. त्याप्रमाणें पित्याचे जामीनकी संबंधाचें कर्ज मुलानें, व्याजरहित ह्मणजे मुद्दल द्यावें ॥ ७ ॥ नातु अथवा पणतु यांनीं आजा व पणजा यांचें जामीनकीचें कर्ज देऊं नये, याप्रमाणें निश्चय आहे. परंतु हा नियम द्रव्य न घेतां जामीन झाला असेल तरचा आहे. द्रव्य घेऊन जामीन झाला असेल तर मुलगा, नातु यांनींही सव्याज कर्ज द्यावें. त्यास कात्यायनाचें वचन. जर पिता कारण घेऊन हजर जामीन झाला असेल, तर जरी बापाची जिनगी मुलास मिळाली नसेल तरी मुलानें जामीनकीचें कर्ज दिलेंच पाहिजे ॥ ८ ॥ कात्यायन. एखाद्या मनुष्यास अन्य मनुष्य जामीन झाला असून तो मनुष्य पळून जाईल तर त्याच्या शोधाकरितां जामीनदारास दीड महिना मुदत द्यावी. या मुदतींत जामीनदारानें त्यास दाखविल्यास तो जामीनदार त्या गुन्ह्यांतून मुक्त होईल ॥ ९ ॥ न दाखविल्यास जामीनदारावर मुळचे मनुष्याप्रमाणेंच जबाबदारी आहे. कर्जदारास हजर करण्यासाठीं जामीन झाला असून कबूल केलेल्या वेळीं व कबूल केलेल्या ठिकाणीं ऋणकोस जर न हजर करील आणि देव व राजा यांचा उपद्रव झाला नसेल तर जामिनकी संबंधानें देण्यास कबूल केलेला पैसा जामीनदाराकडून देववावा ॥ १० ॥

याज्ञवल्क्यः–बहवः स्युर्यदि स्वांशैर्दद्युः प्रतिभुवो धनम् ॥ एकच्छायाश्रितेष्वेषु धनिकस्य यथारुचि ॥ ११ ॥ अहमेव सर्वं दास्यामीति प्रत्येकं प्रतिज्ञा एकच्छायानामाश्रितेष्वप्येषु धनिकेच्छया यः कश्चिद्दद्यात् ॥ याज्ञवल्क्यः–प्रतिभूर्दापितो यस्तु प्रकाशान्धनिने धनम्॥ द्विगुणं प्रतिदातव्यमृणिकैस्तस्य तद्भवेत् ॥ १२॥ बृहस्पतिः–प्रातिभाव्यं च यो दद्यात्पीडितः प्रतिभावितः ॥ त्रिपक्षात्परतः सोऽपि

द्विगुणं लब्धुमर्हति ॥१३॥ मत्तोन्मत्तार्तव्यधीनैर्बालेन स्थविरेण वा ॥ असंबद्धकृतश्चैव व्यवहारो न सिद्ध्यति ॥ १४ ॥ बलाद्दत्तं बलाद्भुक्तं बलाद्यच्चापि लेखितम् ॥ सर्वान्बलकृतानर्थानकृतान्मनुरब्रवीत् ॥ १५ ॥ त्रयः परार्थे क्लिश्यंति साक्षिणः प्रतिभूः कुलम् ॥ चत्वारस्तूपचीयंते विप्र आढ्यो वणिक् नृपः ॥ १६ ॥

'निबंधमाहवेत' ह्मणजे सावकाराचें कर्ज जामीनदाराकडून देववावें. याज्ञवल्क्य. एखादे कर्जास पुष्कळ जामीनदार असतील तर तें कर्ज सर्वांनीं हिस्सेरशीनें द्यावें. जामीनदार एकछायाश्रित असतील तर धनकोची इच्छा ज्या जामीनदारापासून कर्ज वसूल करण्याची असेल त्यापासून धनकोनें आपलें धन घ्यावें ॥ ११ ॥ एकछाया ह्मणजे मीच हें कर्ज देईन असें प्रत्येक जामीनदारानें करार करून राहिलें असतां धनकोची इच्छा ज्यापासून द्रव्य घेण्याची असेल त्यानें तें द्रव्य द्यावें. ऋणकोनें धनकोस कर्ज न दिल्यामुळें जेथें जामीनदाराकडून कर्ज घेतलें जावें तेथें ऋणकोनें जामीनदारास दुप्पट कर्ज द्यावें ॥ १२ ॥ बृहस्पति. जेथें जामीनदारास पीडा दिल्यामुळें आपण झालेल्या जामीनकीचें द्रव्य जामीनदार देईल तेथें दीड महिन्याचे आंत ऋणकोनें जामीनदारास दुप्पट द्रव्य द्यावें ॥ १३ ॥ भांग, गांजा इत्यादि मादक पदार्थांनीं मत्त, रागादिकांनें उन्मत्त, रोगग्रस्त, दुःखित, बालक, अत्यंत वृद्ध, पराधीन, ज्यास स्वतःस अधिकार नाहीं या मनुष्यानें केलेले व्यवहार सिद्ध होत नाहींत. ह्मणजे ते रद्द जाणावेत ॥ १४ ॥ मनूनें असें सांगितलें आहे कीं, बलात्कारानें दिलेलें तसेंच बलात्कारानें उपभोग केलेलें भूमि वगैरे, तसेंच बलात्कारानें लिहिलेले दस्तऐवज, हे सर्व बलात्कारानें केलेले व्यवहार न केल्याप्रमाणें असें जाणावें ॥ १५ ॥ साक्षीदार जामीन आणि धर्मव्यवहार पाहणारें कुल हे दुसऱ्याकरितां क्लेश अनुभवितात. विप्र ह्मणजे ब्राह्मण, श्रीमंत, वाणि आणि राजा हे चार दुसऱ्याच्या द्रव्यानें वृद्धिंगत होतात. अर्थात जामीन, साक्षीपणा, धर्मव्यवहार पाहणें हीं तीन कामें करूं नयेत ॥ १६ ॥

## ॥ अथोत्तमर्णस्वर्णग्रहणविचारः ॥

बृहस्पतिः—सुहृत्संबंधिसंदिष्टैः सामोक्त्यानुगमेन च ॥ प्रायेण वा ऋणी दाप्यो धर्म एषउदाहृतः ॥ १ ॥ कात्यायनः–राजानं स्वामिनं विप्रं सांत्वेनैव प्रदापयेत् ॥ २ ॥ वणिजः कर्षकांश्चैव शिल्पिनश्चाब्रवीद्भृगुः ॥ देशाचारेण दाप्याः स्युर्दुष्टान्संपीड्य दापयेत् ॥ ३ ॥ न चारके निरोद्धव्य आर्यः प्रत्ययिकः शुचिः ॥ सोऽनिबंधः प्रयोक्तव्यो निबद्धः शपथेन वा ॥ ४ ॥ नचाश्रयेन्न दद्यात् ॥ चारके कारागारे ॥ रक्षिणो रक्षकानोवेष्य स्थाप्यः ॥ प्रत्ययिको विश्वास्यः ॥ बृहस्पतिः–

पूर्णावधौ शांतलाभमृणमुद्ग्रहयेद्धनी ॥ कारयेद्वाऋणी लेख्यं चक्रवृद्धिव्यवस्थया ॥ ॥ ५ ॥ पूर्णावधौ द्वैगुण्यादिके जाते अतएव शांतलाभं चोपपद्यते ॥ वृद्धिमपि लेख्ये प्रक्षिप्य तस्यापि वृद्धिकरणं च ऋणवृद्धिः ॥ नारदः–अथ शक्तिविहिनः स्यादृणी कालविपर्ययात् ॥ शक्त्यपेक्षमृणं दाप्यः काले काले यथोदयम् ॥ ६ ॥ मनुः-कर्मणापि समं कुर्याद्धनिकस्याधमर्णिकः ॥ समोपकृष्टजातिश्च दद्याच्छ्रेयांस्तु तच्छनैः ॥ ७॥ कात्यायनः–पीडयेत्तु धनी यत्रऋणिकं न्यायवादिनम् ॥ तस्मादर्थात्स हीयेत तत्समं वाप्नुयादृणम् ॥ ८ ॥ बृहस्पतिः–अनावेद्यतु राज्ञे यः संदिग्धेऽर्थे प्रवर्तते ॥ प्रसह्य सविनेयः स्यात्सचाप्यर्थो न सिद्ध्यति ॥ ९ ॥ यमः—ऋणिकः सधनो यस्तु दौरात्म्यान्न प्रयच्छति ॥ राज्ञा दापयितव्यः स्याद्गृहीत्वा द्विगुणं ततः ॥ १० ॥

## ऋणकोपासून ऋण वसूल करण्याचा विचार.

बृहस्पतीचें वचन–स्नेही, आप्तमंडळी यांच्याकडून उपदेश करून स्नेहपणाच्या भाषणें करून ऋणकोच्या पाठीमागें लागून अशारीतीनें बहुत करून जें कर्ज वसूल करणें. हा धर्ममार्ग सांगितला आहे ॥ १ ॥ कात्यायन. धनकोनें राजा, मालक, ब्राह्मण यांपासून ऋण वसूल करणें तें केवळ सामोपचारानेंच करावें. व स्नेही व वारस यांजपासून स्नेहानें द्रव्य वसूल करावें ॥ २ ॥ वाणी, शेतकीकाम करणारे, कारागीर माणसें यांजपासून देशचालीप्रमाणें ऋणाचा वसूल करावा. दुष्ट ऋणकोपासून बलात्कारानें ऋण वसूल करावें ॥ ३ ॥ श्रेष्ठ मनुष्य, विश्वासास पात्र, व पवित्र अशा मनुष्यास ऋणवसुलाकरितां तुरुंगांत बसवूं नये. परंतु त्यास जामीन अथवा शपथ घेऊन सोडावें ॥ ४ ॥ तो कर्ज नच देईल तर तुरुंगांतही बसवावें व रक्षण करणारे जे मनुष्य त्यांच्या स्वाधीन करून ठेवावें. बृहस्पति. धनकोनें दामदुप्पट ऋण झालें असतां त्याची वाढ बंद झाल्यामुळें तें कर्ज वसूल करून घ्यावें अथवा चक्रवाढ व्याजानें हिशोब करून खत करून घ्यावें ॥ ५ ॥ नारदाचें वचन. ऋणको जर कालविपर्यासानें कर्ज देण्यास समर्थ नसेल तर त्याच्या शक्तीस अनुलक्षून त्या त्या काळीं कर्ज वसूल करून घ्यावें. ह्मणजे हप्तेबंदीनें कर्ज फेडून घ्यावें ॥ ६ ॥ मनु. ऋणको धनकोच्या समान जातींतला असल्यास धनकोच्या घरीं अंगमेहनत करून कर्ज फेडावें. उच्च जातीचा असल्यास थोडें थोडें हप्तेबंदीनें कर्ज द्यावें ॥ ७ ॥ कात्यायन. न्यायभाषण करणारा असा जर ऋणको असेल आणि धनको त्यास जर पीडा देईल तर धनकोचें कर्ज बुडतें. जितकें ऋण असेल तितकाच धनकोस दंड करावा. बृहस्पति. घेण्याचें कर्ज संशययुक्त असून तें राजास न सांगतां जर धनिक बलात्कारानें ऋणको-

पासून वसूल करूं लागेल तर त्यास राजानें दंड करावा व त्याचें ऋण बुडवून टाकावें ॥ ९ ॥ यम. ऋणको सधन असूनही दुष्टपणामुळें जर कर्ज न देईल तर राजानें त्याजकडून धनकोचें कर्ज देववावें आणि त्यास जितकें कर्ज असेल त्याच्या दुप्पट दंड करावा ॥ १० ॥

अनेकोत्तमर्णानां युगपदुपस्थितौ क्रममाह याज्ञवल्क्यः– गृहीतानुक्रमाद्दाप्यो धनिना ह्यधमर्णिकः ॥ दत्त्वा तु ब्राह्मणायैव नृपतेस्तदनंतरम् ॥ ११ ॥ विवादरत्नाकरे कात्यायनः ॥ नानाऋणसन्निपातेऽपि यदि द्रव्यं निस्तारहेतुरेकस्यैव ऋणेन साधितं तदा तस्यैकस्य तेन द्रव्येण ऋणनिस्तारः कर्तव्यो ऋणिकेन नान्यस्येत्यर्थः ॥ एकाहे लिखितं पत्रं तत्र कुर्याद्दणं समम् ॥ ग्रहणं रक्षणं लाभमन्यथा तु यथाक्रमम् ॥ १२ ॥ यस्य द्रव्येण यत्पण्यं साधितं यो विभावयेत् ॥ तद्द्रव्यमृणिकेनैव दातव्यं तस्य नान्यथा ॥ १३ ॥ धनी योऽपगतं दद्यास्स्वहस्तपरिनिह्नवात् ॥ १४ ॥ याज्ञवल्क्यः— लेख्यस्य पृष्ठे विलिखेद्दत्वा यदृणिकोधनम् ॥ नारदः–लेख्यं दद्यादृशुद्धेर्णे तदभावे प्रतिश्रवः ॥ धनिकर्णिकयोरेवं विशुद्धः स्यात्परस्परम् ॥ प्रतिश्रवः—प्रतिदानश्रवणाय शुद्धिपत्रं ॥ १५ ॥ ऋणादानेधमर्णस्यानिष्टं फलमाह कात्यायनः— उद्धारादिकमादाय स्वामिने न ददाति यः ॥ सतस्य दासो भृत्यस्त्री पशुर्वा जायते गृहे ॥ १६ ॥ उद्धारो ऋणम्॥ तद्द्रव्यं वर्द्धते तावद्यावत्कोटिशतं भवेत् ॥ ततः कोटिशते पूर्णे वेष्टितस्तेन कर्मणा ॥ अश्वः खरो वृषो दासो भवेज्जन्मनिजन्मनि ॥ १७ ॥ व्यासोपि तपस्वीचाग्निहोत्री च ऋणवान् म्रियते यदि ॥ तपश्चैवाग्निहोत्रं च सर्वं तद्धनिनो भवेत् ॥ १८ ॥ बृहस्पतिः— ऋणं चात्मीयवत्पैत्र्यंपुत्रैर्देयं विभावितम् ॥ पैतामहं समं देयं न देयं तत्सुतस्य च ॥ १९॥ याज्ञवल्क्यः— पितरि प्रोषिते प्रेते व्यसनाभिप्लुतेऽपि वा ॥ पुत्रपौत्रैर्ऋणं देयं निह्नवे साक्षिभावितम् ॥ २० ॥

पुष्कळ सावकार असून ते जर एकदम कर्ज मागूं लागतील तर कर्ज देण्याचा क्रम याज्ञवल्क्य सांगतात. प्रथम ब्राह्मणाचें कर्ज द्यावें, नंतर क्षत्रियाचें, त्यानंतर ज्या क्रमानें कर्ज घेतलें असेल त्या क्रमानें कर्ज द्यावें ॥ ११ ॥ विवादरत्नाकरांतील कात्यायनाचें वचन. एकाच दिवशीं दोन रोखे अथवा बहुत रोखे लिहिले असतील तेथें ऋणकोपासून जें द्रव्य येईल तें सर्व धनकोनीं सारखे प्रमाणांनीं वांटून घ्यावें अथवा जें व्याज येईल तें सारखे प्रमाणांनीं घ्यावें, किंवा जें सर्वांचें कर्ज राहील तें सारख्या रीतीनें ठेवावें ॥ १२ ॥ पुष्कळ धनको जरी एकदम येतील तरी ज्याच्या द्रव्यानें जी एखादी

वस्तु विकत घेतली असेल, त्या वस्तूच्या विक्रयानें त्याचेंच कर्ज द्यावें दुसऱ्याचें देऊं नये. तसें नसेल तर सर्वांचें सारख्या रीतीनें द्यावें ॥ १३ ॥ याज्ञवल्क्य. ऋणकोनें जो कर्जाचा वसूल दिला असेल तो त्याच्या कर्जरोख्याच्या पाठीमागें धनकोनें मांडून ठेवावा नारद. सर्व कर्ज फिटल्यानंतर धनकोनें भरपाईपत्रक द्यावें अथवा प्रतिश्रव ह्मणजे " यानें सर्व कर्ज दिलें " अशाबद्दल सर्वांस कळवावें. असें जर न झालें तर ऋणको धनको यांची देवघेव राहिली नाहीं असें समजलें जाईल ॥ १४ ॥ १५ ॥ 'प्रतिश्रव' ह्मणजे कर्ज पोहोंचल्याची पावती. ऋण न दिलें असतां ऋणकोस फार अनिष्टफल प्राप्त होतें. त्यास कात्यायनाचें वचन. कर्ज घेऊन जर सावकारास परत न देईल तर तो त्या सावकाराचे घरीं चाकर, बायको, पशु यांचे जन्मास येईल ॥ १६ ॥ उद्धार ह्मणजे ऋण हें मागितलें असतां न देऊन तसेंच राहिलें तर शतावधि - कोटिपर्यंत देखील वाढेल. नंतर तो ऋणको त्या ऋणरूप कर्मानें वेष्टित होऊन त्या धनकोच्या घरीं घोडा, गाढव, चाकर यांचे जन्मास येऊन त्याचें तें कर्ज फेडावें लागेल ॥ १७ ॥ व्यासाचें वचन. तपश्चर्या करणारा, अग्निहोत्री, यानें कर्ज घेऊन तसाच मरण पावेल तर तपश्चर्या व अग्निहोत्राचें पुण्य धनकोस मिळेल ॥ १८ ॥ बृहस्पति. पुत्रानें पित्याचें ऋण आपल्या ऋणाप्रमाणेंच द्यावें. नातवानें आजाचें ह्मणजे बापाच्या बापाचें कर्ज मुद्दल द्यावें, पण नातवानें बापाच्या आजाचें कर्ज देऊं नये ॥ १९ ॥ याज्ञवल्क्य. पिता देशांतरीं गेला असतां अथवा मृत झाला असतां, अथवा व्यसन किंवा रोगानें ग्रस्त झाला असतां मुलगा, नातु इत्यादिकांनीं ऋण द्यावें. ऋणाबद्दल कपट दिसल्यास साक्षिपुराव्यानें सिद्ध झाल्यानंतर द्यावें ॥ २० ॥

विंशतिवर्षवयसा पुत्रादिना ऋणं देयमित्याह नारदः— नार्वाक् संवत्सराद्विंशात्पितरि प्रोषिते सुतः ॥ ऋणं दद्यात्पितृव्ये च ज्येष्ठे भ्रातर्यथापि वा ॥ २१ कात्यायनः— विद्यमानेऽपि रोगार्ते स्वगृहात्प्रोषिते तथा ॥ विंशात्संवत्सराद्देयमृणं पितृकृतं तथा ॥ २२ ॥ प्रोषितपदं मृतस्याप्युपलक्षकं ॥ कात्यायनः— पित्र्यर्णे विद्यमाने तु न च पुत्रो धनं हरेत् ॥ देयं तद्धनिके द्रव्यमृते पुत्रस्तु दाप्यते ॥२३॥ द्रव्यमृते इतिसंबंधः ॥ द्रव्यं विनेत्यर्थः ॥ बृहस्पतिः— पित्र्यमेवाग्रतो देयं पश्चादात्मीयमेव च ॥ तयोः पैतामहं पूर्वं देयमेवमृणं सदा ॥ २४ ॥ याज्ञवल्क्यः— सुराकामद्यूतकृतं दंडशुल्कावशिष्टकम्॥ वृथादानं तथैवेह पुत्रो दद्यान्न पैतृकम्॥२५॥ बृहस्पतिः— सौराक्षिकं वृथादानं कामक्रोधप्रतिश्रुतम् ॥ प्रातिभाव्यं दंडशुल्कशेषं पुत्रं न दापयेत् ॥ २६ ॥ उशनाः— दंडं वा दंडशेषं च शुल्कं तच्छेषमेव च ॥

न दातव्यं तु पुत्रेण यच्च न व्यावहारिकम् ॥ २७ ॥ याज्ञवल्क्यः—न योषित्पति-पुत्राभ्यां न पुत्रेण कृतं पिता ॥ दद्यादृते कुटुंबार्थान्न पतिः स्त्रीकृतं तथा ॥ २८ ॥ कात्यायनः—देयं प्रतिश्रुतं यत्स्याद्यच्च स्यादनुमोदितम् ॥ नारदः—कृतं वा यदृणं कृच्छ्रे दद्यात्पुत्रस्य तत्पिता ॥ २९ ॥ याज्ञवल्क्यः—गोपशौंडिकशैलूषरजकव्याधयोषिताम् ॥ ऋणं दद्यात्पतिस्तासां यस्माद्वृत्तिस्तदाश्रया ॥ ३० ॥ सएव प्रतिपन्नं स्त्रिया देयं पत्या वा सह यत्कृतम् ॥ स्वयंकृतं वा यदृणं नान्यत्स्त्री दातुमर्हति ॥ ३१ ॥ अप्रतिन्नमपि रिक्थग्राहिणी स्त्री दद्यात् ॥ पितृव्येणाविभक्तेन भ्रात्रा वा यदृणं कृतम् ॥ मात्रा वा यत्कुटुंबार्थे दद्युः सर्वेपिरिक्थिनः ॥ ३२ ॥

पुत्रादिक वीस वर्षांच्या वयाचे असतील तरच त्यांनीं द्यावें. याविषयीं नारदाचें वचन—वीसवर्षांच्या आंतील वयाचे जे पुत्रादिक त्यांनीं पिता, चुलता, वडील भाऊ हे देशांतरीं गेले असतील तर कर्ज देऊं नये ॥ २१ ॥ कात्यायन. पिता विद्यमान असूनही रोगग्रस्त झाला असतां, अगर आपल्या घरापासून देशांतरीं जाऊन राहिला असेल तर; अगर मृत झाला असतां पित्याचें कर्ज वीस वर्षांचे त्यानंतर पुत्रानें द्यावें ॥ २२ ॥ कात्यायन. पित्याचें ऋण जर असेल तर पुत्रांनीं पित्याच्या द्रव्याची प्रथम वांटणी करूं नये. जें द्रव्य असेल तें सावकारास द्यावें. नंतर जें राहील तें विभाग करून घ्यावें ॥ २३ ॥ कारण द्रव्य नसेल तरीही पित्याचें कर्ज पुत्रानें दिलेंच पाहिजे. बृहस्पति. पित्याचें ऋण प्रथम द्यावें. नंतर आपण केलेलें कर्ज फेडावें. पिता आणि पुत्र या उभयतांनीं आजाचें कर्ज प्रथम फेडावें. नंतर पित्याचें आणि त्यानंतर आपलें ॥ २४ ॥ याज्ञवल्क्य. दारु पिण्याच्या संबंधानें, परस्त्रियांच्या संबंधानें, जुवा खेळण्यानें, एखादा राजदंड झाल्यामुळें तसेंच जकातीबद्दल राहिलेलें देणें, अगर व्यर्थ कोणास देऊं केलेलें, असें पित्याचें कर्ज पुत्रानें देऊं नये ॥ २५ ॥ बृहस्पति. दारू, जुवाखेळणें, व्यर्थ कबूल केलेलें देणें, काम अथवा क्रोध यांचे स्वाधीन होऊन कबूल केलेलें देणें, जामीनकीचें देणें, दंड अथवा जकात यांच्या संबंधानें राहिलेलें देणें हें मुलांकडून देववावयास लावूं नये ॥ २६ ॥ उशना. वर लिहिल्या प्रकारचें कर्ज व व्यवहारास सोडून असें केलेलें कर्ज मुलानें देऊं नये ॥ २७ ॥ याज्ञवल्क्य. पतीनें अथवा पुत्रानें केलेलें कर्ज स्त्रीनें देऊं नये. पुत्रानें केलेलें कर्ज बापानें देऊं नये. परंतु कुटुंबपोषणाकरितां जर पुत्रानें कर्ज केलें असेल तर पित्यानें दिलेंच पाहिजे ॥ २८ ॥ तसेंच कुटुंबपोषणावांचून अन्य कामास स्त्रियेनें केलेलें कर्ज पतीनें देऊं नये. कात्यायन. पित्यानें देण्यास कबूल केलेलें व ज्या कर्जास अनुमोदन दिलें आहे तें पुत्रानें कर्ज दिलेंच पाहिजे. नारद. एखादे संकटा-

मुळें पुत्रानें केलेलें कर्ज पित्यानें दिलें पाहिजे.॥२९॥याज्ञवल्क्य. गौळी, कलाल, नाचणारे लोक, परीट, पारधी यांच्या बायकांनीं केलेलें कर्ज त्यांच्या पतीनें द्यावें, कारण त्यांच्या उपजीविकेस स्त्रियाही कारण असतात ॥ ३० ॥ स्त्रीनें देण्यास कबूल केलेलें कर्ज, पति व पुत्र या उभयतांनीं काढलेलें कर्ज, किंवा स्त्रीनें आपणच काढलेलें कर्ज, हीं कर्जें द्यावींत. दुसरीं देऊं नयेत ॥ ३१ ॥ परंतु जर स्त्रियेनें द्रव्य घेतलें असेल, तर न कबूल केलेलें कर्ज देखील दिलें पाहिजे. एकत्र असतां चुलता, बंधु, मातोश्री यांनीं कुटुंबपोषणाकरितां जें कर्ज केलें असेल तें सर्वांनीं दिलेंच पाहिजे ॥ ३२ ॥

याप्रमाणें ऋणादान निर्णय जाणावा.

---

# ॥ अथ उपनिधिनिक्षेपनिर्णयः ॥

तत्र नारदः—असंख्यातमविज्ञातमामुद्रं यन्निधीयते ॥ तं जानीयादुपनिधिं निक्षेपं गणिकं विदुः ॥ १ ॥, याज्ञवल्क्यः–वासनस्थमनाख्याय हस्तेऽन्यस्य यदर्प्यते ॥ द्रव्यं तदौपनिधिकं प्रतिदेयं तथैव तत् ॥ २ ॥ बृहस्पतिः—ददतोयद्धवेत्पुण्यं हेमकुप्यांबरादिकम् ॥ तस्मात्पालयतो न्यासं तथैव शरणागतम् ॥ ३ ॥ मनुः–कुलजे वृत्तसंपन्ने धर्मज्ञे सत्यवादिनि ॥ महापक्षे धनिन्यार्ये निक्षेपं निक्षिपेद्बुधः॥४॥ यो यथानिक्षिपेद्धस्ते यमर्थं यस्य मानवः॥ स तथैवग्रहीतव्यो यथादायस्तथा ग्रहः ॥ ५ ॥ यो निक्षेपं नार्पयति पश्चान्निक्षिप्य याचते ॥ तावुभौ चोरवच्छास्यौ दाप्यौ वा तत्समंदममिति ॥ ६ ॥ बृहस्पतिः ॥ भेदेनोपेक्षया न्यासं गृहीत्वा यदि नाशयेत् ॥ याच्यमानो न दद्याद्वा दाप्य स्तत्सोदयं भवेत्॥ भेदः स्वद्रव्यतारतम्यं ॥ तेन स्वद्रव्येण सहोपेक्षया नाशे न दोषः ॥ ७ ॥ याज्ञवल्क्यः—आजीवन्स्वेच्छया दद्याद्दाप्यस्तत्रापि सोदयम् ॥ आजीवन् भोगवृद्ध्यर्थं प्रयोगादिनोपजीवन् ॥ उदयो वृद्धिः ॥ तस्य विशेषमाह कात्यायनः–निक्षेपं वृद्धिशेषंच क्रयं विक्रयमेवच ॥ याच्यमानं न चेद्दद्याद्वर्द्धते पंचकं शतमिति ॥ ८ ॥ मनुः–निक्षेपस्यापहर्त्तारं तत्समं दापयेद्दमम् ॥ तथोपनिधिहर्त्तारं विशेषेणैव पार्थिवः ॥ ९ ॥ बृहस्पतिः–देवराजोपघातेन यदि तन्नाशमाप्नुयात् ॥ गृहीतद्रव्यसहितं तत्र दोषो न विद्यते ॥ १० ॥ याज्ञवल्क्यः–न दाप्योऽपहृतं यत्तु राजदैविकतस्करैः ॥ मनुः–स्वयमेव तु यो दद्यान्मृतस्य प्रत्यनंतरे ॥ न स राज्ञाभियोक्तव्यो न निक्षेप्तुश्च बंधुभिः ॥ ११ ॥

## ठेवीचा विचार.

**नारदाचें वचन**—ठेवीचे दोन भेद आहेत. एक उपनिधि आणि निक्षेप. न मोजितां व अमुक द्रव्य आहे असें न सांगतां एखाद्या डब्यांत घालून शिक्का करून जें दुसऱ्या जवळ देतात त्यास उपनिधि असें ह्मणावें. व गणना करून तशाच रीतीनें जें दुसऱ्या-जवळ ठेवितात त्यास निक्षेप असें ह्मणतात ॥ १ ॥ याज्ञवल्क्याचें वचन—एखादे डब्यांत वगैरे ठेवून तें काय आहे हें न सांगतां दुसऱ्या मनुष्याजवळ जें ठेवितात त्यास उपनिधि अशी संज्ञा आहे. हा जसा ठेवण्यास दिला असेल तसाचेतसाच मालकास परत द्यावा ॥ २ ॥ बृहस्पति. सोनें, रुपें, अन्यधातु, वस्त्रादिक याचें दान केलें असतां जें पुण्य तसेंच शरणांगताचें रक्षण केल्यापासून जें पुण्य तेंच पुण्य ठेव संभाळणारास सांगितलें आहे ॥ ३ ॥ मनु. कुलीन, सदाचारसंपन्न, धर्म जाणणारा, सत्यभाषण करणारा, ज्यास पुष्कळ पुत्रपौत्रादिक आहेत आणि श्रीमंत श्रेष्ठ अशा मनुष्याजवळ ठेव ठेवण्यास द्यावी ॥ ४ ॥ जो मनुष्य ज्या मनुष्या जवळ ज्या प्रकारानें ठेव ठेवण्यास देईल, त्यानें त्याप्रमाणेंच ठेवणारास परत द्यावी. ह्मणजे कोणी अन्यमनुष्यासमक्ष किंवा खूण वगैरे करून जें दिलें असेल तर ज्या साक्षीदारासमक्ष दिलें असेल त्याचे समक्ष तशीच त्याची ठेव त्यास द्यावी ॥ ५ ॥ जो मनुष्य दिलेली ठेव मागितली असतां परत देत नाहीं व जो मनुष्य न ठेविलेली वस्तु मागतो या दोघांसही राजानें चोराची शिक्षा द्यावी. अथवा ठेवीच्या रकमे इतका त्यास दंड करावा ॥ ६ ॥ बृहस्पति. एखादे मनुष्यापाशीं ठेव ठेविली असून त्यानें तिचें रक्षण योग्य-रीतीनें न केल्यानें अथवा भेदभावानें करून तिचा जर नाश केला तर किंवा मागितलें असतां न दिल्यास व्याजासहित ठेव त्याजकडून परत देववावी. (भेद ह्मणजे स्वतःचें द्रव्य व दुसऱ्याचें द्रव्य याच्यामध्यें संभाळण्यासंबंधानें कमजास्तपणा करणें.) इतर द्रव्या-बरोबर ठेवीच्या रकमेचा नाश झाल्यास त्यास दोष नाहीं ॥७ ॥ याज्ञवल्क्य. ठेवीच्या जिनसावर आपल्या इच्छेनें उपजीविका करूं लागला तर त्यास दंड करून व्याजासहित ती ठेव त्याजकडून देववावी. आजीवन् ह्मणजे ठेवीचा उपभोग करणें अथवा ती व्याजी देऊन उपजीविका करणें येथें उदयशब्दाचा अर्थ व्याज. कात्यायन. ठेव, व्याजाची राहिलेली बाकी, विकत घेतलेल्या जिनसांची किंमत, अथवा विक्री केलेला जिन्नस हे मागितले असतां न दिल्यास शेंकडा पांच रुपये प्रमाणें त्याजवर व्याज सुरू होतें ॥ ८ ॥ मनु. ठेवीचें हरण करणारास जितकी ठेव असेल तितका राजानें दंड करावा व उपनिधीचें हरण केल्यास त्यास राजानें ज्यास्त शिक्षा द्यावी ॥९॥ बृहस्पति. देव अथवा राजा

यांच्या उपद्रवानें ज्यापाशीं ठेव ठेविली आहे त्याच्या द्रव्यासहित जर नाश होईल तर ठेवणाराचा कांहीं दोष नाहीं ॥ १० ॥ याज्ञवल्क्य. राजाच्या उपद्रवानें अथवा देवतेच्या ह्मणजे अग्नि इत्यादिकांच्या उपद्रवानें किंवा चोरानें जर ठेव नाहींशी केली तर ती भरून देवविली जाणार नाहीं. एकाद्या मनुष्याजवळ ठेव ठेवून तो मनुष्य मृत झाला असतां त्याचे पश्चात् त्याच्या जवळच्या संबंधी मनुष्यास आपणच ठेवीचें द्रव्य परत देईल तर त्या मनुष्यास अगर ठेव ठेवणाराच्या बंधुजनांनीं अथवा राजानें ठेव कमी ज्यास्त आहे अशा बद्दल प्रमाणाशिवाय त्रास देऊं नये.

प्रत्यनंतरः सन्निहितः प्रमाणं विनाधिकविषये नाभियोज्यइत्यर्थः ॥ सर्वमपि निक्षेपन्यायमन्यत्राप्यतिदिशति बृहस्पतिः-अन्वाहिते याचितके शिल्पिन्यासे सबंधके ॥ एषएवोदितो धर्मस्तथाच शरणागते ॥ १२ ॥ अन्वाहितं अमुकेन मयि स्थापितं त्वया तस्मै देयमिति पुरुषांतरहस्तेऽर्पितम् ॥ याचितमुद्वाहादौ शोभायर्थं नीतमलंकारादि ॥ शिल्पिन्यासो हेमकारादिषु कुंडलाद्यर्थं निक्षिप्तं॥नारदोऽपि-एषएव विधिर्दृष्टो याचितान्वाहितादिषु ॥ शिल्पिषूपनिधौ न्यासे प्रतिन्यासे तथैव च ॥ १३ ॥ प्रतिन्यासः स्वामिना यत्र निक्षिप्तं तेनाप्यन्यत्र निक्षिप्तं राजदेवादिनष्टस्यापि शिल्पिन्यासस्य क्वचित्प्रतिदानमाह कात्यायनः-यश्च संस्क्रियते न्यासो दिवसैः परिनिर्वितैः॥ तदूर्ध्वं स्थापयेच्छिल्पी दाप्योदेवागतेऽपितम् ॥ १४ ॥ नारदः-मूल्याष्टभागो हीयेत सकृद्धौतस्य वाससः ॥ द्विपादस्तु तृतीयांशश्चतुर्धौतेऽर्द्धमेव च ॥ १५ ॥ अर्द्धक्षयात्तु परतः पादांशापचयः क्रमात् ॥ याज्ञवल्क्यः--वसानस्त्रीन्पणान्दंड्यो रजकस्तु परांशुकम् ॥ विक्रयाऽवक्रयाधानयाचितेषु पणान्दश ॥१६॥ अवक्रयो भाटकं गृहीत्वाऽन्यत्रार्पणं ॥ आधानमाधीकरणं ॥ सुवर्णादेरग्नौ ध्मायमाने ॥ ऱ्हासनियम माह ॥ सएव- अग्नौ सुवर्णमक्षीणं रजते द्विपलं शते ॥ अष्टौ त्रपुणि सीसे च ताम्रे पंचदशायसि ॥ १७ ॥ इतोऽधिके रूप्यादेः क्षये हेमकारादेर्दंडः ॥ क्वचिद्वस्त्रार्थं तंतुसमर्पणे वृद्धौ विशेषमाह सएव ॥ शते दशपला वृद्धिरौर्णकार्पाससौत्रिके ॥ मध्ये पंचपला वृद्धिः सूक्ष्मे द्वित्रिपला मता ॥ १८ ॥ क्वचित्क्षयमाह सएव-कार्मिके रोमबंधे च त्रिंशद्भागः क्षयो मतः- न क्षयो न च वृद्धिश्च कौशेये वल्कलेषु चेति॥१९॥ कार्मिके सिद्धपट्टादौ पट्टसूत्रादिना स्वस्तिकाद्याकारनिर्माणेऽवधिके शिल्पिन्यदत्तेऽवधिमध्ये याचितेऽदत्ते नष्टेऽपि च शिल्पिनोदोषाभावमाह सएव- यदि तत्कार्यमुद्दिश्य कालं परिनियम्य वा ॥ याचितोऽर्दत्ते तस्मिन्नप्राप्ते न तु दाप्यते ॥ २० ॥ अवक्रयो भाटकं गृहीत्वाऽन्यत्रार्पणम् ॥ एतद्विपर्ययमाह सएव- प्राप्तकाले दते कार्ये

न दद्याद्याचितोऽपि सन् ॥ तस्मिन्नष्टे हृते वापि गृहीतामूल्यमावहेत् ॥२१॥ सएव–यो याचितकमादाय न दद्यात्प्रतियाचितः ॥ स निगृह्य बलाद्दाप्यो दंड्यश्च न ददाति यः ॥ २२ ॥

## ॥ इति उपनिधिनिक्षेपनिर्णयः ॥

हा जो ठेवीविषयीं नियम सांगितला तो अन्य व्यवहारासही लागू आहे असें बृहस्पति सांगतात. अन्वाहित, याचितक, शिल्पिन्यास, सबंधक, शरणागत, यांचे ठिकाणीं ठेवीविषयीं जो नियम सांगितला तोच नियम सर्व जाणावा ॥१२॥ अन्वाहित ह्मणजे अमुक मनुष्यानें मजपाशीं ठेविलेली ही वस्तु तूं त्याला देः असें सांगून जी दुसऱ्याजवळ वस्तु दिली जाते ती. याचितक, लग्नकार्याचे ठायीं शोभे करितां मागून आणिलेले दागिने, वस्त्रें इत्यादिक. शिल्पिन्यास, कडें, कुंडलें इत्यादिक करण्याकरितां सोनारादिकांजवळ दिलेलें सोनें, रुपें, वस्त्रें वगैरे. सबंधक ह्मणजे तारण. शरणागत ह्मणजे रक्षण करा ह्मणून एखाद्यापाशीं येऊन राहिलेला मनुष्य. नारद. ठेवीचा सर्व सांगितलेला प्रकार याचित, अन्वाहितादिक, कारागिराजवळ ठेविलेली वस्तु, उपनिधि ( खूण करून ठेविलेली ठेव ) न्यास ह्मणजे ठेव, प्रतिन्यास ह्मणजे एका मनुष्यानें संरक्षणाकरितां एकादे ठेवीची वस्तु एकादे मनुष्याजवळ ठेवून ती वस्तु त्यानेंही दुसरे मनुष्याजवळ ठेविली तर त्यास प्रतिन्यास अशी संज्ञा आहे. या सर्वांस ठेवीचाच नियम लागू आहे ॥ १३ ॥ प्रतिन्यासाचा देव, राजा इत्यादिकांच्या उपद्रवानें नाश झाला असतां, तसेंच कारागीर मनुष्याजवळ ठेविलेली ठेव कित्येक प्रसंगीं परत देवविली पाहिजे. कात्यायन. एकाद्या शिल्पी ह्मणजे सोनार वगैरे काम करणाऱ्या कामगार मनुष्यानें कांहीं नियमित दिवसांनीं जिन्नस तयार करून देईन असें सांगून सोनें वगैरे जिन्नस तयारकरण्याकरितां घेतलें असून तितक्या मुदतीमध्यें तें तयार करून न दिल्यामुळें ती वस्तु तशीच राहिली असतां, नंतर देवादिकांच्या उपद्रवानें जर त्या वस्तूचा नाश होईल तर त्या शिल्पी ह्मणजे सोनार वगैरे कारागिरानें ती वस्तु भरून दिली पाहिजे ॥ १४ ॥ नारद. वस्त्र एक वेळां धुतलें गेलें असतां त्याची आठवा हिस्सा किंमत कमी होते. दोन वेळां धुवलें असतां चवथा हिस्सा, तीन वेळां धुतल्यास तिसरा हिस्सा, चारवेळां धुतल्यास निम्मे. निम्मेकिंमतीपुढें प्रत्येक वेळां धुण्यानें चौथा हिस्सा याप्रमाणें किंमत कमी होते ॥ १५ ॥ याज्ञवल्क्य. परिटास धुण्याकरितां दिलेलें वस्त्र त्यानें तें वस्त्र नेसलें असतां अथवा वापरलें असतां त्यास तीन पण दंड करावा. विकलें असतां, अवक्रय ह्मणजे भाड्यानें दिलें असतां, आधान ह्मणजे गहाण ठेविलें असतां, याचित ह्मणजे दुसऱ्यास शोभेकरितां धारण करण्यास दिलें

असतां, दहापण दंड करावा ॥ १६ ॥ सोनें अग्नीमध्यें टाकिलें असतां कमी होण्याबद्दलचा विचार. याज्ञवल्क्य. सोनें अग्नीमध्यें टाकिलें असतां कमी होत नाहीं. रुपें शेंकडा दोन तोळे कमी होतें, कथील, शिसें शेंकडा आठ तोळे, तांबें पांच तोळे, लोखंड शेंकडा दहा तोळे कमी होतें. यापेक्षां जास्त जर कमी होईल तर सोनार वगैरे कारागिरांनीं लबाडी केली असें समजून त्यांस दंड करावा ॥ १७ ॥ वस्त्रादिक तयार करण्याकरितां सूत वगैरे कारागिरास दिलें असतां त्याची वाढ किती होते हें तोच स्मृतिकार सांगतो. लोंकर, कापूस, सूत यांच्या वस्त्रांमध्यें शेंकडा दहा पले वाढ येते. मध्यम जातीचे वस्त्रास शेंकडा पांच पले. अत्यंत सूक्ष्म वस्त्राचे ठिकाणीं दोन अथवा तीन पले वाढ येते ॥ १८ ॥ कलाबतूचे कापडास व लोंकरीचे कापडामध्यें तिसावे हिश्शाची तूट होते. रेशमाचे कापडांत किंवा वल्कलांत वाढ अथवा न्यूनता होत नाहीं ॥ १९ ॥ कार्मिक ह्मणजे कापडावर दुसऱ्या सुतानें स्वस्तिकादिक जे काढले असतात, ते कांहीं वस्तु करण्यासाठीं शिल्पी मनुष्याजवळ दिलेली ठेव नेमलेल्या मुदतीचे आंत मागितली असतां परत न दिल्यास अथवा ठेवीचा नाश झाल्यास कामगाराकडे मुदत संपेपर्यंत दोष नाहीं यास वचन. कांहींएक विशेष कार्यासाठीं किंवा नेमल्या मुदती पावेतों घेतलेलें कर्ज, योग्य काळाचे आंत मागितलें असतां न परत दिल्यास तसेंच ठेव योग्य काळापूर्वीं न दिल्यास ज्यापाशीं ठेव दिली असेल, ती मुदत संपेपर्यंत न दिल्यानें तो अपराधी होत नाहीं ॥ २० ॥ जी वस्तु भाडें घेऊन एकायास दिली असतां किंवा मुदत संपल्यानंतर जर न देईल तर तोच स्मृतिकार सांगतो. एकादे कामाकरितां एकादी वस्तु मागून आणून तें कार्य झाल्यानंतर वस्तु मागितली असतां न देईल अथवा हरपेल अथवा कोणी चोरून नेईल तर ज्यानें घेतली असेल त्याजकडून किंमत देववावी ॥ २१ ॥ एकादी वस्तु मागून आणून जर मागितली असतां परत न देईल तर बलात्कार करून त्याची त्यास वस्तु देववावी व त्या मनुष्यास दंड करावा ॥ २२ ॥ याप्रमाणें ठेवीचा निर्णय जाणावा.

## ॥ अथास्वामिविक्रयनिर्णयः ॥

तत्र बृहस्पतिः–निक्षेपानंतरं प्रोक्तो मृगुणाऽस्वामिविक्रयः ॥ श्रूयतां तत्प्रयत्नेन सविशेषं ब्रवीम्यहम् ॥ १ ॥ तत्रादौ अस्वामिविक्रयस्वरूपमाह नारदः– निक्षिप्तं वा परद्रव्यं नष्टं लब्ध्वाऽपहृत्य वा ॥ विक्रीयतेऽसमक्षं यत्स ज्ञेयोऽस्वामिविक्रयः ॥ २ ॥ तथा व्यासः–याचितान्वाहितं न्यासं हृत्वा वाऽन्यस्य यद्धनम् ॥ विक्रीयते स्वाम्यभावे स ज्ञेयोऽस्वामिविक्रयः ॥३॥ स्वाम्यभावे स्वाम्यसमक्ष इत्यर्थः ॥ तथा

अस्वामिना कृतोयस्तु दायो विक्रयएव वा ॥ अकृतः स तु विज्ञेयो व्यवहारे यथा-
स्थितिः ॥ ४ ॥ कात्यायनः–अस्वामिविक्रयं दानमाधिं च विनिवर्तयेत् ॥ ५ ॥
मनुः–विक्रीणिते परस्य स्वं योऽस्वामी स्वाम्यसंमतः ॥ न तं नयेत साक्ष्यं तु स्ते-
नमस्तेनमानिनम् ॥ ६ ॥ अवहार्यो भवेच्चैव सान्वयः षट्शतं दमम् ॥ निरन्वयोऽ-
नपसरः प्राप्तः स्याच्चौरकिल्बिषम्॥७॥ विक्रयाद्यो धनं किंचिद्गृह्णीयात्कुलसन्निधौ ॥
क्रयेण स विशुद्धस्तु न्यायतो लभते धनम् ॥ ८ ॥ नारदः–प्रकाशतः क्रयः शुद्धः
क्रेतुः स्तेयं रहः क्रयात् ॥ अस्वाम्यनुमताद्दासादसतश्च जनाद्रहः ॥ हीनमूल्यमवे-
लायां क्रीणंस्तद्दोषभाग्भवेत् ॥ ९ ॥ तद्दोषश्चौरदोषः ॥ व्यासः–वादीचेन्मार्गितं
द्रव्यं साक्षिभिर्न विभावयेत् ॥ दाप्यः स्यात् द्विगुणं दंडं क्रेता तद्द्रव्यमर्हति ॥१०॥
क्रेतुः कृत्यमाह सएव–मूले समाहृते क्रेतानाभियोज्यः कथंचन ॥ मूलेन सह वादस्तु
नाष्टिकस्य विधीयते ॥ ११ ॥ बृहस्पतिः–विक्रेता दर्शितोयत्र हीयते व्यवहारतः ॥
क्रेत्रे राज्ञे मूलदंडौ प्रदद्यात्स्वामिनो धनम् ॥ १२ ॥ कात्यायनः–मूलानयनकालश्च
तस्मै देयोमार्गसंख्यया ॥ असमाहार्यमूलस्तु क्रयमेव विशोधयेत् ॥ १३ ॥ विशो-
धिते क्रये राज्ञा वक्तव्यः स न किंचन ॥ क्रयः क्रयसाधितोपि द्रव्यं नाष्टिकएव
लभते ॥ १४ ॥ तथा च मनुः–अथ मूलमनाहार्यं प्रकाशक्रयशोधितम् ॥ अदंड्यो
मुच्यते राजा नाष्टिको लभते धनम् ॥ १५ ॥ अनाहार्यं प्रदर्श्य प्रकाशेन क्रयेण
शोधितं द्रव्यमित्यर्थः ॥ कात्यायनः–अनुपस्थापयन्मूलं क्रयं वाप्यविशोधयन् ॥
यथाभियोगं धनिने धनं दाप्योदमं च सः ॥ १६ ॥ बृहस्पतिः–वणिग्वीथीपरिगतं
विज्ञातं राजपूरुषैः ॥ अविज्ञाताशयात्क्रीतं विक्रेता यत्र वा मृतः ॥ १७ ॥ स्वामी.
दत्वार्धमूल्यं तु प्रगृह्णीत स्वकं धनम् ॥ अर्धंद्वयोरपि हृतं तत्रस्यात् व्यवहारतः ॥१८॥
मनुः–प्रनष्टस्वामिकद्रव्यं राजा त्र्यब्दं निधापयेत् ॥ आर्वाक् त्र्यब्दाद्धरेत्स्वामीपर-
तो नृपतिर्हरेदिति ॥ १९ ॥ परस्वामिकनष्टलब्धपशूनामेकाहादिरक्षणे भृतिमाह
याज्ञवल्क्यः–पणानेकशफे दद्याच्चतुरः पंचमानुषे ॥ महिष्योष्ट्रगवां द्वौ द्वौ पादौ पा-
दमजाविके ॥ भक्षितुं देयमेव ॥ २० ॥ ॥ इत्यस्वामिविक्रयनिर्णयः ॥

## अस्वामिविक्रय ह्मणजे मालकी नसून विक्री केली असतांचा विचार.

त्याविषयीं बृहस्पतीचें वचन. ठेवीचें प्रकर्ण सांगितल्यानंतर भृगुकृपीनीं अस्वामिवि-
क्रयाचा निर्णय सांगितलेला आहे तो मी मोठ्या प्रयत्नानें त्यांतील विशेषासहित सांगतों

श्रवण करा ॥ १ ॥ अस्वामिविक्रयाचें स्वरूप नारदानीं सांगितलें आहे. मनुष्यांनीं दुसऱ्यानें ठेविलेली वस्तु अथवा हरवलेली वस्तु सांपडून त्याची विक्री करणें, एकादी वस्तु चोरून आणून मालकाच्या परोक्ष जी विकली जाते त्यास अस्वामिविक्रयव्यवहार अशी संज्ञा आहे ॥ २ ॥ व्यासाचें वचन. कांहीं कारणामुळें दुसऱ्यापासून एकादी वस्तु मागून घेतलेली अथवा दुसऱ्याची ठेव ह्मणून ठेविलेली अथवा चोरलेली वस्तु स्वतःची मालकी त्यावर नसून जी विकली जाते त्यास अस्वामिविक्रय असें ह्मणावें. स्वाम्यभावे ह्मणजे मालकी नसतां अथवा मालकाच्या असमक्ष ॥ ३ ॥ मालकीवांचून दुसऱ्यानें केलेला विक्रय, दान हें अकृत ह्मणजे न केलेलें असें समजावें. व्यवहारांत जशी मर्यादा आहे तशी न झाल्यामुळें ती रद्द असें जाणावें ॥ ४ ॥ कात्यायन. विक्री, दान, तारण हीं मालकीवांचून केलीं असतां तीं रद्द होतात ॥ ५ ॥ मालकी नसून मालकाच्या संमतीवांचून जो दुसऱ्याचें द्रव्य विकीत तो विकणारा चोर असा जाणावा. तो कोणत्याही कामांत साक्षी देण्यास योग्य होत नाहीं ॥ ६ ॥ दुसऱ्याची वस्तुविक्री करणारा द्रव्याच्या मालकाचा संबंधी असेल तर त्याला सहाशेंपण दंड करावा. संबंधी नसेल तर त्यास चोराप्रमाणें दंड करण्यास पात्र होतो ॥ ७ ॥ जो मनुष्य बाजारांत पुष्कळ मनुष्यांच्या समक्ष विकावयास आलेली वस्तु पुष्कळ मनुष्यांच्या समक्ष जर विकत घेईल तर तो विकत घेतल्यानें दोषी होत नाहीं आणि त्यानें ज्या मालकापासून वस्तु विकत घेतली असेल तो मालक दाखविल्यानंतर न्यायानें त्यानें दिलेलें द्रव्य त्यास द्यावें ॥ ८ ॥ उघडपणें विकत घेणाऱ्यानें केलेली खरेदी निर्दोष जाणावी. मालकानें ज्यास संमती दिली नाहीं अशा चाकरमनुष्यापासून तसेंच वाईट चालीच्या मनुष्यापासून अथवा एकांतस्थळीं वस्तु विकत घेणारा व भलत्याच वेळीं वस्तु विकत घेणारा मनुष्य चोराप्रमाणें दोषी असा होतो ॥९॥ व्यास. एकाद्या वस्तुविषयीं एकादा मनुष्य ही वस्तु माझी आहे असें जर ह्मणेल तर त्यानें ती वस्तु आपली आहे असें साक्षीपुराव्यानें सिद्ध करावें. तसें न केल्यास वस्तूच्या किमतीच्या दुप्पट त्यास दंड करावा व विकत घेतलेली वस्तु विकून घेणारास परत द्यावी ॥ १० ॥ विकत घेणारानें काय करावें हें व्यास सांगतात. ज्यापासून वस्तु आपण विकत घेतली असेल तो हजर करावा. नंतर विकत घेणारा दोषी होत नाहीं. हरवलेल्या वस्तूचा मालक व ज्यानें मूळ विक्री केली असेल त्याचा व ज्याची वस्तु आहे यानें मूळविक्या करणाराशीं वाद करावा ॥ ११ ॥ बृहस्पति. जेथें विकणारा दाखवून दिल्यानंतर तो व्यवहारांत जर दोषी ठरेल तर त्याजकडून खरेदी घेणारास तें द्रव्य देऊन ज्याची वस्तु असेल त्यास वस्तु त्यास द्यावी व राजानेंही दंड घ्यावा ॥ १२ ॥

कात्यायन. ज्यापासून जिन्नस विकत घेतला असेल तो आणून दाखविण्याकरितां जितका दूर मार्ग असेल त्याच्या विचारानें त्यास मुदत द्यावी. मुदतींत त्या मनुष्यास जर हजर न करील तर विकत घेतलेला जिन्नस साक्षीपुराव्यानें त्यानें सिद्ध करावा ॥ १३ ॥ घेतलेले जिन्नस साक्षीपुराव्यानें त्यानें सिद्ध केल्यानंतर राजानें त्यास दोष देऊं नये. खरेदीदारानें घेतलेली वस्तु जरी साक्षीपुराव्यानें सिद्ध केली तरी गमावलेली वस्तु ज्याची असेल त्यासच ती वस्तु मिळेल ॥ १४ ॥ यास मनूचें वचन. मूळ जिन्नस ज्यापासून खरेदी घेतला त्यास हजर केलें नसूनही, विकत घेतलेला जिन्नस प्रसिद्ध रीतीनें घेतला आहे अशा रीतीनें जर ठरेल तर राजानें विकत घेणारास कांहीं दंड करूं नये. परंतु हरवलेली वस्तु त्याजपासून घेऊन ज्याची असेल त्यास द्यावी ॥ १५ ॥ कात्यायनाचें वचन. खरेदी घेतलेली वस्तु ज्यापासून घेतली त्यास हजर न केल्यास आणि प्रसिद्ध रीतीनें खरेदी झाली आहे हें शाबीत न झाल्यास तंट्याची वस्तु ज्याची त्यास द्यावी व खरेदी घेणारास दंड करावा ॥ १६ ॥ बृहस्पतीचें वचन. व्यापारी मंडळीसमक्ष, राजपुरुषास समजेल अशा रीतीनें घेतलें असून ज्यापासून विकत घेतलें असेल त्याचें राहण्याची जागा माहीत नसेल किंवा विकणारा मृत झाला असेल तर खरेदी करणारास मालकानें निम्मी किंमत देऊन तो आपला जिन्नस परत घ्यावा ॥ १७ ॥ १८ ॥ मनु. एकादा गमावलेला जिन्नस सांपडला असून त्याचा मालक जर न मिळेल तर राजानें तो जिन्नस आपल्या खजिन्यांत तीन वर्षें तसाच ठेवावा. त्याचे आंत मालक आल्यास त्यास द्यावा आणि तीन वर्षांपुढें जिन्नस राहिल्यास आपण घ्यावा ॥ १९ ॥ दुसऱ्याच्या मालकीचीं जनावरें चुकून आलेलीं सांपडलीं असतां व राजानें त्यांचें रक्षण केलें असतां त्यांची किंमत घेण्याविषयीं याज्ञवल्क्याचें वचन. एकाखुराचीं जनावरें यांस चार पैसे घ्यावे. मनुष्यास पांच पैसे. म्हैस, उंट, गाई यांस दोन दोन पैसे व शेळी, मेंढीस एकेक पैसा घ्यावा व या जनावरांस खाण्यास जें लागेल त्याची किंमत त्या मालकापासून वेगळी घ्यावी ॥ २० ॥ याप्रमाणें अस्वामिविक्रय जाणावा.

## ॥ अथ संभूयसमुत्थाननिर्णयः ॥

तत्रादौ तत्स्वरूपमाह नारदः—वणिक्प्रभृतयो यत्र कर्म संभूय कुर्वते ॥ तत्संभूयसमुत्थानं व्यवहारपदं स्मृतम् ॥ १ ॥ संभूय धनमेलनं कृत्वा ॥ तत्राधिकारिणमाह बृहस्पतिः—कुलीनदक्षानलसैः प्राज्ञैर्नाणकवेदिभिः ॥ आयव्ययज्ञैः शुचिभिः शूरैः कार्या सहक्रिया ॥ २ ॥ बृहस्पतिः—समोऽतिरिक्तो हीनो वा यत्रांशो यस्य यादृशः ॥ क्षयव्ययौ तथा वृद्धिस्तस्य तत्र तथाविधा ॥ ३ ॥ याज्ञवल्क्यः—समवायेन

वणिजां लाभार्थं कर्म कुर्वतां ॥ लाभालाभौ यथाद्रव्यं यथा वा संविदाकृतौ ॥४॥ समवायेन मेलनेन कर्म वाणिज्यादि लाभालाभौ लाभापचयौ यथाद्रव्यं द्रव्यानुसारेण ॥ यथावा संविदा समयेन द्रव्यव्यवस्थायां मूलधनानुसारेण वृद्धिक्षयौ व्यवस्थायां तु द्रव्यावस्थानुसारेणैव तावित्यर्थः ॥ बृहस्पतिः–बहूनां संमतोयस्तु दद्यादेको धनं हरः ॥ करणं कारयेद्वापि सर्वैरेव कृतं भवेत् ॥ ५ ॥ करणं लेख्यादि ॥ परीक्षकाः साक्षिणश्च तएवोक्ताः परस्परं ॥ संदिग्धेर्थे वंचनायां न चेद्विद्वेषसंयुताः ॥ ६ ॥ यः कश्चिद्वंचकस्तेषां विज्ञातः क्रयविक्रये ॥ शपथैः सोपि शोध्यः स्यात्सर्ववादेष्वयं विधिः ॥ ७ ॥ शपथैरितिप्रमाणमात्रोपलक्षणं ॥ प्रमाणांतरस्यापि संभवात् ॥ क्षयोहानिर्यदा यत्र देवराजकृताद्भवेत् ॥ सर्वेषामेव सा प्रोक्ता कल्पनीया यथांशतः ॥ ८ ॥ क्षयोमूलहानिः हानिर्लाभहानिः अस्यापवादमाह सएव–अनिर्दिष्टोवार्यमाणः प्रमादाद्यस्तु नाशयेत् ॥ तेनैव तद्भवेद्देयं सर्वेषां समवायिनाम् ॥९॥ याज्ञवल्क्यः–प्रतिषिद्धमनादिष्टं प्रमादाद्यच्च नाशितम् ॥ सतद्दद्याद्विप्लवाच्च रक्षिता दशमांशभाक् ॥ १० ॥ विप्लवात्तस्कराद्युपद्रवात् ॥ बृहस्पतिः–देवराजभयाद्यस्तु स्वशक्त्या परिपालयेत् ॥ तस्यांशं दशमं दत्वा गृह्णीयुस्तेंऽशतोऽपरम् ॥ ११ ॥ जिह्मं त्यजेयुर्निर्लाभमशक्तोऽन्येन कारयेत् ॥ जिह्मं वंचकं निर्लाभं मूलमात्रं दत्वा निःसारयेयुः अजिह्मएव यो द्रव्यरक्षणे इतरव्यापारे चाशक्तः सइतरं पुरुषं शक्तं नियुंजीतेत्यर्थः ॥ १२ ॥ कात्यायनः–शिष्यकाभिज्ञकुशलाश्चाचार्याश्चेति शिल्पिनः ॥ एकद्वित्रिचतुर्भागान्हरेयुस्ते यथोत्तरम् ॥ १३ ॥ शिष्यकाः शिष्याः अभिज्ञा ज्ञानवंतः कुशला दक्षाः आचार्या नूतनमार्गप्रवर्तकाः ॥ बृहस्पतिः–हर्म्यं देवगृहं वापि धार्मिकोपस्कराणि च ॥ संभूय कुर्वतां तेषां प्रमुखो द्व्यंशमर्हति ॥ १४ ॥ सएव–नर्तकानामेषएव धर्मः सद्भिरुदाहृतः ॥ तालज्ञोलभतेऽसार्धं गायकास्तु समांशिनः ॥ १५ ॥ कात्यायनः–तेषां चेत्प्रसृतानां च ग्रहणं समवाप्नुयात् ॥ तन्मोक्षणार्थं यद्दत्तं वहेयुस्ते यथांशतः ॥ १६ ॥ वणिजां कर्षकाणां च चौराणां शिल्पिनां तथा ॥ अनियम्यांशकर्तॄणां सर्वेषामेव निर्णयः ॥१७॥ प्रसंगात् अत्र व्यवहारोपयुक्तं किंचिदुच्यते ॥ याज्ञवल्क्यः–व्यासिद्धं राजयोग्यं च विक्रीतं राजगामि तत ॥ अर्घप्रक्षेपणाद्विंशं भागं शुल्कं नृपो हरेत् ॥ अत्र मिताक्षराकारः–इयतःपण्यस्येयन्मूल्यमित्यर्घस्तस्य प्रक्षेपणात् ॥ राजतोनिक्षेपणाद्धेतोरसौ मूल्याद्विंशतितमंशं शुल्कार्थं गृह्णीयात् ॥ १८ ॥ मिथ्यावदन्परीमाणं शुल्कस्थानादपाभरन् ॥ दाप्यस्त्वष्टगुणं यश्च सव्याजक्रयविक्रयी ॥ १९ ॥ तरिकः स्थलजं शुल्कं गृह्णन् दाप्यः पणान्दश ॥

ब्राह्मणप्रतिवेश्यानामेतद्देयानिमंत्रणे ॥ २० ॥ शुल्कं द्विविधं ॥ जलजं स्थलजं च स्थलजं तु उक्तं जलजं चोच्यते ॥ २१ ॥ तत्र मनुः–पणं यानांतरे दाप्यः पुरुषार्द्धपणंतरे ॥ पादं पशुश्च योषिच्च पादार्द्धं रिक्तकः पुमान् ॥ २२ ॥ भांडपूर्णानि यानानि तार्यं दाप्यानि सारतः ॥ रिक्तभांडानि यत्किंचित्पुमांसश्चापरिच्छदाः गर्भिणीच द्विमासादि तथा प्रव्रजितो मुनिः ॥ ब्राह्मणालिंगिनश्चैव नदाप्यास्तारिकं नराइति ॥ २४ ॥ शुल्कद्वयेऽप्ययमपरोविशेषः ॥ नभिन्नकार्षापणमस्ति शुल्कं न शिल्पवृत्तौ न शिशौ न दूते ॥ न भैक्षलब्धे न हृतावशेषे न श्रोत्रिये प्रव्रजिते न यज्ञे ॥ २५ ॥ ॥ इति संभूयसमुत्थाननिर्णयः ॥

## समाईकपणानें व्यापाराचा निर्णय.

प्रथम त्याचें स्वरूप नारद सांगतात. जेथें वाणी वगैरे पुष्कळ मंडळी मिळून समाईक व्यापार करितात त्या व्यापारास संभूयसमुत्थान व्यवहार ह्मणजे भागीपणाचा व्यापार असें ह्मणतात. संभूय ह्मणजे द्रव्य एकत्र करून व्यापार करण्यास प्रवृत्त होणें ॥ १ ॥ त्याविषयीं अधिकारी बृहस्पति सांगतात. उत्तम कुळांत उत्पन्न झालेले, चतुर, आळसरहित, सज्ञ, व्यापारांत होणाऱ्या लाभास जाणणारे, नुकसान नफा जाणणारे, शुचिर्भूत शूर अशा मनुष्यांशीं पातीनें व्यापार करावा ॥ २ ॥ बृहस्पती. व्यापारामध्यें ज्याचा जसा सारखा अधिककमी हिस्सा असेल त्याप्रमाणें फायदा नुकसान त्याची जाणावी ॥ ३ ॥ याज्ञवल्क्य. जे वाणी नफा मिळावा या हेतूनें पातीनें कांहींएक व्यापार करितात त्यांस त्यांचे पातीप्रमाणें लाभ, हानि अथवा कराप्रमाणें तोटा, नफा जाणावा ॥ ४ ॥ बृहस्पती. समाईक व्यापारांत पुष्कळांनीं संमत केलेला अशा एका मनुष्यानेंही जर द्रव्य दिलें अगर दुसऱ्यापासून घेतलें अगर एखादा लेख करून दिला तर तो सर्वां भागीदारांनींच केला असें जाणावें ॥ ५ ॥ संशयीत गोष्टीविषयीं अथवा लबाडीचे प्रकर्णीं ते सर्व परस्परांमध्यें साक्षी देण्यास अथवा परीक्षा करण्यास योग्य आहेत. परंतु एकमेकांमध्यें द्वेष मात्र नसावा. तसेंच वंचना करणारे नसावेत ॥ ६ ॥ खरेदी, विक्री करण्यामध्यें एखादा जर लबाडी करील तर शपथ घेऊन त्यास सोडावें. सर्व प्रकारच्या वादामध्येंही हाच नियम लागू आहे॥७॥येथें शपथ ह्मणजे एक वऱ्हेचें प्रमाण सांगितलें आहे. दुसरेंही प्रमाण करण्यास हरकत नाहीं ॥ ८ ॥ एखादे व्यापारांत देव, राजा यांच्या निमित्तानें क्षय ( ह्मणजे मुद्दल भांडवलाचें नुकसान ) हानि ( ह्मणजे नफ्याचें नुकसान) जर होईल तर जसा ज्याचा हिस्सा असेल त्याप्रमाणें त्याची योजना करावी॥९॥ यास अपवाद सांगितल्यावांचून अथवा करूंनको असें निवारण केलें असतांही अथवा

प्रमादानें जर कोणी नुकसान करील तर त्या एका मनुष्यानेंच सर्वांची नुकसानी भरून द्यावी ॥ ९ ॥ याज्ञवल्क्यानेंही असेंच सांगितलें आहे ॥ १० ॥ बृहस्पती. देव, राजा, इत्यादिकांच्या उपद्रवापासून जर आपल्या शक्तीनें रक्षण करील तर त्यास त्यांतील दहावा हिस्सा देऊन बाकी जें राहील तें आपआपल्या हिश्शाप्रमाणें विभागून घ्यावें ॥ ११ ॥ याज्ञवल्क्य. भागीदारांमध्यें एखादा लबाडी करील तर त्यास नफा न देतां त्या व्यापारांतून त्यास मुद्दल देऊन काढून टाकावें. एखादा मनुष्य सरळ असून काम कारभार करण्यास अशक्त असेल त्यानें आपल्याबद्दल दुसऱ्या मनुष्याची योजना करून द्यावी ॥ १२ ॥ कात्यायन. पुष्कळ मनुष्यें मिळून एखादा व्यापार करूं लागतील तर त्यांतील नफ्याचा शिष्यमंडळीनीं एक भाग घ्यावा. अनुभविक ज्ञात्यानें दोन भाग कुशलकारागिरानें तीन भाग, आणि आचार्य ह्मणजे शिक्षक ( ह्मणजे नवीन मार्ग दाखविणारा ) यानें नफ्याचे चार भाग घ्यावेत ॥ १३ ॥ बृहस्पति. एखादें श्रीमंताचें घर अथवा देवालय, विहीर, धर्मशाळा इत्यादिक पुष्कळ कारागीर जर एकत्र होऊन तयार करतील तर सर्वांपैकीं जो प्रमुख असेल त्यानें जें उत्पन्न होईल त्यांतील दोन हिस्से घ्यावेत ॥ १४ ॥ नर्तकांस हाच नियम लागू आहे. तालधान्यास दीड हिस्सा मिळावा. गायकांस सर्वांस सारखे हिस्से मिळावेत ॥ १५ ॥ कात्यायन. व्यापार करण्याकरितां मनुष्य निरनिराळे देशीं गेले असून त्यांतील एखाद्यास धरून राजानें शिक्षा केली असतां त्यास सोडविण्याकरितां जो खर्च लागेल तो सर्वांनीं आपआपल्या हिश्श्याप्रमाणें द्यावा लागेल ॥ १६ ॥ वाणी, शेतकरी, कारागीर हे एकत्र होऊन जर आपआपले धंदे करूं लागतील आणि अमक्यानें अमुक हिस्सा घ्यावा असा ठराव नसेल तर, हा समाईकपणानें व्यापारसंबंधानें सांगितलेला नियम सर्वांस सारखा जाणावा ॥ १७ ॥ याच प्रसंगीं येथें व्यवहारोपयोगी थोडें सांगतों. याज्ञवल्क्य. निरख ठरवून देण्याबद्दल राजानें निरख ठरविलेल्या जिनसांचा विसावा हिस्सा घ्यावा. व राजानें आपल्या आज्ञेनें इतरांस विकण्याचा निषेध केला आहे असे जिन्नस विकले असले तर राजानें घ्यावेत ॥ १८ ॥ जकात कमी पडण्यामुळें खोटें परिमाण सांगणाऱ्यास, तसेंच जकातीचें नाकें चुकवून दुसरीकडून जाणाऱ्यास अथवा संशययुक्त मालाचा क्रयविक्रय करणारा या प्रत्येकास आठपट दंड करावा ॥ १९ ॥ नावेवर राहणाऱ्या मनुष्यानें जर स्थलावरील जकात घेतली तर त्यास दहापण ( दहा पैसे ) दंड करावा. तसेंच आपल्या घराचे समोर अथवा घराचे शेजारीं एखादा विद्वान् ब्राह्मण असून आपले घरीं ब्राह्मणभोजनाचे समयीं त्यास निमंत्रण न करणारासही दहापण दंड करावा ॥ २० ॥ जकात दोन तऱ्हेची. एक पाण्यावरील व एक स्थलावरील, त्यांपैकीं

स्थळावरील वर सांगितली व आतां पाण्यावरील जकात सांगतों ॥ २१ ॥ मनु. नावेवर रिकामे वाहनास एकपण ह्मणजे एक पैसा जकात घ्यावी. भार वाहणारे पुरुषापासून अर्धापण ( अर्धा पैसा ) उतार घ्यावा. पशु व स्त्रिया यांपासून एक दमडी उतार घ्यावा. रिकामे मनुष्यापासून आठवा हिस्सा ह्मणजे टोली जकात घ्यावी ॥ २२ ॥ गाड्या वगैरे जर मालानें भरलेल्या असतील तर त्या मालाचा सारासार तारतम्यानें उतार घ्यावा. पेट्या वगैरे रिकामें सामान, तसेंच मालावांचून रिकामे उदमी, वाणी यांविषयीं थोडा उतार घ्यावा ॥ २३ ॥ दोन महिन्यांहून अधिक महिन्यांची गर्भिणी बायको, संन्यासी, वानप्रस्थ, ब्राह्मण आणि ब्रह्मचारी यांपासून नावेचा उतार घेऊं नये ॥ २४ ॥ जमीन व पाणी या दोहों प्रकारच्या जकातीविषयीं थोडा विशेष आहे तो सांगतों ॥ २४ ॥ एका रुपयापेक्षां कमी किमतीच्या मालास व सुतार, गवंडी; चितारी वगैरे कारागीर लोकांस व मुलें, जासूद, भिक्षा मागून मिळालेल्या जिनसांस, चोरीस जाऊन अवशेष राहिलेल्या जिनसांस व श्रोत्रिय, तसेंच संन्यास घेतलेल्या मनुष्यास व यज्ञोपयोगी पदार्थांस जकात घेऊं नये ॥ २५ ॥ याप्रमाणें संभूयसमुत्थाननिर्णय जाणावा.

## ॥ अथ दत्ताप्रदानिकनिर्णयः ॥

दत्तस्याप्रदानं पुनर्हरणं यस्मिन् दानाख्ये तद्दत्ताप्रदानिकं नाम व्यवहारपदम् ॥ तथा च नारदः–दत्वा द्रव्यमसम्यग्यः पुनरादातुमिच्छति ॥ दत्ताप्रदानिकं नाम तद्विवादपदं स्मृतम् ॥ १ ॥ अदेयमथदेयं च दत्तं चादत्तमेवच ॥ व्यवहारेपु विज्ञेयो दानमार्गश्चतुर्विधः ॥ २ ॥ तत्र ह्यष्टावदेयानि देयमेकविधं स्मृतम् ॥ दत्तं सप्तविधं विद्याददत्तं षोडशात्मकम् ॥ ३ ॥ तत्र देयमाह बृहस्पतिः–कुटुंबभक्तवसनाद्देयं यदतिरिच्यते ॥ मध्वास्वादोविषं पश्चाद्दातुर्धर्मोऽन्यथाभवेत् ॥ ४ ॥ कात्यायनः–सर्वस्वं गृहवर्जं तु कुटुंबभरणादिकम् ॥ यद्द्रव्यं तत्स्वयं देयमदेयं स्यात्ततोऽन्यथा ॥ ५ ॥ याज्ञवल्क्यः–स्वकुटुंबाविरोधेन देयं दारसुतादृते ॥ नान्वये सति सर्वस्वं यच्चान्यस्मै प्रतिश्रुतम् ॥ ६ ॥ मनुः–वृद्धौ च मातापितरौ साध्वी भार्या सुतः शिशुः ॥ अप्यकार्यशतं कृत्वा भर्तव्या मनुरब्रवीत् ॥ ७ ॥ स्थावरविषयेतु ॥ विभक्ताअविभक्तावा दायादाः स्थावरे समाः ॥ एको ह्यनीशः सर्वत्र दानाधमनविक्रये ॥ ८ ॥ विभक्तानामपि ॥ यत्रांशपरिच्छेदोनजातस्तन्मध्यममेव तिष्ठति ॥ तेन तत्र साधारणत्वमेव तत्रैकोनीशः ॥ पृथग्भूतेपु सर्वेष्वेवद्रव्येपु स्वतंत्रकृतस्य सिद्धिरेव इति मिश्राः ॥ विशेपस्तु दायप्रकरणे उक्तः ॥ ९ ॥ क्वचिद्दानविक्रयौ प्र-

तिषेधयति व्यासः ॥ येजातायेप्यजाताश्च येच गर्भेष्ववस्थिताः ॥ वृत्तिं च तेपि कांक्षंति न दानं न च विक्रयमिति ॥ १० ॥ देयमाह कात्यायनः-स्वेच्छया यः प्रतिश्रुत्य ब्राह्मणाय प्रतिग्रहं ॥ न दद्यादृणवद्दाप्यः प्राप्नुयात्पूर्वसाहसम् ॥ ११ ॥ अत्रैव हारीतः-प्रतिश्रुतार्थादानेन दत्तस्य छेदनेन च ॥ विविधान्नरकान्याति तिर्यग्योनौ च जायते ॥ १२ ॥ वाचा यच्च प्रतिज्ञातं कर्मणा नोपपादितम् ॥ ऋणं तद्धर्मसंयुक्तमिह लोके परत्र च ॥ १३ ॥ गौतमः-प्रतिश्रुत्याप्यधर्मसंयुक्ताय न दद्यादिति ॥ मनुः-धर्मार्थं येन दत्तं स्यात्कस्मैचिद्याचते धनम् ॥ पश्चाच्च न तथा तत्स्यान्न देयं तस्य तद्भवेत् ॥ १४ ॥ ॥ अथादेयनिर्णयः ॥ तत्र नारदः अन्वाहितं याचितकं नाधिः साधारणं च यत् ॥ निक्षेपः पुत्रदारं च सर्वस्वं चान्वये सति ॥ १५ ॥ आपत्स्वपि हि कष्टासु वर्तमानेन देहिना ॥ अदेयान्याहुराचार्यायच्चान्यस्मै प्रतिश्रुतम् ॥ १६ ॥ तत्र बृहस्पतिः-भृतिस्तुष्ट्यापण्यमूल्यं स्त्रीशुल्कमुपकारिणे ॥ श्रद्धानुग्रहसंप्रीत्या दत्तमष्टविधं स्मृतम् ॥ १७ ॥ नारदः-पण्यमूल्यं भृतिस्तुष्ट्या स्नेहात्प्रत्युपकारतः ॥ स्त्रीशुल्कानुग्रहार्थं च दत्तं दानविदो विदुः ॥ इति नारदेन दत्तस्य सप्तविधत्वमुक्तम् ॥ तत्प्रीतिदत्तस्यानुग्रहदत्तांतर्भावाद-विरुद्धम् ॥ एवमेव वाचस्पतिमिश्राः ॥ दक्षः-मातापित्रोर्गुरौ मित्रे विनीते चोपकारिणि ॥ दीनानाथविशिष्टेभ्यो दत्तं तु सफलं भवेत् ॥ १९ ॥ २० ॥ तत्र नारदः-अदत्तं तु भयक्रोधशोकवेगरुजान्वितैः ॥ तथोत्कोचपरीहासव्यत्यासच्छलयोगतः ॥२१॥ बालमूढस्वतंत्रार्तमत्तोन्मत्तापवर्जितम् ॥ कर्त्ता ममायंकर्मेति प्रतिलाभेच्छया च यत् ॥ २२ ॥ अपात्रे पात्रमित्युक्ते कार्ये चाधर्मसंज्ञिते ॥ यद्दत्तं स्याद-विज्ञानाददत्तमिति तत्स्मृतम् ॥ २३ ॥ कात्यायनः-कामक्रोधाऽस्वतंत्रार्तक्लीबोन्मत्त प्रमोहितैः ॥ व्यत्यासपरिहासाभ्यां यद्दत्तं तत्पुनर्हरेत् ॥ २४ ॥ कामात्परस्त्रीवंचनार्थं क्लीबोभीतः ॥ यत्तु कार्यस्य सिद्ध्यर्थमुत्कोचः स्यात्प्रतिश्रुतः ॥ तस्मिन्नपि प्रसिद्धेर्थे न देयं स्यात्कथंचन ॥ २५ ॥ अथ प्रागेवदत्तं स्यात्प्रतिदाप्यस्ततोबलात् ॥ दंडं चैकादशगुणमाहुर्गार्गीयमानवाः ॥ २६ ॥ उत्कोचस्वरूपमाह सएव-स्तेयसाहसिकोद्वृत्तपारदारिकशंसनात् ॥ दर्शनाद्वृत्तनष्टस्य तथासत्यप्रवर्तनात् ॥ प्राप्तमेतैस्तु यत्किंचिदुत्कोचाख्यं तदुच्यते ॥२७॥ मनुः-योगाधमनविक्रीतं योगदानप्रतिग्रहम् ॥ यस्यवाप्युपधिं पश्येत तत्सर्वं विनिवर्त्तयेत् ॥२८॥ योगउपधिः कपटं ॥ यस्य याप्यं-स्यस्यापि जातस्यापि कार्यस्य उपधिः कपटंचेत् तत्सर्वमुपध्यपगमे परावर्ततइत्यर्थः ॥ २९ ॥ अदेयं यश्च गृह्णाति यश्चादेयं प्रयच्छति ॥ तावुभौ चौरवच्छास्यौ दाप्यौ

षोत्तमसाहसम् ॥ ३० ॥ कात्यायनः–स्वस्थेनार्तेन वा दत्तं श्रावितं धर्मकारणात् ॥ अदत्त्वा तुमृतेदाप्यस्तत्सुतो नात्र संशयः ॥ ३१ ॥ ॥ इति दत्ताप्रदानिर्णयः ॥

## दत्ताप्रदानिक निर्णयः

दत्त ह्मणजे दिलेले वस्तूचें अप्रदान ह्मणजे पुनः ग्रहण करणें ज्या दानामध्यें आहे त्यास दत्ताप्रदानिकव्यवहार अशी संज्ञा आहे. नारदाचें वचन. अयोग्यरीतीनें द्रव्य देऊन नंतर देणारा तें पुनः परत घेण्यास इच्छा करतो त्या व्यवहारास दत्ताप्रदानिक अशी संज्ञा आहे ॥ १ ॥ या व्यवहाराचे ठायीं अदेय, देय, दत्त, अदत्त असा दान-मार्ग चार प्रकारचा सांगितला आहे ॥ २ ॥ हे दत्तादिक जे चार सांगितले त्यांमध्यें अदेय आठ प्रकारचे आहेत. देय एक प्रकारचें सांगितलें आहे. दत्त सात प्रकारचें आणि अदत्त सोळा प्रकारचें आहे ॥ ३ ॥ त्यांमध्यें प्रथम देय याचा विचार बृहस्पति सांगतात. कुटुंबांतील मंडळीचे पोषणाहून अधिक जें अन्नवस्त्र असेल तेंच द्यावें. कुटुंब पोषणापुरतें अन्नादिक पुरेसें नसून जो धर्म करितो त्या दात्यास तो धर्म मधाचें आस्वादन केल्यासारखा अथवा विषासारखा पापोत्पत्तिकारक होतो ॥ ४ ॥ कात्यायन. कुटुंबाचे पोषणापेक्षां अधिक जें द्रव्य असेल तें सर्वस्व द्यावें. परंतु घर मात्र देऊं नये. कुटुंब पोषणाइतकें नसेल तर देऊं नये ॥ ५ ॥ याज्ञवल्क्य. कुटुंब पोषणास प्रतिवर्षी जें लागतें तें जाऊन बाकी जी आपली स्वामित्व असलेली स्थावरजंगम मिळकत तो दान, बक्षीस, खरेदी देण्यास योग्य आहे. स्त्रीपुत्र यांवांचून अन्यदान करावें. हें दिलें असतां प्रायश्चित्त सांगितलें आहे. वंश कायम असता सर्वस्व देऊं नये व जें एकास देऊं केलें असेल तें दुसऱ्यास देऊं नये ॥ ६ ॥ मनु. वृद्ध असे आईबाप, पतिव्रता स्त्री, लहान मुलें अशीं असतां, करण्यास योग्य नाहींत अशीं शतावधि देखील कामें करून यांचें पोषण करावें असें मनूनें सांगितलें आहे, सबब कुटुंबपोषणापेक्षां जास्त जर अन्नादिक असेल तरच दान करावें ॥ ७ ॥ स्थावराविषयीं वर दायाद विभक्त असोत अथवा अविभक्त असोत ते स्थावराविषयीं सारखे मालक आहेत. सबब स्थावर गहाण टाकण्यास, दान देण्यास, व विक्री करण्यास मनुष्य मालक होत नाहीं ॥८॥ येथें विभक्त असें जें लिहिलें आहे तें एका स्थावर मिळकतींत वेगळाले जे भाग त्यांची व्यवस्था झाली नसून सर्वांची मिळकत एकत्र असेल तेथें विभक्त असतांही त्या मिळकतीचें दानादिक एकास करतां येत नाहीं. या संबंधाचा विशेष प्रकार दायप्रकरणांत सांगितला आहे तो तेथें पहावा ॥ ९ ॥ निर्वाहाकरितां कायमचें वडिलोपार्जित जें उत्पन्न त्यास वृत्ति

असें ह्मणतात. त्या वृत्तीचें दान अथवा विक्री करूं नये. व्यासाचें वचन. जे जन्मास आले आहेत व जे गर्भांत आहेत, ते सर्व उपजीविकेची इच्छा करितात, सबब वृत्तीचें दान अथवा विक्री करूं नये ॥ १० ॥ अवश्य देण्यास योग्य जें तें कात्यायन सांगतात. ब्राह्मणास आपल्या इच्छेनें जें देऊं केलें असेल तें कर्जाप्रमाणें दिलेंच पाहिजे, न दिलें तर राजानें त्यास दंड करावा ॥ ११ ॥ हारीत. कबूल केलेलें द्रव्य न देईल, अथवा दुसऱ्या मनुष्यानें जें दिलें असेल त्याचा छेद केला असतां नाना प्रकारचे नरकास जाऊन नंतर पश्वादियोनीमध्यें जन्म प्राप्त होतो ॥ १२ ॥ जें वाणीनें देण्याचें कबूल केलें असून तें हातानें जर न देईल तर धर्मसंबंधाचें ऋणच या लोकीं आहे असें जाणावें ॥ १३ ॥ गौतम. देण्याचें कबूल केलें असेल तरीही तो मनुष्य अधर्माचरणशील असेल तर त्यास तें देऊं नये. मनु. एखाद्या मनुष्यानें धर्मकृत्य करण्याकरितां एखादे मनुष्यास द्रव्य दिलें असेल आणि तो मनुष्य त्या द्रव्याचें धर्मकृत्य न करील तर तें दिलेलें द्रव्य परत घ्यावें. द्यावयाचें असल्यास देऊं नये ॥ १४ ॥ देण्यास अयोग्य जें द्रव्य त्याचा विचार. नारदाचें वचन. १ अन्वाहित ह्मणजे एखाद्या मनुष्यानें विश्वासें करून जी वस्तु ठेविली असेल ती. २ याचितक ह्मणजे दुसऱ्यापासून मागून आणिलेली. ३ आधी ह्मणजे लोकांपासून गहाण ठेविलेली वस्तु. ४ साधारण ह्मणजे समाइकांतील द्रव्य. ५ निक्षेप ह्मणजे लोकांनीं ठेविलेली ठेव. ६ पुत्रदार ह्मणजे स्त्री पुत्र पौत्र इत्यादिक. ७ सर्वस्व ह्मणजे वंश कायम असतां घर वगैरे स्थावर व सोनें वगैरे जंगम हें सर्व द्रव्य देऊं नये. असेंच अन्वाहितादिक कधींही देऊं नये॥१५॥ कष्ट देणाऱ्या अशा आपत्तीमध्यें असणाऱ्या मनुष्यानें देऊं केलेलेंही देऊं नये आणि दुसऱ्यास जें देऊं केलें असेल तें त्याहून इतरांस कधींही देऊं नये. याप्रमाणें प्राचीन आचार्य सांगतात ॥१६॥ दत्तवस्तूचा निर्णय. बृहस्पतीचें वचन. १ भृति ह्मणजे वेतन ( पगार अथवा रोजमुरा ). २ तुष्टि ह्मणजे खुष होऊन दिलेली देणगी. ३ पण्यमूल्य ह्मणजे किंमत देऊन विकत घेतलेली जिन्नस. ४ स्त्रीशुल्क ह्मणजे लग्नसमयीं लग्नाकरितां मुलीचे आई, भाऊ इत्यादिकांस दिलेलें द्रव्य. ५ उपकारिणे ह्मणजे उपकार करणारास उपकार फिटण्यासाठीं दिलेलें द्रव्य. ६ श्रद्धा ह्मणजे भक्तीनें धर्मकृत्यास दिलेलें द्रव्य. ७ अनुग्रह ह्मणजे पुत्रादिकांस दिलेलें. ८ संप्रीति ह्मणजे प्रीतीनें मित्रादिकांस दिलेलें. हें आठ प्रकारचें दिलेलें द्रव्य यास दत्त अशी संज्ञा आहे. तें पुनः परत घेतां येत नाहीं ॥ १७ ॥ नारदानें किमतीचें मूल्य इत्यादिक दिलेल्या द्रव्याचे सात प्रकार सांगितले आहेत आणि बृहस्पतीनें आठ प्रकार सांगितले आहेत तर यांमध्यें परस्पर विरोध दिसत आहे तरी,

परंतु नारदानें प्रीतिदत्ताचा अनुग्रहामध्यें अंतर्भाव करून सात प्रकार सांगितले आहेत.
ह्मणून परस्पर विरोध येत नाहीं ॥ १८ ॥ दक्षाचें वचन. आईबापास, गुरुस, स्नेही-
मनुष्यास, नम्र मनुष्यास, आपल्यावर उपकार करणाऱ्या मनुष्यास, दीन, गरीब, विद्वान्
या मनुष्यांस जें दिलेलें तें सफळ होतें ॥ १९ ॥ अदत्त ह्मणजे दिलें असून न दिल्या-
सारखें त्याचा विचार. नारद. भय दाखवून भीति उत्पन्न करून घेतलेलें, क्रोध ह्म-
णजे राग येऊन त्या रागाच्या आवेशानें दिलेलें, शोक ह्मणजे शोकग्रस्त होऊन दि-
लेलें, उत्कोच ह्मणजे आपलें काम होण्याकरितां दिलेली लांच. परिहास ह्मणजे थट्टेनें
दिलेलें. व्यत्यास ह्मणजे चुकीनें दिलेलें. छल ह्मणजे कपटानें दिलेलें द्रव्य. बाल ह्म-
णजे सोळा वर्षांचे आंतील वयाच्या मुलानें दिलेलें. मूढ ह्मणजे वेडगळ मनुष्यानें दिलेलें.
अस्वतंत्र ह्मणजे स्वतः मालकी नसणाऱ्या मनुष्यानें ह्मणजे मुलगा, बायको, नोकर इ-
त्यादिकानीं दिलेलें. आर्त ह्मणजे कोणत्याही रोगानें अत्यंत पीडित होऊन त्या व्यथेंत
दिलेलें. मत्त ह्मणजे कोणताही कैफ उत्पन्न होणारा पदार्थ खाऊन त्या कैफाच्या भ्रां-
तींत दिलेलें. उन्मत्त ह्मणजे वातरोगानें वेडा झालेला भ्रांतिष्ट. अपवार्जित ह्मणजे आ-
पलें कांहीं काम करील अशा बुद्धीनें जें दिलें असेल तें. त्याचेकडून तें काम न होईल
तर दिलेलें परत घ्यावें. अपात्र ह्मणजे दान देण्यास अयोग्य असतां मी महा विद्वान्
आहें असें सांगून जें दान घेतलें असेल तें परत घेतां येतें. अधर्मसंज्ञित ह्मणजे धर्म-
कार्य करील अशा बुद्धीनें अधर्म करणारास अज्ञानानें जें दिलें असेल तें, याप्रमाणें
सोळा प्रकारांनीं द्रव्य दिलें असलें तरीही तें न दिल्यासारखें आहे यामुळें तें परत घेतां
येतें ॥ २२ ॥ २३ ॥ कात्यायन. कामानें ह्मणजे परस्त्रियेस वश करून घेण्याकरितां
दिलेलें. क्रोध ह्मणजे क्रोधावेशानें दिलेलें. अस्वतंत्र ह्मणजे ज्यास स्वतःची मालकी
नाहीं अशा मनुष्यानें दिलेलें. आर्त ह्मणजे रोगानें पीडित झालेलें. क्लीब ह्मणजे नपुं-
सकानें दिलेलें. उन्मत्त ह्मणजे वातादिकानें उन्मादयुक्त झालेल्या मनुष्यानें. प्रमोहित
ह्मणजे वेडगळ मनुष्यानें. व्यत्यास ह्मणजे रुप्याच्या ऐवजीं चुकून सोनें देणें. परि-
हास ह्मणजे थट्टेनें. या सांगितल्या प्रकारांनीं जरी दुसऱ्या मनुष्यास कांहीं दिलें असेल
तरीही तें परत घेतां येतें ॥ २४ ॥ एखादें काम करून घेण्याकरितां "उत्कोच" ह्मणजे
लांच देण्याचें कबूल केलें नंतर त्यानें तें काम केलें तरीही त्यास कबूल केलेली लांच
देऊं नये ॥ २५ ॥ काम होण्याचे पूर्वींच जर लांच दिली असेल तर त्याजकडून बला-
त्कारानें ती लांच परत देववावी आणि त्या लांचीच्या अकरापट लांच घेणारास दंड क-
रावा. याप्रमाणें गर्गऋषीच्या मतास अनुसरणाऱ्या ऋषींचें मत आहे ॥ २६ ॥ लांचेचें

स्वरूप कात्यायन सांगतात. चोर, साहसकर्म करणारा, ज्याचें वर्तन वाईट आहे असा मनुष्य, परस्त्रियेशीं गमन करणारा, अशा मनुष्याचें वर्तन छपवून ठेवण्याकरितां जें घे-तलें असेल तें व वाईट आचरणाचे मनुष्यास छपवून ठेवण्यासाठीं किंवा खोटी साक्ष दे-ऊन तुझी अब्रू कमी करीन असें सांगून जें घेतलें असेल तें, त्यास लांच असें ह्मणतात ॥ २७ ॥ मनु. गहाण, विक्री, दान अथवा प्रतिग्रह; कोणत्याही कामांत कपट आहे असें जर दृष्टोत्पत्तीस येईल तर तें सर्व झालेलें न झाल्यासारखें होतें, ह्मणजे तें दिलेलें रद्द होतें ॥ २८ ॥ उपाधि ह्मणजे कपट याचा अर्थ असा आहे कीं, कोणत्याही कृत्यांत कपट दिसून येत असेल तर तें सर्व फिरतें ॥ २९ ॥ जो मनुष्य देण्यास अयोग्यवस्तु इतरांस देतो व जो मनुष्य घेण्यास अयोग्य वस्तस घेतो ते दोघेही शिक्षा करण्यास योग्य असे होतात ॥ ३० ॥ स्वस्थ असणाऱ्या अगर रोगग्रस्त मनुष्यानें धर्म करण्या-करितां दिलेलें असेल किंवा देण्यास सांगितलें असून देण्याचे पूर्वींच मृत झाला असेल तर त्याचे मुलाकडून धर्मकृत्यास जें देऊं केलें असेल तें देववावें. यांत कोणताही संशय नाहीं ॥ ३१ ॥ याप्रमाणें दत्ताप्रदानिक निर्णय जाणावा.

## ॥ अथाभ्युपेत्याशुश्रूषानिर्णयः ॥

आज्ञाकरणं शुश्रूषा तामंगीकृत्य पश्चाद्यो न संपादयति तद्विवादपदमभ्युपेत्याशु-श्रूषाख्यम् ॥ तत्र नारदः–अभ्युपेत्य तु शुश्रूषां यस्तां न प्रतिपद्यते ॥ अशुश्रूषा-भ्युपेत्यैतद्विवादपदमुच्यते ॥ १ ॥ तत्र शुश्रूषकभेदविषयमाह बृहस्पतिः–आयुधी तू-त्तमः प्रोक्तो मध्यमस्तु कृषीवलः॥ भारवाहोऽधमः प्रोक्तस्तथा च गृहकर्मकृत् ॥ २॥ नारदः–सर्वव्यधिकृतोयः स्यात्कुटुंबस्य तथोपरि ॥ स च कर्मकृतो ज्ञेयः प्रथकौटुं-बिकः स्मृतः ॥ ३ ॥ कात्यायनः–स्वतंत्रस्यात्मनोदानाद्दासत्वं दारवद्भृगुः॥त्रिषु व-र्णेषु विज्ञेयं दास्यं विप्रस्य न क्वचित् ॥ ४ ॥ नारदः–वर्णानां प्रतिलोम्येन दासत्वं न विधीयते ॥ ५ ॥ अग्रे दासादीनां लक्षणान्युक्तानि इदानीं अस्य प्रकरणस्य विशेषतोनुपयोगादेनन्न लिख्यते ॥ इत्यभ्युपेत्याशुश्रूषानिर्णयः

## अभ्युपेत्याशुश्रूषेचा निर्णय.

शुश्रूषा ह्मणजे दुसऱ्यानें सांगितलेल्या आज्ञेप्रमाणें वागणें. चाकरी करतों असें वचन करून वचन नंतर जो शुश्रूषा करीत नाहीं त्याचेबद्दलचा जो वाद त्यास अभ्युपेत्याशुश्रूषा अशी संज्ञा आहे. नारद. जो मनुष्य जवळ जाऊन मी चाकरी करीन असें कबूल क-रून नंतर त्याप्रमाणें वागत नाहीं त्याच्या बद्दलचा जो विवाद त्यास व्यवहारामध्यें चा-करीचा कबूल मोडणें असें ह्मटलें आहे. हेंच अभ्युपेत्याशुश्रूषा असें विवादपदास नांव

सांगितलें आहे चाकरी करणाराचे तीन भेद सांगितले आहेत. बृहस्पतीचें वचन. १ ह-
त्यार घेऊन जो नोकरी करितो तो उत्तम. २ शेवकीचें जो काम करितो तो मध्यम. ३
भार वाहणारा ह्मणजे हमाल हा कनिष्ठपतीचा नोकर त्याप्रमाणें घरांतील काम करणारा
कनिष्ठप्रतीचा नोकर सांगितला आहे ॥ २ ॥ नारद. सर्वप्रकारचें सर्व काम करण्यास
नेमलेला तसाच कुटुंबाचें काम पाहण्यास नेमलेला असा जो नोकर त्यास कौटुंबिक
ह्मणजे कुटुंबांतील कामकरणारा अशी संज्ञा आहे ॥ ३ ॥ कात्यायनाचें वचन. मनुष्य
स्वतः स्वतंत्र असून जो इतर मनुष्यास आपलें दान करितो तो त्याचे स्त्रीप्रमाणें होतो; असें
भृगुऋषी सांगतात ॥ ४ ॥ नारद. चाकरी–क्षत्रिय, वैश्य, शूद्र हा तिन्ही वर्णांस सां-
गितली आहे. ब्राह्मणानीं कधींही करूंनये. संकटप्रसंगीं करण्यास सांगितली आहे.
वर्णाच्या अनुलोमानें नोकरी करावी. प्रतिलोम्यतेनें करूंनये. ब्राह्मणाची नोकरी क्षत्रियानें,
क्षत्रियाची नोकरी वैश्यानें, वैश्याची चाकरी शूद्रानें यास अनुलोम असें ह्मणतात. याचे
विरुद्ध ह्मणजे ब्राह्मणानें क्षत्रियादिकांपाशीं नोकरी करणें यास प्रतिलोम अशी संज्ञा आहे.
अशारीतीनें नोकरी करण्याचा निषेध सांगितला आहे ॥ ५ ॥ याज्ञवल्क्यस्मृति, व्यव-
हारमयूख, विवादरत्नाकर, विवादार्णवसेतु इत्यादि ग्रंथांमध्यें दासादिकांचीं लक्षणें सांगि-
तलेलीं आहेत ( पावेळीं दास ह्मणजे गुलाम तो विकत घेऊन ठेवणें इत्यादिक प्रकार
नसल्यामुळें ह्या प्रकरणाचा हल्लीं उपयोग दिसत नाहीं सबब आली तें येथें लिहीत
नाहीं ) ह्याप्रमाणें अभ्युपेत्याशुश्रूषानिर्णय जाणावा.

## ॥ अथ वेतनादाननिर्णयः ॥

तत्र नारदः–भृत्यानां वेतनस्योक्तो दानादानविधिक्रमः ॥ वेतनस्यानपाकर्म
तद्विवादपदं स्मृतम् ॥ १ ॥ भृत्याय वेतनं दद्यात्कर्मस्वामी यथाक्रमम् ॥ आदौ
मध्येऽवसाने वा कर्मणां यद्विनिश्चितम् ॥ २ ॥ भृतावनिश्चितायां तु दशमं भागमा-
प्नुयुः ॥ लाभे गोदुग्धसस्यानां वणिग्गोपकृषीवलाः ॥ ३ ॥ याज्ञवल्क्यः–दाप्य-
स्तु दशमं भागं वाणिज्यपशुसस्यतः ॥ अनिश्चित्य भृतिं यस्तु कारयेत्समहीक्षिता
॥ ४ ॥ एतदल्पायासपरम् ॥ आयासबहुत्वे तु बृहस्पतिः–त्रिभागं पंचभागं वा
गृह्णीयात्सीरवाहकः ॥ भक्ताच्छादनभृत्सीरी भागं गृह्णीत पंचमम् ॥ ५ ॥

## वेतनादान ह्मणजे नोकरीचा पगार देणें त्याचा निर्णय.

नारदाचें वचन. चाकरास वेतन ह्मणजे पगार देणें अथवा न देणें यासंबंधाचे जे

नियम त्यांचा क्रम सांगतों. यास व्यवहारामध्यें वेतनस्यानपाकर्म ह्मणजे वेतनादान अशी संज्ञा आहे ॥ १ ॥ मालकानें ज्याप्रमाणें ठराव केला असेल त्याप्रमाणें कामाच्या आरंभीं किंवा मध्यें किंवा अंतीं पगार द्यावा ॥ २ ॥ पगार देण्याचा ठरविला नसेल तर वाणी-पणाचा व्यापार, दूध वगैरे विकणें, शेतकीचें काम करणें यांच्यामध्यें जो नफा होईल त्याचा दहावा हिस्सा वाणी, गौळी व शेतकरी यांनीं घ्यावा ॥ ३ ॥ याज्ञवल्क्याचें वचन. पगार देण्याचा ठराव न करितां कोणी मनुष्य एखाद्या मनुष्यास जर वाणीपणा, पशु, धान्य यांच्या व्यापारास लावील त्यामध्यें जो नफा होईल त्याचा दहावा हिस्सा राजानें मालकाकडून चाकरास देववावा ॥ ४ ॥ हें वेतन देणें थोडया श्रमाचें आहे. अत्यंत श्रम असतां बृहस्पतीचें वचन. शेतामध्यें नांगर घेऊन काम करणाऱ्या मनुष्यानें तिसरा अथवा पांचवा हिस्सा घ्यावा. नांगर वाहणाऱ्या मनुष्यास अन्नवस्त्र दिलें असतां त्यानें पांचवा हिस्सा घ्यावा. अर्थात अन्नवस्त्र दिलें नसेल तर तिसरा हिस्सा द्यावा ॥ ५ ॥

गृहीतवेतनः कर्म त्यजन् द्विगुणमावहेत् ॥ अगृहीते समं दाप्यो भृत्यै रक्ष्य उपस्करः ॥ ६ ॥ नारदः–कर्माकुर्वन्प्रतिश्रुत्य कार्यो दत्वा भृतिं बलात् ॥ भृतिं गृहीत्वा कुर्वाणो द्विगुणां भृतिमाप्नुयात् ॥ ७ ॥ मनुः–भृतोनार्तो न यः कुर्याद्दर्पात्कर्म यथोदितम् ॥ स दंड्यः कृष्णलान्यष्टौ न देयं चास्य वेतनम् ॥ ८ ॥ स एव–यथोक्तमार्तः स्वस्थो वा यस्तत्कर्म न कारयेत् ॥ न तस्य वेतनं देयमल्पोनस्यापि कर्मणः ॥ ९ ॥ आर्तस्तु कुर्यात्स्वस्थः सन् यथाभाषितमादितः ॥ सुदीर्घस्यापि कालस्य लभेतैव तु वेतनम् ॥ १० ॥ विष्णुः–भृतकश्चापूर्णे काले त्यजन् सकलमेव च ॥ मूल्यं जह्याद्राज्ञे च पणं शतं दद्यादिति ॥ ११ ॥ सएव–स्वामीचेद्भृतकमपूर्णे काले जह्यात्तच्चास्य ॥ सर्वमेव मूल्यं दद्यात्पणशतं च राजन्येन्यत्रभृतकदोषात् ॥ १२ ॥ वृद्धमनुः–प्रमादान्नाशितं दाप्यः समं द्विड्रोहनाशितम् ॥ न तु दाप्यो हृतं चौरैर्दग्धमूढं जलेन वा ॥ १३ ॥ द्रोहोद्वेषः ऊढमपहृतम् ॥ याज्ञवल्क्यः–प्रस्थानविघ्नकृच्चैव प्रदाप्योद्विगुणां भृतिं ॥ १४ ॥ पथि विक्रीय तत् भांडं वणिग्भृत्यं त्यजेद्यदि ॥ अथ तस्यापि देयं स्याद्भृतेरर्द्धं लभेत सः ॥ १५ ॥ त्यजेत्पथिसहायं यः श्रांतं रोगार्तमेव वा ॥ प्राप्नुयात्साहसं पूर्वं ग्रामेऽयहमप्रतिपाल्य श्रांतं रोगार्तं वा सहायं भृतकरूपं त्यजेत् ॥ पूर्वसाहसं राज्ञा दंड्य इत्यर्थः ॥ १६ ॥

याज्ञवल्क्याचें वचन. जो नोकर मालकापासून करारप्रमाणें वेतन घेऊन काम करणार नाहीं तर त्या नोकरापासून जो पगार असेल त्याचें दुप्पट मालकास पैसे परत देववावे. नोकरी करण्याचें कबूल करुन पगार न घेऊन काम न करील तर जितका

पगार असेल तितका दंड त्यापासून घ्यावा; परंतु नोकरानें, मालकानें जी कामाची सा-
मुग्री दिली असेल ती सर्व संभाळली पाहिजे ॥ ६ ॥ नारद. काम करण्याचें कबूल
करून जर तें काम न करील तर त्याचा पगार त्यास देऊन तें काम त्याजकडून बला-
त्कारानें करून घ्यावें. पगार घेऊन काम जर न करील तर पगाराचे दुप्पट रक्कम त्या-
जपासून घ्यावी ॥ ७ ॥ मनूचें वचन. जो नोकर कोणताही शरीरास आजार नसून
उद्धटपणामुळें सांगितलेलें काम करणार नाहीं त्यास आठ गुंजा दंड करावा व त्याचा
पगार त्यास देऊं नये ॥ ८ ॥ जो नोकर चांगला असून काम करीत नाहीं त्यास पगार
देऊं नये. काम सर्व करून थोडें शिल्लक राहिलें असेल तरीही पगार देऊं नये ॥ ९ ॥
जो नोकर रोगयुक्त झाला असेल त्यानें प्रकृती चांगली झाल्यानंतर सांगितल्याप्रमाणें सर्व
काम करावें व राहिलेला सर्व पगार घ्यावा ॥ १० ॥ विष्णूचें वचन. जो नोकर नोक-
रीची मुदत पुरी होण्याचे पूर्वींच काम सोडून जाईल त्यास झाले दिवसाचा पगार देऊं
नये व त्यास राजानें शंभरपण दंड करावा ॥ ११ ॥ जो मालक चाकराचा कोणताही
दोष नसतांना मुदतीचे ठरावाचे आंत जर सोडून देईल तर नोकरास सर्व पगार द्यावा व
राजानें मालकास शंभरपण दंड करावा ॥ १२ ॥ वृद्धमनूचें वचन. चाकराच्या हय-
गयीमुळें जर मालकाचें नुकसान झालें असेल तर तें नुकसान चाकराकडून भरून देव-
वावें. जर द्वेषबुद्धीनें नुकसान केलें असेल तर दुप्पट नुकसान भरून देववावें. परंतु
चोरानें हरण केलें असेल अथवा अग्नीनें जळालें असेल अथवा पाण्यानें वाहून गेलें
असेल तर चाकराकडून भरून घेऊं नये ॥ १३ ॥ याज्ञवल्क्याचें वचन. गांवास जा-
तेसमयीं नोकर कबूल केल्याप्रमाणें जर न येईल तर त्यास पगाराचे दुप्पट दंड करावा.
व्यापाऱ्यानें मार्गांमध्यें सर्व माल विक्री केल्यामुळें जर नोकरास सोडून देईल तर त्याचा
जो पगार कबूल केला असेल त्याचा अर्धा पगार त्यास द्यावा ॥ १४॥१५ ॥ का-
त्यायनाचें वचन. जो मालक आपल्याबरोबर आणिलेला नोकर मार्गांमध्यें थकून रो-
गयुक्त झाला असेल तर त्यास एखादे खेडेगांवांत राहून त्याची तीन दिवस योग्य व्य-
वस्था न करितां तसेंच सोडून जाईल तर त्यास कनिष्ठपणाचा दंड करावा ॥ १६ ॥

बृहस्पतिः–प्रभुणाविनियुक्तःसन् भृतकोविदधातियः ॥ तदर्थमशुभंकर्मस्वामीतत्रा
पराध्नुयात् ॥ १७ ॥ कृते कर्मणि यः स्वामी न दद्याद्वेतनं भृतेः ॥ राज्ञा दाप-
यितव्यः स्याद्वेतनं चानुरूपतइति ॥ १८ ॥

बृहस्पतीचें वचन. मालकानें आज्ञा केल्यावरून एकाद्या नोकर मनुष्यानें वाईट काम
केलें असतां त्याजबद्दल अपराधी मालक होतो ॥ १७ ॥ जो मालक काम केलें असतां

नोकरास पगार देत नाहीं त्या मालकाकडून नोकराचा पगार देववावा व त्यास राजानें दंड करावा ॥ १८ ॥

## ॥ अथ गृहादिभाटकनिर्णयः ॥

तत्र नारदः–परभूमौ गृहं कृत्वा स्तोमं दत्वा वसेत्तु यः॥ स तद्गृहीत्वा निर्गच्छे-त्तृणकाष्ठेष्टिकादिकम् ॥ १९ ॥ स्तोमं विना वसित्वा तु परभूमावनिच्छतः ॥ नि-र्गच्छंस्तृणकाष्ठानि न गृह्णीयात् कथंचन ॥२०॥ स्तोमं वासमूल्यं ॥ तथा हस्त्यश्व-गोखरोष्ट्रादीन् गृहीत्वा भाटकेन यः ॥ नार्पयेत्कृतकृत्यः संस्तावद्दाप्यः सभाटकम् ॥ २१ ॥ वृद्धमनुः–योभाटयित्वा शकटं नीत्वान्यत्र प्रगच्छति ॥ भाटं न दद्याद्दा-प्योऽसावनूढस्यापि भाटकम् ॥ २२ ॥ शकटमिति वाह्यमात्रोपलक्षणम् ॥ अनूढ-स्यापि अवाहितस्यापि ॥ नारदः–स्तोमवाहीनि भांडानि पूर्णकालेऽप्युपानयेत् ॥ गृहीतुराभवेद्भग्नं नष्टं चान्यत्र संप्लवात् ॥ स्तोमं वेतनं पूर्णकालेऽवधिकाले उपा-नयेत् ॥ तत्स्वामिने समर्पयेत् संप्लवोराजदैवतं तेन राजदैवतमंतरेण विघटितं शक-टादि गृहीतुः समाधेयमिति समुदायार्थः ॥ २३॥२४ ॥ इति वेतनादाननिर्णयः

## घरादिकांच्या भाड्याचा विचार.

नारदाचें वचन. दुसऱ्याच्या जमिनीमध्यें भाडें देऊन घर बांधून जो राहील त्यानें निघून जातेसमयीं घरास लावलेलें गवत, विटा, लांकडें इत्यादिक घेऊन जावें ॥ १९ ॥ भाडें न देतां दुसऱ्याच्या जमिनीमध्यें घर बांधून राहील त्यानें तेथून निघून जातेसमयीं गवत, लांकडें, विटा इत्यादिक पदार्थ घेऊन जाऊं नयेत ॥ २० ॥ तसेंच हत्ती, घोडा, बैल, उंट इत्यादिक जनावरें भाड्यानें घेऊन जाऊन आपलें काम झालें असतांना जो परत देत नाहीं तो जितके दिवस जनावरें ठेवील तितके दिवसांचें भाडें त्याजकडून देव-वावें ॥ २१ ॥ वृद्धमनूचें वचन. जो गाडी भाड्यानें आपण घेऊन दुसऱ्यास नेऊन देईल, तो जर भाडें न देईल तर त्यानें स्वतः जरी गाडीचा उपभोग घेतला नाहीं तरी त्याजकडून भाडें देववावें ॥ २२ ॥ नारदाचें वचन. भाडें वाहणारीं अशीं पात्रें जितके दिवस ठेवण्याचें कबूल केलें असेल तितके दिवस पूर्ण झाल्यानंतर त्याचे मालकास परत नेऊन द्यावींत. राजदैविक उपद्रवावांचून अन्य कारणानें त्यांत जर मोडतोड कांहीं हो-ईल, अथवा वस्तु नाहींशी होईल तर तें भाडें देणारानें भरून दिलें पाहिजे. राजदैविक उपद्रवानें नाश पावलें असतां मालकानें त्याचें नुकसान सोसावें ॥ २३ ॥ २४ ॥ याप्र-माणें वेतनादानाचा निर्णय जाणावा.

## ॥ अथ संविद्व्यतिक्रमनिर्णयः ॥

नारदः–पाखंडनैगमादीनां स्थितिः समयउच्यते ॥ समयस्यानपाकर्म तद्विवाद-पदं स्मृतम् ॥ १ ॥ पारिभाषिकधर्मेण व्यवस्थानं समयस्तस्यानपाकर्माव्यतिक्रमः परिपालनं तद्व्यतिक्रम्यमाणं विवादपदं भवतीत्यर्थः ॥ २ ॥ याज्ञवल्क्यः–राजा कृत्वा पुरेस्थानं ब्राह्मणान्न्यस्य तत्र तु ॥ त्रैविद्यं वृत्तिमद्ब्रूयात्स्वधर्मः पाल्यता-मिति ॥ ३ ॥ निजधर्माविरोधेन यस्तु सामयिको भवेत ॥ सोऽपियत्नेनसंरक्ष्यो धर्मो-राजकृतश्च यः ॥ ४ ॥ गणद्रव्यं हरेद्यस्तु संविदं लंघयेच्च यः ॥ सर्वस्वहरणं कृत्वा तं राष्ट्राद्विप्रवासयेत् ॥ ५ ॥ कर्तव्यं वचनं सर्वैः समूहहितवादिनाम् ॥ यस्तत्र वि-परीतः स्यात्सदाप्यः प्रथमं दमम् ॥ ६ ॥ समूहकार्य-आयातान् कृतकार्यान्विसर्ज-येत् ॥ सदानमानसत्कारैः पूजयित्वा महीपतिः ॥ ७ ॥ धर्मज्ञाः शुचयोऽलुब्धा भ-वेयुः कार्यचिंतकाः ॥ कर्तव्यं वचनं तेषां समूहहितवादिनाम् ॥ ८ ॥ श्रेणिनैगमपा-खंडिगणानामप्ययं विधिः ॥ भेदं चैषां नृपोरक्षेत्पूर्ववृत्तिं च पालयेत् ॥ ९ ॥ इति संविद्व्यतिक्रमनिर्णयः ॥

## संविद्व्यतिक्रम ( लोकसमुदायाचे कायम ठरावाचें उल्लंघन करण्याचा निर्णय. )

नारदाचें वचन. पाखंडी ह्मणजे वेदमार्ग सोडून वर्तन करणारे. नैगम ह्मणजे वेदास अनुसरून चालणारे. त्यांची जी स्थिति त्यास समय असें ह्मणतात. ह्मणजे नियमित परंपरेनें चालत आलेल्या धर्मानें वागणें, त्याचें उल्लंघन करणें हें विवादाचें स्थान आहे ॥ १ ॥ २ ॥ याज्ञवल्क्याचें वचन. राजानें आपले शहरामध्यें एक जागा बांधून तेथें विद्वान् ब्राह्मण ठेवावेत आणि त्यांस वेदोक्तधर्म पालन करण्यास सांगावें ॥ ३ ॥ आपले धर्मास विरोध न येतां जो समुदायाचा धर्म असेल तो, तसेंच राजानें केलेला जो धर्म असेल त्याचें संरक्षण करावें ॥ ४ ॥ जो समुदायाच्या द्रव्यास हरण करील किंवा जो चालू असलेल्या मर्यादेचें उल्लंघन करील त्याचें सर्व द्रव्य हरण करून त्यास हद्दपार करावें ॥ ५ ॥ सार्वजनिकहित करणारे मंडळीचें वचन सर्वांनीं ऐकावें. त्याविरुद्ध जो वागेल त्यास राजानें प्रथमप्रतीचा दंड करावा ॥ ६ ॥ सार्वजनिक कामाकरितां कोणी राजाकडे येईल तर राजानें त्याचा सत्कार करून त्याचें सार्वजनिक काम करून त्यास पाठवून द्यावें॥७॥ सार्वजनिक कामाचा विचार करणारे मंडळींतील लोक, धर्म जाणणारे, शुद्ध आणि निर्लोभी असे असावेत. असे जे सार्वजनिक हितचिंतक त्यांचे भाषणाप्रमाणें

सर्वांनीं वागावें ॥ ८ ॥ **श्रेणी** ह्मणजे वेगवेगळे जातीचे असून एकाच प्रकारचा व्यापार करणारे लोकांचा समुदाय. **नैगम** ह्मणजे वेदोक्त मार्गानें चालणारे. **पाखंडी** ह्मणजे वेदबाह्य मार्गानें वागणारे यांचे जे समुदाय त्यांचा हा प्रकार सांगितला आहे. राजानें यांचा जो भेद असेल त्याचे व परंपरेनें चालत आलेली जी वृत्ति तिचें पालन करावें ॥ ९ ॥ याप्रमाणें संविद्व्यतिक्रमाचा निर्णय जाणावा.

## ॥ अथ क्रीतानुशयनिर्णयः ॥

तत्र नारदः–क्रीत्वा मूल्येन यः पण्यं क्रीतं न बहु मन्यते ॥ क्रीतानुशयइत्येतद्विवादपदमुच्यते ॥ १ ॥ क्रीत्वा मूल्येन यः पण्यं दुष्क्रीतं मन्यते क्रयी ॥ विक्रेतुः प्रतिदेयं तत्तस्मिन्नेवान्ह्यविक्षतम् ॥ २ ॥ द्वितीयेऽह्नि ददत्क्रेता मूल्यात् त्रिंशांशमावहेत् ॥ द्विगुणं तु तृतीयेऽह्नि परतः क्रेतुरेव तत् ॥ ३ ॥ नारदः–परिभुक्तं तु यद्वासः क्लिष्टरूपं मलीमसम् ॥ सदोषमपि तत्क्रीतं विक्रेतुर्नभवेत्पुनः ॥ ४ ॥ व्यास नारदौ–तृणकाष्ठेष्टिकासूत्रधान्यसर्वरसस्य च ॥ वस्त्रकुप्यहिरण्यानां सद्यएव परीक्षणम् ॥ ५ ॥ त्र्यहाद्दोह्यं परीक्षेत पंचाहाद्वाह्यमेव च ॥ मुक्तारत्नप्रवालानां सप्ताहात्स्यात्परीक्षणम् ॥ ६ ॥ द्विपदामर्द्धमासं तु पुंसां तद्द्विगुणं स्त्रियाः ॥ दशाहः सर्वबीजानामेकाहोलोहवाससाम् ॥ ७ ॥ सर्व चैतदपरीक्षितक्रीतविषयम् ॥ यत्पुनः परीक्ष्य गृहीतं तत् च न पुनः प्रत्यर्पणीयमिति समयं कृत्वा क्रीतं तद्विक्रेत्रे न प्रत्यर्पणीयम् ॥ ८ ॥ नारदेन–क्रेतापण्यं परीक्षेत प्राक् स्वयं गुणदोषतः ॥ परीक्ष्याभिमतं क्रीतं विक्रेतुर्नभवेत्पुनरिति ॥ ९ ॥ दोषमाच्छाद्य यदाविक्रीतं तदा बहुनापि कालेन परावृत्य दातुं शक्यतएवेत्याह मनुः ॥ १० ॥ नान्यदन्येन संसृष्टरूपं विक्रयमर्हति ॥ न सावद्यं न च न्यूनं न दूरे न तिरोहितम् ॥ ११ ॥ दोह्यादिपरीक्षाप्रसंगेन स्वर्णादेरपि परीक्षामाह याज्ञवल्क्यः–अग्नौ सुवर्णमक्षीणं रजते द्विपलं शते ॥ अष्टौ त्रपुणि सीसे च ताम्रे पंचदशायसि ॥ १२ ॥ कंबलादौ वृद्धिमाह–शते दशपलावृद्धिरौर्णे कार्पासमौत्रिके ॥ मध्ये पंचपला वृद्धिः सूक्ष्मे तु त्रिपला मता ॥ १३ ॥ एतच्चाप्रक्षालितवासोविषयम् ॥ द्रव्यांतरे विशेषमाह ॥ कार्मिके रोमबंधे च त्रिंशद्भागः क्षयोमतः ॥ न क्षयोनचवृद्धिश्च कौशेये वल्कलेषु च ॥१४॥ इति क्रीतानुशयनिर्णयः ॥

## विकत घेतल्या वस्तूंबद्दल पश्चात्तापाचा विचार.

त्याविषयीं नारदाचें वचन. एखादा जिन्नस किंमत देऊन विकत घेऊन नंतर विक्रय

घेणारास तो माल जर न पसंत पडेल त्याविषयीं जो व्यवहार त्यास क्रीतानुशय अशी संज्ञा आहे ॥ १ ॥ किंमत देऊन जिन्नस घेतल्यानंतर विकत घेणारास वाटेल कीं, ही खरेदी चांगली झाली नाहीं तर तेच दिवशीं जशाचा तसाच तो माल ज्यापासून घेतला त्यास परत करावा ॥ २ ॥ दुसरे दिवशीं माल परत केला असतां जी मालाची किंमत दिली असेल त्यांतील तिसावा अंश कमी करून किंमत परत घ्यावी. तिसरे दिवशीं प-रत केल्यास किंमतीचा पंधरावा अंश कमी करावा. ह्याच्यापुढें जिन्नस परत करूं नये ॥ ३ ॥ नारद. परंतु जुनी वस्त्रें विकत घेतेवेळेसच जर डाग पडलेलीं अथवा मळकट असतील तर तें पुढें दोषयुक्त असें असेल तरीही तीं परत करितां येत नाहींत. सबब त्यांची त्याबद्दल दिलेली किंमत परत मिळणार नाहीं ॥ ४ ॥ व्यास व नारद. गवत, काष्ठें, विटा, सूत, धान्यें, सर्व प्रकारचे रस, वस्त्र, कुप्य, सोनें हे जिन्नस घेतेसमयींच परीक्षा करून घ्यावेत ॥ ५ ॥ दूध देणाऱ्या जनावरांची तीन दिवसांत परीक्षा करावी. वाह्य ह्मणजे ओझें वाहणाऱ्या जनावरांची परीक्षा पांच दिवसांत. मोतीं, हिरे, पोंवळें यांची सात दिवसांत परीक्षा करावी ॥ ६ ॥ पुरुषांची परीक्षा पंधरा दिवसांत व स्त्रियांची एका महिन्यांत करावी. ( पूर्वी पुरुष व स्त्रिया गुलाम करून विकत घेण्याची चाल होती ह्मणून हें लिहिलें आहे हल्लीं ही चाल बंद आहे ) सर्व प्रकारच्या बीजांची दहा दिवसांत आणि लोखंड व वस्त्रें यांची एका दिवसांत परीक्षा करावी ॥ ७ ॥ हें सर्व परीक्षा न करितां जिन्नस जर विकत घेतला असेल तर त्या संबंधाचें आहे. चौकशी करून व पुनः परत करावयाचा नाहीं अशा कबुलायत करून घेतलेला जिन्नस परत घेऊं नये व परत देऊं नये ॥ ८ ॥ नारद. विकत घेणारानें प्रथम स्वतः गुणदोषांची परीक्षा करून जिन्नस विकत घ्यावा. परीक्षा करून घेतलेला जिन्नस, विकणारानें पुनः परत घेऊं नये. जिनसांतील दोष गुप्त ठेवून जर जिन्नस विकला असेल तर पुष्कळदिवसांनीं देखील परत घेतला पाहिजे त्यास मनूचें वचन ॥ १० ॥ केशर कुसुंब्यानें युक्त करून विकलें असतां तें दोषयुक्त होतें. अशा इतर वस्तूही मिश्रणानें युक्त केलेल्या तसेंच वजनांत कमी असलेल्या अगर घेणारा दूर उभा राहिल्यामुळें ज्या पदार्थाचे गुणदोष समजले नाहींत, वस्त्रादिकानें आच्छादित करून विकलेल्या अशा वस्तु घेणारानें पुष्कळ दिवसांनीं त्यांतील कपट जाणलें असतां तो जर परत करील तर विकणारानें त्या परत घेतल्या पाहिजेत ॥ ११ ॥ धान्यादिकांच्या परीक्षेच्या प्रसंगानें सुवर्णादिकांची परीक्षा सांगतो. सोनें अग्नींत आटलें असतां कमी होत नाहीं. रुपें शेंकडा दोन पळें ह्मणजे तीन तोळे चार मासे. शिसें व कथील आठ पळें, तांबें पांच पळें, लोखंड दहा पळें अग्नींत जळतें ॥ १२ ॥ लोंकरीचे वस्त्राविषयीं वाढीचा

विचार. टोंकरीचें वस्त्र, कापड यांची शेंकडा दहा पळें वाढ होते. तीं वस्त्रें मध्यम असल्यास पांच पळें व बारीक असल्यास तीन पळें वाढ होते. हें नवें वस्त्र असल्याचें आहे. अन्य द्रव्यांविषयीं विशेष सांगतात. कार्मिक ह्मणजे अनेक रंगांच्या सुतानें विणलेलें वस्त्र तयार झालें असतां वेलबुट्या वगैरे तयार होतात असें जें वस्त्र तें व रोमबद्ध ह्मणजे शालजोडी वगैरे हीं वस्त्रें विणलीं असतां तिसावा हिस्सा तूट येते. कौशेय ह्मणजे रेशमी वस्त्रें, वल्कलें ह्मणजे झाडांच्या अंतरसालीपासून झालेलीं वस्त्रें यांची तूट नाहीं व वाढही नाहीं. याप्रमाणें क्रीतानुशयाचा निर्णय जाणावा.

## ॥ अथ विक्रीयासंप्रदाननिर्णयः ॥

तत्र नारदः–विक्रीयं पण्यं मूल्येन क्रेतुर्यन्न प्रदीयते ॥ विक्रीयासंप्रदानं तद्विवादपदमुच्यते ॥ १ ॥ बृहस्पतिः–जंगमं स्थावरंचैव द्रव्ये द्वे समुदाहृते ॥ क्रयकाले पण्यशब्दउभयोरपि च स्मृतः ॥ २ ॥ नारदः–लोकेऽस्मिन् द्विविधं द्रव्यं स्थावरं जंगमं तथा ॥ क्रयविक्रयधर्म्मेषु सर्वं तत्पण्यमुच्यते ॥ षड्विधस्तस्य च बुधैर्दानादानविधिः स्मृतः ॥ गणिमं तुलिमं मेयं क्रियया रूपतः श्रिया ॥ ४ ॥ गणिमं पूगादि तुलिमं सुवर्णादि मेयं धान्यादि क्रियया भारवहनादिक्रियया क्रीयमाणं वृषभादि रूपतः लावण्यतः क्रीयमाणमंगनादि श्रिया दीप्त्याक्रीयमाणं हीरकादि ॥ ५ ॥ याज्ञवल्क्यः–गृहीतमूल्यं यः पण्यं क्रेतुर्नैव प्रयच्छति ॥ सोदयं तस्य दाप्योसौ दिग्लाभं वा दिगागते ॥ ६ ॥ नारदः–विक्रीय पण्यं मूल्येन यः क्रेतुर्न प्रयच्छति ॥ स्थावरस्य क्षयं दाप्योजंगमस्य क्रियाफलम् ॥ ७ ॥ विक्रीतमपि विक्रेयं पूर्वक्रेतर्यगृह्णति ॥ हानिश्चेत्क्रेतृदोषेण क्रेतुरेव हि सा भवेत् ॥ ८ ॥ राजदैवोपघातेन पण्येदोषमुपागते ॥ हानिर्विक्रेतुरेवासौ याचितस्याप्रयच्छतः ॥९॥ अन्यहस्ते च विक्रीतं दुष्टं वाऽदुष्टवद्यदि ॥ विक्रीणीते दमस्तत्र मूल्यात्तु द्विगुणो भवेत् ॥ १० ॥ नारदः–दीयमानं न गृह्णाति क्रीत्वा पण्यं च यः क्रयी ॥ विक्रीणानस्तदन्यत्र विक्रेता नापराध्नुयात् ॥ ११ ॥ याज्ञवल्क्यः–मत्तोन्मत्तेन विक्रीतं हीनमूल्येन येन वा ॥ अस्वतंत्रेण मूढेन त्याज्यं तस्य पुनर्भवेत् ॥ १२ ॥ अयं च सर्वोपि विधिर्मूल्ये दत्ते तुभ्यमेव देयं नान्यस्य ॥ दत्तमूल्यस्य पण्यस्य विधिरेष प्रकीर्तितः ॥ अदत्तेन्यत्र समयान्न विक्रेतुरतिक्रमइति नारदोक्तेः ॥ १३ ॥ सदोषपण्यविक्रये याज्ञवल्क्यः ॥ ज्ञात्वा सदोषं यः पण्यं विक्रीणीताविचक्षणः ॥ समूल्यादिगुणं दाप्यस्तत्समं विनयं तथा ॥ १४ ॥

## विक्रीयासंप्रदानाचा निर्णय.

( जिन्नस विकून विकत घेणारास न दिल्याचा विचार ) त्याविषयीं नारदाचें वचन.
जिन्नस विकला असून तो घेणाराच्या वाऱ्यांत दिला नसेल तर त्या व्यवहारास विक्रीया-
संप्रदान असें ह्मणतात ॥ १ ॥ विकावयास योग्य अशा जिनसांचे स्थावर आणि जंगम
असे दोन भेद आहेत. विकत घेण्यास व विकण्यास योग्य अशा पदार्थांस पण्य असें
ह्मणतात ॥ २ ॥ तें पण्य सहा प्रकारचें आहे. १ गणिम, २ तुलिम, ३ मेय, ४ क्रि-
यातः, ५ रूपतः आणि ६ श्रिया. गणिम ह्मणजे मोजून देण्यास योग्य, जसें सुपारी,
नारळ इत्यादि. तुलिम ह्मणजे तोलून विकण्यास योग्य सोनें वगैरे. मेय ह्मणजे मापानें
मोजून देण्यास योग्य, जसें तांदूळ, गहूं इत्यादि धान्यवगैरे. क्रियमाण ह्मणजे क्रियेनें
परीक्षा करून घेण्यास योग्य बैल, घोडा, ह्मैस इत्यादि. रूपतः ह्मणजे लावण्यानें घे-
ण्यास योग्य, जसें वेश्या, स्त्रिया इत्यादि. श्रिया ह्मणजे तेजानें परीक्षा करून घेण्यास
योग्य, पाच, हिरे इत्यादि जिन्नस ॥ ३ ॥ याज्ञवल्क्याचें वचन. ज्या जिनसाची
किंमत घेतली आहे असा जिन्नस विकणारा मनुष्य खरेदी घेणारास जर न देईल तर
राजानें त्या मनुष्यापासून विकत घेणारास नफ्यासुद्धां देववावा. जिन्हाईक जर परदेशां-
तून आलेला असेल तर त्या वस्तूवर परदेशांत जो नफा होण्याजोगा असेल तो त्यास
( विकत घेणारास ) देववावा ॥ ४ ॥ नारद. किंमत घेऊन जिन्नस विकला असून
विकणारा मनुष्य घेणारास तो जिन्नस जर न देईल तर तो जिन्नस स्थावर असल्यास
स्थावराच्या नुकसानीसुद्धां तो खरेदी करणारास देववावा. जंगम असल्यास त्याच्या
क्रियेपासून होणारें जें फळ तेंही द्यावें. ह्मणजे स्थावर शेत असेल तर त्यांत उत्पन्न
होणाऱ्या धान्यादिकांची नुकसानी. जंगम ह्मणजे घोडा, बैल, ह्मैस इत्यादि असल्यास
त्यापासून फळ होणारें भाडें, दूध वगैरे फळ मिळणारें याचें नुकसान ॥ ७ ॥ विकलेला
पदार्थ प्रथम ज्या मनुष्यानें खरेदी केलेला आहे तो मनुष्य जर तो न घेईल तर तो वि-
कावा. त्यांत जो तोटा येईल तो प्रथम ज्यानें खरेदी केली आहे त्याचाच समजावा
॥ ८ ॥ विकत घेतलेला जिन्नस घेणारा मागत असतांही विकणारा त्यास जर न देईल
आणि नंतर तो जिन्नस राजदैविक उपद्रवानें जर खराब होईल तर तें नुकसान विकणा-
राचेंच आहे ॥ ९ ॥ जो मनुष्य प्रथम एका मनुष्यास जिन्नस विकला असून तोच जि-
न्नस दुसऱ्यास जर विकील अथवा दोषयुक्त जिन्नस असून निर्दोष आहे असें सांगून
विकील तर त्या दोघांसही त्या जिनसांच्या दुप्पट दंड करावा ॥ १० ॥ नारद. विकत
घेतलेला माल विकणारा मनुष्य देत असतां घेणारा मनुष्य तो माल आपले ताब्यांत न

घेईल तर विकणारानें तो माल दुसऱ्यास विकला असतां त्यामुळें विकणारा अपराधी होत नाहीं ॥ ११ ॥ याज्ञवल्क्य. एकादा जिन्नस मत्तमनुष्यानें तसेंच भ्रमिष्ट झालेल्या मनुष्यानें कमी किमतीस विकला असतां व तसेंच ज्यास मालकी नाहीं अशा मनुष्यानें विकला असतां तसेंच वेडगळ मनुष्यानें विकला असतां ज्यानें विकत घेतला आहे त्यानें ज्याचा माल असेल त्यास परत दिला पाहिजे. कारण ती खरेदी रद्द समजावी. सबब तो माल विकणाराचाच आहे ॥ १२ ॥ हा सर्व प्रकार मालाची किंमत दिल्यानंतर हा माल तुलाच देईन दुसऱ्यास देणार नाहीं असा जर करार झाला असेल तर अथवा त्या मालाची किंमत दिली असतांना आहे. जर किंमत दिली नसेल अथवा करार झाला नसेल तर दुसऱ्यास विक्री करण्यास हरकत नाहीं अशी नारदाची उक्ति आहे ॥१३॥ मालांत दोष असून विकल्यास याज्ञवल्क्याचें वचन. एकादा लबाड मनुष्य मालांत कांहीं दोष आहे असें समजूनही तो माल जर विकील तर त्या मालाची दुप्पट किंमत विकत घेणारास विकणाराकडून देववावी आणि मालाच्या किंमतीइतका दंड राजानें त्यापासून घ्यावा ॥ १४ ॥ याप्रमाणें विक्रीयासंप्रदानाचा निर्णय जाणावा.

## ॥ अथ स्वामिपालविवादनिर्णयः ॥

तत्र मनुः–पशुषु स्वामिनां चैव पालानां च यथाविधि ॥ विवादं संप्रवक्ष्यामि यथावद्धर्मतत्त्वतः ॥ १ ॥ नारदः–उपानयेद्गां गोपालः प्रत्यहं रजनीक्षये ॥ चीर्णाः पीतांश्च ता गोपः सायाह्ने प्रत्युपानयेत् ॥ २ ॥ रक्षार्थमुपनयेत् चीर्णाः भक्षिततृणाः पीताः पीतजलाः सायाह्ने ईषदवशिष्टदिने प्रत्युपानयेत्स्वामिने समर्पयेत् ॥ ३ ॥ याज्ञवल्क्यः–यथार्पितान् पशून्गोपः सायं प्रत्यर्पयेत्तथा ॥ प्रमादान्मृतनष्टांश्च प्रदाप्यः कृतवेतनः ॥ ४ ॥ प्रमादः पालकस्येत्यादि यथैव प्रातःसमये व्रणादिदोषरहिताः पशवः स्वामिना च गोपालाय समर्पिताः तथैव सायंसमये गोपस्तानानीय समर्पयेत् ॥ प्रमादात् हृतां नष्टां वा गां दाप्यः स यदि कृतवेतनो भवेदिति दीपकलिका ॥ ५ ॥ मनुः–दिवा वक्तव्यता पाले रात्रौ स्वामिनि तद्गृहे ॥ योगक्षेमेऽन्यथा चेत् पालो वक्तव्यतामियात् ॥ ६ ॥ वक्तव्यता पर्यनुयोगः यदि योगक्षेमौ अन्यथा रात्रावपि गोपस्य व्यवस्थापितौ तदा स एव रात्रावपि वक्तव्यतामियादित्यर्थः ॥ ७ ॥ अत्रापवादमाहतुर्मनुनारदौ–विघुष्य तु हृतं चौरैर्न पालो दातुमर्हति ॥ यदि देशे च काले च स्वामिनः स्वस्य शंसति ॥ ८ ॥ अजाविके तु संरुद्धे वृकैः पाले त्वनायति ॥ यां प्रसह्य वृको हन्यात् पाले तत्किल्बिषं भवेत् ॥ ९ ॥ अजा-

विकशब्देन पशव उपलक्ष्यंते ॥ संरुद्धे अभिभूते अजाविके वृकैः परिवृते सति पा-
लेऽनागच्छति यामजामेडकां वा बलेन वृकोहन्याचत्र पालोदोषभागित्यर्थः ॥ १० ॥
नारदः–अनेन सर्वपालानां विवादः समुदाहृतः ॥ मृतेषु च विशुद्धिः स्याद्वालशृं-
गादिदर्शनात् ॥ ११ ॥ अनेन एतेन सर्वपालानामश्वादिपालानामपि वालशृंगादि-
दर्शनात् ॥ केनापि प्रकारेण मृतत्वं निश्चितं कुर्यादिति तात्पर्यार्थः ॥ १२ ॥ व्य-
क्तमाह मनुः–कर्णौ चर्म च वालांश्च वस्तिं स्नायूनि रोचनाः ॥ पशुस्वामिनि द-
द्याच्च मृतेत्वंगानि दर्शयेत् ॥ १२ ॥ कर्णावित्यादिना मृतपशोरसाधारणचिह्नान्यु-
पलक्ष्यंते ॥ अंगानीत्यत्र व्यवहिते मृते अंगानि चिरावस्थायीनि शृंगादीनि मृते
शृंगादीत्यपिपालः ॥ १४ ॥ गवादिप्रचारार्थं भूभागमाह याज्ञवल्क्यः–धनुःशतं
परीणाहोग्रामाद्ग्रामांतरं भवेत् ॥ द्वे शते खर्वटस्य स्यात्प्रचारस्य चतुःशतम् ॥ परी-
णाहो गवादिप्रचारार्था भूः ॥१५॥ अयमेवपरीणाहोः ॥ धनुःशतं परीणाहोग्रामस्य
स्यात्समंततइति मनूक्तेः ॥ १६ ॥ अनेककालकूपीवलयुक्तोग्रामः खर्वटः ॥ बहुकं-
टकसंतानइति केचित् ॥ १७ ॥ परसस्यादिनाशे पशुस्वामिनोदंडमाह याज्ञवल्क्यः
मापानष्टौ तु महिषी सस्यघातस्य कारिणी ॥ १८ ॥ दंडनीया तदर्द्धं तु गौस्तदर्ध-
मजाविकम् ॥ भक्षयित्वोपविष्टानां यथोक्तात् द्विगुणोदमः ॥ १९ ॥ सममेषां वि-
वीतेपि खरोष्ट्रमहिषीसमम् ॥ विवीतं तृणकाष्ठादिसंचयस्थलम् ॥ २० ॥ यावत्सस्यं
विनश्येत तावत्सात्क्षेत्रिशाः फलाः ॥ गोपस्ताडचस्तु गोस्वामी पूर्वोक्तं दंडमर्हति
॥ २२ ॥ अदंडचाश्चोत्सवे गावः श्राद्धकाले तथैवच ॥ व्यासः–आक्रम्य च द्वि-
जैर्भुक्तं परिक्षीणैश्च बांधवैः ॥ गोभिश्च नरशार्दूल वाजपेयाद्विशिष्यते ॥ २३ ॥
गोभिर्विनाशितं धान्यं यो नरः प्रतियाचते ॥ पितरस्तस्य नाश्नंति नाश्नंति त्रिदि-
वौकसः ॥ २४ ॥ इति स्वामिपालनिर्णयः ॥

## स्वामिपालविवादाचा निर्णय.

मालक आणि गुराखो यांच्यामधील वादाचा विचार त्याविषयीं मनूचें वचन.
गाई इत्यादि जनावराविषयीं गुराखी व मालक यांचा जो वाद होतो तो यथार्थ रीतीनें
सांगतो ॥ १ ॥ नारद. गुराख्यानें प्रतिदिवशीं प्रातःकाळीं जनावरें घेऊन रानांत जावें
व त्यास दिवसा तृणादिक चरावयास लावून पाणी पाजून किंचित् दिवस अवशेष राहिला
आहे असे सायंकाळचे वेळीं वीं आणून मालकाचे स्वाधीन करावींत ॥ २ ॥ ३ ॥ याज्ञ-
वल्क्य. प्रातःकाळीं मालक ज्या स्थितींत असलेलीं जनावरें गुराख्याच्या स्वाधीन करील

तशींच गुराख्यानें सायंकाळीं आणून मालकास द्यावींत. आळशीपणामुळें अथवा हयगय केल्यानें एकादें जनावर चुकून गेलें अथवा कोणी चोरून नेलें तर पगार घेणाऱ्या गुराख्यानें तें भरून द्यावें ॥ ४ ॥ ५ ॥ मनु. गुराख्याचे स्वाधीन केलेलीं गुरें दिवसा त्याकडून रक्षण न होईल तर गुराखी अपराधी होतो. रात्रीं मालकाचे घरीं जनावरें आणून घातल्यानंतर मालकाकडून जर रक्षण न होईल तर मालक अपराधी होतो. कदाचित रात्रींही गुराख्याचे स्वाधीन गुरें असतां जर त्यांचें संरक्षण न होईल तर गुराखी अपराधी होतो ॥ ६ ॥ ७ ॥ यास अपवाद. गुराखी आरडाओरड करीत असतां चोरांनीं जर जनावरें हरण करून नेलीं तर तीं गुराख्याकडून मालकास भरून देऊं नयेत. परंतु गुराख्यानें त्याच वेळीं गांवांतील लोकांस व मालकास चोरांनीं गाई हरण केल्याचें कळविलें असेल तर त्याकडून भरून घेऊं नयेत ॥ ८ ॥ शेळ्या, मेंढ्या यांच्या समोर लांडगा आला असतां गुराख्यानें त्याला दूर करण्याचा प्रयत्न करावा. तसें केलें असूनही जर तो एकाद्या शेळीचा अथवा मेंढीचा नाश करील तर त्याबद्दल गुराख्याचा अपराध नाहीं. गुराखी समोर न गेल्यामुळें जर शेळ्यांचा नाश होईल तर त्याबद्दलचा दोष गुराख्याकडे आहे ॥९॥ येथें शेळ्या, मेंढ्या शब्दानें सर्व पशू घ्यावयाचे आहेत. गुराखी पशु संरक्षण करीत असतां आलेल्या हिंसक प्राण्याबद्दल गुराख्यानें प्रयत्न करावा. तसें केलें ह्मणजे तो दोषमुक्त होत नाहीं ॥ १० ॥ नारद. याप्रमाणें सर्व जनावरांचे जे रक्षण करणारे यांच्या संबंधाचा वाद जाणावा. पशु मृत झाले असतां त्यांचे केंस, शिंगें इत्यादि दाखविलीं ह्मणजे गुराखी अपराधरहित होतो ॥ १२ ॥ मनु. राजदैविक पीडेनें गुरें मेलीं असतां कान, कातडें, शेंपूट, वसा, स्नायू, गोरोचन हीं पशूंच्या मालकास द्यावींत. पशू मरण पावले असतां त्यांचीं अंगेंही नेऊन दाखवावींत ॥ १३ ॥ १४ ॥ गाई व इतर जनावरांस चारण्यासाठीं किती जमीन सोडावी याविषयीं याज्ञवल्क्याचें वचन. लहानगांवापासून शेताचें अंतर चारशें हातांपेक्षां कमी नसावें. मोठे गांवापासून आठशें हात जमीन सोडून द्यावी ॥ १५ ॥ गाई वगैरे चारण्यासाठीं जमीन सोडावी ह्मणून जें सांगितलें त्याविषयीं मनूचें मत असें आहे कीं, गांवाचे सभोंवतीं जनावरें चारण्याकरितां चारशें चारशें हात जमीन सोडावी ॥ १६ ॥ ज्या गांवांत पुष्कळ शेतकरी व कष्टाचे लोक राहतात त्यास खर्वट अशी संज्ञा आहे. कित्येकांचे मतें काटशेटे जेथें असतात त्यास खर्वट अशी संज्ञा आहे ॥ १७ ॥ जनावरांनीं दुसऱ्याचें धान्य वगैरे खाईल त्याबद्दल पशूचे मालकास दंड याज्ञवल्क्य सांगतो. म्हशीनें धान्याची नुकसानी केल्यास तिच्या मालकाकडून दररोज म्हशीबद्दल आठ माष दंड घ्यावा धान्याचें नुकसान

झालें असेल त्यास घावें. गाईनें नुकसान केल्यास लशीचे अर्धा दंड घावा. शेळ्या, मेंढ्यां यांनीं नुकसान केलें असतां गाईचे अर्ध्या हिश्शानें शेळ्या, मेंढ्यांच्या मालका-कडून दंड घ्यावा. पीक खाऊन जनावरें शेतांत बसतील तर सांगितलेल्या दंडापेक्षां दुप्पट दंड घ्यावा ॥ १८ ॥ जेथें गवत वगैरे सांठवून ठेविलें असेल तेथें जनावरें जाऊन जर खातील तरीही दुप्पट दंड घ्यावा. लशीबद्दल जो दंड तोच गाढव, उंट यांनीं पिकें खाल्लीं असतांना घ्यावा ॥ १९ ॥ जितकें धान्याचें नुकसान झालें असेल तितकें धान्य शेताचे मालकास घावें व गुराख्यास ताडण करावें व पूर्वीं सांगितलेला दंडही धन्यापासून घेतलाच पाहिजे ॥ २० ॥ उशनाचें वचन. उत्सवाचे वेळीं, श्राद्धाचे वेळीं गाईनें धान्यादिक भक्षण केलें असतां त्याबद्दल दंड घेऊं नये. व्यासाचें वचन. गरीबी स्थितींत आलल्या ब्राह्मणानीं अगर तसेंच बंधुवर्गानीं अगर गाईनीं ज्याचें धान्यादि भक्षण केलें असेल तें वाजपेय यज्ञ केल्यापेक्षांही श्रेष्ठ आहे असें जाणावें ॥ २१ ॥ २२ ॥ २३ ॥ ज्या मनुष्याचें धान्य गाईनें खालें म्हणून तें धान्य गाईचे मालकापासून जो भरून घेईल त्याचें अन्न देवपितर ग्रहण करीत नाहींत ॥ २४ ॥ याप्रमाणें स्वामिपालाचा निर्णय जाणावा.

## ॥ अथ सीमानिर्णयः ॥

सा च चतुर्विधा जनपदसीमा ग्रामसीमा क्षेत्रसीमा गृहसीमा चेति ॥ तत्र विवादः षट्प्रकारोभवति तथा च कात्यायनः-आधिक्यं न्यूनता चांशे अस्तिनास्तित्वमेव च ॥ अभोगभुक्तिः सीमा च षड्भूवादस्य हेतवः ॥ १ ॥ मनुः-सीमां प्रति समुत्पन्ने विवादे ग्रामयोर्द्वयोः ॥ ज्येष्ठे मासि नयेदेनां सुप्रकाशेषु सेतुषु ॥ २ ॥ सीमावृक्षांस्तु कुर्वीत न्यग्रोधाश्वत्थकिंशुकान् ॥ शाल्मलीशालतालांश्च क्षीरिणश्चैव पादपान् ॥ ३ ॥ गुल्मान्वेणूंश्च विविधाञ्शमीवल्लीस्थलानि च ॥ शरान्कुब्जकगुल्मांश्च तथा सीमा न नश्यति ॥ ४ ॥ तडागान्युदपानानि वाप्यः प्रस्रवणानि च ॥ सीमासंधिषु कार्याणि देवतायतनानि च ॥ ५ ॥ उपच्छन्नानि चान्यानि सीमालिंगानि कारयेत् ॥ सीमाज्ञाने नृणां वीक्ष्य लोके नित्यं विपर्ययम् ॥ ६ ॥ अश्मनोऽस्थीनि गोवालांस्तुषान्भस्म कपालिकाः ॥ करीषमिष्टकांगारांश्छर्करावालुकास्तथा ॥ ७ ॥ यानि चैवं प्रकाराणि कालाद्भूमिर्न भक्षयेत् ॥ तानि संधिषु सीमायामप्रकाशानि कारयेत् ॥ ८ ॥ बृहस्पतिः-करीषास्थितुषांगारशर्कराश्मकपालिकाः ॥ सिकतेष्टकगोवालकार्पासास्थीनि भस्म च ॥ ९ ॥ प्रक्षिप्य कुंभेष्वेतानि सीमांतेषु निधापयेत् ॥ ततः पौगण्डबालानां प्रयत्नेन प्रदर्शयेत् ॥ १० ॥ वार्द्धक्ये च शिशूनां ते

दर्शयेयुस्तथैव च ॥ एवं परंपराज्ञाने सीमाभ्रांतिर्न जायते ॥ ११ ॥ मनुः-एतैर्लिंगैर्नयेत्सीमां राजा विवदतां नृणां ॥ पूर्वभुक्त्या च सततमुदकस्यागमेन च ॥१२॥ मनुः-यदि संशयएव स्याल्लिंगानामपि दर्शने ॥ साक्षिप्रत्ययएव स्यात्सीमावादे विनिश्चयः ॥ १४ ॥ साक्ष्यभावे च तत्वांशे ग्रामाः सीमांतवासिनः ॥ सीमायांनिर्णयं कुर्युः प्रयता राजसन्निधौ ॥ १५ ॥ याज्ञवल्क्यः-सामंतावासमग्रामाश्चत्वारोथ दशापि वा ॥ रक्तस्रग्वसनाः सीमां नयेयुः क्षितिधारिणः ॥ १६ ॥ ग्रामोग्रामस्य सामंतः क्षत्रं क्षेत्रस्य कीर्तितम् ॥ गृहं गृहस्य निर्दिष्टं समंतात्परिरभ्य च ॥ १७ ॥ नैकः समुन्नयेत्सीमां नरः प्रत्ययवानपि ॥ गुरुत्वादस्य कार्यस्य क्रियैषा बहुषु स्थिता ॥ १८ ॥ सीमायां च ऋणे कोशे पादस्पर्शे तथैवच ॥ त्रिपक्षपक्षसताहं दैवराजिकमिष्यते ॥ १९ ॥ मनुः-यथोक्तेन नयंतस्ते पूयंते सत्यसाक्षिणः ॥ विपरीतं नयंतस्तु दाप्यास्तु द्विशतं दमम् ॥ २० ॥ नारदः-अथ चेदनृतं ब्रूयुः सामंताः सीमनिर्णये ॥ सर्वे पृथक्पृथग्दंड्या राज्ञा मध्यमसाहसम् ॥ २१ ॥ कात्यायनः-बहूनां तु गृहीतानां न सर्वे निर्णयं यदि ॥ कुर्युर्भयाद्वा लोभाद्वा दाप्यास्तूत्तमसाहसम् ॥ २२ ॥ याज्ञवल्क्यः-अभावे ज्ञातृचिह्नानां राजा सीमप्रवर्तिता ॥ मनुः-सीमायामविपह्यायां स्वयं राजा च धर्मवित् ॥ प्रादिशेद्भूमिमेतेषामुपकारादिति स्थितिः ॥ २३ ॥

## सीमेचा निर्णय.

सीमा ह्मणजे शीव, हद्द. ती चार प्रकारची. देशाची सीमा, गांवाची सीमा, शेताची सीमा व घराची सीमा. या सीमेविषयींचा वाद सहा प्रकारचा होतो. त्याविषयीं कात्यायनाचें वचन. आधिक्य ह्मणजे माझी येथें अधिक जमीन आहे असें एकानें ह्मटलें असतां दुसरा ह्मणतो माझी जमीन बरोबर आहे. माझ्यांत अधिक नाहीं असा अंशाविषयीं आधिक्याचा वाद. न्यूनता ह्मणजे माझी जमीन कमी आहे असा वाद. अंशे ह्मणजे माझा हिस्सा आहे याचा हिस्सा नाहीं असें ह्मणणें. अभोगभुक्ति ह्मणजे माझ्या या जमिनीवर याचा भोगवटा नसून हा हल्लीं उपभोग करीत आहे असें ह्मटलें ह्मणजे दुसरा ह्मणतो मी पहिल्यापासून या जमिनीचा उपभोग घेत आहें. सीमा ह्मणजे हा शेताची हीच शीव आहे, असा सहा प्रकारचा सीमेविषयीं वाद जाणावा. मनूचें वचन दोन्हीं गांवाचे सीमेविषयीं तंटा उत्पन्न झाला असतां ज्येष्ठ महिन्यामध्यें शिवेच्या जमिनीत.गवत वगैरे वाढून गेल्यानें शिवेच्या जमिनी चांगल्या रीतानें दिसूं लागल्या ह्मणजे

त्याचा निर्णय करावा ॥ २ ॥ शिवेवर झाडें लावावींत. वड, पिंपळ, पळस, कांटेसांवरी, ताड व ज्यांस चीक येतो असे वृक्ष शेर वगैरे, गुल्म, वेळू, सौंदड, वेली, ढेकडी शेर, कुब्जक हीं झाडें शिवेवर लाविलीं असतां सीमा नाहींशी होत नाहीं ॥ ३ ॥ ४ ॥ तळीं, आड, विहिरी, झरे, ओढे, देवालयें हीं शिवेच्या संधीच्या ठिकाणीं करावींत ॥ ५ ॥ शीव समजण्याकरितां गुप्त दुसऱ्याही खुणा शिवेवर कराव्यात, कारण उत्तरोत्तर मनुष्यांच्या बुद्धीचा विपर्यास होत आहे ॥ ६ ॥ ज्या गुप्त खुणा सीमेच्या संधीवर केल्या असतां कालेंकरून भूमि नाश करणार नाहीं अशा गुप्त खुणा कराव्या. ह्मणजे पाषाण पुरून ठेवावे. हाडें, पशूंचीं शेपटें, कोंडा, राख, खापऱ्या, शेणी, विटा, कोळसे, रेती, मोठी वाळू, अशा प्रकारचे पदार्थ, सीमेच्या भूमीमध्यें घालून व माती घालून सीमा तयार केल्यानें सीमा नाहींशा होत नाहीं ॥ ७ ॥ ८ ॥ बृहस्पति. वाळलेलें शेण, हाडें, कोंडा, कोळसे, कंकर, खापरें, वाळू, विटा, गाईचे केंस, सरक्या, राख हे खापराचे घागरींत भरून सीमेच्या अंतर्भागांत जमिनींत पुरून ठेवावे. नंतर पौगंडबालक ह्मणजे प्रौढ मुलें यांस त्या जमिनीच्या सीमेच्या खुणा दाखवाव्या ॥ ९ ॥ १० ॥ याप्रमाणेंच आपली वृद्धावस्था झाली असतां शेताच्या हद्दीच्या खुणा मुलांसही दाखवून ठेवाव्या. याप्रमाणें परंपरेनें ज्ञान झालें ह्मणजे शिवेविषयीं भ्रांति उत्पन्न होत नाहीं ॥ ११ ॥ मनूचें वचन. ह्या सर्व प्रसिद्ध व गुप्त अशा सांगितलेल्या खुणा पाहून वाद करणारे जे मनुष्य त्यांच्या शिवेचा निर्णय राजानें करावा. तसाच अविच्छिन्न ज्याचा भोगवटा असेल त्या धोरणानें आणि दोन्हीं गांवांच्या मध्यभागानें वाहणारा जो पाण्याचा प्रवाह त्यांच्या योगानें विवाद करणाऱ्याच्या हद्दीचा निर्णय करावा ॥ १२ ॥ १३ ॥ शिवेच्या खुणा पाहिल्या असूनही जर संशय उत्पन्न होईल तर हद्दीच्या निर्णयाबद्दलचे जे साक्षीदार असतील त्यांचीं भाषणें ऐकून शिवेचा निश्चय ठरवावा ॥ १४ ॥ साक्षीदार नसतील तर आसपासचे गांवांत राहणारे लोक आणून राजाचे समक्ष शिवेचा निश्चय ठरवावा ॥ १५ ॥ याज्ञवल्क्य. सामंत ह्मणजे शेजारचे गांवचे लोक अथवा कज्जांतील जमीन ज्या गांवचे सीमेंत असेल त्या गांवांतील समसंख्या जसें ४, ८ व १० मनुष्यें यानीं तांबड्या फुलांच्या माळा गळ्यांत घालून तांबडीं वस्त्रें नेसून थोडीशी माती डोकीवर घेऊन खरी जी शींव असेल ती दाखवावी ॥ १६ ॥ गांवाच्या शिवेचा निर्णय करण्यास शिवेच्या आसपास असणारीं जीं गांवें त्यांत राहणारे जे लोक ते निर्णय करण्यास घ्यावेत. शेताच्या शिवेचा निर्णय करण्यास आसपास ज्यांचीं शेतें असतील ते शेतकरी. घराच्या हद्दीच्या निर्णयास घरास टेंगून

असणारीं जीं घरें त्यांत असणारे जे लोक त्यांस आणून त्यांच्या विचारानें हद्दीचा निर्णय ठरवावा ॥ १७ ॥ शिवेचें ज्ञान एका मनुष्यास असेल तरीही एका मनुष्यानें शीव दाखवूं नये. कारण हा विषय महत्वाचा असल्यामुळें शीव दाखविण्याचें काम पुष्कळ मनुष्यांवर अवलंबून आहे ॥ १८ ॥ शिवेच्या निर्णयाचे ठायीं, तसेंच ऋणाविषयीं कोश ह्मणजे दिव्य त्याबद्दल एकाद्या पवित्र मनुष्याचे पायास स्पर्श करून शपथ वाहिली असतां हीं कामें खोटीं केलीं तर दीड महिना, पंधरा दिवस अथवा सात दिवसांचे आंत देवते संबंधानें अथवा राजासंबंधानें पीडा, खोटी शपथ वाहणारास अथवा खोटें सांगणारास होते ॥ १९ ॥ मनु. पूर्वी सांगितलेल्या प्रकारानें खऱ्या रीतीनें जे सीमा दाखवून देतील ते आपल्या पातकांपासून मुक्त होतात व जे शीव खोटी दाखवितील त्यांस राजानें दोनशेंपण दंड करावा ॥ २० ॥ नारद. आसपासची मंडळी शिवेच्या निर्णयाविषयीं जर खोटें बोलतील तर राजानें प्रत्येकास मध्यम रीतीचा दंड करावा ॥ २१ ॥ कात्यायन. पुष्कळ बोलावून आणलेले असे लोक सीमेचें ज्ञान असूनही भयानें अथवा लोभानें जर न सांगतील तर राजानें मोठा दंड करावा ॥ २२ ॥ याज्ञवल्क्य व मनु. सीमेचें ज्ञान असणारीं माणसें नसतील अथवा सीमेच्या खुणाही नसतील तर राजानें शीव ठरवून द्यावी. मनु. शीव कोणत्याही रीतीनें ठरवितां येत नसेल तर धर्मवेत्त्या राजानें स्वतः आपण तेथें जाऊन तंट्याची जी जमीन असेल ती ज्या मनुष्यास विशेष उपयोगीं पडत असेल त्या मनुष्यास जमीन द्यावी ॥ २३ ॥

## ॥ अथ गृहादिसीमाविषये ॥

बृहस्पतिः–निवेशकालादारभ्य गृहवाह्यांगणादिकम् ॥ येन यावद्यथाभुक्तं तस्य तन्न विचालयेत् ॥ २४ ॥ कात्यायनः–प्रणाल्यश्च तथा निर्व्यूहवेदिकाः ॥ चतुःशालं स्यंदनिकाः प्राड्निर्दिष्टा न चालयेत् ॥ २५ ॥ कात्यायनः–मेखला भ्रमनिष्कासगवाक्षान्नोपरोधयेत ॥ प्रणालीं गृहवास्तुं च पीडयन्दंडभाग्भवेत् ॥ २६ ॥ मेखला भित्तिमूलबंधः ॥ भ्रमोजलनिर्गमः ॥ निष्कासोहर्म्यादिविनिर्गतकाष्ठादिनिर्मितमस्पृष्टभूमिकमुपवेशनस्थलमिति मदनः ॥ निवेशसमयादूर्ध्वं नैते योज्याः कदाचन ॥ दृष्टिपातं प्रणालींच न कुर्यात्परवेश्मनि ॥ २७ ॥ बृहस्पतिः–वर्चःस्थानं वह्निचयं गर्तोच्छिष्टानुसेचनम् ॥ अत्यारात्परकुड्यस्य कर्तव्यं न कदाचन ॥ २८ ॥ कात्यायनः–निम्नप्रोदकचक्रं च वह्निश्वभ्रनिवेशनम् ॥ हस्तद्वयं समुत्सृज्य परकुड्यान्निवेशयेत् ॥ २९ ॥ बृहस्पतिः–यांत्यायांतिजनायेन पशवश्चानिवारिताः ॥ तदु-

ध्यते संसरणं न रोद्धव्यं तु केनचित् ॥ ३० ॥ नारदः–अवस्करस्थलश्वभ्रभ्रमस्यं-दिनिकादिभिः ॥ चतुष्पथसुरस्थानराजमार्गांश्च रोधयेत् ॥ ३१ ॥ कात्यायनः–सर्वे जनाः सदा येन प्रयांति सचतुष्पथः॥अनिषिद्धायथाकालं राजमार्गः सउच्यते ॥ ३२ ॥ बृहस्पतिः–यस्तत्र संकरं श्वभ्रं वृक्षारोपणमेव वा ॥ कामात्पुरीषं कुर्याच्च तस्य दंडस्तु माषकः ॥ ३३ ॥ मनुः–समुत्सृजेत् राजमार्गे यस्त्वमेध्यमनापदि ॥ सद्वौ कार्षापणौ दद्यादमेध्यं चाशुशोधयेत् ॥ आपद्गतस्तथावृद्धोगुर्विणी वालएव वा ॥ परिभाषणमर्हंति तच्चशोध्यमिति स्थितिः ॥ ३४ ॥ कात्यायनः–तडागोद्यानतीर्थानि योऽमेध्येन विनाशयेत् ॥ अमेध्यं शोधयित्वा तु दंडयेत्पूर्वसाहसम् ॥ ३५ ॥ याज्ञवल्क्यः–मर्यादायाः प्रभेदे तु सीमातिक्रमणे तथा ॥ क्षेत्रस्य हरणे दंडा अधमोत्तममध्यमाः ॥ ३६ ॥ गृहं तडागमारामं क्षेत्रं वापीमपाहरन् ॥ शतानि पंचदंड्यःस्यादज्ञानाद्विशतोदमः ॥ ३७ ॥ कात्यायनः–सीमामध्ये तु जातानां वृक्षाणां क्षेत्रयोर्द्वयोः ॥ फलं पुष्पं च सामान्यंक्षेत्रस्वामिषु निर्दिशेत् ॥ ३८ ॥ सएव–अन्यक्षेत्रेषु जातानां शाखापत्राण्यसंस्थिताः ॥ स्वामिनं तं विजानीयाद्यस्य क्षेत्रेषु संस्थिताः ॥ ३९ ॥ याज्ञवल्क्यः–स्वामिने योऽनिवेद्यैव क्षेत्रे सेतुं प्रवर्त्तयेत् ॥ उत्पन्ने स्वामिनोभोगस्तदभावे महीपतेः ॥ ४० ॥ सएव–न निषेध्योल्पबाधस्तु सेतुः कल्याणकारकः ॥ परभूमिं हरन् कूपः स्वल्पक्षेत्रे बहूदकः ॥ ४१ ॥ नारदः–पूर्ववृत्तसमुत्सन्नमपृष्ट्वा स्वामिनं तु यः ॥ सेतुं प्रवर्त्तयेद्यस्तु न सतत्फलभाग्भवेत् ॥ ४२ ॥

## गृहादिकांच्या मर्यादांविषयींचा विचार.

ज्यावेळीं आपण ज्या घरांत राहिलों त्यावेळीं घराच्या बाहेरील अंगण, भिंती इत्यादि पूर्वींच्या मनुष्यानें जसा ज्याचा उपभोग घेतला असेल त्या तशाच ठेवाव्या. त्यांत बदल करूं नये ह्मणजे पूर्वींच्या मालकाचा त्या घराच्या अंगण, भिंती इत्यादिकांविषयीं जितका हक्क असेल तितकाच त्या मनुष्याचा आहे ॥ २४ ॥ झरोके, पन्हाळ, निर्व्यूहवेदिका ह्मणजे भिंतींतील खांब, चौसोपी. स्यंदनिका ह्मणजे थळचण हीं पूर्वीं आपण घर बांध्यांत घेतेसमयीं जशीं असतील तशींच असावी त्यांत चलित करूं नयेत ॥ २५ ॥ कात्यायन. मेखला ह्मणजे भिंतीचा पाया. भ्रम ह्मणजे पाणी जाण्याचा मार्ग. निष्कास ह्मणजे मदनाच्या मवानें सज्जा आहे. गवाक्ष ह्मणजे झरोके. पन्हाळ ह्मणजे गृहवास्तु. या पूर्वींच्या जशा असतील तशाच ठेवाव्या, ह्मणजे त्यास प्रतिबंध

करूं नये. जो प्रतिबंध करील त्यास दंड केला पाहिजे ॥ २६ ॥ कात्यायन. घरांत प्रवेश केल्या दिवसाचे पुढें मोऱ्या, सज्जे, दारें, वगैरे हीं नवीन करूं नयेत. त्याप्रमाणेंच खिडक्या, झरोकें, जाळ्या, पन्हाळ हीं दुसऱ्याच्या घरांत जातील अशीं करूं नयेत. बृहस्पतीचें वचन. वर्चस्थान ह्मणजे शौचकूप. वह्निचय ह्मणजे विस्तवाची जागा. उष्टें-पाणी वगैरे टाकण्याच्या मोऱ्या हे दुसऱ्याच्या भिंतीजवळ कधींही करूं नयेत ॥ २७ ॥ २८ ॥ कात्यायन. विष्ठा, मूत्र, वाईट पाणी टाकण्याची जागा, चक्र ह्मणजे तेलादिकाचें यंत्र, अग्निचय ह्मणजे अग्निस्थापन करण्याची जागा, श्वभ्र ह्मणजे खळगे हे दुसऱ्याचे भिंतीपासून निदान दोन हात जागा सोडून करावे ॥ २९ ॥ बृहस्पति. लोक व जनावरें ज्या मार्गानें कोणताही प्रतिबंध न होतां जातात येतात त्यास संसरण ह्मणजे राजमार्ग असें ह्मणतात. या रस्त्यास कोणीही प्रतिबंध करूं नये ॥ ३० ॥ नारदाचें वचन. चोहोटा, देवस्थानसंबंधी जागा, राजमार्ग यांवर केर, खळगा खोदणें, पाणी टाकणें, घराची वळचण पुढें आणणें इत्यादिकानीं राजमार्गास प्रतिबंध करूं नये ॥ ३१ ॥ कात्यायन. ज्या रस्त्यानें सर्व लोक सर्वकाळ प्रतिबंध झाल्यावांचून जातात येतात त्यास चतुष्पथ असें ह्मणतात. ज्या रस्त्यास नियमित वेळीं जातां येतें त्यास राजमार्ग असें ह्मणावें ॥ ३२ ॥ बृहस्पतीचें वचन. जो मनुष्य रस्त्यावर केरकचरा बुद्धिपुरःसर टाकील अथवा खोदून खळगा करील अथवा झाडें लावील किंवा बुद्धिपूर्वक शौचास बसेल त्यास माषपरिमित दंड करावा ॥ ३३ ॥ मनु. जो मनुष्य आपत्ति नसून राजरस्त्यावर शौच करील त्यास दोन कार्षापण ह्मणजे दोन रुपये दंड करावा. केलेला शौच त्याकडून काढवून मार्ग स्वच्छ करावा. आपत्तीनें युक्त, वृद्ध, गर्भिणी स्त्री, मुलें यांनीं मार्गांवर शौच केला असतां त्यास दंड करूं नये. त्यांस पुनः न करण्यास ताकीद देऊन रागें भरून शौचादिक काढवून टाकवावें ॥ ३४ ॥ कात्यायन. तळें, बाग, तीर्थ, ह्यांत अपवित्र वस्तु टाकून जो दूषित करील तें त्याजकडून तळें इत्यादिकांतून काढवून स्वच्छ करवावें आणि त्यास थोडा दंड करावा ॥ ३५ ॥ कात्यायनाचें वचन. जमिनीच्या सीमेच्या खुणा नाहींशा करुन टाकल्या असतां त्यास थोडा दंड करावा. आपल्या जमिनीच्या सीमेच्या बाहेरील जमीन नांगरल्याबद्दल त्यास कडक प्रतीचा दंड करावा. दुसऱ्याची जमीन हरण केली असतां त्यास मध्यम प्रतीचा दंड करावा ॥३६॥ मनूचें वचन. दुसऱ्याचें घर, तळें, बाग, शेत विहीर ही समजून हरण करील तर त्यास पांचशेंपण व न समजून हरण करील तर त्यास दोनशेंपण दंड करावा ॥ ३७ ॥ कात्यायनाचें वचन. दोघाच्या शेताच्या शिवेच्या मध्यभागीं उत्पन्न झालेलीं

झाडें त्या झाडांचीं फळें व पुष्पें दोघांनीं सारख्या रीतीनें घ्यावीं ॥ ३८ ॥ एकाच्या शेताच्या शिंवर झाड उत्पन्न झालें असून त्याच्या फांद्या दुसऱ्याच्या शेतांत गेल्या असतील तरी त्या झाडावर मालकी ज्याच्या शेताच्या हद्दींत झाड असेल त्याचीच जाणावी ॥ ३९ ॥ याज्ञवल्क्य. शेताचे मालकास न सांगतां जर शेतांत कोणी एकादा बांध टाकील तर त्यापासून जो फायदा होईल तो जमीनीच्या मालकाचा आहे. जमीनीचा मालक नसेल तर तो राजाचा आहे ॥ ४० ॥ एकादा बांध बांधल्यामुळे त्यापासून दुसऱ्या शेतकऱ्यास विशेष अडचण होत नसून व त्यापासून इतरांस पुष्कळ फायदा होत असेल तर त्यास त्या जमीनीच्या स्वामीनीं प्रतिबंध करूं नये. दुसऱ्याचे जमीनींत विहीर अथवा आड खणला असतां त्यापासून पाण्याचा उपयोग पुष्कळ लोकांसही होण्यासारखा असेल तर त्यास प्रतिबंध करूं नये ॥ ४१ ॥ पूर्वी शेतांत बांध टाकलेला असून तो छिन्नभिन्न झाला असल्या कारणानें जमीनीचे मालकास न विचारितां जर कोणी दुरुस्त करील व त्यापासून जो विशेष फायदा होईल तर तो जमीनीच्या मालकानेंच घ्यावा ॥ ४२ ॥

## ॥ अथ कृष्टाकृष्टविषयनिर्णयः ॥

तत्र नारदः–संवत्सरेणार्द्धखिलं खिलं स्याद्वत्सरैस्त्रिभिः ॥ पंचवर्षावसन्नं च क्षेत्रं स्यादटवीसमम् ॥ ४३ ॥ एवं वर्षपतितमर्द्धखिलं त्रिवर्षपतितं खिलं पंचवर्षपतितम-रण्यं भवतीत्यर्थः ॥ बृहस्पतिः–गृहीत्वा वाहयेत्काले वापगोपनसंग्रहान् ॥ अकुर्वंस्स्वामिने दाप्यो मध्यं कृटसदं तु सः ॥ ४४ ॥ गृहीत्वा क्षेत्रगोपनं रक्षणं संग्रहं सस्यसंचयं अकुर्वंक्षेत्रवापं सदः सस्यं मध्यं कृटसदं नात्युत्कृष्टं ॥ व्यासः—क्षेत्रं गृहीत्वा यः कश्चिन्न कुर्यान्नच कारयेत् ॥ स्वामिने स सदं दाप्यो राज्ञे दंडं च तत्समम् ॥ सदं क्षेत्रोत्पत्त्यर्हफलम् ॥ ४५ ॥ ॥ इति सीमानिर्णयः ॥

## शेत नांगरणें न नांगरणें याविषयीं विचार.

त्यास नारदाचें वचन. शेत आपण लागवडीस पत्करलें असून एक वर्ष तसेंच राहिलें तर तें अर्धें न नांगरल्यासारखें होतें. तीन वर्षें तसेंच पडलें असतां तें मुळींच न नांगरल्या सारखें होतें. पांच वर्षें न नांगरलें तर केवळ अरण्यासारिखें पडित होतें. ( पूर्वी पर्जन्य-काळ अत्यंत असल्यामुळें असें असावें ) ॥ ४३ ॥ बृहस्पतीचें वचन. एखाद्या मनुष्यानें शेत लागवणी करितां घेऊन तें वेळेस जर नाहीं पेरलें अथवा पेरल्याचें रक्षण अथवा धान्याचें संग्रहण जर न केलें तर त्या मनुष्यापासून शेतांत मध्यमप्रतीचें पीक आलें असतां जो फायदा व्हावयाचा तो त्या मालकास देववावा ॥ ४४ ॥ व्यास. एखादा

मनुष्य शेत साऱ्यानें घेऊन तें स्वतः न करील अथवा दुसऱ्याकडून करविणारही नाहीं तर शेतांत जेवढें उत्पन्न व्हावयासारिखें असेल तितकें मालकास त्याजकडून देववावें व राजासही तितकाच दंड दिला पाहिजे ॥ ४६ ॥ याप्रमाणें शिवेचा निर्णय जाणावा.

## ॥ अथ वाक्पारुष्यनिर्णयः ॥

नारदः–देशजातिकुलादीनामाक्रोशन्यंकुसंयुतम् ॥ यद्वचः प्रतिकूलार्थं वाक्पारुष्यं तदुच्यते ॥ १ ॥ आक्रोश आक्षेपः तत्र देशाक्षेपोयथा गौडंप्रति कलहप्रिया गौडाः ॥ जात्याक्रोशो यथा ब्राह्मणंप्रति अत्यन्तलुब्धा ब्राह्मणा इति ॥ कुलाक्रोशोयथा क्रूरचरिता वैश्वानराः ॥ आदिपदाद्विद्यादिपरिग्रहः ॥ न्यंकु अवद्यं ताभ्यां संयुतं यत् प्रतिकूलार्थं वचस्तद्वाक्पारुष्यमिति सामान्यलक्षणं ॥ मित.क्षराकारवाचस्पतिमिश्रादयोऽप्येवं वर्णयंति ॥ नारदः–निष्ठुराश्लीलतीव्रत्वात्तदपि त्रिविधं स्मृतं ॥ गौरवानुक्रमात्तेषां दण्डोप्युक्तः क्रमाद्गुरुः ॥ २ ॥ गौरवानुक्रमात् यथोत्तरं गौरवात् तेषां वाक्पारुष्याणां निष्ठुरादीनां लक्षणमाह स एव ॥ साक्षेपं निष्ठुरं ज्ञेयमश्लीलं न्यंकुसंज्ञितं ॥ तापनीयैरुपक्रोशैस्तीव्रमाहुर्मनीषिणः ॥ ३ ॥ तत्र धिङ्मूर्खंजाल्मेत्यादि साक्षेपम् ॥ अवन्यंगमित्यसभ्यम् ॥ अवद्यं भगिन्यादिगमनं तदुक्तमश्लीलं सुरापोसीत्यादिमहापातकाद्याक्रोशैर्युक्तं वचस्तीव्रम् ॥ ४ ॥ बृहस्पतिः––देशग्रामकुलादीनां क्षेत्रं पापेन योजनं ॥ द्रव्यं विना तु प्रथमं वाक्पारुष्यं तदुच्यते ॥ ५ ॥ भगिनीमातृसंबंधउपपातकशंसनं ॥ पारुष्यं मध्यमं प्रोक्तं वाचिकं शास्त्रवेदिभिः ॥ ६ ॥ अभक्ष्यापेयकथनं महापातकदूषणं ॥ पारुष्यमुत्तमं प्रोक्तं तीव्रमर्माभिघट्टनमिति ॥ ७ ॥ द्रव्यं विना द्रव्यवैशिष्टयं विना केवलं वाक्कृतमेवेत्यर्थः ॥ अभिघट्टनमुद्घाटनम् ॥ ८ ॥ समानयोः समोदंडो न्यूनस्य द्विगुणश्च सः ॥ उत्तमस्यार्द्धिकः प्रोक्तो वाक्पारुष्ये परस्परम् ॥ ९ ॥ परस्परं वाक्पारुष्ये कृते आक्षेपकस्य दण्डः यद्यसावाक्षेप्येण समो जात्यादिभिस्तदा समो दण्डः सन्न्यूनस्तदा तस्योक्तो द्विगुणः उत्कृष्टस्तदार्द्धिको दण्ड इत्यर्थं ॥ याज्ञवल्क्यः–अर्द्धोऽधमेषु द्विगुणः परस्त्रीषूत्तमेषु च ॥ १० ॥ विष्णुः–समवर्णाक्रोशाने द्वादशपणान्दड्यः ॥ स्मृत्यंतरे ॥ पारुष्यदोषावृतयोर्युगपत्संप्रवृत्तयोः ॥ ११ ॥ नारदः–पूर्वमाक्षारयेयस्तु नियतं स्यात्सदोषभाक् ॥ पश्चाद्यः सोप्यसत्कारी पूर्वे तु विनयोगुरुः ॥ १२ ॥ याज्ञवल्क्यः–सत्यासत्यान्यथास्तोत्रैर्न्यूनांगेंद्रियरोगिणां ॥ क्षेपं करोति चेद्दंड्यः पणानर्द्धत्रयोदश ॥ १३ ॥ न्यूनांगाः करादिहीना न्यूनेंद्रिया

नेत्रादिहीनाः ॥ रोगिणः कुष्ठिप्रभृतयः तेषां सत्येनासत्येनान्यथास्तोत्रेण वा क्षेपमाक्रोशं करोति चेत् पणानर्द्धत्रयोदश दण्डयः ॥ सत्यं च नेत्रशून्यस्त्वमसीति असत्यं इन्द्रियवति इन्द्रियशून्यस्त्वमसीति अन्यथा स्तोत्रं अन्ध एव चक्षुष्मानतिशयेनासीति वचनं ॥ प्रथमवाक्पारुष्ये समजातिगुणविषयमेतत् अविषय एव बृहस्पतिः ॥ नारदः–पतितं पतितेत्युक्त्वा चोरं चोरेति वा पुनः ॥ वचनात्तुल्यदोषः स्यान्मिथ्या द्विर्दोषतां व्रजेत् ॥ १३ ॥ शतं ब्राह्मणमाक्रुश्य क्षत्रियोदंडमर्हति ॥ वैश्योप्यर्द्धं शतं द्वे वा शूद्रस्तु वधमर्हति ॥ १४ ॥ बृहस्पतिः–विप्रे शतार्द्धं दंडस्तु क्षत्रियस्याभिशंसने ॥ विशस्तथार्द्धपंचाशच्छूद्रस्यार्द्धं त्रयोदश ॥ १५ ॥ शूद्रविषये स एव धर्मोपदेशकर्त्ता च वेदोदाहरणान्वितः ॥ आक्रोशनस्तु विप्राणां जिव्हाछेदेन दंड्यते ॥ १६ ॥ मनुः ॥ मातरं पितरं जायां भ्रातरं श्वशुरं गुरुम् ॥ आक्षारयन् शतं दाप्यः पंथानं च ददद्गुरोः ॥ १७ ॥ भ्राता ज्येष्ठः पित्रादिसाहचर्यात् ॥ मात्रादीनां सापराधत्वे जायायाश्च निरपराधत्वे दंड इति मिताक्षरादिषु ॥ १८ ॥ याज्ञवल्क्यः–बाहुग्रीवानेत्रसक्थिविनाशे वाचिके दमः ॥ शक्तस्तदर्द्धकः पादनासाकर्णकरादिषु ॥ १९ ॥ अशक्तस्तु वदन्नेवं दंडनीयः पणान्दश ॥ तथाशक्तः प्रतिभुवं दाप्यः क्षेमायतस्य तु ॥ २० ॥ सएव ॥ अभिगंतास्मि भगिनीं मातरं वा नवेति च ॥ शपंतं दापयेद्राजा पंचविंशतिकं दमम् ॥ सएव–त्रैविद्यनृपदेवानां दंडमुत्तमसाहसः ॥ २१ ॥ उशनाः–मोहात्प्रमादात्संघर्षात्प्रीत्या चोक्तं मयेति यः ॥ नाहमेवं पुनर्वक्ष्ये दंडार्द्धं तस्य कल्पयेत् ॥ २२ ॥ यत्र नोक्तोदमः सर्वैरानंत्यात्तु महात्मभिः ॥ तत्र कार्यं परिज्ञाय कर्तव्यं दण्डधारणम् ॥ २३ ॥

## वाक्पारुष्य ( शिवीगाळ ) याचा निर्णय.

नारद. देश, जाति, कुळ इत्यादिकांच्या उद्देशेंकरून जें आक्रोशयुक्त, कठोर व प्रतिकूलतेला सुचविणारें असें जें भ.पण त्यास वाक्पारुष्य ह्मणावव ॥ १ ॥ येथें आक्रोश या शब्दाचा अर्थ तिरस्कार. देशाविषयींच्या आक्रोशाचें उदाहरण–गौडदेशातील मनुष्यें निश्चयानें भांडखोर आहेत. जातीविषयीं ब्राह्मणाविषयीं. ब्राह्मणाची जात अत्यंत लोभिष्ठ आहे. कुळाविषयीं विश्वामित्र कुळोत्पन्न मनुष्य अत्यंत क्रूर कर्म करणारे. आदि शब्दानें बुध्यादिकांचें ग्रहण करावें ह्मणजे जसें निंदेनें बुद्धिमान् विद्वान् इत्यादि. पुरुषाचा आक्षेप करणें न्यंकु ह्मणजे कुत्सित. नारदाचें वचन. निष्ठुर, असभ्य, तीव्र हा भेदेंकरून वाक्पारुष्य तीन प्रकारचें सांगितलें आहे. त्यामध्यें गौरवाच्या अनुक्रमानें दंडही

गुरु ह्मणजे जास्त असा सांगितला आहे ॥ २ ॥ निष्ठुरादिकांचें लक्षण. तिरस्कारयुक्त जें भाषण त्यास निष्ठुर अशी संज्ञा आहे. निंदेनें युक्त, तसेंच असभ्यशब्दांनीं जें युक्त त्यास अश्लील अशी संज्ञा आहे. ताप करणाऱ्या आक्रोश शब्दांनीं युक्त त्यास तीव्र अशी संज्ञा आहे १ निष्ठुर, जसें हे मूर्खा विचार न करितां काम करणाऱ्या मनुष्या तुला धिक्कार असो. असें जें भाषण तें निष्ठुर. २ अवद्य ह्मणजे असभ्य. बहीण, मातोश्री इत्यादिकांशीं गमन करण्यासंबंधीं शिवीगाळ करणें असें तें असभ्य भाषण ॥ ३ ॥ तीव्र तूं मद्यपी आहेस, तूं महापापी आहेस अशा आक्रोशानें जें भाषण तें ॥ ४ ॥ बृहस्पती. एखाद्या मनुष्याचें नांव न घेतां त्याचे देशास, गांवास, अथवा कुळ इत्यादिकांस उद्देशून अब्रू घेण्या जोगे शब्द बोलणें, अथवा त्यास काहीं दुर्गुणांचा आक्षेप करणें यास प्रथममतीचें वाक्पारुष्य ह्मणजे सर्वांत कमी प्रताची शिवीगाळ असें ह्मणतात ॥ ५ ॥ बहीण अथवा मातोश्री यांच्याशीं गमन केल्याचा आरोप घेणें अथवा उपपातक केल्याचा दोषारोप करणें यास शास्त्रवेत्यांनीं मध्यम प्रतीची शिवीगाळ असें ह्मटलें आहे ॥ ६ ॥ भक्षणास अयोग्य असे पदार्थ भक्षण केले अथवा पिण्यास अयोग्य असे पदार्थ प्राशन केले असें ह्मणणें अथवा महा पातक केल्याचा दोषारोप करणें किंवा मर्मभेद होण्यास योग्य असें भाषण करणें त्यास उत्तम वाक्पारुष्य ह्मणजे मोठ्या प्रतीची शिवीगाळ अशी संज्ञा आहे ॥ ७ ॥ द्रव्यंविना ह्मणजे एखाद्या मनुष्याचें नांव न घेतां केवळ शब्दानें शिवीगाळ करणें. अभिवदन ह्मणजे दोष बाहेर काढणें ॥ ८ ॥ एकमेकाशीं शिवीगाळ करण्याविषयीं प्रवृत्त झाले असून दोघांची जाति वगैरे सारखीच असेल तर दोघांस दंड सारखा करावा. एक कमी जात्यादिकें करून असेल तर त्यास दुप्पट दंड करावा. उत्तम जातीचा असेल तर अर्धा दंड करण्यास सांगितलें आहे ॥ ९ ॥ याज्ञवल्क्य. न्यून जातीचे मनुष्यास आक्षेप करणारा अधिक जातीचा असेल तर त्यास अर्धादंड करावा. परस्त्रिया आणि अधिक जातीचे मनुष्य ह्यांस शिव्या देणारा कमी जातीचा असेल तर दुप्पट दंड करावा ॥ १० ॥ विष्णु. समान जातीच्या मनुष्यानें एकमेकांशीं शिवीगाळ केली असतां चवदा पण दंड करावा ॥ ११ ॥ अन्यस्मृतीचें वचन. एकमेकांस शिवीगाळ करण्याविषयीं एकदम प्रवृत्त झाले असतां नारद सांगतात. प्रथम जो शिव्या देऊं लागेल तो निश्चयेंकरून अपराधी आहे असें जाणावें. नंतर जो शिवी देण्याविषयीं प्रवृत्त होतो तोही अपराधी खरा परंतु प्रथम शिवी देणारास जास्त दंड करावा ॥ १२ ॥ याज्ञवल्क्याचें वचन. जो एखाद्या शरीर अवयवांनें न्यून अथवा न्यूनेंद्रिय अथवा रोगपीडित असेल त्याचा तिरस्कार करणारा अथवा

खोटया शब्दांनीं किंवा लाक्षणिक शब्दांनीं केला असता असें करणारास तेरा पण दंड
करावा ॥ १२ ॥ न्यूनांग ह्मणजे हात पाय इत्यादिकांनीं हीन. न्यूनेंद्रिय ह्मणजे नेत्रा-
दिकांनीं हीन त्यास आक्षेप केला असतां वरील सांगितलेला दंड करावा. सत्यपणानें आक्षेप
ह्मणजे आंधळ्यास नेत्रशून्य आहेस असें ह्मणणें. असत्यपणानें ह्मणजे चांगलीं इंद्रियें ज्याचीं
आहेत त्यास इंद्रियशून्य आहेस असें ह्मणणें. अन्यथास्तोत्र ह्मणजे आंधळ्यास आपण
फार चांगले डोळस आहांत असें ह्मणणें. नारदाचें वचन. जो पतित आहे त्यास
पतित असें ह्मणणें. तसेंच चोरास चोर असें ह्मणणें, असें ह्मणणारा दोषी होतो. परंतु
खोडसाळपणानें असें जर ह्मणेल तर त्याचा अपराध दुप्पट होतो ॥ १३ ॥ क्षत्रियानें
ब्राह्मणास शिव्या दिल्या असतां शंभरपण दंड करावा. वैश्यानें ब्राह्मणास शिवीगाळ
केल्यास त्यास दीडशें अथवा दोनशेंपण दंड करावा. शूद्रानें शिवीगाळ केली असता
तो वधास योग्य होतो ॥ १४ ॥ बृहस्पतीचें वचन. ब्राह्मणानें क्षत्रियास शिवीगाळ
केली असतां पन्नासपण दंड. वैश्यास पंचवीस. शूद्रास शिवीगाळ केली असतां तेरापण
दंड करावा ॥ १५ ॥ बृहस्पतीचें वचन. जो शूद्र वेदाचीं उदाहरणें घेऊन धर्माचा
उपदेश करील, किंवा ब्राह्मणांची निंदा करील त्याची जीभ राजानें तोडून टाकावी ॥१६॥
मनूचें वचन. मातोश्री, पिता, आपली स्त्री, वडील बंधु, सासरा, गुरु यांस जो शिवी-
गाळ करील किंवा आपले गुरूस मार्ग देणार नाहीं त्यास शंभरपण दंड करावा. मा-
तोश्री, पिता इत्यादिक अपराधयुक्त असतां आणि आपली स्त्री निरपराधी असतां यांस
शिवीगाळ केली असतां वर लिहिल्या प्रमाणें दंड करावा असें मिताक्षरादि ग्रंथांत सांगि-
तलें आहे ॥ १७ ॥ १८ ॥ याज्ञवल्क्य. बाहू, मान, नेत्र, मांड्या हे मोडून टाकीन
अशी भीति दाखवून कोणी शिवीगाळ करील आणि तसें करण्यास शक्त असेल तर
त्यास शंभरपण दंड करावा. पाय, नाक, कान, हात इत्यादिक मोडून टाकीन असें
बोलून जर शिवीगाळ करील तर त्यास पन्नासपण दंड करावा ॥ १९ ॥ अशक्त असून
याप्रमाणें बोलून जर शिवीगाळ करील तर त्यास दहापण दंड करावा. सशक्त असून
वरीलप्रमाणें बोलून शिवीगाळ करणारास शंभरपण दंड करून ज्याचे बाहू इत्यादि मो-
डीन असें ह्मटला असेल त्याचे रक्षणाकरितां त्याजपासून जामीन घ्यावा ॥ २० ॥
तुझ्या बहिणीशीं अथवा आईशीं मी व्यभिचारकर्म करणार आहें असें ह्मणून शिव्या
देणारा जो त्यास राजानें पंचवीसपण दंड करावा. तीन वेद जाणणारा ब्राह्मण, राजा,
देव यांस शिव्या देणाऱ्या मनुष्यास उत्तम मर्यादेचा दंड करावा ॥ २१ ॥ उशनाचें वचन.
ही गोष्ट मी अज्ञानानें अथवा प्रमादानें किंवा मत्सरपणानें किंवा अतिप्रियानें केली

आहे, मी असें पुनः करणार नाहीं असें ह्मणणारास अर्धा दंड करावा ॥ २२ ॥ जेथें प्राचीन ऋषींनीं दंड सांगितला नसेल तेथें कार्यसंबंधाचा अपराध जाणून दंडाची योजना करावी ॥ २३ ॥ याप्रमाणें वाक्पारुष्याचा निर्णय जाणावा.

## ॥ अथ दण्डपारुष्यनिर्णयः ॥

दण्डपारुष्यलक्षणमाह बृहस्पतिः–हस्तपाषाणलगुडैर्भस्मकर्दमपांसुभिः ॥ आयुधैश्च प्रहरणं दंडपारुष्यमुच्यते ॥ १ ॥ नारदोपि–परगात्रेष्वभिद्रोहो हस्तपादायुधादिभिः ॥ भस्मादिभिश्चावघातो दण्डपारुष्यमुच्यते ॥ २ ॥ याज्ञवल्क्यः–असाक्षिकहते चिह्नैर्युक्तिभिश्चागमेन च ॥ द्रष्टव्योव्यवहारस्तु कूटचिह्नकृतो भयात् ॥ ३ ॥ बृहस्पतिः–आकुष्टस्तु समाक्रोशंस्ताडितः प्रतिताडयन् ॥ हत्वापराधिनं चैव नापराधी भवेन्नरः ॥ ४ ॥ याज्ञवल्क्यः–भस्मपंकरजःस्पर्शे दण्डो दशपणः स्मृतः ॥ अमेध्यपार्ष्णिनिष्ठ्यूतस्पर्शने द्विगुणः स्मृतः ॥ ५ ॥ समेष्वेवं परस्त्रीषु द्विगुणस्तूत्तमेषु च ॥ हीनेष्वर्धदमो मोहमदादिभिरदंडनम् ॥ ६ ॥ कात्यायनः–छर्दिमूत्रपुरीषाद्यैरापाद्यः सचतुर्गुणः ॥ षड्गुणः कायमध्येस्यान्मूर्ध्निस्त्वष्टगुणः स्मृतः ॥ ७ ॥ याज्ञवल्क्यः–उद्गूर्णे हस्तपादे तु दशविंशतिकौ दमौ ॥ परस्परं तु सर्वेषां शस्त्रे मध्यमसाहसः ॥ ८ ॥ ९ ॥ कात्यायनः–वाक्पारुष्ये यथावोक्ताः प्रातिलोम्यानुलोमतः ॥ तथैव दण्डपारुष्ये पात्या दंडा यथाक्रमम् ॥ १० ॥ विष्णुः–एकं बहूनां निघ्नतां प्रत्येकश उक्तो दंडो द्विगुणः ॥ एकं घ्नतां बहूनां च यथोक्ताद्द्विगुणो दमः ॥ कलहापहृतं देयं दण्डश्च द्विगुणः स्मृतः ॥ ११ ॥ यमः–भार्यापुत्रश्च दासश्च दासी शिष्यश्च पंचमः ॥ प्राप्तापराधास्ताड्याःस्यूरज्ज्वा वेणुदलेन वा ॥ १२ ॥ अधस्तात्तु प्रहर्तव्या नोत्तमांगे कथंचन ॥ अतोऽन्यथाप्रवृत्तस्तु यथोक्तं दण्डमर्हति ॥ १३ ॥ कात्यायनः–देहेंद्रियविनाशे तु यथादण्डं प्रकल्पयेत् ॥ तथा तुष्टिकरं देयं समुत्थानं च पंडितैः ॥ तुष्टिकरं ताडिततोषकरं समुत्थानमौषधादिमूल्यं च पंडितैरभिज्ञैः कल्पितं देयमित्यर्थः ॥ १४ ॥ याज्ञवल्क्यः–दुःखमुत्पादयेद्यस्तु स समुत्थानजं व्ययम् ॥ दाप्यो दण्डं च यो यस्मिन् कलहे समुदाहृतः ॥ १५ ॥ अभिघाते तथा छेदे भेदे कुड्यावपातने ॥ पणान्दाप्यः पंचदश विंशतिद्वितयं तथा ॥ १६ ॥ याज्ञवल्क्यः–दुःखोत्पादि गृहे द्रव्यं क्षिपन्प्राणहरं तथा ॥ षोडशाद्यः पणान्दाप्यो द्वितीयो मध्यमं दमम् ॥ १७ ॥ दुःखे च शोणितोत्पादे शाखांगच्छेदने तथा ॥ दंडः क्षुद्रपशूनां तु द्विपणप्रभृतिक्रमात् ॥ १८ ॥ लिंगस्य छेदने मृत्यौ मध्यमोमूल्यमेव च ॥ महापशूनामेतेषु स्थानेषु द्वि-

गुणो दमः ॥ १९ ॥ प्ररोहिशाखिनां शाखास्कंधसर्वविदारणे ॥ उपजीव्यद्रुमाणां च
विंशतेर्द्विगुणो दमः ॥ २० ॥ चैत्यश्मशानसीमासु पुण्यस्थाने सुरालये ॥ जातद्रुमाणां
द्विगुणो दमो वृक्षेषु विश्रुते ॥२१॥ गुल्मगुच्छक्षुपलताप्रतानौषधिवीरुधाम् ॥ पूर्वस्मृता-
दर्द्धदंडः स्थानेषूक्तेषु कर्तने ॥ २२ ॥ मनुः–वनस्पतीनां सर्वेषामुपभोगं यथा
यथा ॥ तथा तथा दमः कार्यो हिंसायामिति धारणा ॥ २३ ॥ इति दण्डपा-
रुष्यनिर्णयः ॥

## दंडपारुष्य ह्मणजे मारामारीचा निर्णय.

त्याचें लक्षण बृहस्पति सांगतात. हात, पाषाण, टांकूड, राख, चिखल, धूळ, ह-
त्यारें यांच्या योगानें प्रहार करणें यास दण्डपारुष्य ह्मणतात. ॥ १ ॥ नारदाचें व-
चन. हात, पाय, हत्यार, इत्यादिक वस्तु, तसेंच राख, चिखल, इत्यादिक पदार्थांनीं
दुसऱ्यास प्रहार करून त्याचे शरीरास पीडा करणें यास दण्डपारुष्य असें ह्मणतात ॥२॥
याज्ञवल्क्याचें वचन. मारामारी झाली असून त्यास साक्षीदार जर नसतील तर मार-
ल्याच्या खुणा, वळ वगैरे तसेंच युक्तीनें विचार ( आसपास मंडळीकडून शोध करणें )
करून मग चौकशी करावी. कारण वळ वगैरे चिन्हें खोट्या रीतीनेंही केलीं जातात
॥ ३ ॥ बृहस्पति. आपणास कोणी शिवीगाळ केली असतां आपण त्याजबरोबर शि-
वीगाळ केली तर, तसेंच आपणास मारिलें असतां आपण त्यास मारलें तर, आपला अ-
पराध केला ह्मणून आपण त्याचा अपराध केला तर यांपैकीं दुसरा मनुष्य अपराधी
होत नाहीं ॥ ४ ॥ याज्ञवल्क्याचें वचन. राख, चिखल, धूळ हे जो दुसऱ्याच्या अं-
गावर टाकील त्यास दहापण दंड करावा. अपवित्र असे नख, केंस, कर्णमळ, नासिका-
मळ हे लोकाचे अंगावर टाकिले असतां तसेंच पार्ष्णि ह्मणजे पायाच्या मागील भागानें
प्रहार केला असतां, तसेंच दुसऱ्याच्या अंगावर थुंकलें असतां दुप्पट दंड करावा ॥ ५ ॥
हें आपले समान वर्णाशीं केलें असतांचें आहे. उत्तम वर्णाच्या मनुष्याचे ठायीं किंवा
परस्त्रियेचे ठायीं पूर्वोक्त रीतीनें भस्मादिक टाकिलें असतां दुप्पट दंड करावा. हीन व-
र्णाचे असल्यास अर्ध दंड. मोह ह्मणजे चित्तास विपर्यास झाला असतां. मद ह्मणजे
मद्यादिप्राशनानें मदयुक्त होऊन पूर्वोक्तप्रमाणें आचरण केलें असतां त्यास दंड नाहीं
॥ ६ ॥ कात्यायनाचें वचन. ओकारी, मूत्र, पुरीष इत्यादि दुसऱ्याचे अंगावर टाकिलें
असतां चौपट दंड करावा. शरीराचे मध्यभागीं टाकिलें असतां सहापट दंड व मस्तकावर
टाकिलें असतां आठपट दंड करावा ॥७॥ याज्ञवल्क्य. मारण्याच्या हेतूनें हात पाय उगारिला

असतां क्रमानें दहा, वीसपण दंड जाणावा. एकमेकांनीं एकमेकांवर शस्त्र उगारिलें असतां मध्यम प्रतीचा दंड करावा ॥ ८ ॥ मनूचें वचन. हीन जातीचा मनुष्य उत्तम जातीच्या मनुष्यास ज्या ज्या हस्तपादादि अवयवानीं किंवा दंडानें प्रहार करील तर त्या त्या अवयवाचा छेद करावा ॥ ९ ॥ कात्यायनाचें वचन. वाक्पारुष्यास जसे प्रतिलोम, अनुलोम रीतीनें दंड सांगितले त्याप्रमाणेंच दंडपारुष्याचे ठायीं दंडांची योजना करावी ॥ १० ॥ विष्णूचें वचन. एका मनुष्यास पुष्कळ मनुष्यें मिळून मारूं लागलीं असतां, साधारण मारामारीस एका मनुष्यास जो दंड सांगितला असेल त्याचे दुप्पट दंड प्रत्येक मनुष्यास करावा. कलहामध्यें जी वस्तु ज्याची घेतली असेल ती त्याची त्यास द्यावी ॥ ११ ॥ यमाचें वचन. स्त्री, पुत्र, दास, दासी, शिष्य यांनीं अपराध केला असतां दोरीनें, अथवा वेळूच्या बारीक छडीनें शरीराच्या अधोभागीं ताडन करावें. ॥ १२ ॥ मस्तकाचे ठायीं कधींही ताडण करूं नये. याहून विपरीत रीतीनें ताडण केलें असतां ताडन करणारास दंड करावा ॥ १३ ॥ कात्यायनाचें वचन. देह, इंद्रिय यांचा नाश झाला असतां सांगितल्याप्रमाणें दंड करावा. तसेंच त्यास संतोष उत्पन्न होईल असें द्रव्य द्यावें आणि शहाण्या मनुष्यानें औषधादि उपचारानें बरें होण्यास जें द्रव्य लागेल तें ज्यास मारलें असेल त्यास द्यावें ॥ १४ ॥ याज्ञवल्क्याचें वचन. मारामारीमध्यें जो दुसऱ्याचे शरीरास दुखापत करील ती बरी होण्यासाठीं जो खर्च लागेल तो त्यानें दिला पाहिजे आणि मारामारी केल्याबद्दल जो दंड सांगितला असेल तो दंडही त्याजकडून घ्यावा ॥ १५ ॥ कोणी मनुष्यानें दुसऱ्याचे भिंतीवर प्रहार केला असतां किंवा छिद्रें पाडलीं असतां अथवा भेगा पाडल्या असतां अथवा भिंत पाडली असतां पांच, दहा, वीसपण दंड क्रमानें करावा व भिंतीची नुकसानी भरून द्यावी ॥ १६ ॥ याज्ञवल्क्याचें वचन. दुसऱ्याचे घरामध्यें दुःख उत्पन्न करणारा पदार्थ टाकिला असतां सोळापण दंड करावा. प्राण हरण करणारा सर्पादिक पदार्थ टाकिला असतां मध्यम प्रतीचा त्यास दंड करावा ॥ १७ ॥ क्षुद्र पशू ह्मणजे शेळ्या, मेंढ्या, हरीण इत्यादिक यांस पीडा दिल्यास, तसेंच त्यांचा रक्तस्राव केल्यास अथवा त्यांचा शाखांगछेद ह्मणजे शिंगें व अवयव तोडल्यास त्याबद्दल क्रमानें दोन, चार, सहा, आठ पण दंड करावा ॥ १८ ॥ हे जे सांगितलेले पशू यांचा लिंगछेद केला असतां व त्यामुळें त्यांस मृत्यु आला असतां त्याची किंमत मालकास देववावी व त्यास मध्यम प्रतीचा दंड करावा. असेंच मोठे पशू मारा केलें असतां पूर्वोक्त सांगितलेल्या दंडाचे दुप्पट दंड करावा ॥ १९ ॥ ज्यांच्या शाखा लाविल्या असतां झाडें उत्पन्न होतात ते वडादिक वृक्ष. तसेंच ज्याच्यावर उपजीविका

होते असे आम्रादिक वृक्ष, त्यांच्या शाखा ह्मणजे फांद्या, मधला स्कंध तोडला असतां, अथवा समूळ वृक्ष तोडला असता, वीस, चाळीस, ऐशीं पण दंड क्रमानें करावा ॥ २० ॥ चोहोटा, स्मशान, देवालय, पुण्यस्थान वसेंच प्रसिद्ध ठिकाणीं असलेलीं झाडें हीं तोडलीं असतां दुप्पट दंड करावा ॥ २१ ॥ गुल्म ह्मणजे मालत्यादिक. गुच्छ ह्मणजे कोरंटी वगैरे लहान झाडें, क्षुद्रादिक वेटी. प्रतान ह्मणजे काडसहित असे सरळ जाणारे, औषधी ह्मणजे साली गुळवेल्यादिक. हे पूर्वोक्त स्थानीं तोडले असतां पूर्वी जो दंड सांगितला त्याच्या अर्धा दंड तोडणारास करावा ॥ २२ ॥ मनूचें वचन. संपूर्ण वृक्षांचा जसजसा उपभोग केला जातो तसतसा तो वृक्ष तोडला असता दंड करावा असा शास्त्राचा निश्चय आहे ॥ २३ ॥ याप्रमाणें दंडपारुष्याचा निर्णय जाणावा.

## ॥ अथ स्तेयनिर्णयः ॥

नारदः-उपायैर्विविधैरेनान् छलयित्वापकर्षणम् ॥ सुप्तमत्तप्रमत्तेभ्यः स्तेयमाहुर्मनीषिणः ॥ १ ॥ मनुः-निरन्वयं भवेत्स्तेयं हृत्वापन्हुवते च यत् ॥ स्यात्साहसं त्वन्वयवत्प्रसभं कर्म यत्कृतम् ॥ २ ॥ याज्ञवल्क्यः-ग्राहकैर्गृह्यते चौरो लोप्त्रेणाथ पदेन वा ॥ पूर्वकर्मापराधी च तथा चाशुद्धवासकः ॥ ३ ॥ अन्येपि शंकया ग्राह्या जातिनामादिनिह्नवैः ॥ द्यूतस्त्रीपानसक्ताश्च शुष्कभिन्नमुखस्वराः ॥ ४ ॥ परद्रव्यगृहाणां च पृच्छकागूढचारिणः ॥ निराया व्ययवंतश्च विनष्टद्रव्यविक्रयाः ॥५॥ नारदः-अन्यहस्तात्परिभ्रष्टमकामादुत्थितं भुवि ॥ चौरेण वा परिक्षिप्तं लोप्त्रं यत्नात्परीक्षयेत् ॥ ६ ॥ तथा ॥ असत्याः सत्यसंकाशाः सत्याश्चासत्यसन्निभाः ॥ दृश्यंते विविधाभावास्तस्माद्युक्तं परीक्षणमिति ॥ ७ ॥ व्यासः-उत्क्षेपकः संधिभेत्ता पांथमुट्ग्रंथिमोचकः ॥ स्त्रीपुंगोऽश्वपशुस्तेयी चौरो नवविधः स्मृतः ॥ संधिभित्त्यादेः ॥ ८ ॥ मनुः-द्विविधांस्तस्करान्विद्यात्परद्रव्यापहारिणः ॥ प्रकाशांश्चाप्रकाशांश्च चारचक्षुर्महीपतिः ॥ स्वचिह्नैरेव विज्ञेयाश्चौरैस्तस्करवेदिभिः ॥ स्वचिह्नैश्चौरचिह्नैः ॥ ९ ॥ तत्र प्रकाशांस्तस्करानाह नारदः-नैगमा वैद्यकितवाः सभ्योत्कोचकवंचकाः ॥ दैवोत्पातविदो भद्राः शिल्पज्ञाः प्रतिरूपकाः ॥ १० ॥ अक्रियाकारिणश्चैव मध्यस्थाः कूटसाक्षिणः ॥ प्रकाशतस्करा ह्येते तथा कुहकजीविनः ॥ ११ ॥ प्रकाशवंचकास्तत्र कूटमानतुलाश्रिताः ॥ उत्कोचकाः सोपधिकाः कितवाः पण्ययोषितः ॥ १२ ॥ प्रतिरूपकराश्चैव मंगलादेशकारिणः ॥ इत्येवमाद्या ज्ञेयाः प्रकाशतस्कराभुवि ॥१३॥ बृहस्पतिः-प्रच्छाद्य दोषं व्यामिश्रं पुनः संस्कृत्य विक्रयी ॥ पण्यं तद्विगुणं दाप्यो

वणिग्दत्तं च तत्समम् ॥ १४ ॥ अज्ञातौषधिमंत्रस्तु यस्तु व्याधेरतत्त्ववित् ॥ रोगिभ्योऽर्थं समादत्ते स दंड्यश्चोरवद्भिषक् ॥ १५ ॥ अन्यायवादिनः सभ्यास्तथैवोत्कोचजीविनः ॥ विश्वस्तवंचकाश्चैव निर्वास्याः सर्व एव ते ॥ १६ ॥ ज्योतिर्ज्ञानं तथोत्पातमविदित्वा तु ये नृणाम् ॥ शकुनादि च ये ब्रूयुर्विनेयास्ते प्रयत्नतः ॥ १७ ॥ दंडाजिनादिभिर्युक्तमात्मानं दर्शयंति ये ॥ हिंसंति छद्मना नृणां वध्यास्ते राजपूरुषैः ॥ १८ ॥ स्वल्पमूल्यं तु संस्कृत्य नयंति बहुमूल्यताम् ॥ ये बालकान्वंचयंति दंड्यास्तेऽर्थानुसारतः ॥ १९ ॥ हेमरत्नप्रवालाद्यान्कृत्रिमान्कुर्वते तु ये ॥ क्रेतुर्मूल्यं प्रदाप्यास्ते राज्ञा तद्द्विगुणं दमम् ॥ २० ॥ अकूटं कूटकं ब्रूते कूटं यश्चाप्यकूटकम् ॥ सनाणकपरीक्षी तु दाप्य उत्तमसाहसम् ॥ २१ ॥ वसानस्त्रीन्पणान् दाप्यो रजकस्तु परांशुकम् ॥ विक्रयावक्रयाधानयाचितेषु पणान्दश ॥ २२ ॥

## चोरीचा निर्णय.

नारदाचें वचन. निजलेला, मत्त, प्रमत्त, अशा मनुष्याचें द्रव्य कपट करून नाना प्रकारच्या उपायांनीं त्यास न समजतां हरण करणें त्यास चौर्य असें ह्मणतात ॥ १ ॥ मनूचें वचन. द्रव्याचा मालक याच्या समक्ष बलात्कारानें जें द्रव्य हरण करून नेलें जावें त्यास साहस असें ह्मणतात. द्रव्याचा मालक यास न कळतां जें द्रव्य हरण केलें जावें त्यास चोरी असें ह्मणतात ॥ २ ॥ याज्ञवल्क्याचें वचन. रक्षक मनुष्यानें चोर धरावा तो मुद्यावरून अथवा माग काढून धरावा. तसेंच ज्यानें पूर्वीं चोरी केली असेल तो अथवा लोकांस न समजणाऱ्या अशा अप्रसिद्ध जाग्यांत राहत असेल तो धरावा ॥ ३ ॥ तसेंच आपली जात, नांव इत्यादिकांस जे छपवितात ते, तसेंच जुवा खेळणारे, स्त्रिया, मद्यपान यांचे ठायीं आसक्त असणारे, जे विचारिलें असतां म्लानवदन व भिन्नशब्द असे होतात ते ॥ ४ ॥ जे दुसऱ्याचें द्रव्य आणि घरें विचारणारे, वेष बदलून संचार करणारे, गमावलेल्या द्रव्याची विक्री करणारे अशा मनुष्यांस धरून चौकशी करावी ॥ ५ ॥ नारदाचें वचन. दुसऱ्याचे हातून पडलेली वस्तु, जमिनीमध्यें खोदित असतां सांपडलेली वस्तु, चोरांनीं टाकिलेलें द्रव्य हें मोठ्या प्रयत्नानें संभाळून ठेवावें ॥ ६ ॥ ह्याह मनुष्य चांगल्या मनुष्यासारखे दिसतात व चांगले मनुष्य वाईट मनुष्याप्रमाणें दिसतात यापुढें चौकशी करावी ॥ ७ ॥ व्यासाचें वचन. उत्प्रेक्षक ह्मणजे उपग्या, भामटा. संधिभेत्ता ह्मणजे घरफोडी करणारा. पांथमुष ह्मणजे रस्त्यावर दरोडे घालणारा. ग्रंथिमोचक ह्मणजे खिसे कापणारा. स्त्रिया, पुरुष, गाई, घोडे, जनावरें

यांस चोरणारे असे नऊ प्रकारचे चोर आहेत ॥ ८ ॥ मनूनें दुसऱ्याच्या द्रव्याला हरण
करणारे असे चोर दोन प्रकारचे सांगितले आहेत. प्रसिद्ध आणि अप्रसिद्ध. राजानें
अशा चोरांच्या चिन्हांस जाणणारे असे जे गुप्त दूत त्यांच्या योगानें चोर जाणावेत
॥ ९ ॥ त्यामध्यें प्रसिद्ध चोरांविषयीं नारद सांगतात. नैगम ह्मणजे व्यापारी, खोटे वैद्य,
लांच खाणारे सभासद, भविष्य सांगणारे जोशी, कारागीर, खोटे दस्तऐवज करणारे
॥ १० ॥ करण्यास अयोग्य अशीं कामें करणारे, खोटी साक्ष देणारे, कपटाच्या यो-
गानें आपली उपजीविका करणारे हे प्रसिद्ध चोर जाणावेत ॥ ११ ॥ तसेंच खोटीं व-
जनें आणि मापें घेऊन व्यापार करणारा, लांच खाणारा, कपट करणारा, ठकबाजी क-
रणारा, कसब करणाऱ्या स्त्रिया ॥ १२ ॥ खोटे दस्तऐवज करणारे, भविष्य सांगणारे
जोशी, या पृथ्वीचे ठायीं हे प्रसिद्ध चोर जाणावेत ॥ १३ ॥ बृहस्पतीचें वचन. वाईट
जिनसांतील दोष छपवून ठेवून अथवा त्यांत दुसरी वस्तु मिसळून चांगली दिसेल अशी
तयार करून विकणारा जो त्या मनुष्याकडून विकलेल्या वस्तूचे दुप्पट किंमत देववावी
आणि विकलेल्या वस्तूच्या किंमतीइतका दंड घ्यावा ॥ १४ ॥ औषधाचें अथवा मंत्राचें
ज्ञान नसून, तसेंच रोगाची खरी परीक्षा नसून जो रोग्यापासून पैसे घेतो त्या वैद्यास
चोराची शिक्षा द्यावी ॥ १५ ॥ जे सभासद अन्यायानें बोलत असतील, तसेंच जे
लांच खाऊन उपजीविका करीत असतील, ज्यांचा आपल्यावर विश्वास आहे अशा म-
नुष्यास जे फसवितात त्यांस राजानें हद्दपार करावें ॥ १६ ॥ ज्योतिषाचें ज्ञान नसून त-
सेंच भविष्यकाळीं होणारें त्याचें ज्ञान नसून जे मनुष्य दुसऱ्यास पुढें होणारें भविष्य
शकुनादिक सांगतात त्या जोशांस राजानें दंड करावा ॥ १७ ॥ जे मनुष्य दंड, कृष्णा-
जिन इत्यादिकांनीं युक्त असे आपण मोठे संन्यासी आहोंत असें दाखवून दुसऱ्याचा
नाश करितात ॥ १८ ॥ जे थोड्या किंमतीच्या वस्तूस कांहीं संस्कार करून पुष्कळ
किंमतीनें विकतात व बालकांस फसवितात त्यांस राजानें त्या द्रव्याच्या मानानें दंड
करावा ॥ १९ ॥ जे मनुष्य सोनें, रत्नें, प्रवाळ ( पोंवळें ) हे खोट्या रीतीनें तयार
करून विकतील तर ज्यानें हे पदार्थ विकत घेतले असतील त्याचें द्रव्य त्यास परत देववून
राजानें त्यास दुप्पट दंड करावा ॥ २० ॥ जो खऱ्या नाण्याला खोटें नाणें असें ह्मणतो
व खोट्याला खरें ह्मणतो त्या परीक्षकास उत्तम मर्यादेचा दंड करावा ॥ २१ ॥ जो परीट
धुण्यास आलेलें वस्त्र आपण नेसतो त्यास तीन पण दंड करावा. तें वस्त्र विकलें असतां
किंवा भाड्यानें दिलें असतां अथवा गहाण टाकिलें असतां किंवा दुसऱ्यानें मागितल्या-
वरून त्यास दिलें असतां त्यास दहा पण दंड करावा ॥ २२ ॥

## ॥ अथ अप्रकाशतस्करदंडनिर्णयः ॥

ये तु तस्कराः संधिं कृत्वा अनेकविधधनमपहरंति ॥ राजा अपहृतसर्वद्रव्यं स्वामिने दापयित्वा तेषां चौराणां हस्तौ छित्वा तीक्ष्णशूले निवेशयेत् ॥ २३ ॥ तदाहतुर्मनुव्यासौ–संधिं कृत्वा तु ये चौर्यं रात्रौ कुर्वंति तस्कराः ॥ तेषां छित्वा नृपो हस्तौ तीक्ष्णशूले निवेशयत् ॥ २४ ॥ निवेशयेदित्यत्र तानिति शेषः ॥ एवमुत्तरवचनेपि संधिच्छेत्तारमिति शेषो बोध्यः ॥ २५ ॥ याज्ञवल्क्यः–उत्क्षेपकग्रंथिभेदौ करसंदंशहीनकौ ॥ कार्यौ द्वितीयापराधे करपादैकहोनकौ ॥ संदंशः तर्जन्यंगुष्ठौ ॥ २६ ॥ बृहस्पतिः–तथा पांथमुषां वृक्षे गले बध्वाऽवलंबयेत् ॥ अंगुलीग्रंथिभेदस्य छेदयेत्प्रथमे ग्रहे ॥ २७ ॥ द्वितीये हस्तचरणौ तृतीये वधमर्हति ॥ अंगुली तर्जन्यंगुष्ठौ ॥ नारदः–प्रथमे ग्रंथिभेदानामंगुल्यंगुष्ठयोर्वधः ॥ २८ ॥ बृहस्पतिः–गोहर्तुर्नासिकां छित्वा बध्वांभसिच मज्जयेत् ॥ नारदः–सर्वस्वं हरतो नारीं कन्यां तु हरतो वधः ॥ वाजिवारणलोहानां चाददीत बृहस्पतिः ॥ सर्वस्वमित्यनुषंगः ॥ २९ ॥ नारदः–महापशुस्तेनयोग्यं दंडमुत्तमसाहसम् ॥ मध्यमं मध्यमपशून्पूर्वं क्षुद्रपशून्हृतः ॥ ३० ॥ असंधितानां संधाता संधितानां च मोक्षकः ॥ दासाश्वरथहर्ता च प्राप्तः स्याच्चौरकिल्बिषम् ॥ ३१ ॥ मनुः–धान्यं दशभ्यः कुंभेभ्यो हरतोभ्यधिके वधः ॥ शेषेप्वेकादशगुणं दाप्यस्तस्य च तद्धनम् ॥ कुंभो विंशतिप्रस्थाः ॥ ३२ ॥ सएव–सुवर्णरजतादीनामुत्तमानां च वाससाम् ॥ पंचाशतस्त्वभ्यधिके हस्तछेदनमिष्यते ॥ शेषेप्वेकादशगुणं मूल्याद्दंडं प्रकल्प्यते ॥ ३३ ॥ योदत्तादायिनोहस्ताल्लिप्सेत ब्राह्मणो धनम् ॥ याजनाध्यापनेनापि यथा स्तेनस्तथैव सः ॥ ३४ ॥ अधार्मिकं त्रिभिन्यायैर्निगृह्णीयात्प्रयत्नतः ॥ निरोधनेन बंधेन विविधेन वधेन च ॥ ३५ ॥ भक्तावकाशदातारः स्तेनानां ये प्रसर्पताम् ॥ शक्ताश्च ये उपेक्षंते तेपि तद्दोषभागिनः ॥ ३६ ॥ परमं यत्नमातिष्ठेत्स्तेनानां निग्रहे नृपः ॥ स्तेनानां निग्रहादस्य यशो राष्ट्रं च वर्द्धते ॥ ३७ ॥ अभयस्य तु यो दाता स पूज्यः सततं नृपः ॥ सत्रं हि वर्द्धते तस्य सदैवाभयदक्षिणम् ॥ ३८ ॥

## आतां गुप्त चोरांच्या दंडाचा निर्णय.

जे चोर संकेत करून अनेक प्रकारच्या द्रव्याला हरण करितात. राजानें त्यांचे धोरून आणिलेलें द्रव्य त्यांजपासून घेऊन मूळचे मालकास तें द्रव्य द्यावें आणि चोरांचे हात तोडून त्यास तीक्ष्ण शूळावर द्यावें ॥ २३ ॥ मनु व व्यास. यांचे वचनाचा अर्थ

असाच आहे ॥ २४ ॥ २५ ॥ याज्ञवल्क्याचें वचन. उचलून घेणाऱ्या चोराचा हात
तोडावा. गांठ सोडून घेणाऱ्याचीं बोटें तोडावीत. हें प्रथम अपराधाचे वेळीं जाणावें. दुसरे
वेळीं अपराध केला असतां त्याचा एक हात व एक पाय तोडावा. येथें बोटें ह्मणजे
आंगठा व त्या जवळचें बोट अशीं दोनही बोटें तोडावीत ॥ २६ ॥ बृहस्पतीचें वचन.
मार्गं लुटणाऱ्या मनुष्यास मानेस फांस टाकून झाडास बांधावें. गांठ सोडून द्रव्य घेणा-
ऱ्याचीं बोटें तोडावीत ॥ २७ ॥ २८ ॥ गाय चोरुन नेणाऱ्या मनुष्याचें नाक तोडून
पाण्यांत बुडवावें. नारदाचें वचन. तरुण स्त्रीस चोरुन नेणाराची सर्व इस्टेट हरण
करून घ्यावी. कन्येस हरण करणारा यास देहांत दंड करावा. घोडे, हत्ती, सुवर्णादि
धातु हे चोरणाराचें सर्वस्व हरण करावें ॥ २९ ॥ वरिष्ठ जातीचीं जनावरें चोरणारास मोठी
शिक्षा द्यावी. मध्यम प्रतीचीं जनावरें चोरणारास मध्यम दंड करावा. कनिष्ठ प्रतीचीं जनावरें
चोरणारास कनिष्ठ दंड करावा ॥ ३० ॥ दुसऱ्याचीं मोकळीं सुटलेलीं जनावरें घोडे इत्यादिक
यांस बांधून ठेवणारा आणि बांधून ठेवलेलीं जनावरें सोडून देणारा, तसेंच दास, घोडे, रथ
यांस हरण करणारा जो मनुष्य तो चोरीचे शिक्षेस पात्र होतो. त्यास त्याच्या अपराधानुरूप
शिक्षा करावी ॥ ३१ ॥ मनु. दहा कुंभ धान्यापेक्षां जास्त धान्य चोरी करणारास फटके
वगैरे शरीर दंड करावा. त्यापेक्षां कमी धान्याची चोरी करील तर चोरापासून धान्याच्या
किमतीच्या अकरापट दंड घेऊन धान्याची किंमत धान्याचे मालकास त्याजकडून देव-
वावी. वीस प्रस्थांचा कुंभ होतो. (कुंभाविषयीं विशेष, प्रायश्चित्त भागांत लिहिलें आहे
तेथें पहावें) ॥ ३२ ॥ मनूचें वचन. सोनें, रुपें इत्यादिकांचे पन्नास किंवा त्याहून जास्त
नग चोरल्यास तसेंच मोठ्या किमतीचीं वस्त्रें चोरल्यास चोराचे हात तोडावेत याहून
कमी किमतीची चोरी असल्यास चोरलेल्या वस्तूच्या किमतीच्या अकरापट दंड करावा
॥ ३३ ॥ चोरापासून यज्ञादिक कर्में करवून धन मिळण्याची जो ब्राह्मण इच्छा
करितो तो चोराप्रमाणेंच जाणावा व त्यास चोराची शिक्षा करावी ॥ ३४ ॥ रा-
जानें अधार्मिक मनुष्यास तीन उपायानें दंड करावा. बंदिशाळेंत ठेवणें, बेड्या घा-
लणें व शरीरदंड करणें. याप्रमाणें तीन प्रकारानें दंड करावा ॥ ३५ ॥ जे मनुष्य
चोरास खाण्यास घालतात व त्यास राहण्यास जागा देतात, तसेंच आपण समर्थ असून
त्यांच्या दोषांची उपेक्षा करतील तर तेही चोराप्रमाणें दंडास पात्र होतील ॥ ३६ ॥
राजानें चोरास दंड करण्याविषयीं अत्यंत प्रयत्न करावा. चोराचा निग्रह करणाऱ्या
राजाची कीर्ति आणि राज्य वाढतें ॥ ३७ ॥ जो राजा प्रजेस कोठूनही भीति नाहीं
अशा रीतीनें वागवितो तो राजा सर्वांस पूज्य असा होतो. त्यानें मोठे यज्ञ केल्याप्र-

माणें होतात. या यज्ञामध्यें सर्वांस भीतिपासून मुक्त करणें हीच मोठी दक्षिणा जाणावी ॥ ३८ ॥ याप्रमाणें चोरीचा निर्णय जाणावा.

## ॥ अथ साहसनिर्णयः ॥

तत्र याज्ञवल्क्यः–सामान्यद्रव्यप्रसभहरणात्साहसं स्मृतम् ॥ नारदः–सहसा क्रियते कर्म यत्किंचिद्बलदर्पितैः ॥ तत्साहसमिति प्रोक्तं सहोबलमिहोच्यते ॥ १ ॥ बृहस्पतिः–मनुष्यमारणं चौर्यं परदाराभिमर्शनम् ॥ पारुष्यमुभयं चेति साहसं स्याच्चतुर्विधम् ॥ उभयं वाक्पारुष्यं दण्डपारुष्यं च ॥ २ ॥ अत्र च साहसे रक्षितुर्न ज्ञानवारणं चौर्य्ये तु तस्य ज्ञानवारणमिति विशेषः ॥ तत्पुनस्त्रिविधं प्रोक्तं प्रथमं मध्यमं तथा ॥ उत्तमं चेति शास्त्रेषु तस्योक्तं लक्षणं पृथक् ॥ ३ ॥ तद्विभजते सएव–फलमूलोदकादीनां क्षेत्रोपकरणस्य च ॥ भंगाक्षेपावमर्दाद्यैः प्रथमं साहसं स्मृतम् ॥ ४ ॥ वासःपश्वन्नपानानां गृहोपकरणस्य च ॥ अनेनैव प्रकारेण मध्यमं साहसं स्मृतम् ॥ ५ ॥ व्यापादोविषशस्त्राद्यैः परदारप्रधर्षणम् ॥ प्राणोपरोधि यच्चान्यदुक्तमुत्तमसाहसम् ॥ ६ ॥ तस्य दण्डः क्रियाक्षेपः प्रथमस्य शतावरः ॥ मध्यमस्य तु शास्त्रज्ञैर्दृष्टः पंचशतावरः ॥ ७ ॥ उत्तमे साहसे दण्डः सहस्रावर इष्यते ॥ वधः सर्वस्वहरणं पुरान्निर्वासनंकने ॥ ८ ॥ तदंगच्छेद इत्युक्तो दण्ड उत्तमसाहसे ॥ वधादयश्चापराधतारतम्यादुत्तमसाहसे समस्ता व्यस्तावा योज्याः ॥ ९ ॥ याज्ञवल्क्यः–तन्मूल्याद्द्विगुणोदण्डोनिह्नवे तु चतुर्गुणः ॥ १० ॥ यः साहसं कारयति सदाप्यो द्विगुणं दमम् ॥ यश्चैवमुक्त्वाहं दाता कारयेत्सचतुर्गुणम् ॥ ११ ॥ अर्घ्याक्रोशातिक्रमकृद्भ्रातृभार्याप्रहारदः ॥ संदिष्टस्याप्रदाता च समुद्रगृहभेदकृत् ॥ १२ ॥ सामंतकुलिकादीनामपकारस्य कारकः ॥ पंचाशत्पणिकोदण्डएषामिति विनिश्चयः ॥ १३ ॥ स्वच्छंदं विधवागामी विक्रुष्टे नाभिधावकः ॥ अकारणे च विक्रोष्टा चण्डालश्चोत्तमान् स्पृशेत् ॥ १४ ॥ शूद्रप्रव्रजितानां च दैवे पित्र्ये च भोजकः ॥ अयुक्तं शपथं कुर्वन्नयोग्यो योग्यकर्मकृत् ॥ १५ ॥ विषक्षुद्रपशूनां च पुंस्त्वस्य प्रतिघातकृत् ॥ साधारणस्यापलापी दासीगर्भविनाशकृत् ॥ १६ ॥ पितापुत्रस्वसृभ्रातृदंपत्याचार्यशिष्यकाः ॥ एषामपतितान्योन्यत्यागी च शतदण्डभाक् ॥ १७ ॥ बृहस्पतिः–प्रकाशघातकाये तु तथा चोपांशुघातकाः ॥ ज्ञात्वा सम्यग्धनं कृत्वा हंतव्याविविधैर्वधैः ॥ १८ ॥ एकस्य बहवो यत्र प्रहरंति रुषान्विताः ॥ मर्मप्रहारको यस्तु घातकस्त उदाहृताः ॥ १९ ॥ कात्यायनः–आरंभकृत्सहायश्च तथा मार्गानु-

देशकः ॥ आश्रयः शस्त्रदाता च भक्तदाता विकर्मिणाम् ॥ २० ॥ युद्धोपदेशक-
श्चैव तद्विनाशप्रवर्तकः ॥ उपेक्षाकार्ययुक्तश्च दोषवक्तानुमोदकः ॥ २१ ॥

## साहसाचा निर्णय.

त्याविषयीं याज्ञवल्क्याचें वचन. साधारण द्रव्य बलात्कारानें हरण केलें असतां
त्यास साहस असें ह्मणतात. नारद. बलेंकरून मत्त झालेल्या मनुष्यानें बळ अथवा
दर्प याच्या योगानें जें कर्म विचार न करितां केलें जावें त्यास साहस असें ह्मणतात
॥ १ ॥ बृहस्पति. मनुष्यास मारणें, समक्ष चोरून वस्तु नेणें, दुसऱ्याच्या स्त्रियेशीं
गमन करणें, दुसऱ्यास शिवीगाळ करणें, मारामारी करणें हें चार प्रकारचें साहस सां-
गितलें आहे. या श्लोकांत वाक्पारुष्य, दंडपारुष्य मिळून एक साहस सांगितलें. येथें
साहसामध्यें जें चौर्याचें ग्रहण केलें आहे, यामध्यें तर मालकाचे समक्ष द्रव्य हरण केलें
जातें. चोरीमध्यें तर मालकास न समजतां द्रव्य हरण केलें जातें ॥ २ ॥ शास्त्रामध्यें
तें साहस तीन प्रकारचें आहे. उत्तम, मध्यम व कनिष्ठ या भेदानें ॥ ३ ॥ कनिष्ठ प्र-
तीच्या साहसाचें लक्षण. फळें, मुळें, पाणी इत्यादिक पदार्थांचें, तसेंच शेताची सामग्री,
नांगर, आऊत इत्यादिक नाश करणें, फेंकून देणें, चिपडवून टाकणें असें करणें हें प्र-
थमप्रतीचें साहस सांगितलें आहे ॥ ४ ॥ नारदाचें वचन. वस्त्र, पशु, अन्न, पिण्याचे
पदार्थ, घरांतील सामग्री यांचा भंग व फेंकून देणें इत्यादि केलें असतां मध्यम प्रतीचें
साहस होतें ॥ ५ ॥ विष, शस्त्र, इत्यादिकानें, अन्य मनुष्याचा द्रोह करणें, परस्त्रीच्या
अंगास झटणें, दुसऱ्याच्या प्राणाचा नाश होईल असें दुसरेंही काम करणें यास उत्तम
प्रतीचें साहस अशी संज्ञा आहे ॥ ६ ॥ प्रथम साहसास शंभर पण दंड करावा. म-
ध्यम साहसापराध करणारास पांचशें पण दंड करावा ॥ ७ ॥ उत्तम साहस करणाऱ्यास
हजार पण दंड करावा. तसेंच त्याचें सर्व द्रव्य हरण करून त्यास गावाबाहेर हांकून
देणें, तसेंच त्यास डाग देणें, त्याचें अंग तोडणें इत्यादिक प्रकार त्याच्या अपराधाच्या
विचारानें योजना करावी ॥ ८ ॥ ९ ॥ याज्ञवल्क्याचें वचन. साहसानें जें द्रव्य ह-
रण केलें असेल त्याचे दुप्पट त्यास दंड करावा. चौर्य करून छपवून ठेविल्यास चौपट
दंड करावा ॥ १० ॥ जो मनुष्य दुसऱ्याकडून साहसकर्म करवितो त्यास दुप्पट दंड
करावा आणि तुला मी द्रव्य देईन हें काम कर असें ह्मणून पूर्वीचे जे साहसाचे प्रकार
सांगितले त्यांतील कोणतेंही साहसकर्म करविलें असतां त्यास राजानें चौपट दंड करावा
॥ ११ ॥ पूज्य मनुष्य याची निर्भर्त्सना करणें अथवा त्याची आज्ञा उल्लंघन करणें,

आपल्या बंधूच्या बायकोस ताडन करणारा, देऊं केलेली वस्तु न देणारा, ज्या घरास मोहोर केलेली आहे तें घर उघडणारा ॥ १२ ॥ आपल्या आसपास राहणारीं माणसें, तसेंच आपल्या कुळांतील माणसें यांस अपकार करणारा या प्रत्येकास ५० रुपये दंड करावा ॥ १३ ॥ यथेच्छ विधवा स्त्रीशीं गमन करणारा, कांहीं भयामुळें आरडाओरड झाली असतां धावून न जाणारा, कारणावांचून ओरड करणारा, चांडाल असून उत्तम वर्णांस शिवणारा ॥ १४ ॥ शूद्र होऊन संन्यास ग्रहण केलेल्या मनुष्यास दैव पितृकर्मांचे ठायीं भोजन देणारा, अयोग्य शिवी देणारा, योग्य असून अयोग्य कर्म करणारा, बैल व दुसरे हलके पशू याच्या पुरुषत्वाचा ( खची ) नाश करणारा, समाईक द्रव्याचा अपहार करणारा, दासीच्या गर्भाचा नाश करणारा ॥ १५ ॥ पिता, पुत्र, बहीण, बंधु, नवरा, बायको, गुरु, शिष्य हे पतित नसून त्यांचा त्याग करणारा या प्रत्येकास राजानें ५० रुपये दंड करावा ॥ १६ ॥ बृहस्पति. जे प्रसिद्धपणानें लोकांचा नाश करणारे, तसेंच गुप्तपणानें लोकांचा नाश करणारे हे चौकशीनें ओळखून त्यांचें द्रव्य हरण करून नाना प्रकारच्या उपायानीं त्यांचा नाश करावा ॥ १७ ॥ एका मनुष्यास पुष्कळ मनुष्यें जेव्हां मारूं लागतात तेव्हां जो मर्मस्थानीं प्रहार करणारा असेल तोच मुख्यत्वेंकरून नाश करण्यास कारण असा सांगितला आहे ॥ १८ ॥ कात्यायनाचें वचन. जो साहसकर्मास आरंभ करितो व सहाय करितो, जो त्यास मार्ग दाखवितो, जो त्यास आश्रय देतो, जो मारण्यास शस्त्र देतो व जो मारणारास खाण्यास देतो ॥ १९ ॥ जो युद्ध करण्यास मसलत देतो, इतराचा नाश करण्यास प्रवृत्त होतो, जो उपेक्षा करितो, त्यास मारावयाचें त्याचे दोष सांगतो, जो अनुमोदन देतो ॥ २० ॥ वाईट काम करणारे मनुष्यास दूर करण्याविषयीं स्वतः समर्थ असून जो दूर करीत नाहीं, हीं सर्व मनुष्यें, करण्यास अयोग्य असें जें वाईट काम याला करणारीं आहेत असें जाणावें. यास त्यांच्या त्यांच्या शक्ति अनुरूप सर्वांस दंड करावा ॥ २१ ॥ हें जें दंड वगैरे करणें तें राजानेंच करावें. दंड करण्याचा अधिकार राजास आहे इतरास नाहीं

## ॥ अथ घातकान्वेषणनिर्णयः ॥

अविज्ञातहतस्याशु कलहं सुतबांधवाः ॥ नष्टव्यायोपितश्चास्य परपुंसि रताः पृथक् ॥ २२ ॥ स्त्रीद्रव्यवृत्तिकामो वा येन वापगतः सह ॥ तत्प्रदेशमसमापन्नं पृच्छेदपि जनं शनैः ॥ २३ ॥ इतः संदश्यते यत्र घातकश्च न दृश्यते ॥ पूर्ववैरानुसारेण ज्ञातव्यः स महीभुजा ॥ २४ ॥ प्रतिवेश्यानुवेश्यौ च तस्य मित्रारिबांधवाः ॥

प्रष्टव्याराजपुरुषैः सामादिभिरुपक्रमैः ॥ २५ ॥ विज्ञेयोऽसाधुसंसर्गाच्चिह्नहोढेन वा नरैः ॥ एषोदिता घातकानां तस्कराणां च भावना ॥ २६ ॥ गृहीतः शंकया यस्तु न तत्कार्यं प्रपद्यते ॥ शपथेन विशोद्धव्यः सर्ववादेष्वयं विधिः ॥ २७ ॥ होढोनिगदितः ॥ शंकया इत्यत्र शंकित इति पाठो रत्नाकरे दृष्टः ॥ तत्कार्यं हननरूपं न प्रपद्यते पृष्टः सन्नानुमन्यते ॥ विवादचिंतामणौ व्यासः–ज्ञात्वा तु घातकं सम्यक् ससहायं सबांधवम् ॥ हन्याच्चित्रैर्वधोपायैरुद्वेगजनकैर्नृपः ॥ २८ ॥ बृहस्पतिः– दिव्यैर्विशुद्धो मोच्यः स्यादशुद्धोवधमर्हति ॥ निग्रहानुग्रहाद्राज्ञः कीर्तिर्धर्मश्च वर्द्धते ॥ २९ ॥ असाधुनिग्रहात्साधोश्चानुग्रहणाद्राज्ञः कीर्तिधर्मयोरुपचयो भवतीत्यर्थः रत्नाकरप्रभृतयोऽप्येवम् ॥ इति साहसनिर्णयः ॥

## मारणाराच्या शोधाचा विचार.

ज्यानें खून केला आहे तो मनुष्य ज्ञात होत नसेल तर ज्याच्याशीं तंटा झाला असेल त्याचीं मुलें, बंधु, व परपुरुषाशीं रममाण होणाऱ्या अशा बायका यांस विचारावें. स्त्रिया अथवा द्रव्य याच्या इच्छेनें कोणाकडे गेला होता असें तेथें येणारे मनुष्यास युक्तीनें विचारावें ॥ २३ ॥ मेलेला मनुष्य दिसत आहे व मारणारा मात्र दिसत नाहीं, तेथें पूर्वी ज्याच्याशीं वैर असेल त्या वैराच्या धोरणानें राजानें त्यास धरावें ॥ २४ ॥ राजाच्या दूतानीं शेजारीं राहणारे लोक व आसपास राहणारे लोक, मयताचे मित्र, शत्रु व बंधु यास सामोपचारानें विचारावें ॥ २५ ॥ वाईट मनुष्याच्या संसर्गानें अगर अंगावर एकादी खूण वगैरे पाहून मारणारा मनुष्य ओळखावा. याप्रमाणें मारणाराच्या शोधाचा प्रकार सांगितला ॥ २६ ॥ एकादा मनुष्य शंकेच्या योगानें धरला असून तें काम जर तो नाकबूल करील तर त्याची शपथ घेऊन त्यास सोडून द्यावें ॥ २७ ॥ मारणारा मनुष्य व त्याचे सहायकारी बंधु हे सर्व समजल्यानंतर इतर मनुष्यास भय उत्पन्न करणारे असे नाना प्रकारचे मारण्याचे उपाय त्याच्या योगानें राजानें खून करणाऱ्या मनुष्याचा नाश करावा ॥ २८ ॥ बृहस्पतीचें वचन. शंकेनें धरलेला मनुष्य शपथा दिव्य प्रकारानें शुद्ध असा ठरल्यास त्यास सोडून द्यावें. दोषी ठरल्यास त्याचा नाश करावा. दुष्टांचा निग्रह व साधूंचें रक्षण केल्यानें राजाची कीर्ति व धर्म वाढतात ॥ २९ ॥ याप्रमाणें साहसाचा निर्णय जाणावा.

## ॥ अथ स्त्रीसंग्रहणनिर्णयः ॥

तत्र व्यासः–त्रिविधं तत्समाख्यातं प्रथमं मध्यमोत्तमम् ॥ अदेशकालभाषाभि-

निर्जने च परस्त्रियाः ॥ १ ॥ कटाक्षावेक्षणं हास्यं प्रथमं साहसं स्मृतम् ॥ प्रेषणं गन्धमाल्यानां धूपभूषणवाससाम् ॥ २ ॥ प्रलोभनं चान्नपानैर्मध्यमं साहसं स्मृतम् ॥ सहासनं विविक्तेषु परस्परमुपाश्रयः ॥ ३ ॥ केशाकेशिग्रहश्चैव सम्यक् संग्रहणं स्मृतम् ॥ स्त्रीपुंसयोर्मिथुनीभावः संग्रहणम् ॥ ४ ॥ त्रयाणामपि चैतेषां प्रथमोमध्य-उत्तमः ॥ विनयः कल्पनीयः स्यादधिको द्रविणाधिके ॥ ५ ॥ एषु त्रिषु संग्रहेषु यथाक्रमं प्रथममध्यमोत्तमसाहसा दण्डाः अधिकधनस्य त्वधिकोदंडइत्यर्थः ॥ मनुः-परदाराभिमर्शेषु प्रवृत्तान्नॄन् महीपतिः ॥ उद्वेजनकरैर्दंडैश्छिन्नयित्वा प्रवासयेत् ॥६॥ याज्ञवल्क्यः-पुमान्संग्रहणे ग्राह्यः केशाकेशिपरस्त्रियाः ॥ सद्यो वा कामजैश्चिह्नैः प्रति-पत्तौ द्वयोस्तथा ॥ ७ ॥ नीवीस्तनप्रावरणसक्थिकेशावमर्शनम् ॥ अदेशकालसंभाषं सहैकासनमेव च ॥ ८ ॥ परस्य पत्न्या पुरुषः संभाषां योजयेद्रहः ॥ पूर्वमाक्षा-रितो दोषैः प्राप्नुयात् पूर्वसाहसम् ॥ ९ ॥ याज्ञवल्क्यः-स्त्रीनिषेधे शतं दद्याद्विशतं तु दमं पुमान् ॥ प्रतिषेधे तयोर्दण्डो यथा संग्रहणे तथा ॥ १० ॥ यस्त्वनाक्षारितः पूर्वमभिभाषेत कारणात् ॥ न दोषं प्राप्नुयात् किंचिन्नहि तस्य व्यतिक्रमः ॥ ११ ॥ अब्राह्मणः संग्रहणे प्राणांतं दण्डमर्हति ॥ चतुर्णामपि वर्णानां दारा रक्ष्यतमाः सदा ॥ १२ ॥ भिक्षुका वंदिनश्चैव दीक्षिताः कारवस्तथा ॥ संभाषणं सह स्त्रीभिः कुर्यु-रप्रतिवारिताः ॥ १३ ॥ न संभाषां परस्त्रीभिः प्रतिषिद्धः समाचरेत् ॥ निषिद्धो भाषमाणस्तु सुवर्णं दण्डमर्हति ॥१४॥ सहस्रं ब्राह्मणो दंड्यो गुप्तां विप्रां बलाद्व्र-जन् ॥ शतानि पंच दंड्यः स्यादिच्छंत्या सह संगतः ॥ १५ ॥ न जातु ब्राह्मणं हन्यात्सर्वपापेष्ववस्थितम् ॥ राष्ट्रादेनं बहिः कुर्यात्समग्रधनमक्षतम् ॥ १६ ॥ न ब्राह्मणवधाद्भूयानधर्मो विद्यते भुवि ॥ तस्मादस्य वधं राजा मनसापि न चिंतयेत् ॥ १७ ॥ कात्यायनः-सर्वेषु चापराधेषु पुंसयोर्यो दमः स्मृतः ॥ तदर्धंयोषितोदद्यु-र्वधे पुंसोंगकर्तनम् ॥ १८ ॥ नारदः-माता मातृष्वसा श्वश्रूर्मातुलानी पितृष्वसा ॥ पितृव्यसखिशिष्यस्त्री भगिनी तत्सखी स्नुषा ॥ २२ ॥ राज्ञी प्रव्रजिता धात्री साध्वी वर्णोत्तमा च या ॥ आसामन्यतमां गच्छन्गुरुतल्पग उच्यते ॥ शिश्नस्यो-त्कर्तनात्तत्र नान्यो दण्डो विधीयते ॥ २३ ॥ याज्ञवल्क्योपि-पितुः स्वसारं मातुश्च मातुलानीं स्नुषामपि ॥ मातुः सपत्नीं भगिनीमाचार्यतनयां तथा ॥ २४ ॥ आचा-र्यपत्नीं स्वसुतां गच्छंस्तु गुरुतल्पगः ॥ छित्वा लिंगं वधस्तस्य सकामायाः स्त्रिया अपि ॥ २५ ॥ अयं च दण्डो न ब्राह्मणस्य ॥ शंखलिखितौ-येन येनांगेनापराधं कुर्यात्तदस्य छेत्तव्यमन्यत्र ब्राह्मणात् ॥ २६ ॥ २७ ॥ ब्राह्मणदास्यादिगमने

दंडमाह याज्ञवल्क्यः–अवरुद्धासु दासीषु भुजिष्यासु तथैवच ॥ २८ ॥ गम्यास्वपि
पुमान्दाप्यः पंचाशत्पणिकं दमम् ॥ अवरुद्धाः स्वामिना पुरुषांतरगमनविशेषे ॥
पशुयोनावतिक्रामन् विनेयः स शतं दमम् ॥ मध्यमं साहसं गोषु तदेवांत्यावसायिषु
॥ २९ ॥ अतिक्रामन्मैथुनं गच्छन् पणशतं दंड्य इति विवादचिंतामणिः ॥ ३० ॥

## स्त्रीसंग्रहण निर्णय.

आतां स्त्रीसंग्रहण ह्मणजे व्यभिचार त्याचा निर्णय त्याविषयीं व्यासाचें वचन. स्त्री-
संग्रहण उत्तम, मध्यम व कनिष्ठ असें तीन प्रकारचें सांगितलें आहे. परस्त्रियेशीं बोल-
ण्यास अयोग्य अशा प्रदेशाचे ठायीं, तसेंच अवेळीं तेथें कोणी नाहीं अशा स्थळाचे
ठायीं भाषण करणें ॥ १ ॥ तसेंच नेत्रकटाक्षाच्या योगानें पाहणें, हांसणें हें कनिष्ठ प्र-
तीचें साहस सांगितलें आहे. सुगंध पदार्थ, सुवासिक फुलें, धूप, डागिने, वस्त्रें हीं स्त्रिये-
कडे पाठवून देणें ॥ २ ॥ उत्तम तऱ्हेचीं अन्नें व पिण्यास योग्य असे पेय पदार्थ, हे
स्त्रियेस देऊन तिला प्रलोभित करणें हें मध्यम प्रतीचें साहस सांगितलें आहे. एकांतस्थ-
ळामध्यें दोघांनीं बसणें, एकमेकांचा आश्रय करणें ॥ ३ ॥ एकमेकांचे केशांस स्पर्श
करणें, स्त्रीपुरुषांनीं एकमेकांचा संग्रह करणें, हें उत्तम प्रकारचें साहस जाणावें ॥ ४ ॥
हें जें उत्तम, मध्यम, कनिष्ठ प्रतीचें साहस सांगितलें त्यांत द्रव्याच्या आधिक्यानें दंड
करावा ह्मणजे श्रीमंतास जास्त दंड करावा ॥ ५ ॥ मनूचें वचन. परस्त्रियेच्या व्यभि-
चाराविषयीं प्रवृत्त झालेले असे जे मनुष्य त्या मनुष्यांस राजानें लोकांस भय उत्पन्न
करणारे असे दंड करून शहराच्या बाहेर हांकून द्यावें ॥ ६ ॥ याज्ञवल्क्याचें वचन.
व्यभिचाराचे कामास प्रवृत्त झालेल्या पुरुषास ओळखण्याच्या संबंधानें, स्त्रीपुरुषांनीं पर-
स्परांचे केश धरले असतां किंवा कामापासून उद्भवलेल्या इतरचिन्हांनीं किंवा दोघांच्या
एकमेकांच्या कबुलीवरून जाणावें ॥ ७ ॥ परस्त्रियेच्या निरीस, स्तनास अथवा तिचे
वस्त्रास, मांडीस अथवा केसांस जो स्पर्श करितो, अयोग्य ठिकाणीं व अयोग्य वेळीं
तिच्याशीं भाषण करितो त्यास व्यभिचारासंबंधानें धरावें ॥ ८ ॥ जो पुरुष परस्त्रियेशीं
एकांतस्थळीं भाषण करितो, त्यास पूर्वी भाषण न करण्याबद्दल सांगितलें असून तो जर
भाषण करील तर तो प्रथमसाहसी जाणावा ॥ ९ ॥ स्त्रियेस निषेध केला असतां ती
जर भाषण करील तर तीस शंभर पण दंड करावा. पुरुष जर भाषण करील तर त्यास
दोनशें पण दंड करावा. निषेध केला असून त्याचे हातून उत्तम, मध्यम, कनिष्ठ जसें
साहस घडेल त्याप्रमाणें दंड करावा ॥ १० ॥ ज्या मनुष्यास पूर्वी दोष दिला नसेल

तो मनुष्य कारणानें एकाद्याच्या स्त्रियेशीं जर भाषण करील तर त्याबद्दल तो दोषी हो- णार नाहीं. तसेंच त्याबद्दल त्याचा मर्यादाविक्रमही होत नाहीं ॥ ११ ॥ ब्राह्मणाहून भिन्न जातीचा मनुष्य यानें स्त्रीसंग्रहण ह्मणजे व्यभिचार केला असतां त्यास प्राणांत दंड सां- गितला आहे. कारण ब्राह्मणाचा वध करूं नये असें शास्त्रांत सांगितलें आहे. ब्राह्मण, क्षत्रिय, वैश्य व शूद्र या चारी वर्णांच्या मनुष्यांनीं आपल्या स्त्रिया सर्वकाळ व्यभिचा- रादि दुष्कर्मांपासून रक्षण करावया ॥ १२ ॥ भिक्षुक, स्तुतिपाठक, दीक्षित ( ज्यांनीं यज्ञ केला आहे असे सभ्य ब्राह्मण ) कारागीर मनुष्य यांस भाषण करण्याविषयीं निवारण केलें नसेल तर परस्त्रियेशीं भाषण करावें ॥ १३ ॥ ज्यास निषेध केला आहे अशा मनु- ष्यानें परस्त्रियेशीं भाषण करूं नये. निषेध केला असून जो भाषण करील त्यास एक सुवर्ण परिमित दंड करावा ॥ १४ ॥ जो ब्राह्मण रक्षण केलेल्या स्त्रियेशीं बलात्कारानें गमन करील त्यास हजार पण दंड करावा. इच्छा करणाऱ्या स्त्रियेशीं गमन केलें अ- सतां पांचशें पण दंड करावा ॥ १५ ॥ कोणताही अपराध करणाऱ्या ब्राह्मणास प्राणांत दंड करूं नये. त्यास राज्याच्या बाहेर हांकून द्यावें ॥ १६ ॥ कारण ब्राह्मणवधापेक्षां दुसरा पृथ्वीचे ठायीं अधर्म नाहीं. यास्तव राजानें ब्राह्मणाचा नाश करणें हें मनामध्यें मुद्दां आणूं नये ॥ १७ ॥ कात्यायन. सर्व अपराधांचे ठायीं पुरुषास जो द्रव्यदंड सांगि- तला असेल त्याचे अर्धा दंड स्त्रियांस सांगितला आहे. जेथें पुरुषाचा नाश करण्यास सांगितला असेल तेथें स्त्रियेचें अंग कापावें. ह्मणजे कर्ण, नाक इत्यादिकांचा राजाज्ञेनें छेद करावा ॥ १८ ॥ नारदाचें वचन. आई, मावशी, सासू, मामी, आत, चुलती, मित्रपत्नी, शिष्याची बायको, बहीण, तिची मैत्रीण, सून, राजस्त्री, विरक्त असणारी स्त्री, दासी, पतिव्रता स्त्री, आपल्यापेक्षां श्रेष्ठ वर्णाची स्त्री या स्त्रियांशीं गमन करणारा मनुष्य गुरु- पत्नीशीं गमन करणारा जाणावा. यास्तव राजानें त्यास शिश्नछेदरूप दंड करावा. याज्ञवल्क्याचे वचनाचा अर्थ असाच आहे ॥ १९ ॥ २० ॥ २१ ॥ २२ ॥ २३ ॥ २४ ॥ २५ ॥ शंखलिखितांचें वचन. ब्राह्मणाहून इतर जातीचा मनुष्य ज्या ज्या शरीर अवयवानें अपराध करील, त्याच्या त्या त्या अवयवांचा छेद करावा ॥ २६ ॥ २७ ॥ याज्ञवल्क्याचें वचन. प्रतिबंधांत ठेविलेल्या अशा ज्या दासी यांचे ठायीं ग- मन केलें असतां पन्नास पण दंड करावा ॥ २८ ॥ पशुयोनीचे ठायीं गमन केलें अ- सतां शंभर पण दंड करावा. गाईशीं तसेंच अंत्यजाचे स्त्रियेशीं गमन केलें असतां म- ध्यम प्रतीच्या साहसास जो दंड तो करावा ॥ २९ ॥ याप्रमाणें स्त्रीसंग्रहणाचा निर्णय जाणावा.

प्रवसेत्कार्यवान्नरः ॥ अवृत्तिकर्षिता हि स्त्री प्रदुष्येत्स्थितिमत्यपि ॥ २० ॥ भर्तृभार्ययोः परस्परतोषफलमाह विवादरत्नाकरे मनुः-संतुष्टो भार्यया भर्ता तेन भार्या तथैव च ॥ यस्मिन्नेवं कुले नित्यं कल्याणं तत्र वै ध्रुवम् ॥ २१ ॥ तयोः पुनरतोषे दोषमाह स एव-यदि हि स्त्री न रोचेत पुमांसं न प्रमोदयेत् ॥ अप्रमोदात्पुनः पुंसः प्रजनं न प्रवर्तते ॥ २२ ॥ स्त्रियां तु रोचमानायां सर्वं तद्रोचते कुलम् ॥ तस्यामरोचमानायां सर्वमेव न रोचते ॥ २३ ॥ दक्षः-अनुकूला त्ववाक्दुष्टा दक्षा साध्वी प्रजावती ॥ एभिरेव गुणैर्युक्ता श्रीरेव स्त्री न संशयः ॥ २४ ॥ तथा च व्यासः-पूर्वोत्थानपरा दक्षा जघन्यासनशायिनी ॥ अवाग्दुष्टानुकूला स्त्री भवेद्वै पुण्यकर्मणः ॥ २५ ॥ मनुः-साध्व्यास्त्यागे दंडमाह चंडेश्वरधृतो नारदः-अनुकूलामवाग्दुष्टां दक्षां साध्वीं प्रजावतीम् ॥ त्यजन् भार्यामवस्थाप्यो राज्ञा दंडेन भूयसा ॥ २६ ॥ मनुः-अन्योन्यस्याव्यभिचारो भवेदामरणांतिकः ॥ एषधर्मः समासेन ज्ञेयः स्त्रीपुंसयोः परः ॥ २७ ॥ तथा नित्यं यतेयातां स्त्रीपुंसौ तु कृतक्रियौ ॥ यथा नाभिचरेतां तौ वियुक्तावितरेतरम् ॥ २८ ॥ एवं स्त्रीपुरुषधर्मनिर्णयः ॥

## स्त्री पुरुष यांच्या धर्मांचा निर्णय.

मनूचें वचन. धर्ममार्गाचे ठिकाणीं राहणारे असे जे स्त्रीपुरुष यांचे संयोग आणि वियोग यांविषयींचे निरंतर चालत आलेले धर्म सांगतों ॥ १ ॥ पुरुषांनीं स्त्रिया रात्रंदिवस आपलें स्वाधीन राहतील अशा ठेवाव्या. त्यांच्या इच्छेप्रमाणें त्यांस वागूं देऊं नये. त्या विषयाचे ठिकाणीं सक्त होणाऱ्या अशा असतील तरीही त्या स्वाधीनच ठेवाव्या ॥ २ ॥ विवादचिंतामणींतील नारदाचें वचन. उत्तम कुलांत उत्पन्न झालेल्या अशाही स्त्रिया स्वतंत्रतेमुळें नाश पावतात ह्मणजे बिघडतात. या कारणाकरितां ब्रह्मदेवानें त्यांस पराधीनता केली आहे ॥ ३ ॥ मनूचें वचन. बाल्य अवस्थेमध्यें स्त्रियांस पिता रक्षण करितो. तारुण्य अवस्थेंत पति रक्षण करितो. वृद्धावस्थेमध्यें मुलें रक्षण करितात. सबब स्त्रियांस स्वतंत्रता नाहीं ॥ ४ ॥ याज्ञवल्क्य. कन्येप्रत पिता रक्षण करील. विवाह झालेल्या मुलीस पति. वृद्ध स्थितींत पुत्र, पुत्र नसतील तर जातीचीं मनुष्यें रक्षण करितात. अर्थात् स्त्रियांनां केव्हांही स्वतंत्रता नाहीं ॥ ५ ॥ स्त्रियांस स्वतंत्रता देऊं नये असें मनु सांगतो. दुष्टाचरण संपादक असा अल्प दुःसंग यापासूनही विशेष करून स्त्रियांचें रक्षण करावें आणि स्त्रियांचें रक्षण न केलें असतां स्त्रिया पतीचें कुल आणि स्त्रियांचें कुल या दोहों कुलांला शोक उत्पन्न करितात ॥ ६ ॥ यास्तव सर्व ब्राह्मणादि व-

र्णास स्त्रीरक्षणरूप धर्म सर्व धर्मांहून श्रेष्ठ आहे असें पाहणारे होत्साते दुर्बलही आपआ-
पल्या स्त्रियांचे रक्षणाविषयीं यत्न करितात ॥ ७ ॥ स्त्रीचें रक्षण केलें असतां आपली
संतति, द्रव्य, कुल, आपलें शरीर, स्वधर्म हीं सर्व रक्षण केल्यासारखीं होतात ॥ ८ ॥
विवाहकाल ह्मणजे ऋतुकालाचे पूर्वीं कन्येचा विवाह न केला तर पिता दोषी होतो.
ऋतुकाळीं स्त्रियेशीं पति गमन न करील तर पति दोषी होतो. भर्ता मृत झाल्यानंतर
मातोश्रीचें रक्षण पुत्र जर न करील तर तो पुत्र दोषी होतो ॥ ९ ॥ १० ॥ बृहस्पतीचे
वचनाचा अर्थ असाच आहे. मनूचें वचन. शय्या, आसन, अलंकार, काम, क्रोध,
कठोरपणा, द्रोहभाव, कुत्सिताचार हे सर्व सृष्टीच्या आरंभीं स्त्रियांमध्यें उत्पन्न केले
आहेत. याकरितां मोठ्या प्रयत्नेंकरून स्त्रियांचें रक्षण करावें ॥ ११ ॥ जसा अग्नि
काष्ठांच्या योगानें तृप्त होत नाहीं, तसेंच समुद्र नद्यांनीं तृप्त होत नाहीं, अंतक सर्व भू-
तांचे नाशानें तृप्त होत नाहीं, त्याप्रमाणेंच स्त्रिया पुरुषांचे योगानें तृप्त होत नाहींत ॥१२॥
बलात्कारानें स्त्रियांस रक्षण करण्यास कोणीही समर्थ होणार नाहीं, परंतु पुढील उपा-
यांनीं त्यांचें रक्षण होईल ॥ १३ ॥ विवादरत्नाकरांतील वचन. स्त्रियांची योजना
द्रव्यसंग्रह करण्याचे कामीं, द्रव्याचा खर्च करण्याचे कामीं, शुचिर्भूतता, धर्माचरण, आ-
प्तसमुदायांमध्यें राहणें, तसेंच कटककुंडलादि अलंकार अवलोकनाविषयीं योजना करावी.
रक्षणाकरितां घरामध्यें प्रतिबंध केल्यापेक्षां या कारणांनीं त्यांचें स्वतःचे योगानें रक्षण
होईल ॥ १४ ॥ बृहस्पति. जें द्रव्य मिळेल तें त्यांच्या जवळ ठेवणें, खर्च करणें, पाक-
निष्पत्ति करणें, घरांतील सर्व सामुग्री रक्षण करणें, शुचिर्भूतपणा, अग्निसेवा यांचे ठायीं
स्त्रियांची योजना करावी ह्मणजे त्यांचें रक्षण होतें ॥ १५ ॥ याज्ञवल्क्याचें वचन.
गर्भिणी स्त्रीस जो पदार्थ खाण्याविषयीं इच्छा होईल तो पदार्थ द्यावा, न दिला असतां
गर्भास विकार उत्पन्न होतो ॥ १७ ॥ प्रवासास जाणाऱ्या मनुष्यानें स्त्रियांची उपजीवि-
केची सर्व प्रकारांनीं व्यवस्था करून नंतर जावें, तसें न करितां गेलें असतां चांगल्याही
स्त्रिया दूषित होतात ॥ १८ ॥ जेथें स्त्रीचे योगानें पति व पतीच्या योगानें स्त्री संतुष्ट
होऊन राहते त्या कुलामध्यें निरंतर कल्याण होईल ॥ १९ ॥ जेथें पुरुषास स्त्री
रुचत नसेल आणि स्त्री पुरुषाविषयीं संतोषयुक्त नसेल तेथें संतती होणार नाहीं. स्त्री
संतोषयुक्त असेल तर सर्व कुल संतोषयुक्त होतें. स्त्री संतोषयुक्त नसेल तर सर्व कुलही
संतोषरहित असें होतें ॥ २० ॥ दक्षाचें वचन. अनुकूल, मधुर भाषण करणारी, पुत्र-
वती, सर्व कर्मांविषयीं कुशल, पतिव्रता या गुणांनीं युक्त असणारी स्त्री साक्षात् लक्ष्मी
जाणावी ॥ २१ ॥ व्यासाचें वचन. पतीच्या पूर्वीं प्रातःकाळीं शयनापासून उठून जा-

णारी, पति बसल्यानंतर बसणारी, पतीनें शयन केल्यानंतर आपण निजणारी, मधुर भाषण करणारी, अनुकूल अशी स्त्री मोठ्या पुण्याच्या योगानें प्राप्त होते ॥ २२ ॥ नारदाचें वचन. अनुकूल, मधुर भाषण करणारी, सर्व कर्मांचे ठिकाणीं निष्णात, जीस संतती आहे अशी आणि पतिव्रता अशा स्त्रियेस टाकणाऱ्या पतीस राजानें दंड करावा ॥ २३ ॥ स्त्री आणि पति या दोघांचा आमरणपर्यंत धर्मार्थकामांचे ठायीं परस्पर वियोग न व्हावा असा हा परमधर्म संक्षेपेंकरून जाणावा ॥ २४ ॥ विवाहित स्त्रीपुरुषांनीं धर्मार्थकामांविषयीं परस्परांचा विरह न होईल अशा रीतीनें निरंतर प्रयत्न करावा ॥ २५ ॥ २६ ॥ ॥ २७ ॥ याप्रमाणें स्त्री पुरुषधर्म निर्णय जाणावा.

## ॥ अथ द्यूतसमाह्वयनिर्णयः ॥

तत्र नारदः–अक्षवध्रशलाकाद्यैर्देवनं जिह्मकारितम् ॥ पणक्रीडावयोभिश्च पदं द्यूतसमाह्वयम् ॥ १ ॥ मनुः–अप्राणिभिर्यत्क्रियते तल्लोके द्यूतमुच्यते ॥ प्राणिभिः क्रियते यस्तु स विज्ञेयः समाह्वयः ॥ २ ॥ बृहस्पतिः–अन्योन्यं परिगृहीताः पक्षिमेषवृषादयः ॥ प्रहरंते हृतपणास्तं वदंति समाह्वयम् ॥ ३ ॥ मनुः–प्रकाशमेतत्तास्कर्यं यद्देवनसमाह्वयौ ॥ तयोर्नित्यं प्रतीघाते नृपतिर्यत्नवान्भवेत् ॥ ४ ॥ द्यूतं समाह्वयं चैव यः कुर्याद्यश्च कारयेत् ॥ तान्सर्वान्घातयेद्राजा शूद्रांश्च द्विजलिंगिनः ॥ ५ ॥ द्यूतसमाह्वयौ यः कुर्यात् यो वा सभीकः कारयेत् तेषामपराधापेक्षया राजा ताडनादिकं कुर्यादित्यर्थः ॥ द्यूतमेतत्पुरा कल्पे दृष्टं वैरकरं महत् ॥ तस्माद्द्यूतं न सेवेत हास्यार्थमपि बुद्धिमान् ॥ ६ ॥ प्रच्छन्नं वा प्रकाशं वा तन्निषेवेत यो नरः ॥ तस्य दण्डविकल्पः स्याद्यथेष्टं नृपतेस्तथा ॥७॥ दंडविकल्पो दंडप्रकारः यथेष्टं नृपतेरिच्छानुसारेण ॥ बृहस्पतिः–द्यूतं निषिद्धं मनुना सत्यशौचधनापहम् ॥ तत्प्रवर्तितमन्यैश्च राजभागसमन्वितम् ॥ ८ ॥ सभीकाधिष्ठितं कार्यं तस्करज्ञापकं हि तत् ॥ एषमेव विधिर्ज्ञेयः प्राणिद्यूतसमाह्वये ॥ ९ ॥ अस्यायमर्थः। द्यूतं तावन्मनुना निषिद्धं अन्यैस्तस्करनिरूपणार्थं तद्विहितं तदपि ससभीकं सराजपुरुषमित्यर्थः ॥ याज्ञवल्क्यः–द्यूतमेकमुखं कार्यं तस्करज्ञानकारणात् ॥ एष एव विधिर्ज्ञेयः प्राणिद्यूतसमाह्वये ॥ १० ॥ एकमुखं एकराजाध्यक्षप्रधानपुरुषरूपसभीकाधिष्ठितं कार्यमित्यर्थः ॥ अस्यैव प्राणिद्यूतसमाह्वये एष एवोपदेशेनातिदेशः ॥ बृहस्पतिः–छद्मपूर्वेण यः कश्चिद्देवयेदप्यनृपात् ॥ तस्करादिना पणो दंडो राष्ट्रात्स निर्वासितः ॥ ११ ॥ अनिर्दिष्टस्तु यो राज्ञा द्यूतं कुर्वीत मानवः ॥ न स मायामुपाश्रयं जितं चैव

सोऽर्हति ॥ १२ ॥ राज्ञा प्रवर्तितान्धर्मान्यो नरो नानुपालयेत् ॥ गर्ह्यश्च पापो दंड्यश्च लोपयन् राजशासनम् ॥ १३ ॥

## द्यूतसमाव्हयाचा निर्णय.

त्याविषयीं नारदाचें वचन. अक्ष ह्मणजे फांसे, बध्र ह्मणजे वादी, शलाका इत्या-
दिकेंकरून जो कपटानें पणपूर्वक खेळ त्यास द्यूत, जुवा असें ह्मणतात. पक्षी, पशू
इत्यादिकांकडून प्रतिज्ञापूर्वक जी क्रीडा त्यास समाव्हय असें ह्मणतात ॥ १ ॥ मनु.
प्राणिभिन्न असे फासे इत्यादिकें करून जी क्रीडा करितात त्यास लोकांमध्यें द्यूत, जु-
गार असें ह्मणतात. प्राण्याच्या योगानें पणपूर्वक ह्मणजे पैज लावून जी क्रीडा करितात
त्यास समाव्हय ह्मणतात ॥ २ ॥ पक्षी, बोकड, बैल, हले इत्यादिक परस्परांनीं घरून
प्रतिज्ञा लावून जे एकमेकांशीं प्रहार करितात ह्मणजे टकरी करितात त्यास समाव्हय
असें ह्मणतात ॥ ३ ॥ मनु. द्यूत आणि समाव्हय हीं दोन्ही प्रसिद्ध चोरी होय. ह्माक-
रितां ह्या दोहोंचा समूळ नाश करण्याविषयीं राजानें यत्नयुक्त व्हावें ॥ ४ ॥ जुवा आणि
पैज हे जो खेळेल अथवा दुसऱ्याकडून खेळवील त्यांचा राजानें नाश करावा. ते ब्राह्मण
क्षत्रिय, वैश्य यांचीं चिन्हें धारण करणारे असले तरीही त्यांचा व शूद्र यांचाही नाश क-
रावा ॥ ५ ॥ द्यूत हें पूर्वयुगामध्यें मोठें वैर उत्पन्न करणारें असें सांगितलें आहे. हल्लीं तर
भयंकर कलियुग आहे सबब यापासून अत्यंत वैरें होतील, ह्मणून बुद्धिमान् मनुष्यानें
विनोदार्थं देखील द्यूत खेळूं नये ॥ ६ ॥ जो मनुष्य प्रसिद्धपणानें अथवा गुप्तपणानें द्यूत
खेळेल त्याला राजानें दंड आपल्या इच्छेस वाटेल तितका करावा ॥ ७ ॥ बृहस्पति.
द्यूत हें सत्यपणा, शुचिर्भूतपणा, द्रव्य याचा नाश करणारें असें आहे. सबब मनूनें
याचा निषेध केला आहे. परंतु राजाचा भाग त्यामध्यें ठेविला असतां तें करावें असें
इतरांनीं सांगितलें आहे ॥ ८ ॥ कारण द्यूत चोरास सुचवून देणारें असें आहे यामुळें
तें सभीक ह्मणजे द्यूत करणाऱ्या राजपुरुषानें युक्त असें करावें. तसेंच प्राण्यांच्या
पैजा लावून टकरी वगैरे होतात त्याही राजपुरुषानें युक्त अशा कराव्या ॥ ९ ॥ याज्ञ-
वल्क्याचें वचन. चोर समजण्याकरितां राजानें जुगारावर एक मुख्य नेमावा. हाच प्र-
कार प्राण्याविषयीं जी पैज तिजविषयीं जाणावा ॥ १० ॥ बृहस्पति. द्वंद्वयुद्ध ह्मणजे
मेंढ, बैल, हले इत्यादिकांच्या युद्धामध्यें ज्याचा पराजय होईल त्याच्या मालकानें जें के-
लेला पण तो द्यावा ॥ ११ ॥ नारद. राजाच्या आज्ञेवांचून जो मनुष्य द्यूत करील त्यास
कांहींही प्राप्ति होणार नाहीं व तो शिक्षेस पात्र होईल ॥ १२ ॥ कात्यायन. रा-

जानें प्रवर्तित केलेले धर्म यांस जो पालन करणार नाहीं, तो राजाचें शासन मोडल्यामुळें पापी, निंदित आणि दंडास पात्र असा होतो. सबब सर्वांनीं राजाच्या आज्ञेप्रमाणें वागावें ॥ १३ ॥ याप्रमाणें द्यूत आणि समाह्वय यांचा निर्णय जाणावा.

उदितः संक्षेपतोयं मिथ्याविवदमानयोः ॥ अष्टादशसु मार्गेषु व्यवहारविनिर्णयः

व्यर्थ वादविवाद करणारे जे वादीप्रतिवादी यांचा हा अठरा प्रकारचा व्यवहारनिर्णय संक्षेपानें सांगितला आहे. इति श्रीधारूरकरेत्युपनामकदाजीसूनुविठ्ठलशास्त्रिणा विरचिते प्रायश्चित्तव्यवहारसंग्रहे चतुर्थभागः परिपूर्तिमगात् ॥ श्रीरस्तु ॥

श्रीरुक्मिणीपांडुरंगार्पणमस्तु.

---

## ॥ अथ प्रकीर्णप्रकरणनिर्णयः ॥

प्रणम्य रुक्मिणीकांतं पौंडरीकपुरनायकम् ॥ संक्षेपादुच्यते चात्र प्रकीर्णकविनिर्णयः ॥ १ ॥ याज्ञवल्क्यः-श्रुताध्ययनसंपन्ना धर्मज्ञाः सत्यवादिनः ॥ राज्ञा सभासदः कार्या रिपौ मित्रे च ये समाः ॥ १ ॥ बृहस्पतिः- सप्त पंच त्रयो वा सभासदो भवंतीत्याह ॥ लोकवेदज्ञधर्मज्ञाः सप्त पंच त्रयोऽपि वा ॥ यत्रोपविष्टा विप्राः स्युः सा यज्ञसदृशी सभेति ॥ २ ॥ अपिच ॥ रागाल्लोभाद्भयाद्वापि स्मृत्यपेतादिकारिणः ॥ सभ्याः पृथक् पृथक् दंड्या विवादाद्विगुणं दमम् ॥ ३ ॥ धर्मशास्त्रार्थशास्त्रयोर्विरोधनिपत्तावाह नारदः-यत्र विप्रतिपत्तिः स्याद्धर्मशास्त्रार्थशास्त्रयोः ॥ अर्थशास्त्रोक्तमुत्सृज्य धर्मशास्त्रोक्तमाचरेदिति ॥ ४ ॥ धर्मशास्त्रयोर्विरोधे त्वाह याज्ञवल्क्यः ॥ स्मृत्योर्विरोधे न्यायस्तु बलवान् व्यवहारतः ॥ ५ ॥

## आतां प्रकीर्णप्रकरणाचा निर्णय.

श्रीरुक्मिणीचा पति आणि पुंडरीकानें निर्माण केलेलें जें पंढरपुर क्षेत्र त्याचा स्वामी असा जो श्रीविठ्ठल त्यास नमस्कार करून संक्षेपानें हें प्रकीर्णक प्रकरण सांगतों ॥ १ ॥ याज्ञवल्क्याचें वचन. राजानें आपले राज्यांत वेदशास्त्राध्ययनसंपन्न, धर्म जाणणारे, सत्यभाषण करणारे, शत्रु आणि मित्र यांविषयीं सारखेपणानें वागणारे असे सभासद नेमावे ॥ १ ॥ बृहस्पतीचें वचन. लोकव्यवहार, वेद, शास्त्र आणि धर्म यांस जाणणारे असे सात सभासद राजानें नेमावे. सात न मिळतील तर पांच अथवा तीन ब्राह्मणांची योजना करावी. ही सभा यज्ञसभेसारखी जाणावी ॥ २ ॥ हे सभासद जे सभासद यांनीं लोभानें अथवा क्रोधानें किंवा भयानें शास्त्राविरुद्ध कार्य

निरुद्धरीतीनें विवादाचा निर्णय जर केला तर प्रत्येक सभासदास राजानें जो वाद
असेल त्याच्या दुप्पट दंड करावा ॥ ३ ॥ धर्मशास्त्र आणि अर्थशास्त्र ह्मणजे नीतिशास्त्र
यांचा एकमेकांस विरोध येत असेल तर त्याविषयीं नारदाचें वचन. जेथें धर्मशास्त्र
आणि नीतिशास्त्र याचीं वचनें परस्पर विरुद्ध असतील, तेथें नीतिशास्त्रोक्त वचन सोडून
धर्मशास्त्रानें सांगितल्याप्रमाणें आचरण करावें ॥ ४ ॥ धर्मशास्त्राचींच वचनें परस्पर वि-
रुद्ध जर येतील, त्यास याज्ञवल्क्याचें वचन. स्मृतिस्मृतीचा परस्पर विरोध येत असेल
तर व्यवहारापेक्षां न्याय हा बलवत्तर आहे ॥ ५ ॥

नारदः–अकल्पबालस्थविरविषमस्थक्रियाकुलान् ॥ कार्यातिपातिव्यसनिनृप-
कार्योत्सवाकुलान् ॥ ६ ॥ मत्तोन्मत्तप्रमत्तार्तान् भृत्यान्नाह्वानयेन्नृपः ॥ न हीन-
पक्षां युवतिं कुले जातां प्रसूतिकाम् ॥ सर्ववर्णोत्तमां कन्यां ता ज्ञातिप्रभुकाः स्मृताः
॥ ७ ॥ तदधीनकुटुंबिन्यः स्वैरिण्यो गणिकाश्च याः ॥ निष्कुला याश्च पतितास्तासा-
माह्वानमिष्यते ॥ कालं देशं च विज्ञाय कार्याणां च बलाबलं ॥ अकल्पादीनपि
शनैर्यानैराह्वानयेन्नृपः ॥ ८ ॥

नारदाचें वचन. व्याधिग्रस्त, बाल, वृद्ध, संकटांत पडलेलीं मनुष्यें, नित्यनैमित्तिक
अनुष्ठान करणारे, जे राजाकडे नेले असता पाठीमागें कांहीं तरी मोठे कार्याचा नाश
होईल असे, मित्रादिकांच्या योगानें जे संकटांत पडलेले, राजकार्याविषयीं तत्पर, ज्यांच्या
घरीं विवाहादि कार्य असल्यानें परस्वाधीन झालेले ॥ ६ ॥ मत्त, उन्मत्त, प्रमत्त ह्मणजे
वेडा, आर्त, पीडित, भृत्य ह्मणजे चाकर यास राजानें आपले सभेमध्यें बोलावून आणूं
नये. तसेंच ज्या स्त्रियेस कोणी नाहीं अशा स्त्रियेस, तरुण स्त्री, कुलीन स्त्री, बाळंतीण
आणि कन्या, ब्राह्मण स्त्री यांस राजानें सभेंत बोलावून आणूं नये. कारण या आ-
पल्या जातीच्या मनुष्याच्या स्वाधीन असतात ॥ ७ ॥ ज्या स्त्रिया स्वतंत्रतेनें कुटुंब पो-
षण करितात, तसेंच पतित, जारिणी, वेश्या, नीचकुलांत उत्पन्न झालेल्या, यास बो-
लावून आणावें. राजानें देशकाल, तसेंच कार्याचें बलाबल पाहून पूर्वी जे रोगी इत्यादि-
कांस बोलावूं नये ह्मणून सांगितलें, त्यांसही, कार्याचें महत्व असल्यास वाहनादि पाठ-
वून हळूहळू आणवावें ॥ ८ ॥

आहूतो यस्तु नागच्छेद्दर्पाद्बंधुबला-
न्वितः ॥ अभियोगानुरूपेण तस्य दंडं प्रकल्पयेत् ॥ ९ ॥ अभियोगभेदेन दंडभेद-
माह कात्यायनः–हीने कर्मणि पंचाशन्मध्यमे तु शतावरः ॥ गुरुकार्येषु दंडः स्या-
आहूतोनागच्छन् दंड्यः ॥ तथा च बृहस्पतिः–

न्नित्यं पंचाशतावर इति ॥ १० ॥ नारदः-अर्थिना संनियुक्तोवा प्रत्यर्थिप्रेरितोपि वा ॥ यो यस्यार्थे विवदते तयोर्जयपराजयौ ॥ ११ ॥

राजानें बोलाविलें असतां जो मनुष्य राजसभेंत न जाईल तो दंडास पात्र होतो. यास बृहस्पतीचें वचन. जो मनुष्य राजानें बोलाविलें असतां गर्वानें किंवा बंधु, कुल इत्यादिकांनीं युक्त होऊन जर कदाचित् न येईल तर त्यास दंड करावा ॥ ९ ॥ कात्यायनाचें वचन. ज्या कज्जाबद्दल बोलाविलें असेल, तो कज्जा क्षुल्लक असल्यास न येणाऱ्या मनुष्यास पन्नास पण दंड करावा. मध्यम असल्यास शंभर, मोठा असल्यास पांचशें अथवा पांचशें पेक्षां जास्त दंड करावा ॥ १० ॥ ज्या मनुष्यानें वादाविषयीं ज्या मनुष्याची योजना करून दिली असेल, त्यानें त्याजबद्दलचा वाद केला असतां त्यांत त्याचा जो जय पराजय होईल, तो मूळच्या मालकाचा जय पराजय झाला असें समजावें ॥ ११ ॥

अकल्पादयः पुत्रादिकमन्यं वा सुहृदं मेषयिष्यंति न च ते परार्थवादिनः ॥ यो न भ्राता न च पिता न पुत्रो न नियोगकृत् ॥ परार्थवादी दंड्यः स्याद्व्यवहारेषु विब्रुवन्निति नारदवचनात् ॥ १२ ॥ प्रत्यर्थिनोऽग्रतो लेख्यं यथावेदितमर्थिना ॥ समामासतदर्धाहर्नामजात्यादिचिह्नितम् ॥ १३ ॥ अन्यवादी क्रियाद्वेषी नोपस्थाता निरुत्तरः ॥ आहूतः प्रपलायी च हीनः पंचविधः स्मृतः ॥ १४ ॥ अप्रसिद्धं निराबाधं निरर्थं निष्प्रयोजनम् ॥ असाध्यं वा विरुद्धं वा पक्षाभासं विवर्जयेत् ॥१५॥ अप्रसिद्धं मदीयं शशविषाणं गृहीत्वा न प्रयच्छतीत्यादि ॥ निराबाधमस्मद्गृहदीपप्रकाशेनायं स्वगृहे व्यवहरतीत्यादि ॥ निरर्थमभिधेयरहितम् क च ट त प ज ड द गवेत्यादि ॥ निष्प्रयोजनं यथायंदेवदत्तोऽस्मद्गृहसन्निधौ सुस्वरमधीत इत्यादि ॥ असाध्यं यथाहं देवदत्तेन सभ्रूभंगमुपहसित इत्यादि ॥ एतत्साधनासंभवादसाध्यम् ॥ अल्पकालत्वान्न साक्षिसंभवो लिखितं दूरतोल्पत्वाच्च दिव्यमिति ॥ विरुद्धं यथाहं मूकेन शप्तइत्यादि ॥ १६ ॥

आजारी, बालक, वृद्ध इत्यादिकांस वादविवादा संबंधानें राजानें बोलाविल्यामुळें पुत्रादिकांस, तसेंच मित्र इत्यादिकांस पाठवितील तर ते परार्थवादी असे होत नाहींत. कारण पिता, बंधु, पुत्र अथवा आपले आंत वागणारा असा मनुष्य ( वकील वगैरे ) यांवांचून अन्य मनुष्य जर दुसऱ्याबद्दल वादविवाद सांगेल तर तो दंडास पात्र होतो. तसेंच व्यवहारामध्यें जो विरुद्ध बोलतो त्यासही राजानें दंड करावा असें नारदाचें वचन आहे ॥ १२ ॥ वादी जें बोलेल तें सर्व भाषण प्रतिवादीच्या समोर ज्याप्रमाणें वादीचें भाषण झालें असेल त्याप्रमाणें वादीचें सर्व भाषण लिहावें आणि त्या लेखावर, वर्ष,

महिना, पक्ष, दिवस, नांव, जात, वय इत्यादिक सर्व लिहावें ॥ १३ ॥ जो वादी प्रथम सांगितलें त्याच्या विरुद्ध बोलतो, पुरावा दाखवीत नाहीं, दाखविला असतां विसंगत दाखवितो व वादविवादास उभा रहात नाहीं, विचारिलें असतां प्रश्नाचें उत्तर बरोबर देत नाहीं, बोलाविलें असतां जाण्याविषयीं त्वरा करितो, असा पांच प्रकारचा वादी असत्य आहे असें जाणावें ॥ १४ ॥ अप्रसिद्ध, निराबाध, निरर्थ, निष्प्रयोजन, असाध्य, विरुद्ध व पक्षाभास अशा प्रकारचा विवाद वर्ज्य करावा ॥ १५ ॥ १. अप्रसिद्ध ह्मणजे माझें ससाचें शिंग यानें घेतलें आहे, तें तो मला देत नाहीं. २. निराबाध ह्मणजे हा मनुष्य आमचे घरांतील दिव्याच्या प्रकाशानें आपले घरांत सर्व व्यवहार करितो. ३. निरर्थ ह्मणजे ज्यांत कांहींच अर्थ नाहीं. क, च, ट, त, प, ज, ब, ग, ड, द इत्यादि हें माझें हरण केलें. ४. निष्प्रयोजक ह्मणजे हा अमुक मनुष्य आमचे घराजवळ सुस्वर अध्ययन करितो. ५. असाध्य ह्मणजे अमुक मनुष्यानें भ्रुकुटी वर करून माझा उपहास ह्मणजे थट्टा केली. येथें थोडा वेळ असल्यामुळें साक्षी मिळण्याचा संभव नाहीं सबब असाध्य. ६. विरुद्ध ह्मणजे अमुक जो मुका मनुष्य त्यानें मला शिव्या दिल्या असा जो पक्षाभास-वाद तो वर्ज्य करावा ॥ १६ ॥

अभियोगमनिस्तीर्य नैनं प्रत्यभियोजयेत् ॥ अभियुक्तं च नान्येन नोक्तं विप्रकृतिं नयेत् ॥ १७ ॥ नारदः–पूर्ववादं परित्यज्य योऽन्यमालंबते पुनः ॥ वादसंक्रमणाज्ज्ञेयो हीनवादी स वै नरः ॥ हीनवादी दंड्यो भवति ॥ १८ ॥ याज्ञवल्क्यः–कुर्यात्प्रत्यभियोगं च कलहे साहसेषु च ॥ उभयोः प्रतिभूर्ग्राह्यः समर्थः कार्यनिर्णये ॥ १९ ॥ कात्यायनः–अथ चेत्प्रतिभूर्नास्ति कार्ययोग्यस्तु वादिनः ॥ स रक्षितो दिनस्यांते दद्याद् भृत्याय वेतनम् ॥ २० ॥ याज्ञवल्क्यः–देशाद्देशांतरं याति सृक्किणी परिलेढि च ॥ ललाटं स्विद्यते चास्य मुखं वैवर्ण्यमेति च ॥ २१ ॥ परिशुष्यत्स्खलद्वाक्यो विरुद्धं बहु भाषते ॥ वाक् चक्षुः पूजयति नो तथोष्ठौ निर्भुजत्यपि ॥ २२ ॥ स्वभावाद्विकृतिं गच्छेन्मनोवाक्कायकर्मभिः ॥ अभियोगे च साक्ष्ये च दुष्टः स परिकीर्तितः ॥ २३ ॥

वादीनें केलेली फिर्याद तिचा निकाल झाल्यावांचून प्रतिवादीनें वादीवर फिर्याद करूं नये. एका मनुष्यानें ज्यावर फिर्याद केली आहे, त्याच्यावर दुसऱ्यानें फिर्याद करूं नये आणि पूर्वीं जें फिर्यादींत लिहिलें आहे, त्याचे विरुद्ध मजकूर आणूं नये ॥ १७ ॥ नारदाचें वचन. जो मनुष्य पूर्वीं आरंभ केलेला वाद सोडून पुनः दुसरा वाद स्वीकार करील, त्यानें प्रथम वाद सोडून दुसऱ्याचा स्वीकार केल्यामुळें तो हीनवादी जाणावा.

हीनवादी मनुष्यास राजानें दंड करावा ॥ १८ ॥ याज्ञवल्क्याचें वचन. प्रतिवादीनें आपलेवरील फिर्यादीचा निकाल होईपर्यंत वादीवर फिर्याद करूं नये, असें जें लिहिलें त्यास अपवाद. कलह, दंडपारुष्य, वाक्पारुष्य, तसेंच साहस ह्मणजे विष, शस्त्र इत्यादिकानीं नाश करणें ( साहसाचा विचार साहसप्रकरणांत सांगितला आहे तो तेथें पहावा ) यांचे ठायीं फिर्याद उलट करावी. राजानें विवादाचा निर्णय होईपर्यंत वादी प्रतिवादींपासून जामीन घ्यावेत ॥ १९ ॥ कात्यायनाचें वचन. वादीस जर योग्य जामीन न मिळेल तर, त्याचें आपल्या नोकराकडून रक्षण करावें, ह्मणजे त्यांच्या ताब्यांत ठेवावें व त्याचा पगार त्याजकडून देववावा ॥ २० ॥ याज्ञवल्क्याचें वचन. जो मनुष्य एका ठिकाणीं न बसतां इकडे तिकडे जाऊं लागतो, व ओठाचे प्रांतभाग चाटितो, ज्याचे कपाळास घाम येतो, ज्याच्या मुखाची चर्या बदलते ॥ २१ ॥ ज्याचें तोंड सुकून जातें व जो विरुद्ध भाषण करितो, जो भाषणाच्या योगानें अथवा अवलोकनाच्या योगानें दुसऱ्यास सत्कार करीत नाहीं आणि आपले ओष्ठ वांकडेतिकडे करितो, जो स्वभावानें, मन, वाणी, देह, यांच्या योगानें विकाराप्रत पावतो, तो मनुष्य वादांत तसेंच साक्षीविषयीं खोटा असा सांगितला आहे ॥ २२ ॥ २३ ॥

याज्ञवल्क्यः–निन्हुते लिखितं नैकमेकदेशे विभावितः ॥ दाप्यः सर्वं नृपेणार्थं नग्राह्यस्त्वनिवेदितः ॥ २४ ॥ कात्यायनः–अनेकार्थाभियोगेपि यावत्संसाधयेद्धनी ॥ साक्षिभिस्तावदेवासौ लभते साधितं धनम् ॥ २५ ॥ साध्यार्थांशेपि गदिते साक्षिभिः सकलं भवेत् ॥ स्त्रीसंगे साहसे चौर्ये यत्साध्यं परिकीर्तितम् ॥२६॥ अथ प्रमाणं ॥ याज्ञवल्क्यः–प्रमाणं लिखितं भुक्तिः साक्षिणश्चेति कीर्तितम् ॥ एषामन्यतमाभावे दिव्यान्यतममुच्यते ॥ २७ ॥ द्वारमार्गक्रियाभोगजलवाहादिषु क्रिया ॥ भुक्तिरेव तु गुर्वी स्यान्न दिव्यं न च साक्षिणः ॥ २८ ॥ पश्यतोऽब्रुवतो भूमेर्हानिर्विंशतिवार्षिकी ॥ परेण भुज्यमानाया धनस्य दशवार्षिकी ॥ २९ ॥

याज्ञवल्क्याचें वचन. वादीनें लिहून दिलेला मजकूर जर प्रतिवादी नाकबूल करील, तंवर वादी त्या वादापैकीं एकादा भाग जरी पुराव्यानें शाबीत करील, तर न्यायाधीशानें वादीच्या ह्मणण्याप्रमाणें सर्व रकमा देववाव्या. परंतु पूर्वीं फिर्यादींत लिहून दिल्या नसतील तर देववूं नयेत ॥ २४ ॥ कात्यायनाचें वचन. वादीनें जरी अनेक पदार्थांबद्दलची फिर्याद केली, तरी साक्षी देख इत्यादि पुराव्यांकडून जितक्या वस्तूंची शाबिती करील, तितक्याच त्यास द्याव्यात. जास्त देववूं नयेत ॥ २५ ॥ स्त्रीसंग्रहण, साहस व चौर्य या विवादांत साक्षीदारांनीं यांतील एकदेश जरी सांगितला ( चौर्य, साहस इत्यादिकांतील

एकादी रक्कम जरी सांगितली ) तरी वादीच्या ह्मणण्याप्रमाणें सर्व प्रतिवादीकडून देववावें ॥ २६ ॥ आतां प्रमाणाचा विचार. याज्ञवल्क्याचें वचन. लेख, भोगवटा, साक्षी अशीं तीन प्रमाणें सांगितलीं आहेत. यांतून एकादें न मिळेल तर दिव्यप्रमाण ( शपथ वगैरे ) करण्यास सांगितलें आहे ॥ २७ ॥ द्वार, मार्ग, अंगण, पाणी जाण्याचा मार्ग, मोरी, पन्हाळ इत्यादिकांविषयीं उपभोग ह्मणजे वहिवाट हीच बलवत्तर आहे. याविषयीं दिव्य किंवा साक्षी नाहीं ॥ २८ ॥ आपण पहात असतां आपली भूमि, घर इत्यादिक स्थावर मिळकतीचा उपभोग दुसरा मनुष्य करीत आहे आणि त्याचें निवारण केलें नाहीं आणि तो तसेंच वीस वर्षेपर्यंत उपभोग करील तर मालकाचें त्या स्थावरावरील स्वामित्व जाऊन वहिवाट करणाराची मालकी होते व जंगम इस्टेट दहा वर्षेपर्यंत मालका-समक्ष उपभोगिली असतां मालकाचें त्यावरील स्वामित्व नाहींसें होऊन वहिवाटदाराची मालकी होते ॥ २९ ॥

आधिसीमोपनिक्षेपजडबालधनैर्विना ॥ तथोपनिधिराजस्त्रीश्रोत्रियाणां धनैरपि ॥ ३० ॥ बलाद्दत्तं बलाद्भुक्तं बलाद्यच्चापि लेखितम् ॥ सर्वान् बलकृतानर्थानकृता-न्मनुरब्रवीत् ॥ ३१ ॥ मत्तोन्मत्तार्तव्यसनिबालभीतादियोजितः ॥ असंबंधकृतश्चैव व्यवहारो न सिध्यति ॥ ३२ ॥ कात्यायनः–एकपात्रेऽथवा पंक्त्यां संभोक्ता येन चित् कृतवर्णं भक्षितं भवेत् ॥ आत्मार्थं विनियुक्तं वा देयं तैरेव तद्भवेत् ॥ ३३ ॥ गुणमुद्दिश्य यत्किं-यो भवेत् ॥ अकुर्वंस्तु तदा दंड्यस्तस्य दोषमदर्शयन् ॥ ३४ ॥ याज्ञवल्क्यः–दुर्दृष्टांस्तु पुनर्दृष्ट्वा व्यवहारान्नृपेण तु ॥ सभ्याः सजयिनो दंड्या विवा-दाद्द्विगुणं दमम् ॥ ३५ ॥

गहाण ठेवलेली मिळकत, शीव, ठेव, अज्ञानाचें ( ज्ञानशून्याचें ) धन, तसेंच बाळधन ( मुलांचें धन ) राजाचें द्रव्य, स्त्रीधन, अग्निहोत्र्याचें धन हीं द्रव्यें मालकासमक्ष दहा वर्षेपर्यंत उपभोगिलीं असतांही मालकाचें स्वामित्व त्याजवरील नाहींसें होत नाहीं ॥३०॥ बलात्कारानें दिलेलें, बलात्कारानें उपभोगिलेलें, बलात्कारानें लिहिलेलें, बलात्कारानें केलेले सर्व व्यवहार न केल्याप्रमाणें जाणावेत, असें मनूनें सांगितलें आहे ॥ ३१ ॥ याज्ञवल्क्याचें वचन. मत्त ह्मणजे मादक भांग इत्यादिक पदार्थ भक्षण करून मत्त झालेल्या मनुष्यानें, उन्मत्त, वात, पित्त, कफ, ग्रहावेश यानें भ्रांतिष्ट झालेल्या मनुष्यानें, आर्त ह्मणजे व्याधिग्रस्त मनुष्यानें, बाल ह्मणजे अठरा वर्षांचे आंतील मुलानें, भीत ह्मणजे भयभीत झालेल्या मनुष्यानें. इत्यादिकांनीं केलेला, तसेंच ज्यांचा कांहीं संबंध नाहीं, अशा मनुष्यानें केलेला व्यवहार सिद्ध होत नाहीं; ह्मणजे व्यवहार करून

न केल्याप्रमाणें होतो ॥ ३२ ॥ कात्यायनाचें वचन. एका पात्रामध्यें किंवा पंक्तीमध्यें जो मनुष्य ज्या मनुष्याशीं भोजन करणार असा आहे, त्या मनुष्याचें भोजन करण्यास प्रतिबंध करणारें तसा दोष न दाखवितां, जो मनुष्य मी याजबरोबर भोजन करीत नाहीं असें ह्मणेल त्या मनुष्यास राजानें दंड करावा ॥ ३३ ॥ समुदायाचें काम दाखवून, जर कर्ज करून, तें कर्ज एकादे मनुष्यानें खाल्लें तर, तें कर्ज ज्यानें खाल्लें आहे, त्या मनुष्यानेंच द्यावें. समुदायानें देऊं नये ॥ ३४ ॥ याज्ञवल्क्याचें वचन. सभासदानें अन्यायानें ठराव केल्यास तो फिरवावा आणि त्या सभासदास व ज्याच्या तर्फे ठराव केला असेल, त्यास वादांत जी रकम असेल, त्याचे दुप्पट दंड करावा ॥ ३५ ॥

व्यवहारात्–यो मन्येताजितोस्मीति न्यायतोपि पराजितः ॥ तमायांतं पुनर्जित्वा दापयेद्द्विगुणं दमम् ॥ ३६ ॥ अत्र सर्वत्रानुक्तसंख्येया संख्या पणविषयिणी ज्ञेया ॥ पणस्तु कर्षोन्मितं ताम्रं ॥ कार्षिकस्ताम्रिकःपणइति कोशात् ॥ कर्षः पलचतुर्थांशः ॥ वराटकानां दशकद्वयं यत्सा काकिनी ताश्च पणश्चतस्रः ॥ ते षोडश द्रम्म इहावगम्यो द्रम्मैस्तथा षोडशभिश्च निष्कः ॥ इति भास्कराचार्योक्तेः ॥ ३७ ॥ उत्तमसाहसादिकं तु–साशीतिपणसाहस्रो दंड उत्तमसाहसः ॥ तदर्द्धं मध्यमः प्रोक्तस्तदर्धमधमः स्मृतः ॥ ३८ ॥

एकादा मनुष्य न्यायाधीशानें न्यायानें केलेला दाव्याचा निकाल, तो न्यायानें झाला नाहीं असें ह्मणून जर पुनः न्यायसभेपुढें येईल तर पुनः त्याची चौकशी करावी आणि त्या चौकशीमध्यें जर त्याचा तो दावा रद्द होईल तर त्याजकडून दुप्पट दंड घ्यावा ॥ ३६ ॥ येथें ज्या प्रकरणामध्यें विशेष न दर्शवितां संख्या मात्र सांगितली आहे तेथें तिचा अर्थ तितके पण असा समजावा. पण ह्मणजे पांच गुंजेचा मासा याप्रमाणें सोळा माशांचा कर्ष ह्मणजे कर्षभर वजनाचा तांब्याचा पैसा ह्मणजे पण. कोशांतही असेंच सांगितलें आहे. वीस कवड्यांची एक काकिनी होते. चार काकिनींचा एक पण ह्मणजे पैसा होतो. सोळा पैशांचा एक द्रम्म आणि सोळा द्रम्मांचा एक निष्क होतो. लीलावती ग्रंथांत भास्कराचार्यांनींही पण शब्दाचा अर्थ पैसा असाच सांगितला आहे ॥ ३७ ॥ उत्तम साहसास एकहजार पण दंड सांगितला आहे. मध्यम साहसास त्याचे अर्ध दंड आणि कनिष्ठ साहसास पावपट दंड करावा ॥ ३८ ॥

तथा ॥ उक्तापराधेपूक्तपरिमाणदंडेदमनासंभवेऽधिकोपि दंडः ॥ यथाहापस्तंब. दंडो दमनादित्याहुस्तेनादांतान् दमयेदि.ति ॥ ३९ ॥ तथा सर्वस्वापहारदंडेविशेषमाह नारदः–आयुधान्यायुधीयानां वाह्यादीन् वाह्यजीविनाम् ॥ वेश्यास्त्रीणामलं-

**कारान् वाद्यातोद्यादि तद्विदाम् ॥ यच्च यस्योपकरणं येन जीवंति कारुकाः ॥ सर्व-स्वहरणेऽप्येतन्न राजा हर्तुमर्हति ॥ ४० ॥**

त्याप्रमाणेंच मागें सांगितलेले जे अपराध त्या अपराधास जे वेगवेगळे दंड सांगितले आहेत, त्या दंडानीं अपराधी मनुष्य यांचे अपराध होण्याचा संभव असेल तर अधिकही दंड करावा. यास आपस्तंबाचें वचन. मनुष्यास दमन केलें जातें ह्मणून त्यास दंड अशी संज्ञा आहे. त्या दंडानेंही अपराधी मनुष्य दबले गेले नाहींत तर त्यांस जसे द-बले जातील असा अधिकही दंड करावा ॥ ३९ ॥ दंडाबद्दल सर्व इस्टेट जप्त करून आणावयाची असतां त्या संबंधानें विशेष नारद सांगतात. हत्यारानें उपजीविका कर-णारें असें जें शिपाई त्यांचीं हत्यारें, भाडें करून उपजीविका करणारें जें मनुष्य त्यांचीं जनावरें, वाहनें, वेश्या स्त्रियांचे दागिने, वाद्यांच्या योगानें जे उपजीविका करणारे त्यांचीं वाद्यें, जे जे मनुष्य ज्या ज्या वस्तूंच्या योगानें आपली उपजीविका करितात, त्या उप-जीविकेच्या साधनीभूत अशा त्या त्या वस्तु; त्यांची सर्व इस्टेट हरण करण्याचे ठायीं राजानें हरण करूं नये ॥ ४० ॥

**स्तेनाः सुरापा ब्रह्मघ्ना गुरुदाराभिगामिनः ॥ न संति यस्य राष्ट्रेषु स राजाशक्र-लोकभाक् ॥ उदितः संक्षेपतोयं मिथ्याविवदमानयोः ॥ अष्टादशसु मार्गेषु व्यवहार-विनिर्णयः ॥ ४१ ॥**

चोर, दारू पिणारे मनुष्य, ब्रह्महत्या करणारे, गुरुस्त्रियेशीं गमन करणारे हे मनुष्य ज्या राजाच्या राज्यांत नाहींत तो राजा स्वर्गलोकाचें राज्य करणारा असा जाणावा. याप्रमाणें अठरा प्रकारच्या मार्गांचे ठायीं असत्यपणानें वादविवाद करणारे जे वादीप्रतिवादी त्यांचा हा संक्षेपानें अठरा प्रकारचा विवादनिर्णय सांगितला ॥ ४१ ॥

## अथ ग्रंथकर्तुर्वंशादिविचारः

**धारूरसंज्ञके ग्रामे केजशब्दोपमंडिते ॥ दुर्गादासोऽभवद् विप्रः सोमयाजी सतां वरः ॥ १ ॥**

केज शब्द आहे समीप ज्याच्या अशा धारूर गांवा-( केजधारूर ) मध्यें दुर्गादास या नांवाचा सज्जनांमध्यें श्रेष्ठ, ज्यानें सोमयाग केला आहे असा ब्राह्मण होता ॥ १ ॥

**दीनानाथोभवत् तस्माद्दीनार्तिनाशनोद्यतः ॥ स्ववंशतिलकः श्रीमान् वदान्यः कोविदोत्तमः ॥ अन्नसत्रं प्रपासंघं स्थापयामास यो मुदा ॥ २ ॥**

त्यापासून दीनानाथ या नांवाचा पुत्र झाला. जो अनाथांची पीडा नाश करण्या-

विषयीं तत्पर, स्ववंशांत श्रेष्ठ, दाता, विद्वानांमध्यें श्रेष्ठ असा होता. ज्यानें अन्नसत्र आणि पुष्कळ पाणपोया स्थापन केल्या ॥ २ ॥ ( तसेंच आमचे वंशांत भगवद्भक्त आणि ज्यास प्रत्यक्ष ईश्वराचा साक्षात्कार असे, अशी मंडळी पुष्कळ होऊन गेली, त्यांतील उद्धव चिद्घन या नांवाचा एक पुरुष होऊन गेला, त्याच्या संबंधानें भक्तविजय अध्याय ५६ मध्यें त्याची कथा लिहिली आहे ).

काशीनाथोऽभवत्तस्मात् सत्ववृत्तिर्दयांबुधिः ॥ पांडुरंगपदांभोजसक्तचित्तः सुधार्मिकः ॥ ३ ॥

त्या दीनानाथापासून काशीनाथ ( दाजीबा हें लोकप्रसिद्ध नांव ) या नांवाचा पुत्र झाला. हा महासात्विक, दयाळु, श्रीपांडुरंगचरणकमळाचे ठायीं ज्याचें चित्त सक्त झालें आहे आणि अत्यंत धार्मिक असा होता ॥ ३ ॥

संसेवितुं यः प्रभुपांडुरंगं तां जन्मभूमिं स्वकुलस्य वृत्तिम् ॥ त्यक्त्वाऽवसद्विठ्ठलपत्तनेऽस्मिन्नाराधयन् विठ्ठलपादपद्मम् ॥ ४ ॥

जे काशीनाथ श्रीपांडुरंगाची सेवा करावी अशा हेतूनें आपली जन्मभूमि जो धारूर गांव आणि वडिलोपार्जित जी ज्योतिषीवृत्ति ती सोडून पंढरपूर क्षेत्रामध्यें श्रीपांडुरंगाची आराधना करीत वास करिते झाले ॥ ४ ॥

तदंगसंभवेनेदं धर्मशास्त्रस्य पुस्तकम् ॥ धारूरकरोपाव्हेन रचितं विठ्ठलेन वै ॥५॥

त्या काशीनाथाचा पुत्र, धारूरकर हें ज्याचें उपनांव आहे असा जो विठ्ठल त्यानें हें प्रायश्चित्तव्यवहारप्रकाश पुस्तक रचिलें ॥ ५ ॥

## ग्रंथकर्त्याची प्रार्थना.

मान्यान्मात्सर्यरहितान् सदाचारयुतान् बुधान् ॥ मुहुर्मुहुः प्रणम्याहं प्रार्थयामि कृतांजलिः ॥ १ ॥ अमानुक्तं दुरुक्तं या मतेर्मांद्याच्छ्रुतस्य या ॥ यत्नेन पूरणीयं तद्विशोध्यं च विचक्षणैः ॥ २ ॥

पूज्य आणि निर्मत्सर, सदाचारसंपन्न अशा विद्वान् मंडळीला हात जोडून वारंवार अशी प्रार्थना करितों कीं, माझ्या मंदबुद्धीमुळें अगर अध्ययनाच्या मालिन्यामुळें या ग्रंथामध्यें जें सांगितलें नसेल अथवा चुकून पडलें असेल तें विद्वज्जनांनीं पूर्ण करून त्यांत आणि तें मना दुरुस्त करावें ॥ १ ॥ २ ॥

शालिवाहनभूपस्य व्योमाग्निवसुभूमिते ॥ वत्सरे चैत्रपंचम्यां ग्रंथोयं च समापितः ॥ १

हें पुस्तक शालिवाहन शके १८३० चैत्र शुद्ध पंचमी दिवशीं पूर्ण झालें ॥ १ ॥

श्रीरुक्मिणीवल्लभपादचिंतनाद्भूदिदं पुस्तकमल्पकं मे ॥ अतो हि तत्रैव समर्प्यते मया स्वकारणे कार्यलयस्तु जायते ॥ २ ॥

हें पुस्तक श्रीपांडुरंगपादचिंतनानें पूर्ण झालें ह्मणून मी त्या श्रीपांडुरंगाच्या चरणारविंदाचे ठायींच अर्पण करितों. कारण जें कार्य ज्या कारणापासून उत्पन्न होतें, तें त्याच कारणाचे ठायीं लीन होतें असें आहे ॥ २ ॥

अनेन प्रीयतां देवो विठ्ठलः प्रणतार्तिहा ॥ दयां करोतु जननी रुक्मिणी भक्तवत्सला ॥ ३ ॥

सर्व देवांचा ईश, भक्तांविषयीं परम दयाळु असा श्रीपांडुरंग या माझ्या कृत्यानें संतुष्ट होवो आणि शरणागताच्या पीडेचा नाश करणारी जगज्जननी श्रीरुक्मिणी देवी माझे ठायीं दया करो ॥ ३ ॥

इति श्रीघ रूरकरेत्युपनामकमौहूर्तिककुलावतंससोमाध्वरयाजिदुर्गादाससुनविद्वन्मुकुटहीरकांकुरान्नसत्रप्रदानार्जितसुकृतव्रातदीनानाथसुतपौंडरीकक्षेत्र निवासिश्रीपांडुरंगचरणारविंदनिविष्टचेतोवृत्तिदाजीबापरपर्यायकाशीनाथसुनविठ्ठलेन विरचिते प्रायश्चित्तव्यवहारप्रकाशाख्यग्रंथे चतुर्थभागः समाप्तः ॥

॥ श्रीपांडुरंगार्पणमस्तु ॥

॥ श्री ॥

॥ श्री शुभंभवतु ॥


समाप्त.

श्रीपांडुरंग प्रसन्न

# प्रायश्चित्त व्यवहार प्रकाश

या ग्रंथास ज्या ज्या सद्गृहस्थांनीं उदार अंतःकरणानें मदत
केली त्यांची नावें,

श्रीमती राणी पार्वती बाईसाहेब गाईकवाड यांनी पंचविस रुपये मदत केली

## बार्शी येथील मंडळी,

श्री. रा. रा. भगवत आपाजी महाजन

श्री. रा. रा. दामोदरराव रायचुरकर

श्री. रा. रा. रामचंद्र उर्फ भाऊ साहेब साने वकील

श्री. रा. रा. रामचंद्र बाळकृष्ण वैद्य

श्री. रा. रा. शिवजीभाई मुरारजी शेटजी

## सोलापूर

श्री. रा. रा. आपा साहेब वारद

श्री. रा. रा. चंद्रया हनमया वचेवार

श्री. रा. रा. भवानराम शे. मारवाडी

वे. रा. रा. रघुनाथ श्यामजी

श्री. रा. रा. शेट उद्भाइ मारवाडी

या सर्व आश्रयदात्या सद्गृहस्थास श्रीपांडुरंग चिरायु आणि सुखी करो.

# उपयुक्त धर्मशास्त्र संग्रह.

## मराठी भाषांतरासहित आवृत्ति दुसरी.

हें पुस्तक आबालवृद्धांचे उपयोगीं पडण्यासारखें सुलभ झालें आहे. या पुस्तकांत व्यवहारास लागणारे धर्मशास्त्राचे अजमासें १००० विषय आणि ज्योतिषशास्त्राचे ५०० विषय यांचा संग्रह केला आहे. या पुस्तकाच्या संग्रहानें व्यवहारास लागणाऱ्या धर्मशास्त्राची व ज्योतिषशास्त्राची बिलकूल अडचण पडणार नाहीं तसेंच शास्त्राज्ञानामुळें एखादें कांहीं कर्म उलट होण्याचा संभव असतो तोही दूर होईल.

शहरवासी लोकांस सामान्य शास्त्रार्थ विचारण्यास दुसऱ्याची जरूर लागणार नाहीं. आणि खेडेगांवचे लोकांस सहजी धर्मशास्त्री अथवा ज्योतिषीबुवा बनण्यासारखें हें पुस्तक झालें आहे. आरंभीं धर्मसिंधु, निर्णयसिंधु, पुरुषार्थचिंतामणी, कालमाधव, स्मृत्यर्थसंग्रह इत्यादि ग्रंथांचे आधार संस्कृतांत दिले असून खालीं त्यांचें मराठी भाषांतर अशा रचनेनें या ग्रंथाचे चार भाग केले आहेत.

पहिले भागांतः—वार्षिकमासाचे ठायीं येणारे उत्सवसणादि दिवस यांचा (वर्षप्रतिपदा, गौरी, रामनवमी, हनुमज्जयंती, अक्षय्यतृतीया, वटसावित्री, पौर्णिमा याप्रमाणें वर्षांतील जे सर्व मुख्य मुख्य दिवस) यांचा निर्णय सांगून पुढें अनियमित दिवस जसे संकटचतुर्थी, स्मार्त-भागवत-वैष्णवएकादशी, प्रदोष, मासशिवरात्र, तसेच ग्रहणादि यांचा निर्णय सांगितला आहे.

दुसरे भागांत—गर्भाधानादि षोडश संस्कार, तसेंच नित्यकर्म (स्नान, संध्या, पूजादि आन्हिक) यांचा विचार सांगितला आहे.

तिसरे भागांत—विवाहोपनयनगर्भाधानादिसंस्कारास मुहूर्त, तसेंच गांवास जाण्यास वगैरे मुहूर्त व उपयोगास लागणारें ज्योतिष याचा संग्रह केला आहे.

चवथे भागांत—श्राद्धाधिकारनिर्णय, जीवत्पितृकाधिकार, श्राद्धसंपात, श्राद्धोपयोगी पदार्थ यांचा विचार, जननाशौच, मृताशौच, अंत्येष्टी आणि संन्यास यांची माहिती सांगून ग्रंथ संपविला आहे. या पुस्तकाचा संग्रह केला असतां इतरधर्मशास्त्राचे ग्रंथ व ज्योतिषशास्त्राचे ग्रंथ पाहण्याची बहुतकरून जरूर लागणार नाहीं.

या पुस्तकास श्रीमज्जगद्गुरु शंकराचार्य यांचा अभिप्राय मिळाला आहे तसेच मुंबई येथील महामहोपाध्याय भीमाचार्य झळकीकर, महामहोपाध्याय राजाराम शास्त्री बोडस, डॉक्टर रामकृष्ण गोपाळ भांडारकर अशा मोठमोठ्या विद्वान् लोकांचे अनुकूल अभिप्राय मिळाले आहेत. हें पुस्तक मोठ्या मेहनतीनें लोकोपयोगार्थ मुद्दाम तयार केलें आहे.

या पुस्तकाचीं पृष्ठें अनुक्रमणिकेसुद्धां ५०० आहेत, किंमत रुपये दोन शिवाय टपाल खर्च ।= पडेल.

पंढरपूर.

विठ्ठल दाजीशास्त्री धारूरकर.